

# कादंबरीमय पेशवाई

३

## पेशवाईचें ध्रुवदर्शन

लेखक

विठ्ठल वामन हडप

१९[illegible]



किं. १॥ रुपया

परचुरे पुराणिक आणि मं.
मुंबई नं. ४

# थोडेंसें हितगुज

'पेशवाईचें ध्रुवदर्शन' ही 'कादंबरीमय पेशवाई'मधील तिसरी कादंबरी पूर्वसंकल्पानुसार आज प्रसिद्ध होत आहे. पेशवाईचे आद्य-संस्थापक बाळाजी विश्वनाथ भट हे जंजिऱ्याच्या हिंदुद्वेष्ट्या सिद्दीच्या अमानुष जुलमाला विटून परागंदा होऊन देशावर आले; एथपासून तों पुढें त्यांच्या भाग्योदयाला सुरवात कशी झाली, मराठशाहीच्या चिरस्थायित्वासाठीं त्यांनीं मनोभावानें कसकसे आटोकाट प्रयत्न केले, तसेंच छत्रपति शाहूमहाराजांची दिल्लीच्या बादशाही कैदेंतून मुक्तता होऊन ते दक्षिणेंत आले तेव्हां तेच खरे मराठशाहीच्या गादीचे मालक हें स्मरून, राजाराममहाराजांची विधवा राणी ताराबाई राजसत्तेच्या अघोर तृष्णेला बळी पडून शाहूमहाराजांच्या हातीं राज्याधिकार सोंपविण्याला तयार नसतां, व ती शाहूमहाराजांना जनतेचें आणि मराठशाहींतील तेव्हांच्या कार्यकारी पुरुषांचें पाठबळ मिळूं नये म्हणून महाराजांविरुद्ध नानापरींचीं हीन कारस्थानें रचीत असतांही एकंदर देश-काल-परिस्थिति ध्यानीं घेऊन शाहूमहाराजांचा सत्पक्ष ओळखून त्यांना छत्रपतिपद प्राप्त करून देण्याच्या कामीं मुख्यतः याच एका निष्ठावंत व पराक्रमी पुरुषाचे प्रयत्न कसे उपयोगीं पडले, एथवरचा इ. सन १७०८ पर्यंतचा ऐतिहासिक कथाभाग 'पेशवाईचें पुण्याहवाचन' आणि 'पेशवाईची प्राणप्रतिष्ठा' ह्या 'कादंबरीमय पेशवाई'मधील पहिल्या दोन कादंबऱ्यांत आला आहे. त्यानंतर इ. सन १७१३ मध्यें बाळाजी विश्वनाथांना पेशवाईचीं वस्त्रें मिळेपर्यंत शाहूमहाराजांच्या पहिल्या चारपांच वर्षांच्या कारकीर्दींत मराठशाहीच्या आयुष्यांत काय काय घडामोडी झाल्या, हा प्रस्तुत कादंबरीचा वर्ण्य विषय आहे.

वस्तुतः पेशवाईचा खरा प्रारंभ बाळाजी विश्वनाथांना पेशवाईचीं वस्त्रें मिळाल्यापासूनच होतो, व तेथपासूनचा पेशवाईचा ऐतिहासिक कथाभाग 'कादंबरीमय पेशवाई'मधील 'पेशवाईचा ध्रुव ढळला !' ह्या चौथ्या कादंबरीपासून निरूपिला जाईल. अर्थात् आजवरच्या तीन कादंबऱ्या हा पेशवाईच्या कथेचा पूर्वरंग होय. ह्या पूर्वरंगाचें इतक्या विस्तृतपणें निरूपण

करण्याचें कारण असें कीं, 'बाळाजी विश्वनाथांना पेशवाई कां मिळाली ?' हा प्रश्न 'बाळाजी विश्वनाथांना पेशवाई मिळाली' ह्या ऐतिहासिक सत्याबरोबरच जिज्ञासु वाचकांच्या मनांत उभा राहणें अपरिहार्य आहे. त्या प्रश्नाचें सांगोपांग उत्तर दिल्याशिवाय पेशवाईच्या कथानिरूपणाला मीं प्रारंभ केला असता, तर पेशवाईच्या उगम-उत्कर्ष-अपकर्षांचें रहस्य ओळखण्याला वाचकांना व तें रहस्य वाचकांच्या मनावर बिंबविण्याला मलाही अत्यंत अवघड गेलें असतें. एकाद्या इमारतीची मजबुती अजमावून पाहतांना शिल्पशास्त्रज्ञ त्या इमारतीचा पाया किती खोल आहे, तो मजबूत आहे किंवा नाहीं, वगैरे गोष्टी प्रथम पायाजवळची जमीन खणून पाहतो; नुसत्या इमारतीच्या वरच्या डामडौलावर किंवा नवेजुनेपणावर विसंबून राहात नाहीं. हाच न्याय 'कादंबरीमय पेशवाई'च्या लेखनाला लावून मीं आजवरच्या तीन कादंबऱ्यांत पेशवाईच्या पायाची खोली व मजबुती अजमावून पाहिली व अशा मजबूत पायावर पेशवाईचें मंदिर उभारलें गेलें आहे, याचें यथावत् स्वरूपांत दिग्दर्शन केलें. अगदीं प्रथम जेव्हां मी चिकित्सक-बुद्धीनें पेशवाईच्या इतिहासाचें वाचन मनन-निदिध्यास करूं लागलों, तेव्हां (१) शिवाजीमहाराजांच्या वेळेपासून छत्रपतींच्या प्रधानमंडळांत कोणी ना कोणी पेशवा ऊर्फ मुख्य प्रधान असतांना त्या त्या पेशव्याच्या कारकीर्दीला 'पेशवाई' हें नांव कां पडलें नाहीं ? (२) शाहूमहाराजांच्या पदरींही बहिरोपंत पिंगळे हा पेशवा असतांना महाराजांनीं बहिरोपंतांकडील पेशवाईपद काढून तें बाळाजीपंतांनाच कां दिलें ?—असे अनेक महत्त्वाचे प्रश्न माझ्यासमोर उभे राहिले, व ते प्रश्न सोडविल्याशिवाय मला पेशवाईच्या उत्पत्ति-स्थिति-लयाचा मुख्य प्रश्न सोडवितांच येईना. ही जी माझी अडचण, तीच पेशवाई-इतिहासाच्या जिज्ञासु अभ्यासूंची अडचण होय, हें ओळखून मीं 'कादंबरीमय पेशवाई'मधील पहिल्या तीन कादंबऱ्यांत पेशवाईची भूमिका तयार करून घेतली आहे.

'कादंबरीमय पेशवाई'चें निरूपण करावयाला मीं 'पुण्याहवाचन'पासून सुरुवात केली. तेव्हां 'पुण्याहवाचन'च्या 'हरिः ॐ'मध्यें मीं माझ्या कार्याची रूपरेखा आंखून ध्येयनिश्चिति केली असल्यानें त्याच त्या गोष्टींचा पुनरुच्चार करण्याचें तादृश कारण नाहीं. तरीही त्या रूपरेखेंत व ध्येयनिश्चितींत अंतर्भूत असणाऱ्या एका गोष्टीचा खुलासा करणें अवश्य आहे. ती गोष्ट अशी कीं,

भूतकाळच्या इतिहासावर असें कथावाङ्मय निर्माण करतांना लेखकानें वर्तमान व भविष्य ह्या दोन्ही काळांविषयीं उदासीन रहावें किंवा कसें ? तसेंच त्याला तसें उदासीन राहतां येणें तरी शक्य आहे किंवा कसें ? गतकाळाचें अवलोकन आपण कशासाठीं करतों ? गतगोष्टींचे इतिहास कशासाठीं वाचतों ? तर भूतकाळीं आपण कसे होतों व वर्तमानकाळीं कसे आहों हें जाणण्यासाठीं. पण आम्ही काल होतों कसे व आज आहों कसे हें जाणून तरी काय करावयाचें ? अर्थात् भूत-वर्तमान-भविष्य अशा ह्या त्रिकालात्मक दीपप्रकाशांत आपण मार्गाच्या मार्गानेंच जात आहों, कीं आपला रस्ता चुकला आहे हें पहावयाचें, व आपलें चुकत असेल तर चुकतें कोठें व तें सुधारावयाचें कसें हें ठरवावयाचें. अंधाऱ्या रात्रीं मार्गानें चालावयाचें तर प्रकाश अवश्य पाहिजे, आणि त्या प्रकाशाच्या साह्यानें चालावयाचें झालें तरी मार्ग अवश्य माहीत पाहिजे. हा मार्ग आपणाला गतकाळाचें पर्यालोचन केल्याशिवाय बिनचूक सांपडावयाचा नाहीं. आपला वर्तमानकालीन आयुष्यक्रम हा भूतकालीन आयुष्यक्रम व भविष्यकालीन आयुष्यक्रम यांचा सांधा आहे. एथून आपणाला पुढें जावयाचें—प्रगतीचें शिखर गांठावयाचें आहे, व गतकाळाच्या इतिहासाचा दीप हातीं घेऊन चालावयाचें तें एवढयासाठीं.

पण एवढ्यावरच संपलें नाहीं; महत्त्वाचा प्रश्न तो पुढेंच आहे. गतकाळाच्या इतिहासाचा दीप वर्तमानकाळीं उजेडासाठीं हातीं घ्यावा याविषयीं दुमत सहसा होणार नाहीं. पण तो दीप आहे तसा जुन्यापुराण्या स्थितींत हातीं धरून जर आपण चालूं लागलों तर ह्या बदललेल्या काळांत त्या दीपाची ज्योत पावलोपावलीं बदलणाऱ्या परिस्थितीच्या सोसाट्याच्या वाऱ्यांत किंवा मुसळधार पावसांत विझली जाऊं नये, यास्तव ज्या काळीं—ज्या ऋतूंत तो दीप पाजळावयाचा, त्या काळीं-त्या ऋतूंत दीपाची ज्योत अभंग तेवत राहील अशी खबरदारी घ्यावयाला नको काय ? गतकाळांतील ऐतिहासिक सत्यें जर वर्तमानकाळांतील जनतच्या मनाला पटवून द्यावयाचीं, तर जेथें आवश्यक व सहज सुलभ असेल तेथें भूतकाळाशीं वर्तमानकाळाची सांगड घालावयाला नको काय ? वस्तुतः तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें पहातां ह्या जगांत नवीन असें कांहींच नाहीं. इतिहासाची पुनरावृत्ति होत असते असें आपण म्हणतों, तो सिद्धान्त इतिहासाप्रमाणेंच वस्तुमात्राला—व्यक्तिमात्राला—

कल्पनामात्राला लावतां येण्यासारखा आहे. एवढें कशाला ! सत्य-नित्य-चिरंतन अशा परमेश्वराला तर ह्या उत्पत्ति-स्थिति-लयाचा निर्बंध बंधनकारक नाहींना ? तरी पण त्यालासुद्धां साधूंच्या परित्राणासाठीं व दुष्कृतांचा विनाश करण्यासाठीं युगोयुगीं अवतार धारण करतांना अमोघ कालौघानुसार भिन्न भिन्न अवतार धारण करावे लागतात. याच न्यायानें वर्तमान परिस्थितींत कोणतीही गोष्ट सांगावयाची किंवा करावयाची झाली तरी ती सद्यःस्थितीशीं सुसंगत अशा स्वरूपांत केल्यानें किंवा सांगितल्यानेंच जास्त परिणामकारक व उपयुक्त होते.

ऐतिहासिक अथवा पौराणिक कथाभागांचें निरूपण करतांना त्या कथा-भागावर वर्तमानकालीन देश-काल-परिस्थितीची यत्किंचित्‌ही छाया पडूं नये असें म्हणणारा एक वर्ग आहे, व वर्तमानकाळाची भूतकाळाशीं संगति लावून देण्यासाठीं वर्तमानकाळांतील भानगडीचे प्रश्न मिटविण्याच्या कामीं हितकर अशी जनतेची मनोवृत्ति बनविण्याला जर भूतकाळच्या इतिहास-पुराणांचा उपयोग होत असेल तर तसा उपयोग रूपकात्मक पद्धतीनें करून घेण्याला हरकत नाहीं, किंबहुना तसा उपयोग करून घेणें अवश्य आहे, असें म्हणणारा दुसरा वर्ग आहे. मी अर्थात्‌ ह्या दुसऱ्या वर्गाचा पुरस्कर्ता आहें, व हा मार्गच मीं 'कादंबरीमय पेशवाई'च्या कथा-निरूपणास्तव प्रारंभापासून आवश्यक तेथें अवलंबीत असून पुढेंही माझें तेंच ध्येय कायम राहील.

मात्र असें करतांना मीं इतिहासाचें अतिक्रमण केलेलें नाहीं व तसें कर-ण्याचा माझा इरादाही नाहीं. कथावाङ्मयांत रसपरिपोषासाठीं विविध काल्प-निक गोष्टींचा समावेश करावा लागतो, व ऐतिहासिक कादंबरी म्हणजे इतिहास नव्हे हें जरी खरें, तरी मीं ह्या सवलतीचा निरंकुशतेनें अवास्तव फायदा घेत नाहीं व घेणारही नाहीं. माझ्या कादंबऱ्यांत ऐतिहासिक व्यक्ति जेथें जेथें आल्या, तेथें तेथें मीं त्यांच्या मूळ खऱ्याखुऱ्या स्वभावचित्रांशीं व गुणदोषविशेषांशीं पूर्ण सुसंबद्धता राखूनच त्यांच्या भूमिका रंगविल्या आहेत. मात्र त्याबरोबर हेंही खरें कीं, मीं अशा ऐतिहासिक व्यक्तींचीं स्वभावचित्रें रंगवितांना कोणाही इतिहासकारांचें किंवा बखरकाराचें अंधानुकरण न करण्याचें ठरविलें आहे. याचें कारण एकतर मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें आजला तरी पुरेशीं उपलब्ध नाहींत, व जीं उपलब्ध आहेत तीं बहुतेक परस्परविसंगत अशीं

आहेत. अशा स्थितींतून बाहेर पडण्याला मार्ग म्हटला म्हणजे निर्भेळ ऐतिहासिक सत्यें जेवढीं हातीं लागतील तेवढीं घेऊन त्या पुराव्यावरून तर्कशुद्ध सूक्ष्मविवेकी विचार-पद्धतीनें तत्कालीन इतिहासाचें खरें स्वरूप ओळखणें हा होय. याच दृष्टीनें मीं 'कादंबरीमय पेशवाई'मधील आजवरच्या चार कादंबऱ्यांतून बाळाजी विश्वनाथ, ब्रह्मेंद्रस्वामी धावडशिकर, शाहूमहाराज, ताराबाई, धनाजी जाधव, चंद्रसेन जाधव, प्रतिनिधि, सचिव वगैरे व्यक्तींच्या भूमिका रंगविल्या आहेत. त्यांची इष्टानिष्टता इतिहासाशीं अजमावून पहातांना माझा कांहीं इतिहासकारांशीं कोठें कोठें क्वचित् मतभेद झालेला दिसला, तरी तो एकाच सत्य गोष्टीवर विचार करणाऱ्या दोघां व्यक्तींच्या विचारपद्धतींतील व तर्कपद्धतींतील फरक असूं शकेल, हें ध्यानीं घेऊन मूळ ऐतिहासिक सत्याशीं अशा मतभेदात्मक गोष्टी कोणींही पडताळून पाहिल्यास कोणतें बरोबर व कोणतें चूक याचा निर्णय आपोआप लावतां येईल.

ऐतिहासिक व्यक्तींविषयीं ही गोष्ट झाली; काल्पनिक व्यक्तींविषयीं विशेष सांगण्याचें कारणच नाहीं. मूळ ऐतिहासिक व्यक्तींचा व प्रसंगांचा परिपोष कथानकांत करण्यासाठीं कथानकावर कल्पनेचीं कलाकुसरीचीं कामें करावींच लागतात. प्रस्तुत कादंबरींतील इस्माईल, यशोदा वगैरे पात्रें ह्या स्वरूपाचीं आहेत. पण हीं काल्पनिक पात्रेंही तत्कालीन देशकालपरिस्थितीच्या अनुरोधानेंच रंगविण्यांत आलीं असल्यानें त्यांच्या भूमिका ह्या तरी त्या काळच्या छाया-पडछायाच होत. तसेंच दैवी चमत्कारांचे किंवा दिव्यांचे प्रसंग जेथें जेथ मीं रंगविले आहेत, तेथें तेथें ते तत्कालीन परिस्थितीशीं सुसंगत असेच रंगविले आहेत.

असो; 'कादंबरीमय पेशवाई'च्या आजवरच्या कार्याविषयीं व पुढील ध्येयाविषयीं मला एवढेंच सांगावयाचें होतें. आतां 'कादंबरीमय पेशवाई'-मधील चौथी कादंबरी

## 'पेशवाईचा ध्रुव ढळला!'

ही असून मालेच्या कादंबऱ्या दर तीन महिन्यांनीं एक याप्रमाणें प्रसिद्ध व्हावयाच्या, ह्या मालेच्या संकल्पानुसार यथाकालीं ती प्रसिद्ध होईल. या कादंबरींत बाळाजी विश्वनाथांनीं आपल्या सात वर्षांच्या पेशवाईत मराठशाही-

ला चिरस्थायी व सकल-वैभव-संपन्न करण्यासाठीं दिल्लीच्या बादशहाकडून स्वराज्याची सनद आणण्यासारखे जे अचाट पराक्रम केले ते इतर व अनेक तत्कालीन महत्त्वाचे, हृदय हलवून सोडणारे प्रसंग मनोरम कथानकाच्या द्वारा ग्रथित केले जातील.

आतां, 'कादंबरीमय पेशवाई'च्या आजवरच्या ग्रंथत्रयात्मक कार्याच्या यशस्वितेची शुभवार्ता वाचकांना जी कृतज्ञताबुद्धीनें अत्यानंदपूर्वक प्रथम सांगावयाची, ती निष्कारण आत्मप्रौढीची ठरूं नये म्हणून मी शेवटीं नमूद करून ठेवीत आहें. ती ही कीं, ह्या कार्याला प्रारंभापासूनच महाराष्ट्रीय विद्वज्जनसमाज व 'केसरी', 'श्रद्धानंद', 'महाराष्ट्र' वगैरे प्रमुख मराठी वृत्तपत्रें यांनीं मुक्तकंठानें मान्यता दर्शविली आहे. बहुजनसमाजाची तर ह्या कार्यावर सदैव कृपादृष्टि आहेच आहे. हीच सर्वांची कृपादृष्टि सदैव कायम असावी; नव्हे, शुक्लेंदुवत् वृद्धिंगत व्हावी. हें ऋण नुसत्या शाब्दिक आभारांनीं फिटण्यासारखें नसल्यानें मी तरी तसा तोंडदेखला प्रयत्न कशाला करूं !

२९० नारायण पेठ,<br>पुणें, ता. २०-४-२७.

**विठ्ठल वामन हडप**

'कादंबरीमय पेशवाई'विषयीं

# लो क म त

'आपल्या भाषेवरील प्रभुत्वाची मीं यापूर्वींच प्रशंसा ऐकिली होती व ('पेशवाईचें पुण्याहवाचन' ही कादंबरी वाचून) ती यथार्थ असल्याबद्दल माझी खात्री झाली आहे. चांगल्या कादंबरीकाराच्या भाषेंत आवश्यक असणारें वैचित्र्य व ओघ हे दोन्ही गुण आपल्या भाषेंत आढळून आले. संसाराचें व मनुष्यस्वभावाचें मार्मिक निरीक्षणही आपल्या कादंबऱ्यांत दिसून येतें. मोठ्या व गुंतागुंतीच्या संविधानकाची व्यवस्थेशीर मांडणीही दिसून येते. विनोदाची वाङ्मयाच्या आवश्यक गुणांत गणना करतां येणार नाहीं; तथापि उपरोध-मूलक विनोद आपणांस बराच साधतो. आपण यापूर्वींच अनेक कादंबऱ्या लिहिल्या असून यापुढें पेशवाईवर व साधल्यास मराठशाहीवरही कादंबऱ्यांची एक अवाढव्य सृष्टि निर्माण करण्याचा आपला हेतु आहे, हें पाहून आपलें अभिनंदन केल्याशिवाय राहवत नाहीं. आपलें अल्पवय व धमक लक्षांत घेतां तो हेतु सिद्धीस जाण्यास हरकत दिसत नाहीं. तो पूर्णपणें सिद्धीस जावो अशीच माझ्यासारख्याची इच्छा असणार'. **श्रीपाद कृष्ण कोल्हटकर,**

बी. ए., एल्एल्. बी.

रा० रा० वि. वा. हडप यांची 'पेशवाईचें पुण्याहवाचन' ही ऐतिहासिक कादंबरी समग्र वाचली. कादंबरी एकंदरीनें व्यवस्थित, परिणामकारक व वाचनीय झाली आहे....ज्या देशकालाविषयींचें सविधानक असेल, त्या देशकालाच्या परिस्थितीचें वातावरण वाचकांच्या नजरेसमोर उभें करणें आणि तत्कालीन व्यक्तींचींही, स्वभावविशेष, विचारविकार, देशभाषा वगैरे साधनांच्या द्वारें वाचकांच्या मनावर बिंबतील व तीं त्यांस-संभवनीयतेच्या दृष्टीनें—पटतील अशीं चित्रें रेखाटणें-हे जे ऐतिहासिक कादंबरीचे प्रधान हेतु ते प्रस्तुत कादंबरींत बऱ्याच अंशीं चांगले साधले आहेत असें मला वाटतें....रा० हडप यांची भाषाशैली स्वभावतःच सावेश, उत्कटतापूर्ण व शीघ्रप्रसवी व प्रसंग-विशेषीं रम्य कल्पनापूर्ण असल्यानें ती ऐतिहासिक कादंबऱ्यांना विशेष

अनुकूल आहे. तसेंच कादंबरीच्या द्वारें जें ध्येय अथवा तत्त्वें उपदेशिण्याकडे लेखकाचा मुख्य कटाक्ष आहे, त्यासंबंधाचेही उद्गार प्रसंगोपात्त अगदीं साहजिक रीतीनें आले असल्यामुळें फार परिणामकारक झाले आहेत......
प्रस्तुत कादंबरींतील दुसरा एक अभिनंदनीय विशेष म्हटला म्हणजे कथानकाचा आटपशीरपणा व तें रेखाटण्यांतील सहजरम्य सुसंगतता. एका कादंबरींत न मावण्याजोगें विस्तृत कथानक घेतल्यामुळें आणि आरंभींच्या कांहीं प्रकरणांत कुतूहलवर्धनार्थ अनेक पात्रांचा पसारा मांडून बसल्यामुळें कित्येकदां चांगल्या कसलेल्या व प्रतिभावान् कादंबरीकारासही, कादंबरीचा शेवट कसा तरी व घाईघाईनें करावा लागतो व त्या योगानें त्या रचनेंत कलांगत्वाच्या दृष्टीनें न्यूनता राहते असें आपण पुष्कळदां पहातों. रा० हडप अशा तऱ्हेच्या अनुकरणाच्या मोहास बळी पडले नाहींत आणि प्रारंभापासूनच त्यांनीं यासंबंधीं सावधगिरी बाळगिली ही फार स्तुत्य गोष्ट आहे. अशाच रीतीनें त्यांनीं सोत्साह काळजीपूर्वक अधिकाधिक प्रगति केल्यास ऐतिहासिक कादंबऱ्यांच्या वाङ्मयांत त्यांच्या हातून अभिनंदनीय व चिरस्थायी महत्त्वाची भर पडेल अशी अपेक्षा करणें विफल होणार नाहीं असा मला भरंवसा वाटतो.

प्रो० श्रीकृष्ण नीलकंठ चापेकर,
एम्. ए., एल्एल्. बी.

श्री० वि. वा. हडप यांनीं लिहिलेली 'पेशवाईचें पुण्याहवाचन' ही कादंबरी वाचून मला फार आनंद झाला सामान्य जनतेंत इतिहासाचा प्रसार करून त्यांच्या पूर्वजांविषयीं व पूर्ववैभवाविषयीं अभिमान व आदर उत्पन्न करण्यास ऐतिहासिक कादंबरी हेंच योग्य साधन आहे. पेशवाई ही शिवशाहीनंतरची स्वाभाविक क्रमप्राप्त पायरी होय. मराठी इतिहासांतील या उत्तरार्धाचें ज्ञान २०–२५ तरी ऐतिहासिक कादंबऱ्या लिहून सामान्य जनतेंत प्रसृत करण्याचा श्री० हडप यांचा संकल्प आहे व तो अत्यंत स्तुत्य आणि देशहितैकदृष्टीचा आहे. त्यांच्या संकल्पाचा ओनामा भावी यशाविषयीं उत्साह व आशा उत्पन्न करणारा आहे याविषयीं मुळींच संदेह नाहीं.

प्रो० नारायण केशव बेहेरे,
एम्. ए., बी. एस्सी., एल्. टी.

**पेशवाईचें पुण्याहवाचन व पेशवाईची प्राणप्रतिष्ठा**—बाळाजी विश्वनाथाच्या हस्तें पेशवाईची प्राणप्रतिष्ठा झाल्यापासून पेशवाईच्या अखेरपर्यंतचा मराठी इतिहास कादंबरीरूपानें 'कादंबरीमय पेशवाई' या मालेंत श्री० वि. वा. हडप यांनीं ओंवण्याचा संकल्प केला असून वरील दोन कादंबऱ्या त्या मालेंतील पहिलीं दोन पुष्पें होत. श्री० हडप मराठींतील एक चटकदार लेखक म्हणून प्रसिद्ध आहेत, व प्रस्तुतच्या दोनही कादंबऱ्यांत त्यांनीं लेखक या नात्याचें आपलें महत्त्व कायम राखिलें आहे. मराठी इतिहासाचे सामान्यतः दोन भाग केल्यास दुसऱ्या भागाचा प्रारंभ पेशवाईच्या स्थापनेपासून होतो. शिवछत्रपतींची स्वराज्याविषयींची व्यापक कल्पना सत्यसृष्टींत याच काळांत आली. अर्थात् हा सर्वच इतिहास मनोरम असल्यानें तो जितक्या विविध स्वरूपांत वाचावयास सांपडेल तितकी त्याजविषयींची भूक वाढतच जाते. 'पेशवाईचें पुण्याहवाचन' या कादंबरींत कोंकणपट्टींत हिंदुसमाजावर सिद्दि-जोहारानें कसे अमानुष जुल्म केले व त्या जुलुमांमुळें श्रीवर्धनच्या देश-मुखांना देशत्याग कसा करावा लागला, या गोष्टी कादंबरीकारानें चांगल्या प्रकारें मांडल्या असून महाराष्ट्रीय ललनांत स्वाभिमानाचें तेज कसें होतें ही गोष्ट गौरीच्या द्वारें, हिंदु समाजांतील स्त्रिया पतींना दैवत समजतात हें सारजेच्या उदाहरणावरून उत्तम प्रकारें दाखविलें आहे. भार्गवस्वामी ( ब्रह्मेंद्रस्वामी ) हे शाहू, बाळाजी विश्वनाथ व बाजीराव यांचे गुरु असल्यानें पेशवाईच्या स्थापनेस ते अंशतः कसे कारणीभूत झाले हेंही कादंबरीकारानें चांगल्या रीतीनें दाखविलें आहे. भार्गवस्वामींचीं प्रकरणें व कारस्थानें वाचीत असतां उषःकालांतील समर्थांची आठवण एकसारखी होते....

**पेशवाईची प्राणप्रतिष्ठा**—या कादंबरींत ताराबाईचीं कारस्थानें, सेनापति धनाजी जाधवचा पुत्र चंद्रसेन जाधव याचा कुटिलपणा, बाजीराव, पिराजी, मुक्ता यांचा बाणेदारपणा इ. गोष्टी चांगल्या प्रकारें रेखाटल्या आहेत. कादंबऱ्या वाचनीय आहेत. —केसरी, ता ८।२।२७

**पेशवाईची प्राणप्रतिष्ठा**—श्री० हडप यांच्या आजपर्यंतच्या अनेक कादंबऱ्यांवरून ते महाराष्ट्रास परिचित आहेत. आजपर्यंतचे त्यांचे वर्ण्य विषय निराळेच होते; परंतु या कादंबरींत त्यांनीं मराठ्यांच्या एका मोठ्या

महत्त्वपूर्ण ऐतिहासिक कालाचें चित्र रेखाटण्याचा स्तुत्य प्रयत्न केला आहे. व यापुढेंही ते पेशवाईचा सर्व काळ कादंबरीच्या मनोरम दर्पणांतून दाखविण्यास बद्धवचन झाले आहेत. ही कादंबरी शाहूमहाराज मोगलांच्या कैदेंतून सुटून परत आले, त्या वेळच्या काळाला अनुसरून लिहिली आहे....श्री० हडपांची भाषा जोरकस, वर्णनें चित्ताकर्षक व भावना देशभक्तिपूर्ण आहेत. ......देशाभिमानी वाचकवर्गानें ही कादंबरी अवश्य वाचावी अशी आमची विनंती आहे. —श्रद्धानंद, ता. १७।२।२७

कादंबरीमय पेशवाई—सदर मालेपैकीं पहिली कादंबरी 'पेशवाईचें पुण्याहवाचन' ही असून प्रतिभासंपन्न लेखकाच्या कुशल लेखणीनें, इतिहासाचें हृदयवेधक शब्दचित्र उठावदार रीतीनें रंगविलें आहे; व प्रत्येक पात्राचा स्वभावपरिपोषही पूर्णांगानें झालेला आहे. दुसरी कादंबरी 'पेशवाईची प्राणप्रतिष्ठा' तर पहिल्या कादंबरीपेक्षांही इतिहास या दृष्टीनें सरस झाली असून कथानकाची रचना स्फूर्तिप्रद आणि चटकदार झाली आहे. जोत्याजी, मुक्ता आणि पिराजी हीं पात्रें पहिल्या कादंबरींतील गिरिजा व तानाजी या कामसू पात्रांप्रमाणेंच आपला रंग खुलवून दाखवीत आहेत. आणि त्यामुळेंच तिसरी कादंबरी 'ध्रुवदर्शन' ही केव्हां वाचायला मिळेल अशी प्रत्येकाला उत्सुकता वाटणार आहे. —सद्बोधचंद्रिका

# सिंहावलोकन

परमेश्वरी घटनासूत्राचे धागेदोरे मानवी कल्पनाशक्तीच्या आटोक्या-बाहेरचे असतात. बाळाजी विश्वनाथांच्या हातूनच हिंदवी-स्वराज्याचा पुनरुद्धार व्हावा अशी परमेश्वरी घटना होती म्हणूनच ते जंजिऱ्याच्या सिद्दीच्या अंमलांत श्रीवर्धन येथें देशमुखी करीत असतां सिद्दीच्या जुलमी व हिंदद्वेषी झोटिंगपातशाहींत त्यांच्यावर अशीं पर्वत-प्राय संकटें कोसळलीं कीं, त्यांमुळें त्यांना आपल्या वित्तसर्वस्वाला मुकून मायदेशाला सोडून वणवण करीत देशावर यावें लागलें. हिंदूंचीं देवालयें जमीनदोस्त करून तेथें मशिदी उभारणें, कुलवान् हिंदु ललनांची अब्रू घेणें, हिंदु रयतेला सर्रास छळणें, बाटविणें, असले अमानुष प्रकार आजवर आपणांवर कोणत्या यवन सत्ताधाऱ्यांनीं केले नाहींत, तर तो जंजिऱ्याचा सिद्दी तरी तसें केल्याशिवाय कसा राहील ? गझनीच्या महमुदानें सोमनाथाचें मंदिर उध्वस्त करण्यापासून हिंदुधर्म व हिंदुबांधव यांना नामशेष करण्याला सुरुवात केली. तैमुरलंगानें हिंदुस्थानावर स्वारी करून हिंदुधर्माचा व हिंदुराजसत्तेचा परोपरीनें विध्वंस तर केलाच, पण त्याबरोबरच असंख्य हिंदु पुरुष, म्हाताऱ्या-कोताऱ्या बायका आणि मुलें यांची लांडगेतोड करून असंख्य तरुण व रूपवान् हिंदु ललनांना मुसलमानांच्या दासी-बटकी करून सोडलें. अल्लाउद्दीन खिलजीनें तर आपल्या पाशवी विषयवासनांना सौंदर्य-संपन्न व पतिव्रताधर्मी हिंदु राजस्त्रियांचा बळी घेण्याच्या राक्षसी महत्त्वाकांक्षेनें व धनवैभवाच्या अनिवार लोभानें अनेक हिंदु राज्यें त्यांच्या हिंदुत्व-सर्वस्वासह धुळीला मिळविलीं ! मेवाडभूपति राजा भीम-सिंहाची त्रिभुवनविख्यात सौंदर्यवती राणी सती पद्मिनी हिला आपली पट्टराणी करण्याच्या अट्टाहासानें त्यानें मेवाडचा धुव्वा उडविला ! गुजराथचा राजा कर्णराय याची राणी कमलादेवी व कन्या देवलदेवी यांच्या लावण्याची कीर्ति ऐकून त्यानें गुजराथेवर स्वारी केली व कर्ण-

रायाला ठार करून कमलादेवीला आपली राणी आणि देवलदेवीला आपली सून करून सोडलें ! अकबर बादशहा जो एवढा मोठा धर्मात्मा म्हणून गाजला गेला, त्यानें तरी ठायीं ठायीं हिंदुत्वाचा काय कमी गळा कापला ! औरंगजेबासारख्या कडव्या मुसलमानांनीं धर्मवेडाच्या भरांत हिंदूंना उघड उघड तरी छळलें; पण अकबरानें धर्मैक्याच्या सोनेरी सबबीखालीं हिंदुधर्माला हतबल करण्याचे प्रयत्न केले. इतर अत्याचारी मुसलमान सत्ताधीशांनीं कुलीन सौंदर्यवती हिंदु ललनांवर उघड उघड पापी दृष्टि ठेवून त्यांना बाटवून भ्रष्ट केलें, तर अकबरानें परस्परसलोख्याच्या राजकारणाच्या दिखाऊ अलंकारांनीं आपल्या पापी विषयवासनांचें हिडीस स्वरूप झांकून जोधबाईसारख्या रजपूत कुमारिकांना राणीपदाचें मिष दाखवून जन्मांतून उठविलें. हिंदूंचा इतर मग्रूर अविंधांनीं तलवारीनें गळा कापला, तर ह्या मानभावी अविंधानें केंसानें गळा कापला ! हिंदूंच्या उरीं सुरी खुपसावयाची ती खुपसावयाचीच, पण इतर अविंधांप्रमाणें पोलादी सुरी न खुपसतां सोन्याची सुरी खुपसावयाची; हिंदुत्वाचा जीव तर घ्यावयाचा, पण वाघाप्रमाणें एकदम त्याच्या नरडीचा घोट न घेतां अस्वलाप्रमाणें त्याला गुदगुल्या करकरून त्याला हांस हांस हंसवून त्याचा जीव घ्यावयाचा; असा आजवर हिंदुस्थानावर राज्य करून गेलेल्या अविंधांत धर्मात्मा-महात्मा म्हणून गाजलेल्या अकबराचा अजब कावा होता. मग इतरांची गोष्ट कशाला!

जगाच्या इतिहासांत जेथें जेथें मुसलमानांनीं आपलीं राज्यें स्थापन केलीं, तेथें तेथें परधर्मीयांवर धार्मिक जुलूम केला नाहीं, त्यांच्या देवदेवालयांचा विध्वंस केला नाहीं, त्यांच्या स्त्रियांच्या अब्रूवर घाला घातला नाहीं व अन्यायानें त्यांचें वित्त हरण केलें नाहीं, असें एकही स्थान सांपडावयाचें नाहीं. मग जंजिऱ्याचा सिद्दी तरी मुसलमानांच्या ह्या अमानुष जुलमीवृत्तीला अपवाद कसा असणार ! तशांत बाळाजी विश्वनाथांच्या वेळचा जंजिऱ्याचा सिद्दी कासीम म्हणजे तर मूर्तिमंत दुरात्मा ! त्याच्या अमदानींत अंजनवेलच्या मुसलमान किल्लेदारानें

अंजनवेलींतील गौरी नांवाच्या एका नवयौवनसंपन्न मराठा वीरपत्नी-
ला तिच्याच गोतावळ्यांतील 'कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ' अशा
तिच्या मेहुण्याच्या–रणधीररावाच्या–साह्यानें पकडून सिद्दीच्या जनान-
खान्यांत कोंबण्याचा डाव रचला, व त्याप्रीत्यर्थ करूं नये तसलीं
अनेक अनन्वित कृत्यें केलीं. गौरीला पकडून नेतांना बाळाजी विश्वनाथ
व त्यांचे वडील बंधु जानोजी विश्वनाथ नेमके परमेश्वरानें पाठविल्या-
सारखे अचानक अंजनवेलच्या खाडीवर येऊन पोंचले. त्यांनीं हर-
उपायांनीं गौरीला त्या काळांच्या जबड्यांतून ओढून काढलें. सिद्दीला
याबद्दल अत्यंत संताप येऊन त्यानें जानोजीपंतांना गोणत्यांत बांधून
समुद्रांत बुडवून ठार मारलें, व बाळाजीपंतांसह त्यांच्या सर्वस्वावरून
नांगर फिरविण्याचा डाव रचिला. पण सत्याचा वाली परमेश्वर असल्यानें
बाळाजीपंतांनीं आपला परिवार व वेळासचे त्यांचे ऋणानुबंधी स्नेही त्रिवर्ग
भानु यांसह रातोरात देशत्याग केला. हा एवढा अनर्थपात कां झाला
याचा बाळाजीपंतांना उलगडा होईना, तेव्हां त्या काळीं अंजनवेली-
जवळील भार्गवगुंफेंत गुप्त रूपानें वास्तव्य करणारे व शाहूमहाराजांच्या
काळीं साताऱ्याजवळ धावडशीला वास्तव्य करूं लागल्यावर ब्रह्मेंद्र-
स्वामी ह्या नांवानें त्रिभुवनविख्यात होऊन पेशवाईच्या ऐन अमदानीं-
त हिंदवी-स्वराज्याच्या हितासाठीं काया-वाचा-मनानें झटणारे महात्मे
प्रथमपासूनच अंतर्ज्ञानानें भविष्यकाळांतील महाराष्ट्राचें भवितव्य
ओळखून ह्या कारस्थानाच्या मुळाशीं एकजीवित्वानें वावरत होते,
त्यांनीं बाळाजीपंतांना दर्शन देऊन 'आज तुझ्या देशत्यागांत देवाच्या
दरबारीं तुझ्या नांवानें भावी पेशवाईचें पुण्याहवाचन ठेवलें गेलें आहे'
असें त्यांच्या भावी भाग्योदयाचें रहस्य त्यांना उलगडून सांगितलें.

स्वामींच्या आशीर्वादानें पुनित होऊन बाळाजीपंत आपलें नशीब
काढण्यासाठीं परिवारासह देशावर आले, ते यशाचा पल्ला गांठतां
गांठतां ताराबाईच्या कारकीर्दींत मराठ्यांचा सेनापति धनाजी जाधव
याच्या पदरीं येऊन चाकरीला राहिले. त्यांनीं आपल्या अप्रतिम बुद्धि-

चातुर्याच्या व पराक्रमाच्या जोरावर धनाजीला हां हां म्हणतां आपलासा करून घेतलें. धनाजी बाळाजीपंतांवर इतका खूष झाला कीं, त्याला पोटचा पराक्रमी मुलगा चंद्रसेन जितका प्रिय वाटत नव्हता, तितके बाळाजीपंत प्रिय वाटूं लागले. चंद्रसेन पराक्रमी होता पण दुरात्मा होता, त्यामुळें धनाजीनें राजकारणाच्या अनेक भानगडींत चंद्रसेनापेक्षां बाळाजीपंतांवरच जास्त विश्वास टाकावा. त्यामुळें चंद्रसेनाच्या मनांत बाळाजीपंतांविषयीं वैषम्य उत्पन्न झालें. पुढें शाहूमहाराजांची सुटका झाली व ते महाराष्ट्रांत यावयाला निघाले, तेव्हां ताराबाई आपल्या अघोर राज्यतृष्णेला बळी पडून शाहूमहाराजांचा मराठ्यांच्या गादीवरील वारसा नाशाबीत करण्यासाठीं 'शाहू तोतया आहे', 'शाहू बाटगा आहे', 'शाहू बादशहाचा हेर आहे', अशा नाना प्रकारच्या खोड्यानाळ्या कंड्या पिकवूं लागली. शाहूमहाराजांच्या खरेखोटेपणाचा निर्णय लावून घेण्यासाठीं बाळाजीपंतांनीं ब्रह्मेंद्रस्वामींकडे धाव घेतली. ब्रह्मेंद्रस्वामींनीं शाहू खरा आहे आणि शाहूचा पक्ष हाच सत्पक्ष आहे अशी बाळाजीपंतांची खात्री पटवून दिली. लगेच बाळाजीपंतांनीं धनाजीचीही शाहूमहाराजांच्या सत्पक्षतेविषयीं पूर्ण समजूत करून दिली. इतक्यांत ताराबाईनें दरबार भरवून सर्व सरदार-दरकदारांकडून शाहूला साह्य न करण्याविषयीं व साताऱ्याच्या गादीवरील शिवाजी छत्रपतीशीं—ताराबाईच्या वेड्या शिवाजीशीं—राजनिष्ठ राहण्याविषयीं शपथा घेवविल्या; त्यांत धनाजीलाही जुलमानें शपथ घ्यावी लागली. पण 'मी उभ्या आयुष्यांत फक्त एकवारच शाहूशीं लढण्यासाठीं रणांगणावर उभा राहीन' अशा अटीची शपथ त्यानें घेतली. लगेच तो व परशरामपंत प्रतिनिधि यांच्या नेतृत्वाखालीं शाहूमहाराजांचा मोड करण्यासाठीं मराठ्यांची फौज रवाना झाली. धनाजी व बाळाजीपंत यांचा शाहूमहाराजांकडे कल आहे आणि ताराबाई तर शाहूमहाराजांना पाण्यांत पहात आहे, असें पहातांच चंद्रसेनानें धनाजीविरुद्ध ताराबाईचा पक्ष स्वीकारला. त्यानें ताराबाईला खूष करण्यासाठीं तिला न कळत आपल्या संभाजी नामक

दुष्ट दासीपुत्राला गुप्तरीतीनें शाहूमहाराजांकडे पाठवून त्याच्या-मार्फत शाहूमहाराजांच्या जिवावर मारेकरी घालण्यालाही कमी केलें नाहीं! पण शाहूमहाराजांचा स्वामिनिष्ठ हुजऱ्या जोत्याजी केसर-कर, बाळाजीपंतांचा हुजऱ्या पिराजी, व त्यांचा मुलगा बाजीराव यांनीं त्या कारस्थानाचा पिच्छा पुरवून मोठ्या चतुराईनें शाहूमहा-राजांच्या जिवावरील संकट निवारण केलें. पुढें खेड-कडूस येथें तारा-बाईचें सैन्य जाऊन पोंचल्यावर बाळाजीपंतांनीं शाहूमहाराजांची भेट घेतली व धनाजीलाही त्यांच्या पक्षाला मिळवून दिलें. इतकेंही करून धनाजी व बाळाजीपंत, केवळ जनलौकिकासाठीं व प्रतिनिधि ताराबाई-समोर घेतलेली राजनिष्ठेची शपथ मोडण्याला तयार होईनात म्हणून, शाहूमहाराजांविरुद्ध रणांगणावर उभे राहिले; पण लढले मात्र नाहींत. मग एकट्या प्रतिनिधींचें काय चालणार! त्यांना पराभूत होऊन पळ काढावा लागला. लगेच धनाजी आपल्या सैन्यासह शाहूमहाराजांना मिळाला. नंतर शाहूमहाराज आपल्या प्रचंड संयुक्त सैन्यासह ठिक-ठिकाणीं विजयश्री संपादन करीत साताऱ्याला आले, व धनाजी, बाळाजीपंत वगैरे एकनिष्ठ सेवकांच्या साह्यानें राज्यसूत्रें आपल्या हातीं घेऊन त्यांनीं आपणाला राज्याभिषेक करून घेतला. राज्याभिषेकाच्या महोत्सवाप्रीत्यर्थ त्यांनीं धनाजी जाधवाला सेनापतिपद दिलें व इतर सेवकांचाही त्यांच्या त्यांच्या योग्यतेनुरूप गौरव केला. बाळाजीपंतांचा गौरव कोणत्या प्रकारें करावा हें मात्र शाहूमहाराजांना कोडें पडलें. कारण धनाजीसारखा नरवीर आपल्या बाजूला मिळवून देण्यापासून तों अखेर शाहूमहाराजांना राज्याभिषेक होईपर्यंतच्या सर्व महत्त्वाच्या घडामोडी एकट्या बाळाजीपंतांनींच आपल्या बुद्धिकौशल्याच्या जोरावर पार पाडून शाहूमहाराजांना उपकृत करून ठेविलें होतें. त्या उपकारांची फेड कशी करावी हें शाहूमहाराजांना कळेना, तेव्हां त्यांनीं बाळाजी-पंतांनाच काय तें मागणें मागावयाला सांगितलें. बाळाजीपंतांनीं दूरवर विचार करून मागणें मागितलें, "महाराज! मला फक्त

आपली सेवा करण्याची संधि पाहिजे आहे. आपण माझी सेवा आजवर घेतली तशीच पुढेंही घ्यावी व ती आपणाला मानवली तर आपल्या मर्जीला येईल तेव्हां मला आपल्या प्रधानमंडळांतील उत्तमपद प्राप्त व्हावें."

शाहूमहाराजांनीं बाळाजीपंतांची विनंति मान्य करून त्यांना तसें वचन दिलें व दरबारांतील वेळा साजरी करण्यासाठीं त्यांना बहुमोल वस्त्रालंकार देऊन त्यांचा तात्पुरता गौरव केला.

इतकें सारें झालें, शाहूमहाराज महाराष्ट्रांचे पट्टाभिषिक्त छत्रपति बनले, तरी ताराबाईपक्षाचा भुंगा जो शाहूमहाराजांचें सिंहासन पोंखरीत होता, त्याचा प्रतिकार केल्याशिवाय आपल्या राज्यकारभाराला स्थिरता यावयाची नाहीं हें ओळखून शाहूमहाराज प्रथम ताराबाईचें पारिपत्य करण्याच्या उद्योगाला लागले.



# पेशवाईचें ध्रुवदर्शन

## दर्शन १ लें

### मोहरा पडला!

"काय म्हणतां बाळाजीपंत! चंद्रसेन खरेंच ताराबाई आईसाहेबांना फितूर आहे?"

"होय महाराज!"

"तशी तुमची पक्की खात्री आहे?"

"पक्की खात्री आहे हें काय विचारतां महाराज! असें पहा, आपण रांगणा घेण्याची इतकी शिकस्त केली तरी रांगणा हातीं येईना याचा अर्थ काय? आपलें सैन्यबल एवढें अफाट असतांही किल्ल्यावरच्या मूठभर लोकांसमोर आपली डाळ शिजली नाहीं; तें आपल्या यशाच्या भांड्यांत मीठ कोठून पडलें? तें मीठ चंद्रसेनानें पाडलें. त्यानें आपल्या सैन्यांतील परसोजी भोंसले, खंडेराव दाभाडे, चिमणाजी दामोदर मोघे वगैरे मातबर सरदारांना परोपरीचीं आमिषें दाखवून त्यांचे कान फुंकले, म्हणूनच ते कच्च्या दिलाचे लोक नेकी विसरून आपल्या बाजूनें मनमोकळेपणानें लढले नाहींत. रांगण्याच्या किल्लेदारालाही त्यानेंच फितविलें; इतकेंच काय, पण त्यानें आपल्या दुय्यम सेनापतिपदाचा दुरुपयोग करून आपल्याच बारगीर–शिलेदारांचीं मनें आपल्याविरुद्ध कलुषित करण्याला कमी केलें नाहीं. नाहीं तर धनाजीबाबांसारखा एवढा अद्वितीय रणझुंजार आपला सेनापति असतांना, तो जो रांगण्यासारख्या किल्ल्यांच्या रांगाच्या रांगा त्यांच्या पायथ्याशीं शत्रूच्या रक्ताची राड करीत जिंकीत जावयाचा, त्याला इतके दिवस लढून एक रांगणा घेतां येऊं नये? धनाजीबाबांनीं आपल्या अप्रतिम युद्धकौशल्याचे किल्ले बांधावे व त्यांच्या ह्या कुळबुडव्या–देशबुडव्या कपाळकरंट्या पोरानें त्या किल्ल्यांच्या मुळाशीं भेदाचीं भुयारें खणून सुरुंग पेरावे! आपल्या राज्याभिषेकाला ताराबाई आईसाहेब इतके अडथळे आणूं शकल्या त्या तरी ह्याच बद्‌नेकीच्या बारगळलेल्या लोकांचें साह्य त्यांना होतें म्हणूनच ना?"

"एकूण आम्हीं चंद्रसेनाच्या अपराधांची गय केली हा मोठा अन्यायच केला म्हणावयाचा! वेळच्या वेळींच जर ह्या विषारी सर्पाला ठार केला असता, तर तो आमचा दावा धरून असा जेव्हां तेव्हां चावा घेत नसता. हा आमचा दयाभूतपणा आम्हांला नडला!"

"महाराज! असें आम्हीं सेवकांनीं कसें म्हणावें! आतां आपणच बोलतां म्हणून मी बोलतों, आपण अलम् मराठी दुनियेचे मायबाप आहां, व दुनिया ही नेहमीं सुष्टांनीं आणि दुष्टांनीं भरलेली असावयाचीच; अशा दुरंगी दुनियेचें पालनपोषण आपणांला जर करावयाचें, तर तें राज्यकर्ते–रयतेचे शास्ते म्हणून केलें पाहिजे. नुसतें साधुवृत्तीनें राजशासन होत नसतें. राजा हा रयतेचा मायबाप खरा; पण तो जर रयतेच्या हितासाठीं सुष्टांचें पालन व दुष्टांचें निर्दालन यथान्याय करणार नाहीं, तर त्याच्या हातून राजशासनही पार पडावयाचें नाहीं व लोकशासनही पार पडावयाचें नाहीं. मी आजवर चंद्रसेनाच्या बाबतींत आपणापाशीं बरें किंवा वाईट कांहींच बोललों नाहीं; कारण तसें करण्यानें–मी आपल्या पायांचा एक यःकश्चित् सेवेकरी, माझ्याकडून आपली अमर्यादा झाली असती. दुसरें असें कीं, चंद्रसेन मला प्रथमपासूनच पाण्यांत पहातो, माझ्याशीं साताजन्मींच्या कट्टया दुस्मानाप्रमाणें वागतो, ही गोष्ट जगजाहीर आहे. अशा स्थितींत मी जर त्याच्या विरुद्ध बोललों, तर तो माझा प्रतिस्पर्धी म्हणून त्याचा सूड घेण्यासाठीं मी बोललों असा अर्थाचा अनर्थ होईल. पण आतां ओघाला गोष्ट आली म्हणून बोललों."

"बरस! आतां चंद्रसेनाची गय करतां उपयोगी नाहीं. त्याला शासन हें झालेंच पाहिजे."

छत्रपति शाहूमहाराज व बाळाजी विश्वनाथ यांचें असें संभाषण चाललें आहे, तोंच पिराजी घाबऱ्याघाबऱ्या तेथें आला व मुजरा करून सांगूं लागला, "महाराज! धनाजीबाबांची अवस्था फार कठीण आहे. आज सकाळपासून ते 'मरण्यापूर्वीं एकवार महाराजांच्या पायांचें दर्शन मला कसें होईल' असा ध्यास घेऊन बसले आहेत!"

"काय, धनाजीबाबांची तब्येत एकाएकीं इतकी बिघडली? रात्री तर मी त्यांना भेटून आलों. त्यांनीं चंद्रसेनाला बोलवावयाला सांगितलें म्हणून

तेव्हांच रांगण्याला घोडेस्वारही रवाना केला. चंद्रसेन आला का ?" बाळाजी-पंतांनीं विचारलें.

"हो ! तो आतांच येऊन पोंचला." पिराजी म्हणाला.

धनाजीच्या पायाला फार दिवसांपूर्वीं एक जखम झाली होती व कांट्याचा नायटा होऊन तें दुखणें विकोपाला गेलें होतें. पण तें इतक्या थोड्या अवधींत ह्या थराला येऊन पोंचेल अशी कोणाचीच कल्पना नव्हती.

"महाराज ! आतां कसें करायचें ? धनाजीबाबांची तर आपणांला भेटण्याची फार उत्कट इच्छा दिसते. ती आपण पुरवणार नाहीं का ? मरतांना मुखीं देवाचें नांव वसावें व डोळ्यांना महाराजांचें—महाराष्ट्राच्या पोशिंद्या छत्रपतींचें-दर्शन व्हावें, एवढी धनाजीबाबांची पुण्याई थोर नाहीं का ?" बाळाजीपंत लीनतेनें म्हणाले.

"धनाजीबाबांची पुण्याई ? बाळाजीपंत ! त्यांची पुण्याई तुमच्या-आमच्या बोलांच्या मापानें थोडीच मापतां येणार आहे ! धनाजीबाबा माझे जनक आहेत. शाहूला जन्म कैलासवासी छत्रपति संभाजीमहाराजांनीं दिला; पण शाहूछत्रपतीला धनाजीबाबांनीं जन्माला घातलें. त्यांच्या कैक जन्मींची पुण्याई आमच्या फळाला आली. चला. धनाजीबाबांना दर्शन देण्यासाठीं मी येत नाहीं; माझ्या जन्मदात्याचें दर्शन घेण्यासाठीं मी येतों. चला." असें म्हणून शाहूमहाराज पिराजीच्या हातीं आपण भेटीला येत असल्याचा निरोप सांगून घाईघाईनें कपडे करून बाळाजीपंतांबरोबर धनाजीच्या भेटीला निघाले. ते एवढे मोठे छत्रपति ! तशांत मोंगलबादशहाच्या जनानखान्यांत अत्यंत ऐषआरामांत वाढलेले ! पण या वेळीं त्यांना कपडे चढविण्याला हुजऱ्याही लागला नाहीं. तेवढ्यांत जोत्याजी बाहेरून अकस्मात् आंत आला व त्यानें जोडे त्यांच्यासमोर आणून ठेवले म्हणून, नाहींपेक्षां ते वेळीं अनवाणींच वाटेला लागले असते !

"महाराज, पालखी येते आहे." जोत्याजी तेवढयांत बाहेर जाऊन पालखी तयार करावयाला सांगून आंत आला व म्हणाला.

"पालखी ? पालखी कशाला ? ही वेळ पालखींत बसण्याची नव्हे." असें म्हणून शाहूमहाराज पायींच बाळाजीपंतांबरोबर निघाले. त्या वेळीं बाळाजीपंत व जोत्याजी यांच्या तोंडून 'धन्य हा राजा ! आणि धन्य तो

घनाजी, कीं ज्याच्या भेटीसाठीं राजा पायीं चालत निघाला!' असे उद्गार निघाले असल्यास नवल काय ?

ताराबाईचा मोड करण्यासाठीं कोल्हापुरकडे मोहिमेवर जातांना शाहू-महाराजांनीं कोणा अपशकुनी दळभद्र्याचें तोंड पाहिलें होतें कोण जाणे! तिकडे त्यांना लाभावें तसें यश कांहीं लाभलें नाहीं. नाहीं म्हणावयाला प्रथम पन्हाळा त्यांच्या हातीं आला; पण ताराबाई पन्हाळा सोडून रांगणा, रांगणा सोडून मालवण अशी पळूं लागली, व तिच्या चिथावणीनें मागें चंद्रसेन जाधवादि अनेक मातबर लोक मराठशाहींतील ह्या दुहीच्या होळीवर स्वतःच्या क्षुद्र स्वार्थाची पोळी भाजून घेण्यासाठीं शाहूमहाराजांच्या बाजूनें लढण्यांत कुचराई करूं लागले. मुळांतच दिल्लीचा तेव्हां होऊं घातलेला बादशहा अजीमशहा व त्याचा वजीर झुल्फिकारखान यांनीं शाहूमहाराजांची मुक्तता केली ती शाहूमहाराज मराठी राज्यांत जावे, तेथें ताराबाईशीं गादीबाबत त्यांचा तंटा जुंपावा, मराठशाहींत दुफळी पडावी व त्या दुफळींत ताराबाई-च्या अमदानींत जोरावलेल्या मराठशाहीचीं हाडें खिळखिळीं होऊन ती आपल्याच भवजंजाळांत गुरफटून जावी; मराठ्यांत आपसांत अशी यादवी माजली म्हणजे डळमळत्या दिल्लीपद-पातशाहीवर त्यांची नजर खिळून बसणार नाहीं व आपणाला आपली बादशाही सत्ता स्थिर करण्याला फुरसद मिळेल, हा अजीमशहा व झुल्फिकारखान यांच्या ह्या डावांतील अंतस्थ हेतु होता. ही युक्ति मूळ औरंगजेब बादशहाची; पण त्याच्या मनांतून लढाऊ धोरणानें—भेदनीतीच्या योगानें मराठशाहींत दुफळी माजवून मग तिचा एकेक तुकडा आस्ते आस्ते गिळंकृत करावयाचा, ह्या उद्देशानें ती अमलांत आणावयाची होती. पण मध्येंच त्याला आकस्मिक मरण आलें व त्याच्या पश्चात् बादशहात बळकावण्यासाठीं त्याचे पुत्रच आपसांत यादवी माजवूं लागले, तेव्हां प्रत्यक्ष सत्तेच्या घोड्यावर स्वार झालेल्या अजीमशहानें आपला वजीर झुल्फिकारखान याच्या सल्ल्यानें ती जुनीच युक्ति बचावू स्वरूपाच्या प्रसंगोपात्त नव्या धोरणानें उपयोगांत आणली. मराठशाहीच्या वाढत्या वैभवा-ला विस्कळित करण्याचा औरंगजेब बादशहाचा हा उपाय खरोखरच रामबाण होता व परिणामीं तो रामबाण ठरलाही. राजमाता ताराबाई एका बाजूला तर शाहूमहाराज दुसऱ्या बाजूला, मराठ्यांचा रणधुरंधर राजनिष्ठ सेनापति शाहू-

महाराजांच्या पक्षाचा तर त्याचा तसाच पराक्रमी पण बदनेकीचा कुपुत्र चंद्रसेन ताराबाईच्या पक्षाचा, अशी मराठशाहींत राजापासून रयतेपर्यंत जबरदस्त फूट पडून मराठे आपल्या घरच्या घरींच एकमेकांच्या माना कापण्याला सरसावले. अशा आणीबाणीच्या वेळीं बाळाजी विश्वनाथ ह्या कर्त्या नरपुंगवानें शाहू-महाराजांचा सत्पक्ष ओळखून देशहितैक दृष्टीनें त्यांची मराठशाहीच्या सिंहासना-वर छत्रपति म्हणून प्रतिष्ठापना करण्याचा आटोकाट प्रयत्न केला नसता, तर मराठशाहीला फार कठीण दशा प्राप्त झाली असती. मग पेशवाईच्या हस्तें हिंदवी स्वराज्याचें सुविख्यात वैभवमंदिर उभारलें जाण्याची गोष्ट बाजूलाच राहिली असती; पण वेळीं मराठशाहींतील देशाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या होऊन त्या परक्या अविंधांनीं मटकावून केव्हांच मराठशाही नामशेष करून सोडली असती !

पण भवितव्यता तशी नव्हती. हिंदवी स्वराज्य आणखी निदान एक शतक तरी जगावें, महाराष्ट्राच्या कपाळीं परदास्याचीं पदलांच्छनें केव्हांना केव्हां उमटावयाचींच असलीं तरी तें आजचें मरण उद्यांवर जावें; एवढ्या मुदतींत महाराष्ट्राला हिंदवी-स्वराज्याचा आसेतुहिमालय विस्तार वाढवून तिच्या वैभवमंदिरावर साम्राज्यसत्तेचा सुवर्णकळस चढविण्याची पुन्हा एकवार संधि मिळावी, अशी भवितव्यतेची इच्छा होती. छत्रपति शिवाजीमहाराजांच्या हस्तें हिंदवी स्वराज्याची स्थापना झाली व शिवाजीमहाराजांच्या पश्चात् संभाजी-महाराजांनीं नियत सोडून अजाणपणें हिंदवी-स्वराज्याला अवनतीच्या गर्तेंत लोटून दिलें; ही हिंदवी-साम्राज्याची पहिली सोन्यासारखी संधि महाराष्ट्रानें गमावली, तरी छत्रपति शाहूमहाराजांसारखे प्रजाहितदक्ष भूपति महाराष्ट्राला देऊन त्यांच्या राजसत्तेला धनाजी जाधव, बाळाजी विश्वनाथ अशा पराक्रमी पुरुषांची जोड देऊन हिंदवी-साम्राज्य स्थापन करण्याची संधि पुन्हा एकवार भवितव्यतेनें दिली.

शाहूमहाराज पायीं पायींच धनाजीच्या तंबूपर्यंत चालत गेले. सैन्यांतील मोठमोठे लोक यापूर्वींच तेथें जमले होते. त्यांना हा कधींही दिसून न येणारा प्रकार पाहून अचंबा वाटला. चंद्रसेनही तेथें होताच. त्यानें धनाजीपाशीं जाऊन हळूच त्याच्या कानांत सांगितलें, "बाबा ! महाराज आले."

"काय ?" असा प्रश्न अडखळत विचारीत धनाजी आंथरुणावर उठून

बसण्याचा प्रयत्न करूं लागला. इतक्यांत शाहूमहाराज व बाळाजीपंत हेच त्याच्या आंथरुणाशेजारीं जाऊन बसले. उठून बसण्याचे प्रयत्न केल्यामुळें झालेले श्रम असह्य झाल्याकारणानें धनाजीला क्षणभर ग्लानि आली होती तो डोळे मिटून बिछान्यावर निपचित पडला होता.

बाळाजीपंतांनीं हलकेंच हांक मारली, "धनाजीबाबा!"

पण ओ नाहीं! लगेच शाहूमहाराजांनींही तशीच हलकेंच हांक मारली तेव्हां मात्र धनाजीनें डोळे उघडून त्यांच्याकडे एकवार पाहिलें. शाहू-महाराजांची व त्याची दृष्टादृष्ट होतांच दोघांच्याही नेत्रांतून गंगा-यमुना वाहूं लागल्या. आंगावरील शेल्याच्या टोंकानें शाहूमहाराजांनीं एका हातानें आपलीं आंसवें पुसलीं व लगेच त्याच शेल्यानें धनाजीचीं आंसवें पुसलीं.

"महाराज! ह्या सेवकासाठीं आपणाला एवढे कष्ट पडले! पुंडलिकाच्या भेटी परब्रह्म आलें! मरत्या घडीला मी पामर,-महाराज, हें उपकारांचें ओझें माझ्या माथीं वाढलें! पण अखेरच्या वेळीं एकवार आपल्या पायांचें दर्शन घडावें अशी माझी उत्कट इच्छा होती ती भगवंतांनीं पुरविली."

शाहूमहाराज कळकळीच्या वाणीनें उद्गारले, "धनाजीबाबा! असे घाबरूं नका, भिऊं नका, धीर सोडूं नका. देवदयेनें तुम्ही ह्या दुखण्यांतून खात्री-पूर्वक बरे व्हाल. मोडकळत्या मराठशाहीचा इमला खांदा देऊन तुम्हीं सांवरून धरला, त्या इमल्याची उभारणी पूर्ण होईतों तुम्हीं जगलें पाहिजे. मराठशाहीची काळजी देवाला आहे. तो तुम्हांला इतक्यांत कसा मरूं देईल!"

"मी जगणार?" धनाजी विषादपूर्ण हास्य करीत उद्गारला, "महाराज! आतां मी कसला जगतों! माझी देखील तशी इच्छा होती. निदान कोल्हापूर-कडची मोहीम माझ्या हातून यशस्वी होऊन आपल्या हितशत्रूंचा पूर्ण बींमोड व्हावा व मगच मला मरण यावें असें माझें देवापाशीं मागणें होतें. पण तें देवाच्या मनाला आलें नाहीं; देवाच्या मनाला मीं अखेर पराजयाची काळोखी तोंडाला फांसून मरावें असेंच आलें. काय करणार! आलें देवाजीच्या मना, तिथें कोणाचें चालेना! असो. तेव्हां आतां मी मरणार. आतां महाराज! ह्या शेवटच्या क्षणाला आपणापाशीं मला एक-फक्त एकच मागणें मागा-वयाचें आहे. तें मागणें मागावयाला मला तोंड नाहीं! ह्या धनाजीनें स्वतः-च्या लायकीहून मोठ्या मागणीसाठीं आजवर कधींच कोणासमोर तोंड

वेंगाडलें नाहीं. पण सारेच दिवस सारखे नसतात." धनाजी जवळच खालीं मान घालून उभा असलेल्या चंद्रसेनाकडे एकवार अश्रुपूर्ण पण तिरस्कृत नजरेनें पाहून लगेच शाहूमहाराजांकडे पहात म्हणाला, "महाराज! मी मागतों एवढी भीक मला घालाल का?"

"सांगा, धनाजीबाबा! सांगा, तुमच्यासाठीं मी काय करूं?"

"माझ्यासाठीं माझ्या ह्या चंद्रसेनाला—जाधववंशाच्या ह्या एकुलत्या एका अंकुराला-तो विषाचा अंकुर आहे हें मी जाणतों; पण कसा झाला तरी तो पोटजाळ पडला, तेथें माझा नाइलाज आहे!—एवढा अंकुर आपल्या चरणांच्या सांवलीला वाढूं द्या. चंद्रसेनाचे अपराध अगणित आहेत. मस्तकावरचे केंस मोजवतील पण ते अपराध मोजवणार नाहींत. पण माझ्याकडे पाहून आपण मला एवढी भीक घाला."

शाहूमहाराजांना हा योगायोग मोठा विचित्र वाटला. अर्ध्या घटकेपूर्वी ज्या चंद्रसेनाचें न्यायनिष्ठुरतेनें पारिपत्य करण्याचा त्यांचा निर्धार झाला होता, त्याच चंद्रसेनाला कृतापराधांची क्षमा करण्यासाठीं ते वचनबद्ध होऊन गेले. त्यांनीं एकवार बाळाजीपंतांकडे पाहिलें, तेव्हां बाळाजीपंत उद्गारले, "महाराज! धनाजीबाबांची पुण्याई जबर आहे. ती पुण्याईच आजवर आपणांला राज्यपद प्राप्त होण्यापायीं खर्चीं पडली आहे. आपण मनांतील सारे किंतु दूर सारून धनाजीबाबांच्या ह्या अखेरच्या मागणीला मान दिला पाहिजे."

"ठीक आहे." शाहूमहाराज धनाजीला म्हणाले, "धनाजीबाबा! तुमच्या शब्दासाठीं—शाहू छत्रपतीला तुम्हीं तुमच्या पराक्रमानें जन्म दिला आहे, त्या पितृऋणाचा अंशतः तरी उतराई होण्यासाठीं म्हणून मी तुमच्या शब्दाला मान्यता देतों. तुमच्या पश्चात् तुमचे सर्व अधिकार तुमच्या मुलाला——"

"हां, महाराज! जरा थांबा. माझा मुलगा एक नाहीं; माझे मुलगे दोन आहेत. चंद्रसेन माझा औरस पुत्र असला तर बाळाजीपंत माझा धर्मपुत्र आहे. औरसपुत्र पुत्र नव्हेसा होत नाहीं म्हणून वारस ठरावयाचा. पण खरा पुत्रधर्म ह्या माझ्या धर्मपुत्रानेंच पाळला आहे, यास्तव माझ्या पश्चात् माझ्या ह्या दोन पुत्रांत माझ्या अधिकाराची विभागणी झाली पाहिजे." धनाजी म्हणाला.

धनाजीच्या तोंडचे हे शब्द ऐकून सर्वांना—खुद्द महाराजांनाही तो व

बाळाजीपंत यांच्या एकमेकांच्या ठायीं वसणाऱ्या उत्कट प्रेमाचें मोठें कौतुक वाटलें. चंद्रसेन मात्र तेव्हांच काळाठिक्कर पडला.

शाहूमहाराज म्हणाले, "तर मग तुम्हीच सांगा, तुमच्या अधिकाराची विभागणी तुमच्या पश्चात् आम्हीं कशी करावी ?"

"सेनापतिपद चंद्रसेनाला द्यावें व जमाबंदीचे अधिकार बाळाजीपंतांना द्यावे." धनाजी म्हणाला.

"तुमची आज्ञा आम्हांला शिरसावंद्य आहे." शाहूमहाराज म्हणाले. "आणखी कांहीं आज्ञा आहे ?"

"आज्ञा ? महाराज ! आपण आमचे मायबाप, आम्ही आपलीं लेंकरें--आपली रयत आम्ही. रयतेनें राजाला आज्ञा कसली करावयाची ? विनंति करावयाची; राजापाशीं भीक मागावयाची. ती भीक मीं मला पाहिजे होती तेवढी मागितली व आपण उदार अंतःकरणानें मला ती घातली. मीं भीक मागितली तीच माझ्या पात्रतेहून मोठी भीक मागितली. मीं लहान तोंडीं मोठा घांस घेतला, पण देवदयेनें तो मला गिळतां आला; माझ्या गळ्याला लागला नाहीं. आणखी भीक मी कोणत्या तोंडानें मागूं !" असें म्हणून धनाजीनें चंद्रसेनाकडे वळून सांगितलें, "चंद्रसेन ! महाराजांच्या पायांवर डोकें ठेवून कृतापराधांबद्दल त्यांची क्षमा माग व यापुढें आजन्म त्यांच्या पायांशीं राजनिष्ठेनें वागण्याची शपथ घे."

चंद्रसेनानें धनाजीच्या आज्ञेप्रमाणें शाहूमहाराजांच्या पायांवर डोकें ठेवून शपथ वाहिली. पण ती नुसती तोंडदेखली शपथ होती. धनाजीनें आपल्या अधिकाराची विभागणी केली ती चंद्रसेनाला मुळींच रुचली नव्हती. कशी रुचेल ! ज्या बाळाजीपंतांना नामशेष करण्यासाठीं त्यानें आजवर जंगजंग पछाडले, तेच त्याच्या नाकावर पाय देऊन त्याच्या वारसहक्कांच्या अर्ध्या हिश्शाचे वारस ठरले ! ह्या अधिकारविभागणीनें तो सर्प चिडला व त्यानें बाळाजीपंतांविषयीं मनांत उभ्या जन्माचा दावा धरला. ह्या दाव्याचे दुष्परिणाम पुढें बाळाजीपंतांना व खुद्द शाहूमहाराजांनाही कैक वर्षें भोगावे लागले. ते कसे, तें पुढें ओघाओघानें येणारच आहे.

लगेच धनाजीनें बाळाजीपंतांनाही तशीच शपथ घ्यावयाला सांगितली. त्यांनीं शपथ घेतली. वस्तुतः त्यांनीं शपथ घ्यावयाची काय बाकी राहिली

होती ! ते यापूर्वींच शाहूमहाराजांच्या कसोटीला उतरून त्यांचे अभिन्न-हृदयी सेवक बनले होते.

"झालें. माझी इच्छा पूर्ण झाली. आतां महाराष्ट्राच्या मायबापा, आपले पवित्र चरण पुढें करा." धनाजी ऊर्ध्व-श्वासांत अडखळत मोठ्या कष्टानें उद्गारला.

"धनाजीबाबा !" अशी टाहोवजा हांक मारून शाहूमहाराज स्तंभित झाले. त्यांच्या कंठीं गहिंवर दाटून आला व डोळे दुःखाश्रूंनीं डबडबले. त्यांना धनाजीचा अंतकाळ कळून चुकला.

शाहूमहाराज पाय पुढें करावयाला संकोच करीत आहेत असें पाहातांच धनाजीनें मोठ्या कष्टानें शाहूमहाराजांच्या पायांच्या अनुरोधानें आपल्या मस्तका-ला कलांडी दिली. पुण्यपुरुषच तो, त्याचें मस्तक नेमकें शाहूमहाराजांच्या पायांवर टेंकलें गेलें, व 'महाराज ! राम ! राम !' असें म्हणत त्यानें देह ठेवला.

धनाजीच्या प्राणोत्क्रमणानें सर्वच लोक दुःखसागरांत बुडून गेले. पण शाहूमहाराज व बाळाजीपंत यांना तर इतकें दुःख झालें कीं, त्या दुःखाच्या महासागरांत इतरांच्या दुःखांचे कैक सागर सामावले असते !

वारणेच्या वाळवंटांत धनाजीची चंदनाची चिता रचण्यांत आली व शाहू-महाराजांनीं चितेला वंदन करून चंदनकाष्ठ अर्पण केल्यावर तिला अग्नि देण्यांत आला.

"धन्य ! धनाजी धन्य खरा ! हा अव्वलचा मोहरा आमच्या वतीनें इरेला पडला म्हणून आमची राजवट ह्या नांवारूपाला आली. तो मोहरा आज अशा आणीबाणीच्या प्रसंगीं नामोहरम झाला ! आमच्या राजवटीला हें मोठेंच दुश्चिन्ह झालें ! ह्या दुश्चिन्हाचे दुष्परिणाम आम्हांला कोठवर भोगावे लागतील भगवान् जाणे !" असे शाहूमहाराजांनीं धनाजीची चिता भडकूं लागलेली पहातांच उद्गार काढले व पूज्यभावानें चितेला पुन्हा एकदां वंदन करून अश्रू ढाळीत ढाळीत ते माघारे फिरले.

शाहूमहाराजांच्या वाणीनें तेव्हां जणुं काय परमेश्वरच मराठशाहीच्या भवितव्याचें भाकित बोलला. कारण त्याच कुमुहूर्तावर चंद्रसेन जाधव बाळाजी विश्वनाथांचा हाडवैरी बनला. ह्या वैराच्या ठिणगीचाच पुढें वणवा पेटला व मराठशाही त्या वणव्यांत होरपळूं लागली. ती कशी ? तेंच आपणांला पुढें पहावयाचें आहे.

## दर्शन दुसरें

# काळ ओढवला !

धनाजी जाधवाच्या निधनापासून चार वर्षांनंतरच्या काळाच्या उदरीं मराठशाहीची काय अवस्था होती हेंच आपणांला आतां पहावयाचें आहे.

*　　*　　*

" बाळ !"

" काय ग आई ! "

" असें काय बरें ! आजोबा काय विचारतात त्याला नीट उत्तर द्यावें."

" पण आधीं मला तरवार आणि भाला दे."

" पण आधीं आजोबांनीं विचारलेल्या प्रश्नाचें उत्तर दे. सांग, तूं मोठा झाल्यावर काय करणार ? "

" आधीं मला तरवार आणि भाला दे, मग सांगतों. नाहीं तर नाहीं सांगत जा काय करणार तें. देना ग आई मला ! असें काय ग !" असें लाडके बोल बोलत कृष्णा जेव्हां जवळच गाईची धार काढीत असलेल्या आपल्या आईच्या—यशोदेच्या गळ्यांत पडला, तेव्हां म्हाताऱ्या व्यासरावाला वाटलें कीं, हीं पुराणकाळचीं कृष्ण-यशोदाच आहेत. नुक्ताच पिराजी न्याहारी करून शिकारीला गेला, तेव्हां हीं मायलेंकरांची प्रेमळ लीला पाहून त्यानेंही कृष्ण-यशोदेचीच आठवण केली होती. पिराजी व व्यासराव यांचा हा भाव सदुपमेय होता. यशोदामाता गाईची धार काढीत असतां त्रिभुवनपालक भगवान् बाळकृष्णाच्या साजिऱ्यागोजिऱ्या रूपानें तो त्या आपल्या मातेच्या गळ्याला मिठी मारून तिचा मुका घेऊं पहात आहे व त्या बाळमुक्यानें मातेला प्रसन्न करून मग तिच्यापासून ताजें दूध प्यावयाला मागून घेण्यासाठीं त्यानें बाळवाटी हातीं धरली आहे, असा नयनमनोहर देखावा कोणीं पाहिलेला नाहीं ! तोच देखावा व्यासरावाला या वेळीं आठवला. विशेषतः कृष्णा जेव्हां आपल्या आईच्या गळ्याला मिठी मारून क्षणांत तिच्या डाव्याउजव्या गालांचे ओलंबते मुके घेऊन व आपल्या बाळहातांनीं तिला गुदगुल्या करून खुद्खुद् हंसूं लागला व त्याच्या त्या चाळवाचाळवीमुळें

यशोदेचा गाईच्या सडांवरील हात चळूं लागून धार भांड्याबाहेर सांडूं लागल्यामुळें ती त्याला बळेंच दटावूं लागली, तेव्हां त्यानें आपल्या हास्याची अमृतवृष्टि करून यशोदेचा राग कुठच्याकुठें धार घालवून लाविला व तिला हंसवून आपला एक गोडसा मुका घ्यावयाला लावलें. तें मनोहर हास्य पाहून तर व्यासरावाला वाटलें कीं ह्यांना आपली दृष्ट लागेल कीं काय !

" असें काय बरें बाळ, करावयाचें तें ! जरा आजोबांपाशीं खेळत बैस, तोंवर मी धार काढतें. माझ्या बाळाला दूध प्यायला पाहिजे ना ? " यशोदा कृष्णाची मिठी हलकेच आपल्या डाव्या हातानें सोडवीत, त्याचा मानेचा होकार पाहून त्याला व्यासरावाच्या स्वाधीन करीत म्हणाली, " तर मग जा, आजोबांबरोबर खेळत बैस. "

कृष्णा लाडिकपणें उत्तरला, " नाहीं, मी कपिलेबरोबर खेळेन. "

" बरें, कपिलेबरोबर खेळ. "

" पण मला आधीं दूध दे ना ! "

" अरे हो ! देतें म्हणतें ना ? "

" पण 'अगोदर तरवार दे, भाला दे' अशा तहनाम्याच्या अटी घालतांना व त्यांविषयीं तडजोडीची भाषा ऐकतांना कृष्णा यशोदेच्या मानेला मिठी मारून जो उभा होता, तो मात्र जागचा हलेना.

अंमळशानें यशोदेची धार काढून झाली. लगेच तिनें कृष्णाला वाटींत दूध ओतून दिलें. तें तो प्याला; पण त्या नादांत तो तरवार-भाला मागावयाचें विसरेल असें जें यशोदेला वाटलें होतें, तें मात्र खोटें ठरलें.

" आतां सांग, तूं मोठा झाल्यावर काय करणार ? " व्यासरावानें पुन्हा कृष्णाला जवळ घेऊन विचारावयाला सुरुवात केली.

" दाजीबा ! तो जरा तुमच्यापाशींच खेळूं दे. नाहीं तर माझा पाठपुरावा करील. अजून घरांतला केरदेखील निघाला नाहीं, सारें काम तसेंच पडलें आहे. आणि बाहेर पहा, किती उशीर झाला हा ! प्रहरावर दिवस आला ! " असें कांहीं व्यासरावाला उद्देशून बोलत व कांहीं स्वत:शीं पुटपुटत यशोदा आंत गेली.

पण आजोबांच्या भुलवणीच्या प्रश्नांनीं कृष्णा थोडाच भुलणार ! तो

आपल्या हट्टाचें अनुसंधान राखून चटकन् पुन्हा पूर्वपदावर आला, "आधीं मला भाला आणि तरवार द्या."

व्यासरावानें कृष्णाची समजूत करण्याचा कर कर प्रयत्न केला; पण कृष्णा कांहीं ऐकेना! अखेर त्या म्हाताऱ्याला त्या पांच वर्षांच्या चिरमुडल्या बालकासमोर हात टेकावे लागले. पण त्यांतही त्याला वात्सल्यप्रेमाच्या आनंदाचें भरतें आलें. त्या भरांत तो कृष्णाला जवळ घेऊन त्याचा एक मुका घेऊं लागला. पण एकतर व्यासरावाच्या मिशांचे रांठ केंस आपल्या गालाला बोंचतात म्हणून त्याला मुका देण्याचा किंवा त्याचा मुका घेण्याचा कृष्णाला कंटाळा व दुसरें, खंडणीदाखल त्यानें भाला व तरवार मागितली ती त्याला मिळेना, त्यामुळें तर तो मुका देण्याचें साफ नाकारून 'आम्ही नाहीं जा' असें रुसल्याचे मंजुळ बोल बोलत दूर जाऊन बसला.

"मुक्ते!" व्यासराव आंत डोकावून पाहून हांक मारीत म्हणाला, "तुझा पोरगा म्हणजे बापसे बेटा सवाई आहे! पिराजीदेखील लहानपणीं मोठा धूर्त व हट्टी होता; पण हें पाणी त्याच्याहूनही कांहीं और आहे."

"मग! तो माझा मुलगा आहे!" आंतून उत्तर आलें.

"असें-अस्सें! हें मी बोलावयाला विसरलों होतों खरा. आतां बरोबर खूणगांठ पटली. बाप छट, बापापेक्षां आई छट; मग पोरगा महाछट निपजला नाहीं तरच आश्चर्य!" व्यासराव म्हणाला.

"एकूण त्यांच्यापेक्षां मी छट आहें असें का तुमचें म्हणणें आहे?" आंतून यशोदेनें विनोदानें विचारलें.

हाच प्रश्न यशोदेनें ती पांच वर्षांपूर्वी पिराजीशीं बरोबरीच्या खेळगड्याच्या नात्यानें वागणारी मुक्ता असतांना विचारला असता तर पिराजीचा 'त्यांच्यापेक्षां' असा नम्रतापूर्वक उल्लेख करण्याऐवजीं 'पिराजीपेक्षां' असाच उल्लेख तिनें केला असता. अर्थात् तो मुक्तेनें उल्लेख केला असता. पण ती मुक्ता आतां कोठें होती! पांच वर्षांपूर्वीं तिचें पिराजीशीं लग्न झालें तेव्हां ती पिराजीची आवडती यशोदा बनली होती. त्या माहेरच्या मुक्ता नांवाबरोबरच बरोबरीच्या बहीणभावंडांच्या नात्याचाही त्याग करण्याची इष्टापत्ति तिच्यावर ओढावल्यापासून ती पिराजीचा नांवानें उल्लेख करण्याला लाजूं लागली होती. कुंवारपणीं ती 'पिराजी' 'पिराजी' अशी पिराजीच्या नांवाची सवंगसुकाळ खैरात

करी. पण त्याच पिराजीची ती अर्धांगी झाल्यापासून लोक तिचा 'नवऱ्याचें नांव घे ना ग!' असा थट्टाविनोदानें पाठपुरावा करूं लागल्यापासून तिच्या तोंडचा 'पिराजी' हा शब्द सोनेमोलाचा—नव्हे, हिरे-माणिक-मोत्यांच्या मोलाचा—महाग झाला होता. आणि पिराजीनेंदेखील लग्नांत मुक्तेचें 'यशोदा' असें आवडतें नांव जरी ठेविलें होतें, तरी नेहमीं बोलतांना तो तिला मुक्ता ह्याच नांवानें संबोधी व एखाद्या मंगल समारंभाच्या वेळीं आप्तेष्टांकडून 'पिराजी! बायकोचें नांव घे ना रे!' अशा आग्रहाचें भरपूर मोल मिळे तेव्हांच व तेंही फक्त उखाण्यांत तो 'यशोदा' हें नांव घेई. लोकांत मात्र मुक्तेचीं मुक्ता व यशोदा हीं दोन्ही नांवें रूढ झालीं होतीं. ती आपल्या बाळपणींच्या मित्र-मैत्रिणींची व व्यासराव वगैरे वडील मंडळींची मुक्ता होती व इतरांची यशोदा होती.

यशोदेचा कौतुकाचा प्रश्न ऐकून व्यासरावही कौतुकानेंच उद्गारला, "तुम्ही दोघेंही एकाच माळेचे मणि आहां."

यशोदा यावर आणखी कोट्या-प्रतिकोट्या करण्याला पुरून उरेशी शेराला सव्वाशेर होती. पण कृष्णा कुठें तिला बोलूं देतो! तो भाला-तरवारीसाठीं जास्तच हट्ट करूं लागला. इतका वेळ तो नुसताच रुसून कोंपऱ्यांत बसला होता. पण आपला आळ पुरविला जाण्याला एवढा हट्ट अपुरा पडत असल्याचें त्याच्या निदर्शनाला येतांच त्यानें निर्वाणीचा उपाय अंमलांत आणण्याला सुरवात केली. बालकांचा हा निर्वाणीचा उपाय कोणता हें कोणीं कोणाला सांगावयाला पाहिजे असें थोडेंच आहे! आई एखादी गोष्ट मनासारखी करीनाशी झाल्यावर तिला 'बाबांना सांगेन' असें भय दाखवावयाचें, बाप मनासारखा वागेनासा होतांच आईची दहशत घालावयाची, आणि अखेर 'शेषं कोपेन पूरयेत्' हा निर्वाणीचा रामबाण सोडावयाचा. हा बाणही वायां गेला व माता-पितरें ह्या बाणानें विद्ध होऊन तीं बालकासमोर नमलीं नाहींत असें कधीं झालें आहे?

पिराजीचा हा युवराज वयाच्या तिसऱ्या वर्षापासूनच, पिराजी बाहेर मृगयेला किंवा मुलुखगिरीला शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन निघाला, कीं मीही बरोबर येणार असा हट्ट धरून बसावयाचा. त्याची समजूत करण्यासाठीं पिराजीनें मुद्दाम त्याच्याकरितां तरवार, ढाल, भाला अशीं खेळणीं आणलीं

होतीं. प्रथम तरवार लोखंडाची व भालाही लोखंडी टोंकाचा होता. पण तीं शस्त्रें घेऊन हा चिमणा वीर जेव्हां घरांतल्याघरांत व्यासराव व यशोदा यांच्याशीं व संधि सांपडली कीं बरोबरीच्या खेळगड्यांशींही लढूं लागला आणि गोठ्यांतील गुरें-वांसरें व आपल्या आईची आवडती हरिणी कपिला यांची शिकार करूं लागला, तेव्हां घरांतल्या माणसांना, शेजाऱ्या-पाजाऱ्यांच्या मुलांना व गुरांवासरांना त्यापासून त्रास पोचूं लागला. आज काय, शिकारींत गोठ्यांतल्या वांसराच्या पायालाच जखम झाली; उद्यां काय, कपिलेचा डोळाच फुटला; परवां काय, शेजारचीं मुलें लुटुपुटूच्या लढाईंत जखमी होऊन रडत रडत घरीं बोभाटा घेऊन गेलीं, अशा आपल्या चिरंजीवांच्या आगळिकी ऐकतां ऐकतां पिराजी व यशोदा यांचा जीव मेटाकुटीला आला. त्यांनीं ह्या बालबंडखोराला निःशस्त्र करून पाहिलें. पण त्यानें निःशस्त्र-प्रतिकाराची व वेळीं काठी-कोयती-पळी चिमटा, जें काय शस्त्र हातीं लागेल तें घेऊन सशस्त्र-प्रतिकाराची मोहीम सुरू केली, तेव्हां यशोदेनें हलकेच लोखंडी खेळणीं दूर लपविलीं व पिराजीनें त्याला लांकडी खेळणीं आणून दिलीं. तींच खेळणीं यशोदेनें आज बाहेर आणून देतांच कृष्णा तीं घेऊन चिमणा शिपाई सजला व आनंदानें नाचूं बागडूं लागला.

"सांग, आतां तूं काय करणार ?" व्यासरावानें विचारलें. यशोदेनेंही अपत्यवात्सल्यरसानें थबथबलेल्या ओंठांनीं त्या आपल्या प्रेमनिधानाचा एक गोडसा पापा घेऊन व्यासरावाच्याच प्रश्नाची पुनरावृत्ति केली.

कृष्णा ऐटीनें आपल्या हातांतील तरवार व भाला यांकडे न्याहाळून पहात म्हणाला, "मी का ? मी आतां बाबांसारखा लढाईवर जाणार, आणि बाबा जसे शत्रूशीं लढतात, तसा लढणार."

"मग काय, आतां तूं लढाई करणार तर !" यशोदा हंसत हंसत म्हणाली.

"हो ! आणि शिकारदेखील करणार !" तेव्हांच आंगणांत कपिला इकडे तिकडे बागडत होती, तिच्याकडे नजर देऊन कृष्णा म्हणाला, "मग बाबा जसे शिकारीला जातात व हरणें मारून आणतात, तसा मीही हरणें मारून आणणार."

"काय, तूं हरणांची शिकार करशील ? तीं फार चपळ असतात.

आपली कपिला पाहिलीस ना कशी वाऱ्यासारखी पळते ती, तशीं तीं पळतात." यशोदा म्हणाली.

"पळेनात! पळालीं म्हणून काय झालें? मी त्यांच्या मागोमाग पळेन" कृष्णा भाला उगारून कपिलेच्या मागोमाग पळत म्हणाला, "आणि हरणावर असा भाला फेंकीन."

"हां! हां! बाळ! ती आपली कपिला ना? तिची शिकार करायची नाहीं, रानांत जाऊन रानांतल्या हरणांची शिकार करायची." असें म्हणून यशोदा कृष्णाला आंवरण्यासाठीं पुढें झाली. कपिला भिऊन दूर दूर पळूं लागली व कृष्णा आईला न जुमानतां तिच्या मागोमाग धावत सुटला. तीं दोघेंही पळत एका झाडीआड गेलीं.

इतक्यांत रानांतून एकाएकीं पांच-सहा रानहरणें पळत पळत आलीं. त्यांच्या घाबरलेल्या चर्यांवरून कोणी तरी शिकारी त्यांच्या पाठीवर असल्याची यशोदा व व्यासराव यांची खात्री झाली. बोलूनचालून ती माळशिरस घाटांतील डोंगराळ मुलखामधली वस्ती. काळवेळ सांगून थोडीच येते! कपिला जी कृष्णाच्या भयानें सैरावैरा पळूं लागली, ती घाबऱ्या घाबऱ्या त्या रानहरणांत जाऊन मिसळली. आतां ह्या शिकाऱ्यांच्या तीरांना आपली कपिला वेळीं हकनाक बळी पडावयाची व मुलालाही ठेंचबीच लागावयाची ह्या भयानें यशोदेनें व्यासरावाला त्या दोघांनाही आंवरून आणण्याला सांगितलें, व इतक्यांत एक रानमांजर घरांत शिरलें होतें, तें दुधाचा फडशा करील म्हणून त्याला हांकलण्यासाठीं स्वतः आंत गेली. यशोदेला जितकी त्या दोन जीवांची कळकळ, तितकीच व्यासरावालाही असल्यानें तो लगेच त्या दोघांच्या मागून धावत गेला. इतक्यांत ज्या दिशेनें रानहरणें पळत आलीं होतीं, त्याच दिशेनें तीर सूं सूं करीत एकावर एक सुटूं लागले. त्यांनीं बिचाऱ्या दोन रानहरणांचा तर बळी घेतलाच; पण कपिलेचाही बळी घेतला! हा काय अनर्थ झाला म्हणून व्यासराव विस्मयचकित होऊन समोंवर पहातो, तोंच एक तीर जो सोंसावत आला तो थेट त्याच्या उजव्या दंडांत रुतला! तशा स्थितींत विव्हळत तो कृष्णाला सांवरूं पहातो, तों-हाय! आणखी एक तीर जो वेगानें आला तो त्या अर्भकाच्या छातींत घुसला! त्यासरशीं त्या अर्भकानें एक—फक्त एकच किंकाळी फोडली आणि— !!!

## दर्शन तिसरें

# ठिणगी पडली !

काळ ओढवावयाचा झाला कीं असा ओढवतो! पिराजी मोहिमेवर निघतांना यशोदेला आपणाबरोबर येऊं नकोस असें सांगतां सांगतां दांतांच्या कण्या करून दमला; पण यशोदेनें आपला हेका कांहीं सोडला नाहीं. ती स्वभावतःच शूर, लढाऊ वृत्तीची व मृगयाप्रिय होती. पिराजी तिला वेळोवेळीं 'बायकोमाणूस तूं, बायकांनीं बांगड्यांचा मुंजळ आवाज करून आपल्या प्रिय जनांना रिझवावें; पण तें घरांतल्या घरांत. त्यांनीं रणमैदानावर येऊं नये. त्यांच्या कोमल कानांना तरवारींचा खणखणाट ऐकवणार नाहीं' असें म्हणून कौतुकानें चिडवी. तेव्हां ती मात्र खरोखरीच चिडे व आपण एकवार आपल्या आंगच्या शौर्यधैर्यादि गुणांबद्दल आपल्या पतीची खात्री करून द्यावी असें तिला वाटे. अशा संधीची ती वाटच पहात होती. अशा संध्या यशोदेचें लग्न झाल्यापासून अनेक येऊन गेल्या. पण पहिल्या एक वर्षांतच ती देवदयेनें मातृपदाच्या मार्गाला लागली. अशा पहिलारू गर्भवतीनें वणवण करणें बरें नाहीं म्हणून, व पुढें तिचें मूल लहान म्हणून, अशा एका ना एका अडचणीमुळें तिची इच्छा फलद्रूप झाली नाहीं. आणि आज तरी तिनें बरोबर येण्याचा हट्ट घेतांच पिराजीनें फारसे आढेवेढे न घेतां तो पुरवला याचें कारण एकतर ती वीस वर्षांची भरज्वानींतील युवति होती व शिवाय ती सहा सात महिन्यांची गरोदर होती. तिला तिसऱ्या महिन्यापासूनच डोहाळे लागावयाला सुरुवात झाली होती. ते डोहाळे घोड्यावर बसावें, शिकार करावी, लढाईवर जावें अशा मर्दानी थाटाचे होते. ह्या डोहाळ्यांचा अर्थ—व्यासराव,जोत्याजी वगैरे वडील माणसें बोलत त्यावरून—यशोदेच्या पोटीं कोणी तरी पराक्रमी वीर पुरुष जन्माला येणार असा पिराजीलाही पटला होता. ते तिचे डोहाळे पुरविण्यासाठीं त्यानें आतां एखादी मोहीम निघाली म्हणजे सहपरिवार मोहिमेवर जावयाचें ठरविलें होतें. योगायोगच तसा होता, त्यामुळें त्याची—विशेषतः यशोदेची—ती इच्छा लौकरच फलद्रूप झाली. शाहूमहाराजांशीं दिल्लीपतीनें करार केल्याप्रमाणें मोंगलाईतील कांहीं प्रांतांतून घांसदाणा व

चौथाई याची भरपाई आज बरेच दिवसांत झाली नव्हती. 'तिकडे शाहू-महाराज व ताराबाई परस्पर आपसांत भांडत आहेत; आपण कबूल केलेली खंडणी दिली नाहीं तर आपलें पारिपत्य करावयाला येण्याइतकें बल शाहू-महाराजांच्या अंगीं कोठें उरलें आहे !' अशा घमेंडींत मोगलाईंतील बादशाही अधिकाऱ्यांनीं हा पोरखेळ चालविला होता. असले प्रकार फार दिवस सहन करण्यांत आपल्या सत्तेला धोका आहे हें शाहूमहाराजांना माहीत होतें. शिवाय ताराबाई व तिच्या वतीचे मराठे सरदार शाहूमहाराजांची सत्ता उलथून पाडण्यासाठीं आटोकाट प्रयत्न करीत होते. तसेंच माणप्रांतीचा कृष्णराव खटावकर, हिंगणगांवचा दमाजी थोरात, कोंकणांतील कान्होजी आंग्रे वगैरे अरेराव चारी बाजूंनीं मराठशाहींतील दुफळीच्या ह्या पेटत्या होळीवर आपल्या सवत्या सुभ्यांची पोळी भाजून घेण्यासाठीं सर्वत्र कमालीची दंगल माजवून बसले होते. ह्या साऱ्यांचें पारिपत्य करण्यासाठीं सैन्याची उभारणी व पाठवण करतां करतां खजिना तर बहुतेक रिता होऊन गेला होता ! आतां बाकी तुंबलेला वसूल आला नाहीं तर पैसा आणावयाचा कोठून व परचक्रांचा प्रतिकार करावयाचा कसा, ह्या विवंचनेची इंगळी शाहूमहाराजांच्या जिवाला सारखी झोंबत होती. त्या अरिष्टांतून बाहेर पडण्याला मार्ग कोणता, असें शाहूमहाराजांनीं आपल्या अष्टप्रधानांना जवळ बोलावून विचारलें, तेव्हां सर्वानुमतें मोगलाईप्रांतावर स्वारी करून तुंबलेली खंडणी वसूल करावी व त्या पैशांतून सैन्याची तरतूद करून मग खटावकर, चव्हाण, थोरात, आंग्रे वगैरे स्वतंत्रवृत्तीनें वागणाऱ्या शिरजोरांची बंडाळी मोडण्याचें काम हातीं घ्यावें असें ठरलें. हें काम चंद्रसेन जाधव आपल्या शिरावर घेत होता. शाहू-महाराजांचा चंद्रसेनाच्या पराक्रमावर विश्वास होता, पण दानतीवर विश्वास नव्हता. चंद्रसेन ताराबाईचा पक्षपाती पडला, तो वेळीं खंडणी वसूल करून ताराबाईचें घर भरणार नाहीं कशावरून ! त्याच्या बेलगामी अधिकाराला मागें खेंचून धरण्याच्या अंतस्थ इराद्यानें पण दाखवावयाला चंद्रसेनाला मदतनीस असावा म्हणून, शाहूमहाराजांनीं बाळाजीपंतांना त्याच्याबरोबर जाण्याला आज्ञा केली. चंद्रसेनाला हें मनांतून मुळींच रुचलें नाहीं. साऱ्यांचा आपणाहून बाळाजी-पंतांवरच जास्त विश्वास, म्हणून चंद्रसेन प्रथमपासूनच बाळाजीपंतांच्या नांवानें मनांतून जळत होता. तशांत धनाजीनें आपल्या आयुष्याच्या शेवटच्या घटकेला

आपले जमाबंदीचे अधिकार शाहूमहाराजांकडून बाळाजीपंतांना देवविले, त्यामुळें तर चंद्रसेनाचें बाळाजीपंतांशीं हाडवैरच जुंपलें. पुढें कांहीं दिवसांनीं शाहूमहाराजांनीं आपसांतील फुटाफुटीविषयीं फिकिरींत असतां आपला पक्ष सबळ करण्यासाठीं बाळाजीपंतांना 'सेनाकर्ते' हा किताब देऊन लष्कराच्या जमावाच्या बेगमीबद्दल पंचवीस लक्षांचा सरंजामही दिला. असा आपला वैरी आपल्या बरोबरीनें पोसला जात असलेला चंद्रसेनाला कसा सहन व्हावा! त्या भडकत्या वैराग्नीवर शाहूमहाराजांच्या ह्या नव्या योजनेनें जणुं काय तेलाचा शिडकाव झाला. आतां ह्या वैऱ्याला जास्त माजूं देतां उपयोगी नाहीं; कांहीं तरी कुरापत काढून त्याला ठेंचलाच पाहिजे, असा मनोमन निर्धार करून पण राजाज्ञा पाळलीच पाहिजे म्हणून, चंद्रसेन बाळाजीपंतांसह मोगलाईवरील मोहिमेवर निघाला. त्या दोघांचें संयुक्त सैन्य मजल-दरमजल करीत माळशिरसच्या घाटापाशीं आलें, तेव्हां घाटांतील घनदाट जंगल पाहून चंद्रसेनाला व इतर अनेक सैनिकांनाही तेथें एक दिवस शिकार करावीशी वाटली, म्हणून जंगलांतच त्यांच्या सैन्याचा तळ पडला. वास्तविक मोहिमेवर जातांना सैनिकांनीं आपलीं बायका-मुलें बरोबर घ्यावयाचीं नाहींत. पण असले नियम तेव्हां सामान्य सैनिकांना तेवढेच कांहींसे लागू असले तरी मातबर लोक सदाच आपल्या लहरीप्रमाणें असले नियम धाब्यावर बसवूं शकत, व 'गाड्याबरोबर नळ्यांना यात्रा' या न्यायानें त्यांच्या मर्जींतील दुय्यम लोकांना देखील त्या संधीचा फायदा घेतां येई. चंद्रसेन हा स्वभावतःच रंगेल गडी असल्यानें त्यानेंही आपली बायको पार्वतीबाई व सहा वर्षांचा एकुलताएक मुलगा रामचंद्र यांना मोहिमेंत बरोबर घेतलें होतें. चंद्रसेनाच्या सैन्यांतील इस्माईलखान रोहिला, सर्जेराव घाटगे वगैरे बड्या अधिकाऱ्यांनींही आपले कबिले बरोबर घेतले होते. बाळाजीपंत तर बाजीराव व चिमाजी ह्या आपल्या दोघां मुलांना शिक्षण देऊन चतुरस्त्र करण्यासाठीं म्हणून नेहमींच बरोबर घेत. अर्थात् आजही ते त्यांच्याबरोबर होते. पिराजी तर बाळाजीपंतांचा कलिजा! तो सहपरिवार निघाल्यावर त्याला आडकाठी कोण करणार! त्यांचा ऋणानुबंधाचा व्यासराव हा ह्या जगांत अगदीं एकटा म्हातारा व तो चंद्रसेनाचा आश्रित. तशांत त्याला नेहमीं आपण आंगाखांद्यावर खेळवून लहानाचीं मोठीं केलेल्या लेंकरांना सोडून दूर रहावेंसेंच वाटत नसे. कृष्णानें तर त्याला जणुं काय

आपलें वेडच लावून ठेविलें होतें. ह्या दोन-तीन नात्यांमुळें तोही अशा प्रसंगीं हटकून बरोबर असावयाचाच. मात्र अशा वेळीं पिराजी, चंद्रसेन व बाळाजी-पंत यांचें वैमनस्य ध्यानीं न घेतां व्यासरावासह एकत्र राही. ह्या परिवारांत त्यांनीं कृष्णाला दूध मिळावें म्हणून एक दुभती गायही बरोबर बाळगली होती. आजदेखील घाटांतील जंगलवस्तींत तीं सर्व मिळून एका निवाऱ्याच्या पडक्या झोंपडींत आनंदानें उतरलीं होतीं. पण पुढें असें दुर्दैव ओढवणार आहे हें त्या बिचाऱ्यांना तरी काय माहीत !

× × ×

असो. मागें वर्णिलेला अकल्पित अनर्थ घडला तेव्हां व्यासरावानें वेगासरसा आपल्या दंडांतील तीर उपटून दूर फेंकून दिला व आपलें सर्व दुःख एका क्षणांत गिळून कृष्णाला उचलून मांडीवर घेऊन त्याच्या छातींतील तीर ओढून काढण्याची खटपट केली, पण फुकट ! त्यानें अंगीं होता नव्हता तेवढा जोर मनगटांत एकवटून पुन्हा तीराला हिसडा दिला तेव्हां तो हातीं आला. पण उपयोग काय ! त्यानें कृष्णाच्या छातींतून पाठीपर्यंत आरपार आपला रस्ता रोखला होता व त्या रस्त्यानें दणकत जातांना कृष्णाचे पंचप्राण केव्हांच परागंदा झाले होते ! आपण आपल्या छबकड्याला तात्काळ कांहीं उपाय करून वांचवूं म्हणून व्यासरावानें एवढी धडपड केली; पण व्यर्थ ! तें कृष्णाचें प्रेत मांडीवर घेऊन त्यानें किंकाळी फोडली "माझ्या कृष्णा रे ! कोणा साता जन्मींच्या हाडवैऱ्यानें माझ्या बाळाचा बळी घेतला !—" पुढें व्यासरावाच्या तोंडून शब्दच निघेना. तो बेशुद्ध होऊन पडला.

यशोदा रानमांजराला हांकलण्यासाठीं झोंपडींत जाते न जाते, तोंच इकडे हा अनर्थ ओढवला. प्रथम तिला त्याची दादच नव्हती. पण तिनें व्यास-रावाची किंचाळी जेव्हां ऐकली, तेव्हां मात्र ती दचकून बाहेर आली व सभोंवार पाहूं लागली. तोंच थोड्या अंतरावर कपिला हातपाय झाडते आहे व व्यासराव अस्ताव्यस्त पडला आहे असें तिला दिसून आलें. तिचा कृष्णा मात्र तिला कोठें दिसेना. अशा वेळीं आईचेंच हृदय तें, तें प्रथम व्यासरावा-साठीं कळवळलें नाहीं, कपिलेसाठींही कळवळलें नाहीं; तें तत्काळ कृष्णा-साठीं कळवळलें. कृष्णा कोठें दिसेना, त्याला पाहाण्यासाठीं नेत्र शक्य तेवढे स्वतःला नकळत विस्फारित करून व अंतःकरणांतील उमाळ्याबरोबर

देहभान विसरून 'कृष्णा ! माझा कृष्णा कुठें आहे !' असा हंबरडा फोडीत यशोदा धावत धावत व्यासराव व कपिला पडलीं होतीं तिकडे जाऊं लागली. झोंपडीपासून त्या अपशकुनी जागेपर्यंतचें अंतर कांहीं फार नव्हतें, सारें दहा-वीस कदमांचें होतें. तें अंतर आपण एका पावलांत तोडून कृष्णाला पाहूं अशा आवेशानें यशोदा चालली. पण कृष्णा कोठें दिसत नाहीं ह्या भीतीनें तिच्या अंतःकरणाला एवढा जबरदस्त धक्का बसला होता कीं, त्यामुळें तिचें पाऊलच उचलेना. तशा स्थितींत पन्नास कदमांच्या चालीइतका वेळ तिला व्यासरावापाशीं जावयाला लागला. जवळ जाऊन पहाते तों काय ! कृष्णा व्यासरावाच्या छातीवर निश्चेष्ट पडलेला तिला दिसला. त्याच्या छातीवरील जखमही तिला दिसली; तरी तो मेला असेल अशी कल्पनाही तिच्या मनाला शिवली नाहीं. तिच्या कल्पनासृष्टींत तो जखमी होऊन बेशुद्ध झाला होता; मेला नव्हता. पण हें कृष्णाचें कल्पनेचें जिवंतपण किती वेळ जीव धरून राहणार ! तिनें त्याला उचलून हृदयाशीं धरलें, त्याच्या तोंडा-वरून हात फिरविला, त्याला आंसवांनीं न्हाऊं घातलें, त्याचे मुके घेतले, त्याच्या डोळ्याला डोळा भिडविला, दोन तीन हांका मारल्या; पण तो हलेना, हंसेना, डोळा फिरवीना, तेव्हां मात्र तिनें त्याला हृदयाशीं धरून एक किंकाळी फोडली!–एकच किंकाळी कां ? तिच्या त्या अपत्यशोकाच्या महापुराला शब्दांचे व संख्येचे बांध घालून तो थोडाच आवरणार होता !

यशोदेच्या त्या शोकानें सारा वनप्रान्त हादरून गेला. व्यासरावदेखील त्या हादरण्यानें शुद्धीवर आला व यशोदेला हृदयाशीं धरून आक्रोश करूं लागला. सभोंवारच्या वनांत वारा वाहीना, झाडांचीं पानें हलेनात, जिकडे-तिकडे शांत ! निस्तब्ध ! अशी सभोंवारची सर्व सृष्टि यशोदेची समदुःखी झाली तरी कृष्णाला कांहीं तिची दया आली नाहीं. तो बोलेना, कीं हालेना, कीं डोळा उघडून पाहीना ! कपिलादेखील कृष्णाशीं निरंतर खेळ खेळण्या-साठींच कीं काय, परलोकीं निघून गेली होती. खरेंच, ती कैक पूर्वजन्मींची शापभ्रष्ट गोपी असावी. मुक्तेच्याठायीं जणुं यशोदामाता संचारून मग त्या यशोदामातेच्या उदरीं भगवान् श्रीकृष्ण अवतार घेणार आहेत ह्या समजुतीनें त्यांच्या संगतींत शापमुक्त होण्यासाठीं ती अगोदर जन्म घेऊन मुक्तेच्या आश्रयाला आली असावी. यशोदा तिची धनीण खरी; पण कृष्णावतारीं तरी गोपींना

यशोदेची शुद्ध-बुद्ध कोठें होती; ती आतां कपिलेला असेल ! जिकडे कान्हा तिकडे गोपी, व जिकडे कृष्ण तिकडे कपिला !

एवढें मात्र खरें कीं, मृगया करणारांनीं जे तीर मारले ते हरणांवर रोंखून म्हणून मारले; कपिला, व्यासराव किंवा कृष्णा यांच्यावर रोंखून मारले नाहींत. तसा त्यांचा दुष्ट मानस असता तर इकडे इतका हाहाःकार उडाला असतां ते आपण होऊन संकटग्रस्तांच्या समाचारासाठीं धावून कशाला येते ! ते दोघे तरुण पुढें आले व दुःखितांचें शांतवन करण्याचा प्रयत्न करूं लागले, तेव्हां यशोदा व व्यासराव ह्या दोघांनीं त्यांना ओळखलें. ते बाळाजीपंतांच्या शतवीरांतील पिराजीचे संवगडी पिलाजी जाधव व नाथाजी धुमाळ हेच होते.

यशोदेनें त्या दोघांना शोकाक्रांत स्वरांत विनविलें, " बाबांनो ! ज्या दुष्टांनीं आमचा असा घात केला, त्यांचें तुम्ही कांहींच पारिपत्य करणार नाहीं काय ? तुमच्या दोस्ताचा एकुलता एक बाळ, त्याचा त्या चांडाळांनीं बळी घेतला !—" यशोदेच्यानें पुढें बोलवेना. तिला अनावर हुंदके येऊं लागले.

व्यासराव यशोदेचें शांतवन करतां करतां त्या दोघांना म्हणाला, " नाथा ! पिलाजी ! तुम्ही मर्द असाल, तुम्ही अस्सल मराठ्यांचे बच्चे असाल, षंढ नसाल, तर आतांच्या आतां जाऊन त्या मगरूर मांगांना त्यांच्या मानगुटीला धरून पकडून आणा. मी चंद्रसेनाला सांगून त्यांना इथल्याइथें तीर मारून ठार करण्याची शिक्षा देवविली नाहीं तर नांवाचा व्यासराव—जातीचा ब्राह्मण नव्हे. चला. हा पहा मीही तुमच्याबरोबर येतों." व्यासराव गुन्हेगारांच्या शोधासाठीं जावयाला उठतां उठतां यशोदेला म्हणाला, " मुक्ते ! देवानें लेंकरूं दिलें, देवानें तें नेलें ! देवाच्या सत्तेपुढें आपला काय इलाज ! आपण कमनशिबाचीं, म्हणून असें झालें. जा बाळ ! आतां शोक करूं नकोस. झोंपडींत बैस जा. जा.—मी हा पहा त्या यमदूतांना पकडावयाला चाललों. त्यांना पकडून आणतों, त्यांना तीरमार करून ठार करतों, व त्यांच्या मुडद्यांच्या लांकडांनीं माझ्या कृष्णाची चिता पेटवितों. जा.—रडूं नकोस."

पण रडूं नकोस म्हणून यशोदेचें रडें थोडेंच थांबणार होतें ! तरीही यशोदा विचारी होती; ती आपल्या जिवाचा करवला तेवढा विरंगुळा करून म्हणाली,

" चला. मीही तुमच्याबरोबर येतें. ह्या स्मशानांत मी तरी एकटी कशी बसूं!" लगेच ती नाथाजी व पिलाजी यांच्याकडे वळून म्हणाली, " नाथा! पिलाजी! हें कृत्य कोणीं केलें तें तुम्हांला माहीत आहे काय ? सांगा. खोटें बोलूं नका, तुम्हांला तुमच्या सवंगड्याच्या, तुमच्या धन्याच्या व तुमच्या राजाच्या गळ्याची शपथ आहे; खरें सांगा."

नाथाजी व पिलाजी हे दोघेही अस्सल मराठे, खरे राजनिष्ठ, निःसीम स्वामिनिष्ठ व 'उत्सवे व्यसने चैव दुर्भिक्ष्ये राष्ट्रविप्लवे, राजद्वारे स्मशाने च यत्तिष्ठन्ति स बान्धवाः' असे पिराजीचे मित्र असल्यानें त्यांना यशोदेनें घातलेली शपथ मोडवेना. आतां आपण गुन्हा कबूल केला तर आपल्या प्राणांवर बेतेल याचीही त्यांना पूर्ण अटकळ होती. पण राजनिष्ठा, स्वामिनिष्ठा, मित्रनिष्ठा व सत्यनिष्ठा अशा चतुर्निष्ठेसमोर त्यांना प्राणांचीही मातब्बरी वाटेनाशी झाली. त्यांनीं पुढें होऊन यशोदेच्या पायांना स्पर्श करून सांगितलें, " यशोदे! हा गुन्हा आम्हां अभाग्यांच्या हातूनच घडला आहे!"

" काय, तुम्हींच माझ्या बाळाचा जीव घेतलात ? अरे चांडाळांनो!" असें म्हणून यशोदा पुन्हा मटकन् खालीं बसून आक्रोश करूं लागली.

इतक्यांत चंद्रसेन सकाळींच मृगयेसाठीं बाहेर पडला होता; तो ही ओरड ऐकून अचानक तेथें आला. त्याला हा भयंकर प्रकार पाहून अत्यंत विस्मय वाटला. त्यानें चौकशी केली, तेव्हां व्यासरावानें त्याला खरा प्रकार सांगून त्या दोघां गुन्हेगारांचें तेथल्या तेथें पारिपत्य करण्याला सांगितलें. नाथाजी व पिलाजी हे बाळाजीपंतांचे शतवीर म्हणून त्यांच्यावर चंद्रसेनाचा दांत होताच. तशांत ते आतां गुन्हेगार ठरलेले; मग त्यांना चंद्रसेन थोडीच गय करणार! त्यानें व्यासरावाला विचारलें, " व्यासराव! ह्या हरामखोरांना काय शिक्षा करूं, सांग."

व्यासराव कळवळून उद्गारला, " यांनीं माझ्या बाळाची शिकार केली, तशी यांची शिकार करून यांना ठार मारलें पाहिजे."

नाथाजी उद्गारला, " व्यासराव! गुन्हा आमच्या हातून घडला खरा; पण आम्हीं कांहीं हें कृत्य मुद्दाम असें केलें नाहीं." लगेच तो यशोदेकडे वळून म्हणाला, " यशोदे! आमची व पिराजीची किती जिव्हाळ्याची दोस्ती आहे हें तुला देखील माहीत आहे. ज्या कृष्णाला आजवर स्वारींत देखील आम्ही

जिवापलीकडे जतन करीत आलों, त्याच्या जिवावर समजून उमजून उठण्याइतके आम्ही निर्दय पशु आहों असें तुला तरी वाटतें का ?"

"त्यांना शासन करण्याचें कांहीं कारण नाहीं. आपलेंच नशीब खोटें, त्यासारखी दुर्बुद्धि त्यांना आठवली!" यशोदा चंद्रसेनाला म्हणाली, "चंद्रसेनजी ! तुम्ही त्यांना सोडून द्या. ते तरी आपलेच लोक आहेत."

चंद्रसेन यशोदेच्या बोलण्याकडे लक्ष न देतां नाथाजी व पिलाजी यांना उद्देशून म्हणाला, "हरामखोरांनो ! तुमचा कावा मी बरोबर ओळखतों. तुम्ही पिराजीचे मित्र म्हणवतां; पण त्याच्या बायकोला भोंदून भुलवून लांबवण्यासाठीं तुमची तिच्याशीं नेहमीं लाडीगोडी सुरू असते, हें का मला माहीत नाहीं ? पिराजी भोळा पडला म्हणून त्याच्या घरांत त्याच्या बायकोशीं चेष्टा चालवतां काय ?"

"असें काय ?" व्यासराव खवळून म्हणाला, "असले बदमाष हे हरामखोर आहेत काय ? मग चंद्रसेन ! आण.–भाला–बरची–तलवार कांहीं तरी माझ्या हातीं दे. मीच इथल्या इथें यांचे मुडदे पाडतों."

यशोदा, पिलाजी, नाथाजी व पिराजी ह्या सर्वांच्याच अब्रूचें वाटोळें करणारा हा नवा आळ अकस्मात् उत्पन्न होतांच सर्वांच्या अंतःकरणांत जो दुःखाचा दाह होत होता, तेथें आतां संतापाच्या ज्वाळा भडकूं लागल्या. चंद्रसेनानें आळ घेतला तो निव्वळ नीचपणानें घेतला होता. किंवा वेळीं त्याची तशी खरीखुरी गैरसमजूत झाली असली तरी ती निव्वळ गैरसमजूत होती. नाथाजी व पिलाजी यांना ह्यांत स्वतःची नाहक बदनामी होत आहे म्हणून तर संताप आलाच; पण स्वतःपेक्षांही आपल्या मित्रपत्नीची–सीता-सावित्री-प्रमाणें जिचें आचरण उज्ज्वल व गंगाजलाप्रमाणें निर्मळ आहे याविषयीं त्यांची बालंबाल खात्री होती, अशा त्या साध्वी यशोदेची ह्यांत व्यर्थ विटंबना होत आहे म्हणून त्यांच्याही संतापाला सीमा राहिली नाहीं.

नाथाजी म्हणाला, "चंद्रसेनजी ! आणखी काय वाटेल तें बोला किंवा पाहिजे तर आमच्या हातून गुन्हा घडला म्हणून आम्हांला काय करावयाचें तें शासन करा, पण जर का पुन्हा तोंडावाटे यशोदेच्या वर्तनाविषयीं घाणेरडे उद्गार काढलेत, तर प्रसंग मोठा कठीण येईल."

पिलाजीही म्हणाला, "याद राखून ठेवा ! जरा विचारानें बोला !"

" पण तुम्ही तरी गप्प रहानारे ! ज्याला त्याला आपल्यासारखेंच सारें जग दिसतें." यशोदा नाथाजी व पिलाजी यांना हातानें गप्प राहण्याला खुणावीत म्हणाली. आज ती पुत्रशोकानें विव्हळ झाली होती म्हणून, नाहींपेक्षां ती वाणीवाटे याहीपेक्षां कठोर शब्दांचें असलें जालीम विष ओकली असती कीं, त्या विषदाहांत चंद्रसेन भाजून गेला असता.

व्यासरावाला यशोदेचे हे तडजोडीचे बोल ऐकून इथें कांहीं तरी पाणी तर मुरत नसेल ना, असा संशय आला. पण त्यांतल्या त्यांत त्याच्या भोळ्या स्वभावाला यशोदा तेवढीशी गुन्हेगार न दिसतां नाथाजी व पिलाजी हे मात्र खरोखरच अशा पापी हेतूनें पिराजीशीं मैत्री ठेवीत असावे असें वाटलें. त्या भरांत तो चंद्रसेनाला म्हणाला, " चंद्रसेन ! पहातोस काय ? तुझ्या आंगीं राम नाहीं तर माझ्या हातीं एखादें हत्यार दे म्हणतों ना ! म्हणजे आतांच्या आतां ह्या दोन सर्पांना ठार मारतों व त्यांच्याबरोबर मीही मरतों."

व्यासराव नुसतें असें म्हणूनच थांबला नाहीं, त्यानें आवेशासरसा जवळचा एक मोठा दगड उचलला व तो आतां त्याच्या हातून नाथाजी किंवा पिलाजी यांपैकीं कोणाच्या तरी मस्तकांत कोसळणार, तोंच यशोदेनें त्याला आवरलें. आतां मात्र व्यासरावाचा नाइलाज झाला. तो आवेशाच्या भरांत एकदम बोलून गेला, " मुक्ते ! जो इतका तूं त्यांचा कैवार घेतेस, ते खरोखरच तुझे * * * आहेत वाटतें ! "

यावर यशोदेनें व्यासरावाचे पाय धरून त्यांवर आंसवांचा अभिषेक करीत विव्हळत उद्गार काढले, " दाजीबा ! मला बोलूं नये तसलीं दुरुत्तरें बोललां त्या पापाबद्दल परमेश्वर तुम्हांला क्षमा करो ! "

यशोदा हे शब्द मुखावाटे उच्चारते आहे तोंच नाथाजी व पिलाजी यांनीं व्यासरावाचे दोन हात दोहींकडून बरच्यावर धरले व बजावलें, " हां ! व्यासराव ! तुमची जीभ फार सैल सुटली. पुन्हा तोंडावाटे असला शब्द उच्चाराल तर खबरदार ! "

" चंद्रसेन ! " व्यासरावानें आतां हे दोघे आपलीं हाडें नरम करणार अशा भयानें मदतीसाठीं हांक मारली.

लगेच चंद्रसेनानें मागचा पुढचा कांहींदेखील विचार न करतां त्या दोघांवर हात टाकला. चंद्रसेन ताकदवान गडी होता खरा; पण त्या दोघांच्या

ऐन पंचविशींतील ताज्या रक्तापुढें त्याच्या ताकदीचा काय दिमाख चालणार ! त्या दोघांनीं चंद्रसेनाला असा जोराचा धक्का दिला कीं, त्यासरसा चंद्रसेन कोलमडून खालीं पडला. पण पडल्यापडल्याच त्यानें कमरेची तरवार उपसण्याला कमी केलें नाहीं. इकडे हा प्रकार चालला आहे, तों तिकडे पिराजी जो शिकारीहून दोन हरणें मारून घेऊन झोंपडींत आला, तों झोंपडींत कोणी नाहीं असें पहातांच तीं हरणें तशींच आंत टाकून सभोंवतीं पहातो तों त्याला इकडे भांडाभांड व रडारड चाललेली दिसली, म्हणून लगेच तो तिकडे गेला. तेव्हां प्रथम नाथाजी, पिलाजी व चंद्रसेन यांच्या झगड्याकडेच त्याचें चित्त वेधलें. त्यानें विचारलें, " नाथ ! हा काय प्रकार आहे ? "

नाथाजी व पिलाजी कांहीं न बोलतां चंद्रसेनाच्या हातांतील तरवार तेवढी हिसकून घेऊन खालीं मान घालून उभे राहिले. चंद्रसेन उठून उभा राहतां राहतां म्हणाला, " पिराजी ! ह्या हरामखोरांनीं तुझा मुलगा व कपिला यांची शिकार केली आहे; ती पहा ! "

पिराजीनें एकवार तिकडे पाहिलें मात्र, त्याबरोबर त्याच्या हृदयांत एवढा जबरदस्त उमाळा उसळला कीं, त्यामुळें तो मटकन् खालीं बसून दोन्ही हातांनीं आपलें कपाळ घट्ट दाबून धरून ढसढसां रडूं लागला. त्याला रडूं आलेलें पाहून यशोदाही पुन्हा मोठमोठ्यानें रडूं लागली. 'माझा कृष्ण काळानें गिळला हो, माझा बाळ मला सोडून गेला !' असा हंबरडा फोडून तिनें पिराजीच्या कमरेला मिठी मारली. पिराजी तिला हृदयापाशीं कवळून नाथाजी व पिलाजी यांच्याकडे पहात उद्गारला, " चांडाळांनो ! जिवाचे जिवलग होऊन जन्मोजन्मींच्या हाडवैऱ्यांसारखी माझी मान कांरे कापलीत ? "

पिराजीचे शब्द नाथाजी व पिलाजी यांच्या हृदयांत बाणांप्रमाणें घुसले. हेच किंवा याहूनही कठोर शब्द चंद्रसेनानें व व्यासरावानें उच्चारलेले होते, यशोदाही याच शब्दांत कळवळत होती; पण ते वाग्बाण जितके त्यांना झोंबले नाहींत तितके पिराजीचे वाग्बाण झोंबले. कारण त्या बाणांच्या टोंकांना मित्रप्रेमाच्या जिव्हाळ्याचें पोलादी पाणी मिळालेलें होतें. त्या वाग्बाणांनीं विद्धहृदय होऊन त्या दोघांनींही पिराजी व यशोदा यांच्या पायांवर घालून घेतलें व तोंडावाटे उद्गार काढले, " पिराजी ! आमच्या हातून जन्मोजन्मींच्या वैऱ्यांना शोभेशी—नव्हे, हाडवैऱ्यांनाही लाजविणारी भयंकर चूक झाली

खरी. त्या चुकीबद्दल तूं खुशाल ही तरवार घे—" बोलतां बोलतां नाथाजी आपल्या कमरेची तरवार काढून पिराजीसमोर ठेवीत म्हणाला, " व आम्हां दोघांच्याही गर्दनी छाटून टाक. शिकार! शिकार आम्हांला भोंवली ही! कोणत्या कुवेळेवर आम्ही आज शिकारीला निघालों नकळे!"

पिराजी तरवार उचलीना, तेव्हां व्यासराव तरवारीला हात घालीत म्हणाला, "नामर्दा! ज्यांनीं तुझ्या पोटच्या पोराला ठार केलें त्यांना ठार करावयाला तूं लाजतोस? त्यापेक्षां बांगड्या कां भरल्या नाहींस?"

पिराजीनें व्यासरावाचा हात आवरला व तरवार बाजूला सारीत म्हटलें, "दाजीबा! त्यांच्याकडे तरी काय दोष! मी कमनशिबी म्हणून त्यांना तशी बुद्धि झाली. त्यांनीं माझ्या बाळाला मुद्दाम ठार मारलें असें थोडेंच आहे! आणि त्यांना मारून तरी आपला बाळ आतां थोडाच जिवंत व्हावयाचा आहे!"

"दाजीबा! होऊं नये ती गोष्ट होऊन गेली. आमचेंच नशीब फुटकें! आतां असा आततायीपणा करून काय होणार बरें!" यशोदा रडत उद्गारली.

व्यासराव त्या दोघांच्या बोलण्याकडे लक्ष न देतां चंद्रसेनाकडे वळून म्हणाला, "चंद्रसेन! तूं खरा सेनापति—धनाजी जाधवाचा अस्सल बच्चा असलास तर माझा न्याय कर. मला न्याय पाहिजे आहे. बस्स! न्याय!"

चंद्रसेनाच्या आंगीं पुन्हा आंगच्या खुनशीपणाचें वारें उसळूं लागलें. त्या उसळीसरसा तो उठूं लागतांच पिराजीनें यशोदेला बाजूला सारून पुढें होऊन म्हटलें, "हां! चंद्रसेन! मुलगा माझा मेला; त्याचें आम्ही आपसांत काय तें पाहून घेऊं. तुम्हांला त्यांत ढवळाढवळ करण्याचें कारण नाहीं."

"कारण नाहीं म्हणजे? मी सेनापति आहें. जोंवर मी मोहिमेवर आहें तोंवर सैन्यांतील प्रत्येकाचा न्यायनिवाडा करण्याचा शाहूमहाजांइतकाच मलाही अधिकार आहे." चंद्रसेन म्हणाला.

"पण आमचा न्याय तुम्ही करावयाला नको म्हणतों ना? न्यायच करावयाचा झाला तर तो आमचे धनीसाहेब करतील." पिराजी म्हणाला.

"पण तुझे धनीसाहेबदेखील माझेच ताबेदार आहेत. त्यांचा धनी-देखील मीच आहें" चंद्रसेन जास्त आढ्यतेनें म्हणाला.

"तें तुम्ही दोघे तिकडे परस्पर पाहून घ्या. मीं कांहीं तुमच्याकडे फिर्याद केली नाहीं." पिराजी म्हणाला.

" पण त्यांनीं माझाही गुन्हा केला आहे. त्या गुन्ह्याबद्दल मी त्यांना शासन करणार." चंद्रसेन उद्गारला.

" आम्हांला शासन करणारे आमचे धनीसाहेब समर्थ आहेत. तुम्हांला त्यात पडण्याचें कांहीं कारण नाहीं." नाथाजी व पिलाजी धीरानें पुढें होऊन म्हणाले.

आपण सेनापति असतां बाळाजीपंतांचे यःकश्चित् हुजरेही आपणावर उलटतात म्हणजे काय, असें, चंद्रसेन मनस्वी चिडून नाथाजी व पिलाजी यांच्या आंगावर धावून जात म्हणाला, " बेमुर्वतखोर बदमाष ! हा पहा, तुमचें शासन करण्याचा अधिकार मला आहे कीं नाहीं तें दाखवितों."

इतक्या हातघाईवर प्रसंग आलेला पाहून पिराजी व यशोदादेखील आपलें सारें दुःख गिळून धीरानें उभीं राहिलीं. नाथाजी व पिलाजी यांनाही विलक्षण अवसान चढलें. आतां ह्या तिघां जवानांसमोर आपला एकट्याचा निभाव लागावयाचा नाहीं हें ओळखून चंद्रसेनानें मागें पाऊल घेतलें. मात्र तो आपल्या मकाणाकडे जातां जातां गर्जना करून गेला, " पिराजी ! तूं-देखील माझा गुन्हा करणाऱ्या गुन्हेगारांना सामील झालास नव्हे काय ? ठीक आहे. यशोदे ! पोटचा पोर मरूनदेखील तुला पुरेसें दुःख झालें नाहीं, त्याची भरपाई मी तुझ्या कपाळचें कुंकू पुसून करीन, याद राख !"

चंद्रसेनाचे हे अभद्र बोल यशोदेला कसे सहन व्हावे ! ती वाघिणीसारखी चवताळून म्हणाली, " निलाजऱ्या मांगा ! मी मर्दाची मर्दानी स्त्री आहे. असल्या धमक्यांना मी भ्यायची नाहीं. तुझ्या बायकोच्या कपाळचें कुंकू पुसून तें माझ्या कपाळाला लावीन. नीच, हलकट कुठचा !"

चंद्रसेनानें जातां जातां एकवार नुसतें जखमी झालेल्या वाघाप्रमाणें मागें वळून पाहिलें; पण कांहीं बोलण्याची मात्र त्याला छाती झाली नाहीं.

यशोदा रडत रडत स्वतःशीं उद्गारली, " देवा ! काय रे दुर्धर प्रसंग आणलास हा ! ही ठिणगी आतां कोठवर भडकेल, भगवंता ! तुझें तुला माहीत !"

## दर्शन चौथें

# परिस्थितीच्या अंतरंगांत

यशोदेवर ओढवलेला अनर्थ एका दृष्टीनें अकल्पित होता; पण तो चंद्रसेनाच्या पूर्वकल्पित कारस्थानानुसार त्याच्या पथ्यावरच घडला. मोगलाईवरील मोहिमेची कल्पना निघण्याच्या पूर्वींपासून ताराबाईशीं चंद्रसेनाचीं शाहूमहाराजांची सत्ता उलथून पाडण्याविषयींचीं कृष्णकारस्थानें सुरू होतींच; पण तीं मूर्तस्वरूपाला येण्याला बाळाजीपंतांची आडकाठी होती. चंद्रसेन, सर्जेराव घाटगे, रंभाजी निंबाळकर, इस्माईलखान, कृष्णराव प्रतिनिधि वगैरे शाहूमहाराजांचें अन्न खाऊन त्या खाल्ल्या घरचेच वांसे मोजण्याला न शरमणाऱ्या निमकहराम लोकांनीं एकजुटीनें जेव्हां जेव्हां शाहूमहाराजांना गोत्यांत आणण्याचे डाव रचावे, तेव्हां तेव्हां बाळाजीपंतांनीं आपल्या आंगच्या अपूर्व राजकारणनैपुण्यानें ते हाणून पाडावे, असें शाहूमहाराजांच्या राज्याभिषेकापासून आज चार-पांच वर्षें चाललें होतें. हे सर्व लोक आंतून ताराबाईला सामील होते हें खरें; पण त्या सामीलपणाचा अर्थ असा नव्हे कीं, त्यांना शाहूमहाराजांचा साताऱ्याच्या गादीवरील वारसाच मान्य नसून शाहूमहाराजांपूर्वींचा छत्रपति ताराबाईचा वेडा शिवाजी याच्याठायीं त्यांची निस्सीम राजनिष्ठा होती. एखादें जनावर मरून पडल्यावर त्याच्या मांसावर ताव मारण्यासाठीं दाही दिशांचीं भुकेनें वखवखलेलीं गिधाडें एकत्र व्हावीं, ह्या अर्थाची चंद्रसेन वगैरे शाहूमहाराजांविरुद्ध ताराबाईशीं उघड अथवा प्रच्छन्न संगनमत करणाऱ्या ह्य प्रभावळीची मनीषा होती. चंद्रसेन शाहूमहाराजांच्या विरुद्ध कां हें सर्व मराठशाहीला मशहूर होतें. त्याच्या इतर साथीदारांना शाहूमहाराज व ताराबाई यांच्या आपसांतील दुफळीच्या होळीवर स्वतंत्र जहागिरी व जहागिरींत मनाला येईल तशी अस्मानीसुलतानी गाजविण्याचा अधिकार ह्या स्वार्थाची पोळी भाजून घ्यावयाची होती. हा स्वार्थ त्यांना शाहूमहाराज व बाळाजीपंतांसारखा महाराजांचा राजकार्यधुरंधर सल्लागार यांच्या अमदानींत साधतां येणें दुरापास्त होतें, शाहूमहाराजांचें उच्चाटन होऊन ताराबाईच्या हातीं मराठशाहीचीं राज्यसूत्रें येतांच, ताराबाई बोलूनचालून अबला

पडली, तिच्या डोळ्यांत आपल्याला हां हां म्हणतां धूळ फेकतां येऊन आपली महत्त्वाकांक्षा पूर्ण करतां येईल अशी त्या प्रत्येकाची खात्री होती. हा डाव साधण्यासाठीं जो तो आपल्या मगदुराप्रमाणें कमीअधिक अरेरावी गाजवीत होता. ज्यांच्या हातीं पूर्वींपासून कांहीं निश्चित सत्ता, बराचसा मुलूख, बराचसा पैका व अंगीं बराच पराक्रमही होता, अशा कान्होजी आंग्रे, दमाजी थोरात, कृष्णराव खटावकर वगैरे अव्वलींच्या अरेरावांनीं परस्पर आपल्या सवत्या सुभ्यांची स्थापना करण्याच्या हांवेनें छत्रपतींची सत्ता कःपदार्थ मानून मराठशाहींत मनसोक्त पुंडाई चालविली होतीच. पण ही कर्तबगार पुंडांची गोष्ट झाली; ज्यांच्या पदरीं कर्तबगारी कमी त्यांना चंद्रसेनासारख्या शाहूमहाराजांच्या जबरदस्त वैऱ्याची कांस धरण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. माणसाच्या अंगीं ज्या मानानें कर्तबगारी कमी, त्या मानानें कुढेपणा व तदनुषंगानें गैरइमानी, तोंडपुजेपणा, मत्सर वगैरे दुर्गुण जास्त भिनलेले असावयाचे, व असले हीनबुद्धि दुबळे लोकच राष्ट्राच्या अथवा समाजाच्या पडत्या काळीं स्वतःच्या क्षुद्र स्वार्थासाठीं राष्ट्राच्या अथवा समाजाच्या नरडीला नख लावण्याला उद्युक्त व्हावयाचे. भूपृष्ठावरील नैसर्गिक वातावरणांत चल-बिचल झाली, विजा कडकडूं लागल्या व वादळ वाहूं लागलें म्हणजे रत्नाकर खवळतो व त्याच्या पृष्ठभागावर मोठमोठ्या लाटा उसळूं लागतात; अशा वेळींदेखील समुद्राच्या उदरीं असलेलीं मणि-मौक्तिकादि रत्नें समुद्राच्या तळींच राहतात, मोठमोठाले खडकदेखील स्थानापन्न राहतात. पण ज्यांच्या अंगीं मूळचा भरींवपणा नाहीं व ज्यांना समुद्रवलय ओलांडून भूपृष्ठाच्या नवप्रान्ताकडे धाव घेण्याची हांव फार, असा कुजकासडका पानपाचोळा व किडलेला लांकूड-ओंडाच मोठ्या दिमाखानें समुद्रपृष्ठावर तरंगूं लागावयाचा! आजच्या महालीला मराठशाहीचीही थेट अशीच अवस्था होती. मराठशाहींत राज्याधिकाराबाबत ताराबाई व शाहूमहाराज यांच्यामधील दुफळीचें वादळ सुरू होतांच त्या सपाट्यासरसे राजा व प्रजा यांचीं परस्परांशीं असलेलीं निष्ठाबंधनें सपासप तुटूं लागलीं व कोणाचा पाय-पोस कोणाच्या पायांत नाहींसा झाला. अशा स्थितींतही ज्यांना आपल्या मायदेशाचें मंगल खरोखर कळत होतें व खराखुरा जाज्वल्य स्वदेशाभिमान ज्यांच्या ठायीं होता असे बाळाजी विश्वनाथ, खंडो बल्लाळ चिटणीस, हैबत-

राव निंबाळकर वगैरे निष्ठावंत कर्ते लोक शाहूमहाराजांचें न्यायसंमत छत्रपतित्व मानून त्यांच्याशीं इमानानें वागत होते. ज्यांच्या अंगीं इतकी कडवी धडाडी नव्हती पण कर्तव्यनिष्ठा मात्र दांडगी होती, असे परशुरामपंत प्रतिनिधि, संक्राजी नारायण सचीव वगैरे लोक कोणत्याही बाजूनें फाजील कारवाई न करतां शाहूमहाराज व ताराबाई ह्या उभयपक्षींचा रोष सहन करून प्रतिकूल परिस्थिति निरस्त होण्याची वाट पहात मौन स्वीकारून स्वस्थ होते. पण मराठशाहीच्या कमनशिबानें तेव्हां महाराष्ट्रांतील पराक्रमी पुरुषांत फारशी इमानदारी उरलीच नव्हती. मराठशाहींत तेव्हां देव-दानवांच्या युद्धाची पुनरावृत्ति होत होती. अशा युद्धांत अखेर विजय सत्पक्षीय देवांचाच व्हावयाचा हें जरी खरें—व तेंच अखेर खरें झालेंही—तरी युद्धाच्या प्रथमचरणांत स्वदेशाभिमानशून्य व स्वार्थलोलुप अशा दानवांची दुर्दमनीय दंडेली कांहीं काळ तरी दुमदुमत राहणें अपरिहार्य होतें. ह्या दानवांना ताराबाईसारखी राज्यतृष्णेनें धुंदावलेली दानवी देवता आयती लाभली, चंद्रसेनासारखे दुरात्मे तिचें कापट्ययुक्त भजन-पूजन करूं लागले व सर्जेराव घाटगे, कृष्णराव प्रतिनिधि, इस्माईल रोहिला वगैरे तशाच पिशाचवृत्तीचे इतर दुरात्मे त्याला साथीदार मिळाले.

चंद्रसेनाची महत्त्वाकांक्षा व बाळाजीपंतांशीं ते धनाजीच्या पदरीं आल्यापासूनची दावेदारी तर जगद्विख्यात होतीच. सर्जेराव घाटगे शाहूमहाराज व बाळाजीपंत यांच्या विरुद्ध कां, तर त्याला मराठशाहींत मोठी मानमान्यता मिळवून व भोंसल्यांच्या राजघराण्याशीं सोयरीक करून मराठशाहीच्या राजघराण्यांत आपलें स्तोम माजवावयाचें होतें. पण घाटगे हे अस्सल क्षत्रिय नाहींत असा जनापवाद तेव्हां रूढ होता, तो अनेक बाजूंनीं सर्जेरावाच्या महत्त्वाकांक्षेच्या आड येत होता. तो जनापवाद खरा असो कीं खोटा असो; तें शल्य सर्जेरावाच्या मनांत एकसारखें डांचत होतें. हा जनापवाद नष्ट करण्यासाठीं आपण खटपट करूं लागल्यास शाहूमहाराज विशेषतः बाळाजी विश्वनाथ हा 'भट' आपल्या वाटेंत आडवा पडेल, ह्या भीतीनें सर्जेरावानें त्यांच्याशीं वैर मांडून ताराबाईशीं लाडीगोडी लावण्याचा उपक्रम फार पूर्वींपासून सुरू केला होता. पुढें ताराबाईनें कोल्हापुरीं स्वतंत्र गादी स्थापन करण्याचा डाव खेळण्याला सुरवात करतांच तर सर्जेरावानें भविष्यकाळीं कोल्हापूरच्या नव्या छत्रपतीशीं कोणत्याना

कोणत्या उपायानें संधान बांधून तेथें चंचुप्रवेश करून घेण्याच्या इराद्यानें आपली वागणूक ठेविली होती. हा हेतु साध्य होण्यासाठींदेखील त्याला शाहूमहाराज व बाळाजीपंत यांचा मोड होण्याची आवश्यकता भासत होतीच!

कृष्णराव प्रतिनिधीचा दांत मुख्यतः शाहूमहाराजांवर नसून बाळाजीपंतांवर होता. त्याच्या वडिलांना-परशुरामपंत प्रतिनिधींना--शाहूमहाराजांनीं ते ताराबाईला सामील असल्याच्या आरोपावरून कैदेंत डांबून ठेविलें होतें; हें कृत्यदेखील शाहूमहाराजांनीं केवळ स्वतःच्या बुद्धीनें केलें नसून त्यांना तसें करण्याला भर बाळाजीपंतांनींच दिली असावी असा कृष्णरावाचा समज होता. मात्र त्याला वाईट वाटत होतें तें वडील कैदेंत डांबले गेले म्हणूनच केवळ नसून त्यांचें प्रतिनिधिपद आपणाला मिळत नाहीं हें त्याच्या असंतोषांतील इंगित होतें. कृष्णराव स्वार्थपरायण व कोत्या दृष्टीचा असल्यानें प्रतिनिधींच्या वांट्याला कैद येण्यांत वस्तुतः बाळाजीपंतांचें कांहीं अंग नसतां व बाळाजीपंत उलट जेव्हां जेव्हां संधि सांपडेल तेव्हां प्रतिनिधींना मुक्त करण्याविषयीं शाहूमहाराजांचें मन वळविण्याचा आटोकाट प्रयत्न करीत असतांही ही सारी कारवाई त्यांचीच असा त्याचा समज–समज कसला, गैरसमज–झाला होता. त्याचें पूर्वग्रहदूषित कोतें मन पुढें असे मनकवडे कयास बांधूं लागलें कीं, आपण देशस्थ ब्राह्मण पडलों व बाळाजीपंत पडले चित्पावन, म्हणून ते आपल्या घराण्याला असे पाण्यांत पाहातात. त्यांचा नक्षा आपण उतरला पाहिजे; चित्पावनावर देशस्थानें मात केली पाहिजे. शाहूमहाराजांकडून आपणाला पुन्हा प्रतिनिधिपद मिळण्याची आशा नाहीं, तें आपण ताराबाईकडून मिळवावयाचें, ह्या हेतूनें शाहूमहाराज व बाळाजीपंत यांच्यांशीं त्यानें प्रच्छन्न दावेदारी मांडली होती व ती सफल करण्यासाठीं तो चंद्रसेनाच्या तोंडानें पाणी पिऊं लागला होता.

इस्माईलखान रोहिल्याचें चंद्रसेनाशीं नातें मात्र सर्वस्वीं भिन्न स्वरूपाचें होतें. तो चंद्रसेनाच्या सैन्यांत शिलेदारीवर होता खरा; पण चंद्रसेनाच्या सैन्यांत नोकरी करणें हा त्याचा मुख्य व्यवसाय नव्हता. तो खरें पाहूं गेलें असतां दिल्लीपतीच्या वतीनें झुल्पिकारखानानें चंद्रसेन जाधवाला फितविण्यासाठीं दक्षिणेंत पाठविलेला हस्तक होता. सहा वर्षांपूर्वीं शाहूमहाराजांची सुटका अजीमशहा व झुल्पिकारखान यांनीं केली ती दक्षिणेंत मराठशाहीच्या वारशाच्या बाबतींत शाहू-

महाराज व ताराबाई यांच्यांत दुफळी माजून त्या दुफळींत मराठशाहीच्या बरगड्या खिळखिळ्या व्हाव्या व मग आपणाला मराठ्यांचें राज्य गिळंकृत करावयाला सांपडावें म्हणून. शिवाय शाहूमहाराज बाळपणापासून बादशहाच्या जनान-खान्यांत वाढून मोठे झाल्यामुळें ते बादशाही सत्तेचे सदैव अभिमानी राहून स्वतःला बादशहाचा मांडलिक म्हणवून घेण्यांत भूषण मानतील अशी अजीम-शहा व झुल्पिकारखान यांची अटकळ होती. पण शाहूमहाराजांना हें पारतंत्र्य रुचण्याचीं चिन्हें कांहीं दिसेनात. मग हा त्यांच्या नसानसांत सळसळणाऱ्या स्वराज्यसंस्थापक श्रीशिवाजीमहाराजांच्या उत्कट स्वदेशप्रेमानें लालावलेल्या रक्ताच्या आनुवंशिकतेचा परिणाम असो, कीं त्यांच्याठायीं सुप्तावस्थेंत वसणाऱ्या हिंदवी-स्वराज्याविषयींच्या कळकळीच्या निखाऱ्यावर मुसलमानांच्या दीर्घ-कालीन सहवासांत जो मुसलमानाविषयींचा आदर व स्वदेश-स्वधर्म यांविषयीं-च्या ज्वलज्जहाल अभिमानाविषयींचें शैथिल्य याची राखाडी सांचली होती ती बाळाजीपंतांनीं आपल्या ज्वलज्जहाल देशभक्तीचा फुंकर घालून फुंकून टाकली म्हणून असो; बादशहा व त्याचा वजीर यांना वाटलें होतें तितके शाहूमहाराज आहारीं पडण्याचीं चिन्हें त्यांना दिसेनात. मराठशाहींत फूट पाडण्याचा हा पहिला डाव नीटसा साधेना, तेव्हां बादशहा व वजीर यांनीं भेदनीतीचा दुसरा पवित्रा कसा टाकतां येईल याचा बारकाईनें शोध करून तें कार्य करण्यासाठीं आपल्या पदरचा इस्माईल नांवाचा शिलेदार गुप्त हेर म्हणून ह्या कामगिरीवर पाठविला. इस्माइललाच ह्या कामगिरीवर पाठविण्याचें कारण एक तर तो हुषार होता व दुसरें, तो जन्मानें हिंदु असून पुढें बाटून मुसलमान झालेला होता. मुसलमान आईबापांच्या पोटीं जन्मलेल्या मुसलमानापेक्षां असले बाटगे मुसलमान हिंदवी-स्वराज्याच्या व हिंदु-धर्माच्या जिवावर उठण्यांत जास्त तत्तर असतात, हें नैसर्गिक सत्य ओळखून वजिरानें इस्माइलला ह्या कामगिरीवर पाठविलें होतें. वजिराचा हा तर्क कांहीं फोल नव्हता. काय असेल तें असो, धर्मभ्रष्ट लोक आपल्या पूर्वधर्मांतील बांधवांचा जितका द्वेष करतात व त्यांना आपल्याप्रमाणेंच धर्मभ्रष्ट करण्याला आडवाटांनीं जितके झटतात, तितके जन्मतःच परधर्मी असलेले लोक खास झटत नसतील. हा अनुभव सर्व काळीं, सर्व स्थळीं व सर्व परिस्थितींत सारखाच खरा असतो. इस्माइल हा मूळचा मराठा होता. जावळीकर पाटील

हें त्याच्या घराण्याचें आडनांव. पण तें घराणें तेव्हां जावळीकर ह्याच नांवानें सर्वांना परिचित होतें. चोरांच्या आळंदीला येऊन पाटीलकी करूं लागण्यापूर्वीं ह्या घराण्याचें चार पिढयांपासून जावळी हें वतनी गांव होतें, त्यावरून जावळीकर हें नांव पडलें. औरंगजेब बादशहाच्या कोणा मुसलमान सरदारानें जावळीला लुटालूट करून तेथल्या अनेक हिंदूंना बाटविलें तेव्हांच तेथला दिनाजी पाटील जावळीकर मोगलाईंत मोठा मानमरातब मिळविण्याच्या आशेनें स्वखुषीनें आपल्या अनेक कौटुंबीयांसह बाटून मुसलमान झाला. हा दिनाजी पाटील सर्व दुर्गुणांचा मूर्तिमंत पुतळा होता. त्याची एक रखेली व तिच्यापासून झालेला शंभुराव नांवाचा पांच-सहा वर्षांचा मुलगा होता, तीं दोघें व—लग्नाची बायको कावेरी व तिची सहा महिन्यांची एक तान्ही कन्या यांशिवाय—घरची इतर मंडळी मुसलमान झाली. ती बाईदेखील बाटावयाची; पण ती साताऱ्याजवळील उरमोडी नदीच्या कांठीं असलेल्या शेंदरें नांवाच्या खेड्यांतील एका खानदानीच्या मराठा कुळांतील स्त्री होती, तिनें आपल्या नादान पतीबरोबर बाटण्याचें नाकारून चोरांच्या आळंदीहून रातोरात चोरून आपल्या तान्ह्या कन्येसह पळ काढला व मजल-दर-मजल करीत आपलें माहेर गांठलें. दिनाजी पाटील बाटून अल्लाउद्दीन बनला व त्याचा शंभुराव इस्माईल बनला. अल्लाउद्दीन आपल्या बाटग्या परिवारासह त्या मुसलमान सरदाराच्या आश्रयानें दिल्लीला येऊन राहूं लागला. तो लौकरच कुराण वगैरे पढून मुल्ला झाला, व आपल्या पूर्वीच्या धर्मबंधु हिंदूंना बाटवून बादशहाला खूष करण्यासाठीं धडपड करतां करतां मेला. त्याचा मुलगा इस्माईल हळुहळू मोठा—बावीस वर्षांचा झाला. तो तर जणुं काय हिंदूंचा जन्मोजन्मींचा हाडवैरी असा—बापसे बेटा सबाई निघाला. बापाची मुल्लागिरी बापाच्या पश्चात् त्याला मिळाली होतीच. शिवाय एक लहानशी वतनदारीही मिळाली होती. पुढें औरंगजेबाच्या निधनानंतर तो वजिराच्या आश्रयाला गेला. वजिरानें त्याच्या कर्तबगारीवर खूष होऊन त्याला आपल्या सैन्यांत शिलेदारी दिली. इस्माइलचा हातखंडा हिंदुद्वेष्टेपणाही त्याच्या इतर कर्तबगारीबरोबरच वजिराच्या डोळ्यांत भरला. त्यानें त्याला मराठशाहींत कलागती लावून मराठशाहीचा इमला आंतून पोंखरण्याच्या कामगिरीवर नेमलें. लगेच इस्माईल आपल्या आणखी कांहीं बाटग्या साथीदारांसह नोकरीच्या मिषानें आपला व आपल्या साथीदारांचा

वजिराशीं बेबनाव झाल्याचा बहाणा करून साताऱ्याला आला, तो चंद्रसेन जाधवाच्या सैन्यांत नोकरीला राहिला. ह्या घरभेद्या टोळीची ही नोकरी केवळ निमित्तमात्र होती; तिचें खरें काम बादशहाच्या वतीनें मराठशाहीच्या मंदिराखालीं परोपरीचे सुरुंग पेरणें, हें होतें.

चंद्रसेनाच्या पदरींही इस्माइलचा जम बसण्याला फारसा कालावधि लागला नाहीं. चंद्रसेन शाहूमहाराजांच्या विरुद्ध व ताराबाईला सामील आहे, त्याच्याठायीं स्वदेशाभिमान व स्वधर्माभिमान यांची वाण असून पराक्रम मात्र खूप आहे, असें पाहून इस्माइलानें हळुहळू त्याचें मन मोगलाईकडे वळविण्याला सुरुवात केली व त्यांत त्याला यशही येऊं लागलें. त्याच्या मार्फत चंद्रसेनाचीं दिल्लीच्या बादशहाशीं गुप्त कारस्थानें सुरू झालीं व तो बादशाही अमलाशीं अंतस्थ सलोख्यानें वागूं लागला. प्रसंग पडल्यास बादशहाशीं उघडउघड सलोखा करून ताराबाईचा पक्ष विजयी होण्यासाठीं त्याची मदत घ्यावयाची, व तो बेत साधला नाहीं तर उघडउघड मराठशाही सोडून मोगलाईंत जाऊन स्थायिक व्हावयाचें असा चंद्रसेनाच्या विचारांचा प्रवाह दिवसेंदिवस वाहूं लागला. अशा अनेक गोष्टींमुळें इस्माईल चंद्रसेनाच्या गळ्यांतील ताईत बनून राहिला होता.

एकूण मराठशाहीचा मुडदा पाडून त्यावर आपल्या क्षुद्र स्वार्थाची मेजवानी पार पाडण्यासाठीं टपून बसलेल्या मानवी गिधाडांची दोस्ती ही अशा प्रकारची होती!

* * *

आज मराठ्यांच्या सैन्यांतील मृगयाप्रिय लोक मृगयेला निघण्यापूर्वीं रात्रभर व उजाडेपर्यंत तेथें ठायीं ठायीं कारस्थानांना एवढा ऊत आला होता कीं, पुसण्याची सोय नाहीं. मराठ्यांचें सैन्य जरी दिसावयाला एक होतें, तरी सेनापति चंद्रसेन जाधव व सेनाकर्ते बाळाजी विश्वनाथ असे त्या सैन्यांत उघड उघड दोन तट होते; दोघेही पराक्रमी व महत्त्वाकांक्षी पुरुष पडले, व दोघेही एकमेकांचे प्रतिस्पर्धी! त्यामुळें दोघांच्याही गोटांत निरनिराळीं कारस्थानें चाललेलीं असावयाचींच. त्यांत फरक असेल तर एवढाच कीं, चंद्रसेनाच्या गोटांतील कारस्थानांत स्वकीयांचा नाश करून स्वार्थ कसा साधतां येईल

याविषयींच्या विघातक गोष्टींचा खल चालावयाचा, व बाळाजीपंतांच्या गोटांतील कारस्थानांत घरभेद्या स्वकीयांच्या कारस्थानांपासून मराठशाहीचा बचाव कसा करावयाचा याविषयींचा खल चालावयाचा. दोघांचेही गुप्त हेर देशांत सर्वत्र टेहळणीवर असावयाचे व ते रोज जी बातमी आणतील तिच्या अनुरोधानें ह्या कारस्थानांचा ओघ हरहमेष बदलावयाचा. ह्या हरहमेषच्या नियमाप्रमाणें आज सकाळच्या अनर्थ घडण्याच्या पूर्वरात्रीं चंद्रसेनाच्या गुप्त हेरानें बातमी आणली कीं, ताराबाई कोल्हापुराकडे सैन्य वगैरेंची जय्यत तयारी करीत असून लौकरच साताऱ्यावर स्वारी करून सातारची गादी हस्तगत करण्याचा तिचा निश्चय कायम झाला आहे. ती फक्त चंद्रसेन मोगलाईवरील मोहिमेवरून माघारा येतो केव्हां व आपणाला सामील होतो केव्हां, याची वाट पहाते आहे. एवढें कळतांच चंद्रसेन व त्याचे साक्षीदार ताराबाईला सामील होऊन साताऱ्याच्या गादीवर अनर्थपरंपरा ओढून आणण्यासाठीं इतके अधीर झाले कीं, ताराबाईची जर इतकी तयारी आहे तर आपण मोगलाईवरील मोहिमेंत व्यर्थ कालक्षेप न करतां आतांच याच पावलीं माघारे जाऊन ताराबाईला जाऊन मिळावें असें त्यांच्या मनानें घेतलें. पण सर्व बाजूंनीं परिस्थितीचा विचार करतां त्यांना हा उतावळेपणा धोक्याचा वाटूं लागला. कारण, ते माघारे फिरले तरी बाळाजीपंत थोडेच माघारे फिरणार होते ! चंद्रसेन जरी सेनापति होता व अफाट दल जरी त्याच्या पाठीशीं होतें, तरी बाळाजीपंतांचें बळही उपेक्षा करण्यासारखें नव्हतें. त्यांना निर्बल करण्यासाठीं त्यांच्या सैन्यांत फूट पाडण्याचे प्रयत्न चंद्रसेनानें मोठ्या शिकस्तीनें चालविले होते, व त्यांत त्याला बरेंच यशही आलें होतें. आज चंद्रसेनानें माघार घ्यावयाची म्हणतांच बाळाजी-पंतांच्या हुकमतींतील बहुतेक सैन्य तो शब्द मानण्याइतकें फितूर झालें होतें. पण त्यांच्या सभोंवारच्या शतवीरांचा अभेद्य तट भेदण्याच्या कामीं मात्र चंद्रसेन अगदीं हातटेंकीला आला होता. एवढा मोठा सेनापति ! सहस्रावधि सैन्य त्याच्या पदरीं ! असें असतां त्याला बाळाजीपंतांच्या शतवीरांच्या—शंभर स्वारांच्या लहानशा पथकाचा एवढा दरारा वाटावा ही नवलाईची गोष्ट तर खरीच ! पण वस्तुस्थिति तशी होती हेंही खरें. बाळाजीपंतांचें शतवीरांचें पथक खरोखरच कोणत्याही सहस्र वीरांना चळवळ कांपविणारें होतें. शाहूमहाराजांनीं बाळाजीपंतांना 'सेनाकर्ते' हा किताब दिल्यावर त्यांनीं पहिली गोष्ट जी केली

ती ह्या शतवीरपथकाची उभारणी करण्याची. आपल्या सहस्त्रावधि सैन्यांतून ऐन पंचविशीच्या आंतले वज्रदेही व प्रत्यक्ष काळालाही आपल्यासमोर चळचळां कापावयास लावतील व आपल्या हांकेला मध्यरात्रीं तर मध्यरात्रीं धावून येऊन आपल्या जिवाला जीव देतील असे शंभर तरुण वेंचून काढून त्यांनीं हें पथक बनविलें होतें. ही शतवीरांची निवड त्यांनीं आपले एकनिष्ठ सेवक पिराजी राऊत, नाथाजी धुमाळ व पिलाजी जाधव ह्या तिघांच्या पारखीनें केली होती. ह्या शतवीरांतील प्रत्येक वीराला शिलेदार अशी संज्ञा होती. आज्ञाधारकपणा म्हणजे ह्या शतवीरांच्या आंगीं इतका अलोट होता कीं, बाळाजीपंतांच्या तोंडून शब्द निघण्याचा अवकाश, कीं प्रत्येक शिलेदार आपलें शिर उतरून देण्याला तयार असावयाचा! असले हे महापराक्रमी शंभर वीर चंद्रसेनाला कर्दनकाळासारखे वाटत असले तर त्यांत नवल तें काय!

असो. आजच्या मसलतींत चंद्रसेनानें आपल्या साथीदारांच्या संमतीनें असें ठरविलें होतें कीं, शाहूमहाराजांचा पक्ष सोडून ताराबाईला जाऊन मिळण्यापूर्वीं कांहीं तरी कुरापत काढून बाळाजीपंतांशीं तंटा करावयाचा, व शिकारीच्या धांदलींत शक्य तों शतवीरांचें प्रत्यक्ष सूत्रचालन करणाऱ्या पिराजी, नाथाजी व पिलाजी ह्या त्रिमूर्तींना प्रथम छाटावयाचें. हे आघाडीचे तीन महारथी पडले कीं बाकीच्या शतवीरांना नामोहरम करून बाळाजीपंतांना लंगडें करण्याला फारसे आयास पडणार नाहींत असा चंद्रसेनाचा तर्क होता. ही कामगिरी इस्माइलनें पुढें सरून स्वयंस्फूर्तीनें आपल्या शिरावर घेतली. असलें क्रूर कृत्य करण्यांत इस्माइलला एवढा हुरूप वाटण्याचें कारण—त्याला असा संशय होता कीं, ह्या तिघांचाही आपल्या बायकोवर—लतिफेवर डोळा आहे. त्याला असा संशय येण्याचें कारण लतिफा त्या तिघांच्या पराक्रमांचे पोवाडे गाण्यांत व ऐकण्यांत आनंद मानी! पण वस्तुस्थिति मात्र निराळी होती. लतिफा, पिराजी वगैरे तिघांची चहाती होती खरी; पण त्यांच्याविषयीं तिच्या अथवा तिच्याविषयीं त्यांच्या मनाला पापी विचार कधींही शिवला नव्हता. लतिफा दोन वर्षांपूर्वीं इस्माइलची बायको व आठ महिन्यांपूर्वीं त्याच्या जहांगिराची आई झाली होती. अर्थात् ती आजला मुसलमान होती; पण ती देहानें मुसलमान होती, मनानें नव्हे. दोन वर्षांपूर्वीं एक अनाथ मराठा म्हातारी आपल्या एकुलत्या एका सोळा वर्षें वयाच्या सुंदर मुलीसह

साताऱ्याच्या आसपासच्या भाडळी-बोरगांव गांवीं रहात होती. इस्माईल कांहीं कामानिमित्त तिकडे गेला असतां त्याच्या डोळ्यांत ती पोरगी सलूं लागली, तेव्हां लगेच त्यानें दंडेली करून तिचें हरण केलें व बळजबरीनें तिला बाटवून तिच्याशीं शादी केली. ह्या सर्व गोष्टी अर्थात्च त्या मुलीच्या मर्जीविरुद्ध झाल्या. ती परवां बाटविली जाऊन इस्माइलाची अर्धांगी लतिफा बनली, व काल आठ महिन्यांपूर्वीं त्याच्या जहांगिराची जन्मदात्री झाली, तरी तिच्या अंतःकरणांतील हिंदुत्वाभिमानाची ज्योत विझली नव्हती, व इस्माइल आणि त्याचा इस्लाम-धर्म यांविषयीं आदर वाटण्याचें राहून उलट तिरस्कार—कमालीचा तिरस्कार—मात्र तिला वाटत होता. दोन वर्षांपूर्वीं इस्माइलाचा घरचा कैदखाना वांट्याला आल्यापासून बाहेरच्या जगाला सर्वस्वीं ती पारखी झाली होती. मग तिला तिची आई तरी भेटणार कशी! आणि घरांत तरी काय! इस्माईल व त्याची बाटगी आई ह्या दोघांनीं तिला नेहमीं ती मुसलमानी रीतीरिवाजांप्रमाणें वागत नाहीं, अल्लाची आराधना करीत नाहीं, म्हणून अतोनात छळावें. पहिलें वर्ष तर तिच्यावर सासूचा व नवऱ्याचा इतका सक्त पहारा असे कीं, ती गळफांस करून अथवा विहिरींत उडी घालून जीव देईन म्हणेल तरदेखील तिला तेवढयापुरता एकांत सांपडूं नये! अशा जुलूमजबरदस्तींतही लतिफेचा हिंदुत्वाभिमान सर्वस्वी लोपला नव्हता. ती प्रथम इस्माइलाच्या तावडींत सांपडली व इस्माइलनें तिला बळजबरीनें बाटवून तिच्याशीं शादी लावली तेव्हां तिची अभागी आई टाहो फोडीत चंद्रसेन इस्माइलाचा धनी म्हणून त्याच्यापाशीं तक्रार घेऊन आली. पण चंद्रसेनानें तिला धुडकावून लावलें. तेव्हां ती बिचारी शोक करीत ऊर बडवीत भ्रमिष्ट होऊन कोठें निघून गेली याचा तेव्हांपासून पत्ता नव्हता. त्या वेळीं पिराजी, नाथाजी व पिलाजी यांनीं—विशेषतः पिलाजीनें तिची विचारपूस करून इस्माइलाच्या तावडींतून तिला सोडविण्यासाठीं परोपरीचे भगीरथ प्रयत्न केले. त्याचे ते प्रयत्न वायां गेले; पण त्यांचा प्रत्यय असा आला कीं, आपल्या हितासाठीं ह्या तिघां शिलेदारांविषयीं—विशेषतः पिलाजीविषयीं लतिफेच्या मनांत आपले-पणा वज्रलेपानें बाणून राहिला, व आपल्या बायकोवर डोळा ठेवणारे हे तिघे बदमाष आहेत असा त्यांच्याविषयींचा द्वेष इस्माइलच्या अंतःकरणांत

वज्रलेपासारखा दृढमूल होऊन बसला. नाथाजी व पिलाजी हे इस्माइलला पाण्यांत पाहूं लागले याला याशिवाय आणखी एक जबरदस्त कारण होतें. पिलाजी व नाथाजी ह्या दोघांना अनुक्रमें कमळा व कमळजा अशा अठरा-एकोणीस वर्षांच्या उमरीच्या सुंदर बहिणी होत्या. व कमळा नाथाजीची आणि कमळजा पिलाजीची अर्धांगी होती. पण मध्यंतरीं एक फकीर इस्माइलच्या आश्रयानें साताऱ्यांत येऊन तळ देऊन बसला; त्याच्या आंगच्या बोकेसंन्यासी-पणाला नगरांतील बरींच स्त्री-पुरुषें भाळून त्याच्या कृपेनें आपापलें प्रिय साध्य करण्यासाठीं त्याच्या भजनीं लागलीं. त्यांतच ह्या दोन पोरी—दोघींनाही अजून मूल होत नव्हतें; तें व्हावें ह्या आशेनें-त्या फकिराच्या मोहपाशांत भक्तिभावानें गुर-फुटल्या गेल्या ! पण पुढें जेव्हां तो ढोंगी फकीर व त्या दोघी पोरी मिळून तिघें एकाच दिवशीं नापत्ता झालीं व इस्माईल त्यांचा ठावठिकाणा सांगेना, तेव्हां पिलाजी व नाथाजी यांना तसेंच इतर अनेकांनाही वाटलें कीं तो फकीर ढोंगी होता व इस्माईल त्याचा साथीदार होता. मग नाथाजी व पिलाजी यांना इस्माईल वैरीसा कां वाटणार नाहीं !

अस्तु. बाळाजीपंत, नाथाजी, पिलाजी, पिराजी व अखेर शाहूमहाराज यांची गठडी वळण्याचा बेत रात्रीच्या बैठकींत मुक्रर झाल्यावर इस्माइलानें आपल्या मकाणाला येतांच आपल्या आईला ती आनंदाची वार्ता सविस्तर सांगितली. ती ऐकून त्या बाटग्या बाईला परमसंतोष झाला. पण लतिफेला मात्र तें ऐकून—विशेषतः पिलाजीच्या जीवाला धोका आहे हें ऐकून मस्तकावर आकाश कोसळल्यासारखें वाटलें. त्या चिंतानलानें तिच्या मनांत मारे आगीची डोंबा-डोंब उडवून दिली. पण त्या बिचारीला ती आग विझविण्यासाठीं तिच्या-वर अश्रुसिंचन करण्याचीही मोकळीक नव्हती. न जाणो ! ते अश्रु तिच्या नादान नवऱ्यानें अथवा कजाग सासूनें पाहिले असते तर मग त्या गरीब गाईची धडगत नव्हती !

पण पेटत्या अग्नीपेक्षां धुमसता अग्नि जास्त भयंकर असतो म्हणतात. पेटत्या अग्नीवर पाय पडूं नये म्हणून मनुष्य सावधपणानें पाऊल उचलतो, पण धुमसता अग्नि आपल्या अस्तित्वाची उघड साक्ष न देतां अचानक पेट घेऊन अनर्थ करतो. इस्माईल लतिफेच्या बाबतींत असाच फसला. त्याला तिच्या मनःस्थितीचा जरादेखील मागमूस लागला नाहीं. तो

कोठपर्यंत ? दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठून तो रात्रौ ठरलेल्या बेतानुसार शिकारीला जाईतोंपर्यंत ! ती सारी रात्र लतिफा इस्माइलशीं नेहमींप्रमाणेंच हंसली खेळली, हौसे-मौजेंत गढून गेली. हें जग आहे व ही जन्मठेपेची शिक्षा आपल्या वांट्याला आली आहे हें स्मरून तसें वागणें तिच्या कपाळींच आलें होतें, त्याला ती तरी काय करील ! पण तिच्या मनांत मात्र आपल्या कैवाऱ्यांचें— विशेषतः पिलाजीचें आतां कसें होणार याविषयीं एकसारखी हुरहुर लागून राहिली होती. इस्माइलला तिच्या ह्या मानसिक अस्वस्थतेचा ओझरता संशय-देखील आला नाहीं. मध्यरात्रीच्या अगोदर थोडा वेळ काळोखांत चुकून वळचणीची पाल चुकचुकत तिच्या आंगावर पडली, तेव्हां ती भिऊन एवढ्यानें ओरडली कीं, दिवा लावून पाहीपर्यंत इस्माइलला वाटलें एखादा साप हिच्या आंगावर पडला कीं काय! पण ती पाल होती, हें पाहतांच त्यानें ती मारली व 'भित्री ! भित्री ! बायको जातीची खरी !' अशी लतिफेच्या हनुवटीला हात लावून * * * तिची गोड थट्टा करीत तो पुन्हा झोंपीं गेला. त्या आडदांडाला स्त्री-जातीच्या साहसाची काय पारख ! साऱ्या स्त्रीजातीचीच गोष्ट कशाला, तो आज दोन वर्षें लतिफेशीं संसार करीत होता, ती अष्टौप्रहर त्याच्या सहवासांत जखडून पडलेली होती, तरीही तिचे गुण, तिचें साहस व तिच्या नसानसांत सळसळणारें अस्सल लढवय्या मराठ्याचें रक्त याची त्या मानवजातीला कलंक-भूत असलेल्या रानवटाला मुळींच जाणीव नव्हती !

इस्माइलला झोंप लागतांच लतिफा हलकेच आपल्या छातीवर पडलेला त्याचा हात दूर करून जरादेखील जाग न देतां उठली व जहांगीर मध्येंच जागा झाला त्याला पाजून पुन्हा निजवून दरवाजाबाहेर सासू निजली होती ती जागी होईल ह्या भयानें तेथेंच भिंतीला दोन विती रुंदीचें एक भोंक तात्पुरत्या कांबट्या बांधून बंद केलें होतें तें खुलें करून त्यांतून भिंतीलगत असलेल्या बोरीच्या वृक्षाच्या आधारानें 'देवा ! पिलाजीचें रक्षण कर' असें म्हणत बाहेर निसटली. बोरीचे कांटे आंगाला बोंचले, पर्वा नाहीं. तिच्या कमनशिबानें बोरीच्या बुंध्याशीं असलेले कांटे पायांत मोडले, पर्वा नाहीं. मध्यरात्रीचा सुमार, पण भय नाहीं. शरीराच्या वेदनांनीं हाय म्हणणें नाहीं. अशा वेळीं पिशाच्चें पृथ्वीवर इतस्ततः संचार करीत असतात, तसें एखादें पिशाच आपणाला झपाटील कीं काय

ह्या शंकेचा लवलेशही मनांत नाहीं. ती तीराप्रमाणें वाटेनें तर वाटेनें, आडवाटेनें तर आडवाटेनें झप्‌झप् पावलें उचलीत चालत कोठेंशी गेली व एका घटकेच्या आंत तशीच परत आली. शयनागारांत तिच्या पाव-लटीनें इस्माईल जागा झाला व तिची चुळबुळ पाहून 'प्यारी ! सोते नहिं क्यौं ?' असें लाडिकपणें विचारूं लागला, तेव्हां तिनें भयभीत अंतःकरणानें कांपऱ्या स्वरांत उत्तर दिलें, "प्यारे ! मघांशीं पाल आंगावर पडली, तेव्हां-पासून भीतीनें माझ्या छातींत धडकी भरली आहे ! डोळाच लागत नाहीं."

त्या मूर्खाला लतिफेचे हे बोल खरेच वाटले.

पहांट होतांच चंद्रसेन, इस्माईल व इतर ज्यांना ज्यांना शिकारीला जावयाचें होतें ते सारे गेले. चंद्रसेनाला बाळाजीपंतांची कांहीं तरी कुरापत काढावयाची होतीच; त्याला उजाडतांच यशोदेच्या मकाणाशेजारीं गुदरलेला अनर्थ पथ्यकर वाटला. आंधळा मागतो एक डोळा तर देव देतो दोन, अशांतला हा मामला झाला. पिराजी, नाथाजी व पिलाजी अनायासेंच वर्मी सांपडले. चंद्रसेन जो तेथून पिराजी वगैरे मंडळीकडून अपमानित होऊन निघाला, तो ह्या संधीचा राईचा पर्वत करावयाचा अशा मत्सरपूर्ण निश्चयानेंच निघाला. जातांना त्याच्या मनांत जे मनोरथाचे मनोरे उभारले गेले, त्यांवर तो आपल्या डेऱ्यांत जातांच पार्वतीबाईनें आपल्या मत्सरी मनोरथाचा कळस ठेवला. त्यानें तिला सर्व वर्तमान निवेदन केलें, तेव्हां तिनें त्याचे कान फुंकले, "पिराजी, नाथाजी व पिलाजी ह्या शिरजोरांनीं तुमचा जो एवढा अपमान केला, तो बाळाजीपंतांच्या चिथावणीनें, सेनापति हा कुठच्या झाडाचा पाला असें समजून केला. याची कांहीं लाज असेल तर पहा ! हा भट तुमच्या आश्रयाला आला व तुमच्या अन्नावर पोसून आज इतका माजला. शाहूमहाराजांच्या कानाशीं लागून त्यानें जमाबंदीचे अधिकार बळकावले, सेनाकर्तेपणा बळकावला, उद्यां वेळीं तो पेशवेपदही बळकावील, अशा नानापरीच्या कारवाया करून आजच्या सेनापतींनाही हुसकून लावील. भटांची जात आहे ती ! ती खाल्ल्या घरचे वांसे मोजणारच. आतां उद्यां सारी मराठशाही भटांच्या घशांत उतरून मग त्यांनीं तुमच्याआमच्या मातबर मराठ्यांच्या बायकापोरांना आपल्या बायकांचीं लुगडीं धुवायला, भांडीं घासायला व गोठ्यांतलें शेण भरायला लावलें नाहीं तर नांव कशाला हवें !"

पार्वतीबाईच्या ह्या आगलाव्या विषारी कलागतीनें स्वतःला इष्ट तो परिणाम चंद्रसेनाच्या मनावर घडवून आणतां आला. तिचें हें रडगाणें नेहमींचेंच होतें. पण इतके दिवस तिच्या सुराला चंद्रसेनाचा सूर तंतोतंत भिडला नव्हता तो आज भिडला, " पार्वती ! तूं म्हणतेस तें सारें खरें. मला ह्या गोष्टी कळत नाहींत असें का तुला वाटतें ? पण कोणतीही गोष्ट मनासारखी व्हावयाला काळवेळ साधावी लागते. ती काळ वेळ आज साधूं पहात आहे. आतां तूं पहाच ! आज माजलेल्या ह्या भटांचा उद्यां माज उतरवून मी त्यांना मराठशाहींत अन्नाला महाग करीन व त्यांच्या बायका-पोरांना तुझीं लुगडीं धुवायला, तुझीं खरकटीं भांडीं घांसायला, तुझ्या गोठ्यांत शेण भरायला लावीन तरच जाधव हें नांव सांगेन ! "

पार्वतीबाईला पतीचे हे निर्वाणीचे बोल ऐकून मनापासून हंसू आलें !

## दर्शन पांचवें

# अज्ञातवासाला सुरुवात

चंद्रसेनाचे गुप्त हेर केव्हां कोठें काय होतें हें कळविण्याला तत्पर होते, व बाळाजीपंतांचे शतवीर झोंपा घेत होते असें थोडेंच आहे ! बाळाजीपंत मोहिमेवर आले तरी त्यांनीं आपले कांहीं डोकेबाज वीर ह्या कामगिरीवर ठेविले होतेच. शिवाय शाहूमहाराजही सातार्‍याला झोंपा काढीत नव्हते. त्यांचीही ताराबाईच्या कारस्थानावर सक्त नजर होतीच. जी बातमी चंद्र-सेनाच्या गुप्त हेरांनीं आणली तीच बातमी बाळाजीपंतांच्या गुप्त हेरांनींही आणली, व त्याच दिवशीं शाहूमहाराजांकडून जोत्याजी केसरकर व खंडो बल्लाळ चिटणीस, 'अशी परिस्थिति आहे; यांतून मार्ग कसा काढावयाचा' हें विचारण्यासाठीं बाळाजीपंतांकडे येऊन पोंचले. रात्रभर सर्वांनीं ह्या प्रश्नाचा खल करून अखेर एक नामी तोड काढली. ती अशी कीं, शाहूमहाराजांनीं कोल्हापूरच्या गादीचा वारस राजाराममहाराज व राजसबाई यांचा मुलगा संभाजी हा आहे अशी मान्यता द्यावी, व त्याला पाठिंबा देऊन ताराबाई आणि तिचा मुलगा शिवाजी यांना कैदेंत टाकण्याला सांगावें; म्हणजे संभाजी शाहूमहाराजांशीं कृतज्ञ राहून एवढें कार्य करून तेथें निर्वेधपणें राज्य करूं लागेल. अशानें कोल्हापूरच्या सवत्या सुभ्याचा परस्पर बंदोबस्तही होईल व शाहूमहाराजांच्या वाटेंतील ताराबाईचा कांटाही अनायासें दूर होईल. या-प्रमाणें विचार नक्की झाला. बाळाजीपंतांनीं शाहूमहाराजांना स्वदस्तुरचा तसा खलिता रातोरात लिहून तो मोहोरबंद तयार करून ठेवला व नंतर सर्व मंडळी झोंपीं गेली. एकटे बाळाजीपंत मात्र जागेच होते. त्यांच्या मनाला स्वास्थ्य नव्हतें. पिलाजी बाहेर पहार्‍यावर होता. तो अकस्मात् आंत येऊन बाळाजीपंतांना मुजरा करून म्हणाला, " सरकार! आतांच एक अनिष्ट बातमी माझ्या कानीं आली आहे. सेनापतीसाहेब व त्यांचे साथीदार यांनीं आपणाला व आम्हां सर्वांना दगाफटका करण्याचे बेत रचिले आहेत."

ही बातमी ऐकून बाळाजीपंतांना कांहीं विशेष वाटलें नाहीं. चंद्रसेन जाधव आपल्या वाइटावर टपून बसलेला आहे ही गोष्ट त्यांना व त्यांच्या

निकटसहवासीयांना मुळींच नवी नव्हती. त्यांनीं तसें बोलून दाखविलें तेव्हां पिलाजी पुन्हा म्हणाला, "सरकार! सेनापतीसाहेब आपणालाच नव्हे तर छत्रपति शाहूमहाराजांनाही पाण्यांत पाहतात हें साऱ्या जगाला माहीत आहे. पण मला मिळालेली बातमी तशा मामुली स्वरूपाची नाहीं. ह्या मोहिमेंत— ह्या एक-दोन दिवसांत आपणां सर्वांवर एखादें भयंकर अरिष्ट गुदरणार यांत संशय नाहीं."

"असें कोणतें अरिष्ट गुदरणार व तें कसें?"

पिलाजी अंमळ ओशाळल्यासारखें करून म्हणाला, "सरकार! आज रात्रौ चंद्रसेन, इस्माईल, सर्जेराव घाटगे वगैरे आमच्या साऱ्या हितशत्रूंनीं एकत्र जमून नक्की विचार केला आहे कीं, उद्यांला कांहींतरी कुरापत काढून आपणांशीं भांडावयाचें व आपणांला आणि आपल्या निष्ठावंत सेवकांना देतां येईल तेवढा दगा देऊन अपेशाचें खापर आपल्या माथीं फोडून उघड उघड ताराबाई आईसाहेबांना जाऊन मिळावयाचें."

बाळाजीपंतांचें चित्त अगोदरच व्यग्र झालें होतें, त्यांत ह्या नव्या बातमीनें आणखी भर पडली; पण ते डगमगले मात्र नाहींत. नीतिमान्, धीरवान् व कार्यकुशल पुरुष पडला तो; साक्षात् धरणीकंप होऊन सारी धरणी हादरून गेली तरी असल्या कर्मयोगी पुरुषाचें अंतःकरण कृतनिश्चयापासून ढळावयाचें नाहीं. त्यांनीं स्वतः तर धीर सोडला नाहींच; पण पिलाजीच्या चर्येवर चिंतेची छाया पहातांच उलटा त्याला धीर दिला. "कांहीं चिंता नाहीं. आपल्या हिंदवी-स्वराज्याच्या मंगलासाठीं आपण सारे जिवावर उदार होऊन झटत आहों, हें देश-कार्य म्हणजेच देवकार्य आहे. देव आमचा पाठीराखा आहे. तुम्ही मात्र कसाही प्रसंग पडला तरी धीर सोडतां कामा नये. सेनापति असले आणखी कितीही कां डाव रचीना व कसलींही संकटें कां माझ्या समोर आणून उभीं करीना! तुम्ही माझे शतवीर माझ्या साह्याला उभे असल्यावर आपण त्या संकटांच्या छाताडावरून सहज शतपावली घालूं. तूं मला वेळींच खबर दिलीस हें फार चांगलें केलेंस. उजाडल्यावर आपण सर्व एकंदर परिस्थितीचा विचार करून काय तें ठरवूं. तूं आतां जा."

बाळाजीपंतांच्या ह्या संजीवनीतुल्य बोलांनीं पिलाजीलाही नवा हुरूप आला. तो मजुरा करून बाहेर आला. तोंवर ज्या बातमीदारानें ही बातमी

आणलो तो—नव्हे, ती लतिफा बाहेर आपणाला कोणी पहाणार नाहीं अशा सावधगिरीनें बाजूला उभी होती.

" धनीसाहेबांना सांगितलेंस ? " लतिफेनें हलकेंच पुढें होऊन विचारलें.

"होय." पिलाजी लतिफेकडे निरखून पहात म्हणाला, " मला वाटलें, तूं गेली असशील."

"मी गेलें नाहीं. मला एकटीला जायला भय वाटतें." लतिफा म्हणाली.

वस्तुतः लतिफा हें कांहींसें खोटें बोलली. पण तें खोटें प्रेममूलक व म्हणूनच क्षम्य होतें. भर रात्रौ ती जी एथवर आली ती एकटी आली. तेव्हां तिला भय वाटलें नाहीं, मग आतां माघारी जातांनाच भय वाटण्याचें काय कारण अशी शंका पिलाजीलादेखील आली. पण त्यानें ती मनावर घेतली नाहीं. ती आली तेव्हांच आपण कां आलों याचा खुलासा तिनें पिलाजीपाशीं गर्भितार्थानें केला होता. पिलाजीला तिनें प्रथम पाहिलें तें तो तिची इस्माइल-च्या कचाटींतून मोकळीक करण्यासाठीं झटत होता तेव्हां. तेव्हांची वेळच अशी होती कीं, जर दैववशात् ती मोकळी सुटली असती, तर तिच्या जन्माची काय अवस्था झाली असती, ती पिलाजीची सहचारिणी झाली नसती असें तरी कोणीं सांगावें ! पण तिची मुक्तता करण्यासाठीं पिलाजीनें तेव्हां जी धडपड केली ती तिला आपली धर्मभगिनी मानून केली व तीही तेव्हां-पासून त्याला धर्मबंधु ह्याच नात्यानें ओळखीत होती. मात्र पिलाजी तेव्हांपासून आजवर तिला जवळजवळ अगदीं विसरला होता, पण ती मात्र त्याला विसरली नव्हती. उलट तिचा पिलाजीविषयींचा कृतज्ञपणा इतका वर्धित व दृढमूल होऊन बसला होता कीं, काय असेल तें असो, पिलाजी सुखी असावा, त्याच्या केंसालाही धक्का लागूं नये, वेळ पडली तर आपण त्याच्यासाठीं मरावें देखील, असें तिला वाटूं लागलें होतें. म्हणूनच ती आज एवढें अपूर्व साहस करण्याला तयार झाली. ती तशीच कांहीं वेळ पिलाजीकडे टक लावून पहात उभी होती. पुन्हा तिला काय वाटलें कोण जाणे. ती म्हणाली, " बरें तर; मी आतां येतें."

"तूं एकटी जाशील का ? " पिलाजीनें विचारलें.

"हो! जाईन तर! न जाऊन कुणाला सांगायचें! देवानेंच मला वनवासी केलें आहे, त्याला काय करायचें ! " लतिफा म्हणाली, "तुला बरोबर यायला



"धनीसाहेबांना सांगितलेंस ?" लतिकेनें पुढें होऊन विचारलें.

फोटोग्राफर–एस्. जी. नाईक, पुणें.]

[पृष्ठ ५०.

सांगितलें असतें. पण रात्रीची वेळ, तूं पहारा सोडून येऊं नयेस हें चांगलें. तुम्ही यापुढें आपल्या सर्वांच्या जिवाला मात्र जपा. एवढें सांगण्यासाठींच मी ही इथवर आलें."

"आमच्या जिवाला आम्ही जपतों. पण–" पिलाजी मध्येंच अडखळून म्हणाला, "ह्या अनर्थांत जर इस्माइलाच्या जिवावर बेतलें तर वैधव्य तुझ्या कपाळीं येईल त्याची काय वाट ?"

लतिफा गंभीर स्वरांत गर्जून म्हणाली, "वैधव्य ? कसलें वैधव्य ? सध्यां मी सौभाग्यवती आहें असें का तुला वाटतें ? असल्या बळजबरीच्या सौभाग्यांत मला कुठें आनंद होतो आहे, तें वैधव्यांत दुःख होईल ! मघाशीं मीं तुला सांगितलें ना,–मला मरायलादेखील मोकळीक नाहीं, म्हणूनच मी आजवर जगलें आहें. आजवर दोन वर्षांत कोंडवाड्याबाहेरचें जग असें हें आज मला दिसतें आहे ! मला आजवर माझ्या घराच्या दरवाजाबाहेर पाहाण्याचीदेखील मोकळीक मिळाली नाहीं, कीं गळफांस करून मरेन म्हटलें तर एका क्षणाचा एकांतही मिळाला नाहीं."

"मग आज बरी संधि मिळाली ?"

"परमेश्वरानें धैर्य दिलें म्हणून, एरव्हीं सुखासुखी संधि कुठची मिळायला ! आज धैर्य झालें तें तुझ्यासाठीं–पिलाजी ! एकट्या तुझ्यासाठीं ! तुझे-माझे ऋणानुबंध काय आहेत नकळे; पण मला आपलें नेहमीं वाटतें, मला भाऊबंद, सगेसोयरे कोणी नाहींत ते तुम्हीच माझे पाठीराखे भाऊ ! आणि त्यांतल्या त्यांत तुझ्याविषयीं मला इतकी कळकळ वाटते कीं,–छे ! कोणत्या शब्दांनीं मी माझें मन तुला खुलें करून सांगूं बरें ! नुसत्या शब्दांनीं तुला त्याची ओळख पटायची नाहीं. आजवर तुला माझी आठवणदेखील नव्हती–नव्हतीच. खरें ना ? बोल, खरेंना मी बोललें हें ?"

"हो ! आठवण नव्हती खरी !"

"पिलाजी ! माझ्यासारख्या अभागी स्त्रियांच्या यातनांची बाहेरच्या जगाला कल्पना करतां यावयाची नाहीं. माझा धर्म गेला, जात गेली, कुळ गेलें, गोत गेलें, अशा स्थितींत जगण्यांत मला आनंद वाटत असेल असें का तुला वाटतें ? तर तसें नाहीं रे बाबा ! तसें नाहीं. मी अनंत पूर्वजन्मींची पातकी, त्या पातकांची फेड रौरव नरकांत पडून करायची तो हा रौरव नरक माझ्या

चांटयाला आला आहे. तूं माझें कसलें सौभाग्य व कसलें वैधव्य घेऊन बसलास ? इस्माईल तुमच्या हातून ठार झाला तर झाला, तो माझा कोण, तें मला त्यांत दुःख होईल ? उलट मला त्यांत आनंद होईल. तूं म्हणशील कीं, त्यांत आनंद कसला ! तर आनंद असा कीं, माझ्या एका जन्माची वाताहात झाली ती कांहीं आतां नव्हेशी होत नाहीं; पण माझ्यासारख्याच माझ्या इतर भगिनी ज्या ह्या सैतानाच्या हातून बाटविल्या जायच्या, त्या बिचाऱ्यांना त्यांचा हा एक शत्रु मेल्यावर तेवढाच तरणोपाय होईल !–पण मला उशीर होतो. मी आतां जात्यें. तुम्हीं सावधगिरीनें वागावें एवढेंच माझें तुम्हांला अखेरचें सांगणें आहे. मी आतां जातेंच." असें म्हणून लतिफा तेथून घाईघाईनें निघून गेली. ती चांदण्याच्या प्रकाशांत अगदीं दिसेनाशी होईतों पिलाजी तिच्याकडे निरखून पाहात होता. लतिफेची ही दुर्दशा पाहून तर त्याला पराकाष्ठेचा खेद झालाच. त्यांतच कमळा व कमळजा यांचीही अशीच वाट लागली असेल ह्या चिंतेची भर पडून त्याचें मस्तक भ्रमून गेलें.

लतिफा पिलाजीपासून थोडी दूर जातांच पहिला विचार तिच्या डोक्यांत आला तो 'माझा जहांगीर जागा होऊन रडत तर नसेलना !' हा होता. तो रडूं लागला तर इस्माईल जागा होऊन आपणाला हांका मारूं लागेल व आपण जाग्यावर सांपडलों नाहीं म्हणजे अनर्थ होईल हें भय, व 'आपलं बाळ रडून कळवळत तर नसेल ना' ही अपत्यवात्सल्यापासून उत्पन्न होणारी चिंता, अशी दुहेरी बोंचणी तिच्या मनाला लागल्यानें ती दुप्पट वेगानें चालूं लागली. ती बिन्हाडांतून बाहेर पडली तेव्हां वाटेंत एक विहीर तिला आढळली, तेव्हां पिलाजीला भावी अरिष्टाची बातमी देऊन माघारी येतांना या विहिरीचा आश्रय करून सर्व यातनांतून मुक्त व्हावें असा एक ओझरता विचार तिच्या मनांत आला होता. पण पिलाजीची भेट होऊन त्याची संगत सोडीपर्यंत त्या विचाराची दिशा हळुहळू पालटली, व मी मेलें तर माझ्या पश्चात् माझ्या बाळाचें कसें होईल असें तिला वाटूं लागलें. परत जातांना ती त्या विहिरीवरूनच गेली; पण तिचे डोळे व मन पोटच्या गोळ्याकडे ओढ घेऊं लागल्यामुळें विहिरीकडे तिचें लक्षच गेलें नाहीं. एकदां आपल्या मकानाला सुरक्षित जाऊन पोंचल्यावर आपला बाळही रडत नाहीं व इस्माइलही जागा झाला नाहीं असें तिनें पाहिलें, तेव्हां तिचा जीव हायसा झाला.

* * *

बाळाजीपंतांच्या घरच्या सर्व मंडळीला रात्रौ झोंप मिळाली, पण बाळाजीपंतांचा मात्र कसा तो डोळ्याला डोळादेखील लागला नाहीं. विचार करकरून परिश्रांत झालेल्या मनाला शांतता प्राप्त व्हावी ह्या उद्देशानें ते उजाडतांच बाजीरावाला बरोबर घेऊन जवळच एका उंच पहाडावर असलेल्या भुलेश्वराचें दर्शन घ्यावयाला गेले. बाळाजीपंतांची साधुसंतांवर श्रद्धा फार व भुलेश्वराचें प्राचीन कीर्तिवैभवही अपार. येथें येण्यापूर्वींच त्यांनीं भुलेश्वराच्या देवालयांत वास्तव्य करीत असलेल्या कोणाची कीर्ति ऐकली होती. शिवाय त्यांना हें स्थान पहाण्याची इतकी उत्कंठा लागण्याचें आणखीही एक कारण होतें. तें असें कीं, ब्रह्मेंद्रस्वामी धावडशीला वास्तव्य करूं लागल्यापासून प्रतिसंवत्सरीं माघमासीं ह्या देवालयासमोर एक गुहा आहे तेथें गुप्तसंचार करीत हें त्यांना माहीत होतें. तें आपल्या गुरूच्या निवासानें पावन झालेलें स्थान पहाणें त्यांना पुण्यप्रद वाटलें. ते दोघे बापलेक सकाळींच पहाड चढून गेले. आपणाला माहीत नाहीं म्हणून त्यांनीं एक तेथलाच माहीतगार वाटाड्या आपणाबरोबर घेतला होता. त्यानें त्या स्थानाविषयींच्या एकेक मनोरंजक दंतकथा सांगण्याला सुरवात करतांच, बाळाजीपंतांच्या मनाची भरपूर करमणूक होऊं लागली. त्याच्या सांगण्यावरून बाळाजीपंतांना भुलेश्वराच्या देवालयाविषयीं प्राचीन इतिहास कळला. तो असा कीं, प्राचीन काळीं ह्या पहाडावर दौलतमंगल ह्या नांवाचा एक किल्ला होता. तेथें किल्ला होता हें तेथें आजूबाजूला दिसून येणाऱ्या पडक्या बुरुजांवरून कोणालाही अजमावतां येण्यासारखें होतें. येथें पूर्वीं रायराय नांवाच्या राजाचा अंमल होता. असो. बाळाजीपंत व बाजीराव पहाड चढून वर देवालयापाशीं गेले तेव्हां देवालयाचा गाभाऱ्याचा दरवाजा बंद असल्याचें त्यांना दिसून आलें.

"दरवाजा बंद कां ?" बाळाजीपंतांनीं वाटाड्याला विचारलें.

"सरकार!" वाटाड्या म्हणाला, "मधून मधून येथें साधुसंन्यासी येऊन रहातात. असाच एक साधु अलीकडे येथें येऊन राहात असतो, तो पहांटेच्या वेळीं देवाची पूजा वगैरे करीत असतो. त्याची पूजा सुरू असतांना गाभाऱ्याचा दरवाजा बंद असतो असें मीं ऐकलें आहे. मीं कांहीं त्या साधूला प्रत्यक्ष पाहिलेला नाहीं. पण आपण थोडा वेळ थांबून वाट तर पाहूं!"

"बरें आहे, तोंवर आपण एथवर आलोंच आहों, ते सभोंवारची वनश्री

तरी पाहूं ! " असें म्हणून ते तेथल्या तेथेंच सभामंडपांतील दगडांवरील कोरींव काम पाहूं लागले. किती तरी सुंदर मूर्ति व चित्रें त्यांना तेथें पहावयाला सांपडलीं. पण तीं बहुतेक भग्न झालेलीं होतीं. 'ह्या चित्रांची अशी दशा कोणीं केली' असें बाजीरावानें वाटाड्याला विचारतांच तो उत्तरला, 'सरकार ! ही औरंगजेब बादशहाच्या जुलुमाची साक्ष आहे !' हें उत्तर ऐकून बाजीराव व बाळाजीपंत यांना मनस्वी संताप आला. नंतर ते बाहेर येऊन देवालयाच्या आवारांत हिंडूं लागले. अजून सूर्योदय व्हावयाला बराच अवकाश होता. पण तें ठिकाण पहाडावर–बऱ्याच उंचीवर असल्यानें तेथें सभोंवार गर्द झाडी असूनही आंत काय किंवा बाहेर काय, संधिप्रकाश पुरेसा होता. बाळाजीपंत व बाजीराव यांनीं वाटाड्यासह देवालयाला एक प्रदक्षिणा घातली तेव्हां जागोजाग दगडांत कोरलेल्या अनेक नक्षीदार घंटा त्यांना पहावयाला सांपडल्या. देवालयासमोरच एक गुहा असलेली पाहून बाळाजीपंतांनीं वाटाड्याला विचारलें, " ही गुहा कोणीं तयार केली तें तुला माहीत आहे ? "

" हो !" वाटाड्या म्हणाला, " धावडशीला ब्रह्मेंद्रस्वामी नांवाचे कोणी एक महान् साधु आहेत, त्यांनीं ती स्वतःसाठीं तयार केली आहे. स्वामी मधून मधून येथें येऊन राहातात असें म्हणतात. स्वामींनीं स्नानाच्या सोयी-साठीं पलीकडे एक टांकेंही खोदविलेलें आहे. पाहावयाचें आहे का ? "

स्वामींनीं खोदविलेलें टांकें म्हटल्यावर तें पहाण्याची उत्कंठा बाळाजी-पंतांना कशी असणार नाहीं ! ते म्हणाले, "चल दाखव."

लगेच वाटाड्यानें त्या दोघां बापलेकांना देवालयापासून दोनशें कदमांवर असलेल्या टांक्यापाशीं नेलें. तिघांनींही पूज्यभावानें त्या टांक्यांतील रुचकर थंडगार जलानें मुखमार्जन करून तें स्वामींचें प्रसादतीर्थ म्हणून थोडेंसें जल प्राशन केलें.

" एथून तीनशें कदमांवर खंडोबाचें जुनाट देवालय आहे." वाटाड्या म्हणाला.

" त्यांत पहाण्यासारखें काय आहे ? " बाजिरावानें विचारलें.

" तसें पाहाण्यासारखें आतां तिथें कांहीं नाहीं. त्या देवालयाचा तर मुसल-मानांनीं पुरा विध्वंस केला आहे. त्यांत खंडोबाची मूर्ति आहे; ती पूर्वीं

हिरेमाणकांनीं जडविलेली होती म्हणतात. पण आज तर ती छिन्नभिन्न झालेली दिसते. त्या देवाचें कोणी दर्शन घेत नाहीं कीं पूजा-अर्चा करीत नाहीं. तिथें भुताटकी फार आहे असें म्हणतात. म्हणून म्हणतों आपण तिकडे न जावें हें चांगलें." वाटाड्या म्हणाला.

इतक्यांत एक जटाबेशधारी तेजःपुंज साधु भुलेश्वराच्या देवालयाकडून त्या टांक्यावर पाणी नेण्यासाठीं आला. त्याला पहातांच बाजीराव व बाळाजी-पंत यांना वाटलें कीं, भुलेश्वराची पूजा-अर्चा करणारा साधु तो हाच असावा. त्या तिघांनीं साधूला पाहिलें पण ते दूर एका आडवशाला उभे असल्यानें साधु मात्र त्यांना पाहूं शकला नाहीं. बाळाजीपंतांना मात्र नजरेच्या पहिल्या भरारीसरसा त्याचा चेहरा ओळखीचासा दिसला. मागें एकदां धावडशीला ब्रह्मेंद्रस्वामींच्या दर्शनाला नारायण दीक्षित या नांवाचा साधु आला होता, तोच तर हा नसेल ना, अशी त्यांना शंका आली, पण तोच हा असें नक्की म्हणवेना. साधु आपला कमंडलु पाण्यानें भरून घेऊन पुन्हा देवालयाकडे निघाला, तेव्हां देवालयाच्या गाभाऱ्याचा दरवाजा उघडला गेला असावा अशी मात्र त्यांची खात्री झाली. ते तिघेही त्या साधूच्या मागोमाग पण त्याला नकळत चालूं लागले. साधु देवालयाच्या दरवाजांत गेला तेव्हां बाजी-राव जरी तिघांच्या अग्रभागीं चालत होता, तरी त्याच्यांत व त्या साधूंत पन्नास कदमांचें अंतर होतें. गाभाऱ्याचा दरवाजा मात्र पूर्ववत् लागलेलाच होता तो साधु त्या दरवाजापाशीं जातांच दरवाजा आंतून उघडला गेला. बाजीराव आघाडीला होता व शिवाय त्याची दृष्टि विशेष चौकस होती, त्या-मुळें एका शुभ्रवस्त्र परिधान केलेल्या तरुण स्त्रीनें दरवाजा उघडला, हें त्यानें पाहिलें. तेवढ्यांत त्या स्त्रीनें कांहीं खूण केल्यावरून कीं काय, साधूनें एकाएकीं मागें वळून पाहिलें व दरवाजा पुन्हा पूर्ववत् आंतून लावला गेला. त्यामुळें बाजीराव व बाळाजीपंत या दोघांचीही क्षणभर निराशा झाली. बाजीरावाच्या मनांत तर तो प्रकार पाहून त्या साधूविषयीं नानाप्रकारचे कुतर्क घोळूं लागले पण त्यानें ते बोलून मात्र दाखविले नाहींत.

साधूनें मागें वळून पाहिलें व बाळाजीपंतांनीं त्याच्याकडे पाहिलें, दोघांना-ही एकमेकांची ओळख पटली. बाळाजीपंतांनीं पूर्वीं पाहिलेले स्वामी ते हेच होते. बाळाजीपंतांनीं साधूच्या चरणांवर मस्तक नमविलें. लगेच

बाजिरावानेंही–भक्तिभाव म्हणून नव्हे; शिष्टाचार म्हणून–तसें केलें. स्वामींनीं ब्रह्मेंद्रस्वामींचें कुशलवृत्त वगैरे विचारलें व इकडे येण्याचें प्रयोजन काय वगैरे प्रश्नांवर एकमेकांचीं कांहीं प्रश्नोत्तरें झालीं. जराशानें गाभाऱ्याचा दरवाजा स्वामींनीं उघडला. पण बाजिरावाला तेथें पूर्वींप्रमाणें कोणी स्त्री दिसली नाहीं. गाभाऱ्यांत एक शिवलिंग आणि समोर एक भव्य नंदी व साधूचें आसन एवढेंच सर्वांना दिसलें. एरव्हीं शिवलिंगाची पूजा केलेली नाहीं किंवा देवघरांतील केरही नीटसा काढलेला नाहीं! एथें कांहीं तरी रहस्य असावें असें बाजीरावाच्या मनानें घेतलें. पण आतां ऐकलेल्या एकंदर संभाषणावरून साधूविषयींचा त्याच्या मनांतील संशयमात्र पार धुवून निघाला होता.

देवदर्शन झाल्यावर जावयाला निघतांना बाळाजीपंतांनीं स्वामींचा आशीर्वाद व प्रसाद मागितला, त्याबरोबर स्वामींनीं शंकराची पिंडी हलकेच बाजूला सारून आंतून दोन पुष्पें काढून बाळाजीपंतांच्या हातीं दिलीं व म्हटलें, "हा शिव-प्रसाद पदरीं ठेवा, म्हणजे तुम्ही सर्वत्र विजयी व्हाल."

"गुरुमहाराज! त्या देवाचें दर्शन मला घेऊं देतां का?" बाजीरावानें तेथें गूढत्वाचा कांहीं मागमूस लागला तर पहावा अशा कुतूहलपूर्ण जिज्ञासेनें विचारलें.

"होय!" असें म्हणून स्मितहास्य करीत स्वामींनीं पुन्हा पूर्ववत् शिवलिंग बाजूला सारलें. बाजीराव व बाळाजीपंत दर्शनलालसेनें उठून उभे राहून पाहूं लागले तों तेथें थोडीशी पोकळ जागा असून आंत लहान लहान तीन पिंड्या होत्या व तिन्ही पिंड्या अर्ध्या झांकल्या जाव्या इतकें जल सभोंवार होतें. तो देखावा पाहून ते बापलेक थक्कच झाले. त्यांनीं त्या देवतांना वंदन केलें.

स्वामी म्हणाले, "ब्रह्मा-विष्णु-महेश अशा त्रिमूर्ति इथें तीन पिंड्यांच्या स्वरूपानें वसत आहेत व तीन त्रिकाळ त्यांचे चरण धुण्यासाठीं इथें गंगामाता अवतरली आहे." लगेच साधूनें त्या पवित्रोदकाचें बाळाजीपंत व बाजीराव यांच्या मस्तकावर सिंचन करण्यासाठीं एका हाताच्या कुळचाभर जल घेतलें, तों तें रक्तासारखें लाल झालेलें दिसलें. तें पाहून सर्वांनाच विस्मय वाटला. स्वामी गंभीर चर्या करून म्हणाले, "बाळाजीपंत! हें भावी अनर्थाचें सूचक आहे."

"होय. गुरुदेव! आमच्यासाठीं अनर्थ एकामागून एक भविष्य-काळाची वाट पहात बसले आहेत खरे! मीं आतांच आपणाला सर्व वृत्तांत निवेदन केला आहे. अनर्थ घडणार यांत तर तिळप्राय शंका नाहीं. यांतून परमेश्वराची कृपा व गुरुजनांचा आशीर्वाद यांनीं आमचा बचाव केला तर!"

सुमारें पाव घटका स्वामी कांहीं न बोलतां नेत्र मिटून समाधि लावून बसले. नंतर नेत्र उघडून त्यांनीं प्रसन्नमुद्रेनें त्याच गंगाजलाचें त्याच जल-संचयांत त्रिवार तर्पण केलें, त्याबरोबर काय चमत्कार! सर्व जल पूर्ववत् निर्मल झालें. तें पहातांच बाळाजीपंतांनीं स्वामींच्या अलौकिक सामर्थ्या-विषयीं दृढविश्वासपूर्वक त्यांच्या चरणीं माथा नम्र करून करुणा भाकली, "स्वामी! आपली लीला अगाध आहे. आपण आमचे व आमच्या निमित्तानें सर्व हिंदवी-स्वराज्याचे त्राते-पाते आहां. आपण आम्हांला आशीर्वाद द्यावा."

स्वामींनीं त्या निर्मल गंगाजलाचें तीर्थ बाळाजीपंत व बाजीराव यांना प्राशन करावयाला लावून आशीर्वाद दिला, "प्रसंग आणीबाणीचा येईल खरा; पण जसा येईल तसा निवारण होईल. मराठशाहीची सद्दी अजून संपली नाहीं; तिला यापुढें खरी सुरुवात व्हावयाची आहे व ती तुम्ही आणि शाहू-महाराज यांच्या हस्तें व्हावयाची आहे. मात्र तुम्ही ह्या मोहिमेचा नाद सोडून तूर्त बचावू धोरणाचा स्वीकार करा व नैर्ऋत्येच्या बाजूनें शक्य तों माघारे जा. तुमचा शत्रु प्रबल आहे; तो तुम्हांला गोत्यांत आणण्यासाठीं धडपडत आहे. पण त्याचें प्राबल्य लौकरच नष्टप्राय होईल व तुम्ही त्याच्या जाचांतून मुक्त व्हाल. दिव्याची ज्योत विझतांना मोठी होते, त्यांतली तुमच्या शत्रूची अवस्था आहे. मात्र एक करा; हें आपणां हिंदूंचें देवालय, तुमचे-आमचे गुरु प्रतिवर्षीं माघमासीं इथें तपश्चर्येला येत असतात, हें ध्यानीं ठेवून—देवालयाची अविंधांनीं ठायीं ठायीं कशी दुर्दशा केली आहे हें तुम्ही प्रत्यक्ष पाहिलेंच आहे—हें वर्तमान यथाकालीं शाहूमहाराजांच्या कानांवर घालून ह्या देवालयाचा जेणेंकरून ऊर्जितकाळ येईल अशी तजवीज झाली पाहिजे. आणखी एक जबाबदारी मी तुमच्यावर टाकणार होतों; पण ती आजच टाकीत नाहीं. ह्या तुमच्या शतवीरांतील नाथाजी व पिलाजी ह्या दोघां शिलेदारांवरही एखादें संकट ओढवेल, त्यांचें रक्षण करण्यांत तुम्ही कसूर

करणार नाहींच; पण ऋणानुबंधाची गोष्ट म्हणून तुम्हांला सांगतों, त्या दोघांच्या केंसालाही धक्का लागतां कामा नये."

"स्वामींना नाथाजी व पिलाजी यांची विशेष चिंता लागलेली दिसते, ती कां बरें?" बाळाजीपंतांनीं विचारलें.

"तें तुम्हांला मागाहून समजेल. तूर्त त्याविषयीं कांहीं बोलावयाचें नाहीं." स्वामी उत्तरले.

"आज्ञा स्वामीजी!" बाळाजीपंत जास्त चिकित्सेच्या भरीला न पडतां स्वामींच्या चरणांवर मस्तक ठेवून म्हणाले, "आतां मी येतों. ह्या गंडांतरांतून पार पडल्यावर मी पुन्हा स्वामींच्या पायांचें दर्शन घ्यावयाला येईन."

"अवश्य या." स्वामी म्हणाले.

बाजीरावानेंही स्वामींना वंदन केलें. स्वामींनीं दोघांही बापलेकांच्या मस्तकावर वरदहस्त ठेवून त्यांना आशीर्वाद दिला. लगेच ते बापलेक दरवाजाबाहेर आले व त्यांचा वाटाड्या तेथें त्यांची वाट पहात उभा होताच, त्याला बरोबर घेऊन माघारे निघाले. स्वामींनीं नाथाजी व पिलाजी यांची इतकी चिंता कां करावी याचें गूढ मात्र त्यांना उकललें नाहीं. पण स्वामींची आज्ञा प्रमाण मानावयाची म्हणून त्यांनींही त्याची जास्त चिकित्सा केली नाहीं.

आतां 'खंडोबाचें देवालय पहावयाचें आहे का' असा वाटाड्यानें प्रश्न केला; पण उशीर होईल म्हणून बाळाजीपंत नको म्हणाले. नंतर मकाणाला जाईपर्यंत वाटाड्या पुन्हा भुलेश्वराविषयीं तेथें यापूर्वीं मुसलमानांनीं जे अमानुष अत्याचार केले त्यांविषयीं एकाहून एक हृदयस्पर्शी दंतकथा सांगत होता व बाजीराव आणि बाळाजीपंत त्याला शून्य मनानें हुंकार देत होते. पण दोघांच्याही मनांत स्वामींचें कारस्थानी संभाषण व भविष्यकाळीं ओढवणारा अनर्थ यांशिवाय दुसरा कोणताही विचार नव्हता.

## दर्शन सहावें

# अज्ञातवास सुरू झाला

सुमारें प्रहर दिवसाला बाळाजीपंत व बाजीराव भुलेश्वराहून माघारे येऊन पोंचले. लगेच बाळाजीपंतांनीं खंडो बल्लाळ व जोत्याजी यांना बाजूला घेऊन देवालयांत घडलेली सर्व हकीकत सांगितली. बाजीराव जवळच उभा होता. भेदनीतीनें ताराबाईचा मोड करण्याची रात्रीची युक्ति सर्वांना मान्य होती, त्याप्रमाणें बाळाजीपंतांनीं शाहूमहाराजांना द्यावयाचा खलिता त्या दोघांच्या स्वाधीन करून त्यांना तांतडीनें निघावयाला सांगितलें. पण भावी अनर्थांची वार्ता ऐकून त्या दोघांना—विशेषतः जोत्याजीला अशा प्रसंगीं बाळाजीपंतांना एकटे सोडून जावेंसें वाटेना.

खंडो बल्लाळही मित्रभावानें म्हणाले, "नाना! असें जर आहे, तर मला वाटतें, आम्ही आजच तुम्हांला सोडून जाऊं नये. प्रसंग येतो तो सांगून येत नाहीं."

"छे! छे! तुम्ही आतांच्या आतां या घटकेला गेलें पाहिजे. आमच्यावर प्रसंग आला तर स्वामींच्या व श्रीगजाननाच्या कृपेनें आम्ही त्यांतून पार पडूं. आमच्यावरचा प्रसंग हा व्यक्तीवरचा प्रसंग आहे. पण शाहूमहाराजांवरचा प्रसंग हा साऱ्या मराठशाहीवरचा प्रसंग आहे. एथल्या प्रसंगाशीं मी व माझे मुलगे यांचें भाग्य निगडित झालेलें असेल; पण त्या प्रसंगाशीं कोटमाप मराठी रयतेचें भाग्य निगडित झालेलें आहे. येऊं नये तो प्रसंग आला व त्यांत बाळाजी आणि त्याचे मुलगे चिरडले गेले तर मराठ्यांच्या राष्ट्रवृक्षाची एक लहानशी फांदी मोडून पडेल; ती पडूं द्या. ती फांदी बचावण्यासाठीं तुम्ही आम्ही झटत राहिलों तर तिकडे राष्ट्रवृक्षाच्या मुळाशीं परचक्राच्या कुऱ्हाडीचे घाव पडून सारा वृक्षच्या वृक्ष उन्मळून पडेल त्याची काय वाट! आम्ही शाहूमहाराजांच्या पदरचीं नेकीचीं माणसें, आम्हीं जगावयाचें तें स्वामिकार्यासाठींच जगावयाचें व स्वामिकार्य करतां करतां मरावयाचें. तुम्हीदेखील माझे मित्र खरे, पण सेवेकरी शाहूमहाराजांचे आहां. मित्रकार्यापेक्षां स्वामिकार्याला तुम्हीं जास्त मान दिला पाहिजे. जा. तुम्ही

दोघेही लौकर जा व महाराजांना सर्व परिस्थिति नीट समजावून सांगा. त्यांना म्हणावें, इकडच्या मोहिमेविषयीं बिलकूल चिंता करूं नका. श्रीभार्गवराम आमचा पाठीराखा आहे. प्रसंग पडलाच तर–पण तें पुढचें पुढें. तुम्ही आतां अगोदर जा."

बाजिरावानेंही बाळाजीपंतांनाच दुजोरा देऊन सांगितलें, " चिटणीस ! तुम्ही दोघेही निर्घोरपणें जा. आमची काळजी करूं नका. संकटें आलीं, येतात व येतील; पण सत्याचा वाली परमेश्वर असतो. सत्यवादी माणसांवर संकटें येतात तीं परमेश्वराच्या इच्छामात्रेंकरूनच येतात. कर्तबगारांना भाग्योदयाला चढविण्यापूर्वीं परमेश्वर संकटांच्या कसोटीवर त्यांच्या कर्तबगारीचा कस ठरवीत असतो. आमची दानत खरी असेल, आमच्या हातून हिंदवी-स्वराज्याची खरीखुरी सेवा व्हावयाची असेल व त्यांतच आमचें भाग्य उदयाला यावयाचें असेल, म्हणूनच संकटें आमच्यावर येत असतील. तेव्हां तुम्ही जा, व शाहूमहाराजांना आम्हा उभयतां बापलेकांचा दोन्ही हात जोडून निरोप सांगा कीं, 'आपल्या पूर्वजांनीं–गो-ब्राह्मण-प्रतिपालक श्रीशिवछत्रपतींनीं अविंधांच्या आसुरी अत्याचारांपासून गोब्राह्मणांचा बचाव करून 'गोब्राह्मण-प्रतिपालक' हें आपलें नांव सार्थ केलें; त्या उपकारांची यत्किंचितही फेड ब्राह्मणांकडून आजवर व्हावी तशी झाली नाहीं. आपण त्याच शिवछत्रपतींचे भाग्यशाली नातू आहां. आपण आपल्या आजोबांचें गो-ब्राह्मण-प्रतिपालनाचें पुण्यव्रत अखंड चालविलेंच आहे. पण काळ कठीण आला आहे. आपलीच मराठी रयत आपणावर उलटली आहे. अशा वेळीं आम्ही ब्राह्मणांनीं आपल्या व आपल्या राज्याच्या रक्षणासाठीं मरणाच्या मोलानें झटलेंच पाहिजे. हें आमचें कर्तव्य आम्ही पूर्णपणें पार पाडतां पाडतां विजयी होऊन आपल्या ऋणाची अंशतः फेड तरी करूं किंवा मरून तरी जाऊं'.—असा शाहू-महाराजांना आमचा निरोप सांगा. जा."

निरोप देतां देतां बाजिरावाची चर्या निःसीम स्वामिभक्तीच्या दैवी तेजानें देदीप्यमान झाली. बाळाजीपंतांनाही आपल्या पोटच्या पुत्राचे हे कर्तव्य-तत्परतेचे बोल ऐकून इतकी धन्यता वाटली कीं, त्यांच्या नेत्रांतून आनंदाश्रूंचें आऊर उसळलें. त्यांनीं बाजिरावाला प्रेमातिशयानें हृदयाशीं घट्ट धरून अश्रूंची आंघोळ घालीत गद्गद कंठानें उद्गार काढले, " शाबास ! बाजी ! तूं

माझें नांव राखशील. श्रीगजानन तुझी ही स्वामिकार्याविषयींची कृतज्ञताबुद्धि अशीच अढळ ठेवो!"

अखेर खंडो बल्लाळ व जोत्याजी गहिंवरलेल्या कंठानें बाजिरावाला शुभाशीर्वाद देऊन व त्या बापलेकांचा निरोप घेऊन मार्गाला लागले. त्यांना जाऊन पाव घटका होते न होते तोंच पिराजी, पिलाजी व नाथाजी हे तिघे घाबऱ्या घाबऱ्या तेथें आले, व त्यांनीं एकदम बाळाजीपंतांच्या पायांवर घालून घेऊन विनविलें, "धनीसाहेब! आमचें रक्षण करा."

"काय, झालें तरी काय?" बाळाजीपंतांनीं त्या तिघांनाही उठवून धीर देत विचारलें, "अरे वेडयांनो! असें भ्यायला काय झालें, तें तरी सांगाल कीं नाहीं?"

पिराजीनें सर्व वृत्तांत बाळाजीपंतांना निवेदन केला. नाथाजी व पिलाजी यांना बोलावयाला तोंडच नव्हतें. ते खरे गुन्हेगार होते.

"निर्दय मांगांनो! तुम्हीं पिराजीच्या एकुलत्या एका सोन्यासारख्या मुलाचा बळी कीं रे घेतलात!" बाळाजीपंत पिराजीच्या तोंडून सर्व वृत्तांत ऐकून पिलाजी व नाथाजी यांना म्हणाले, "तुम्हांला आतां कोणतें शासन करावें हेंच मला कळेनासें झालें आहे."

नाथाजी व पिलाजी यांनीं पुनः बाळाजीपंतांच्या चरणांवर मस्तक नमवून उद्गार काढले, "धनीसाहेब! आपण कराल तेवढें शासन अपुरेंच पडेल असा आमचा गुन्हा भयंकर आहे खरा! आतां आपण तारा किंवा मारा. पण त्या दुष्ट चंद्रसेनाच्या स्वाधीन मात्र आम्हांला करूं नका."

बाळाजीपंतांनीं पिराजीकडे वळून विचारलें, "पिराजी! तूंच सांग, यांना मी कोणतें शासन करूं?"

पिराजी दुःखावेग आवरीत शांतपणानें म्हणाला, "धनीसाहेब! आपलेच दांत व आपलेच ओंठ. त्यांना शासन तें काय करावयाचें! मी फुटक्या नशिबाचा, त्यासारखी त्यांना बुद्धि झाली. हाच माझ्या हातून अपराध घडला असता तर मला कोणीं कोणतें शासन केलें असतें! तेव्हां शासन कोणाला कांहीं करूं नये. फक्त चंद्रसेन ह्या निमित्ताचा फायदा घेऊन आमचीं—विशेषतः माझीं पाळेंमुळें खणून कांढण्याची प्रतिज्ञा करून गेला

आहे, त्याच्यापासून आमचें रक्षण करा, एवढीच विनंति करण्यासाठीं आम्ही आपल्या पायांपाशीं आलों आहों."

"पण असा उपटून सूळ खांद्यावर घेण्याचें चंद्रसेनाला तरी काय प्रयोजन?" बाळाजीपंतांनीं रागानें विचारलें.

"तें त्याचें तो जाणे! आम्ही आपल्या पायांचे सेवेकरी आहोंत, हाच आमचा अक्षम्य गुन्हासा त्याला वाटत असेल!" पिराजी म्हणाला.

"ठीक आहे. तुम्ही मुळींच भिऊं नका. चंद्रसेन तुमच्या केंसाला तरी कसा धक्का लावतो तें मी पहातों. तुम्ही निर्धास्तपणें येथें रहा." बाळाजीपंत म्हणाले, "पण तिकडे यशोदा व व्यासराव यांची काय वाट? त्यांनाही इकडेच कां आणलेंत नाहीं?"

"दाजीबा कांहीं येणार नाहींत. त्यांचा असा समज झाला आहे कीं, नाथाजी व पिलाजी यांनीं मुद्दाम यशोदेवर डोळा ठेवून माझ्या मुलाला ठार मारलें—"

"काय?" बाळाजीपंतांनीं पिराजीच्या तोंडचे शब्द ऐकून त्याला पुरतेपणीं बोलूं देण्यापूर्वींच विचारलें, "हें खरें काय?"

"छे! धनीसाहेब! आपल्या पायांसाक्ष–" नाथाजी व पिलाजी बाळाजीपंतांच्या पायांना स्पर्श करून काकुळतीच्या स्वरानें उद्गारले, "इतके अधम आम्ही असूं असें आपल्याला वाटतें तरी का? यशोदा आमची अत्यंत आवडती अशी पाठोपाठची बहीण आहे."

"तर मग व्यासरावाला तरी तसा संशय कां आला?" बाळाजीपंतांनीं विचारलें.

पिराजी उत्तरला, "चंद्रसेनाला पिराजीच्या संसाराचा मांडव मोडून पिराजीला राखेंत बसवावयाचें आहे व आम्ही तिघेही आपले एकनिष्ठ सेवेकरी, त्या आम्हां शतवीरांना एकमेकांविरुद्ध चेतवून परस्पर एकमेकांच्या हातीं गाडून आपली बाजू लंगडी करावयाची आहे, म्हणून त्यानें दाजीबांच्या कानांत असें विष ओतलें. पण माझ्या सवंगड्यांच्या वर्तनाविषयीं माझी पूर्ण खात्री आहे. त्यांच्याविषयीं असा घाणेरडा संशय घेणें हेंदेखील पाप आहे."

"ठीक आहे. मग तूं आतांच्या आतां जाऊन यशोदेला व व्यासरावाला घेऊन ये." बाळाजीपंत म्हणाले.

"दाजीबा संतापले आहेत, ते माझें सांगणें ऐकतीलसें मला वाटत नाहीं. पण यशोदेला मात्र मी घेऊन येतों." असें म्हणून पिराजी आपल्या झोंपडीकडे निघाला. त्याच्याबरोबर तो नको नको म्हणत असतांही नाथाजी व पिलाजी निघाले. न जाणो, चंद्रसेनाची जर वाटेंत गांठ पडली तर त्याच्याशीं सामना द्यावयाला एकाला तीन असलेले बरे, असा विचार करून बाळाजीपंतांनींही त्यांना आडकाठी केली नाहीं.

पिराजी, नाथाजी व पिलाजी शक्य तेवढ्या तांतडीनें पिराजीच्या मकाणाला आले. त्यांना धनीसाहेबांनीं अभय दिल्याचें ऐकून यशोदेला तेवढेंच दुःखांत सुख वाटलें. ती प्रसंग ओळखून त्यांच्याबरोबर लगेच निघाली. त्यांनीं व्यासरावांनाही आपणांबरोबर निघण्यासाठीं परोपरीनें विनवून पाहिलें. पण व्यासरावानें निक्षून सांगितलें, " नाहीं. माझ्या पोराचा बळी ह्या दुष्टांनीं घेतला; ते यांचे बळी इथें पडल्याशिवाय मी इथून हलावयाचा नाहीं. मग काय वाटेल तें होवो. मी हा असा माझी प्रतिज्ञा पूर्ण होईतों माझ्या कृष्णाचें प्रेत उराशीं घेऊन बसणार ! "

आणि म्हातारा खरोखरीच कृष्णाचें प्रेत उराशीं घेऊन बसला तो कांहीं केल्या उठेना ! सर्वांनीं आपापल्या परीनें त्याची समजूत करून पाहिली; पण व्यर्थ ! तेव्हां सर्वांना संशय आला, म्हाताऱ्याला शोकवायु झाला कीं काय ! हा त्यांचा तर्क कांहीं खोटा नव्हता. व्यासराव खरोखरच शोकवायूनें वेडा झाला होता.

" मग काय, दाजीबा ! आम्ही जाऊं ? " पिराजीनें विचारलें.

" जा ! इथून एकदांचें काळें करा. मरा जा ! मी, माझा कृष्णा व माझी कपिला इथें ह्या झोंपडींत राहूं. तुम्ही जा ! " व्यासराव खऱ्याखुऱ्या वेडाच्या लहरींत बेफिकीरपणें उत्तरला.

अखेर यशोदेनें जातां जातां एकवार कृष्णाच्या प्रेताचें चुंबन घेतलें, तेव्हां तिला अपत्यशोकाचा केवढा मोठा उमाळा आला ! पण कोणी तरी ऐकेल व पुनः नसता गोंधळ होईल ह्या भयानें तिन सारा शोक मनांतल्या मनांत गिळला. पिराजीनें कृष्णाचें प्रेत पुरण्यासाठीं मागितलें; पण व्यासरावानें तें दिलें नाहीं. तो तें बगलेंत मारून तडक दूर पळत गेला. शेवटीं यशोदेनें एकवार कपिलेच्या प्रेताचें चुंबन घेऊन त्याला आंसवांनीं न्हाणल्यावर व्यासरावाशिवाय सर्वांनीं खिन्न मनानें त्या अभागी स्थानाचा निरोप घेतला.

## दर्शन सातवें

# यशोदेच्या शोधांत

दुर्भाग्याच्या फेऱ्यांत मनुष्य सांपडावयाचाच असा ईश्वरी नेमानेम असला, कीं घडूं नयेत त्या अघटित गोष्टी घडून येतात! पिराजी वगैरे मंडळी मुद्दाम चंद्रसेनाची दृष्टि चुकविण्यासाठीं राजमार्ग सोडून गोवंड्या वाटेनें चालली, ती वाट अत्यंत बिकट असल्यानें पिराजीसारख्या पुरुषांनाही फार संभाळून पाऊल उचलावें लागत होतें. मग यशोदेची परिस्थिति बिकट झाली असल्यास नवल काय! आधींच ती सुकुमार नार. ती गरिबींतून वर आलेली असल्यानें तिला सरपण जमविण्यासाठीं वगैरे झोंपडीसभोंवारच्या रानांतून अनवाणी हिंडण्याची संवय होती खरी; पण तें फिरणें निराळें व हें चालणें निराळें. आज तिचा जीव पुत्रनिधनाच्या दुःखानें पोळून निघाला असल्यानें तिच्या अंगीं चालण्याचें त्राण उरलें नव्हतें, व शिवाय ती सहा-सात महिन्यांची गरोदर होती. त्यामुळें तिला एकेक पाऊल उचलतांना गोवर्धनगिरी उचलण्याइतके अपरंपार कष्ट होत होते. पिराजी तिला हाताशीं धरून हळुहळू चालवींत होता खरा; तरी पण तो प्रसंग एकंदरींत फार भयंकर होता. तीं सर्व ज्या डोंगरदरडीवरून चालत होतीं, त्या दरडीची डाव्या बाजूची उतरण इतकी निमुळती होती व वाटही इतकी खडकाळ आणि अरुंद होती कीं, जर का चालतां चालतां एक पाऊल जरा घसरलें, तर माणूस सरळ उतरणीवरून घसरत खालच्या खोल दरींत जाऊन पडावयाचा व मग त्याचें एक सबंध हाडही हातीं लागावयाचें नाहीं. एवढ्यांतल्या एवढ्यांत दोन तीन वेळां पिराजीनें मोठ्या शर्थीनें आपला व यशोदेचा बचाव केला होता. अशा रेंगाळण्यानें आपल्याला मकाणास पोंचावयाला विनाकारण फार वेळ लागेल, व तेवढ्यांत शत्रु केव्हां कसा जबडा उघडून समोर उभा राहील याचा नेम नसल्यानें पिराजीनें यशोदेला खांद्यावर घेऊन चालविण्याची इच्छा दर्शविली. पण यशोदेनें संकोचवृत्तीनें तें मान्य केलें नाहीं. अशीं बराच वेळ तीं चाललीं असतां त्यांच्याजवळील जाळींतून दोन हरणें अकस्मात् दौडत बाहेर पडलीं. त्यांना पहातांच नाथाजी

व पिलाजी यांना—मृगयाप्रिय लढवय्येच पडले ते—त्यांची शिकार करण्याची इच्छा झाली. त्यांनीं लगेच आपले तिरकमठे सरसावले. पण यशोदेची तितक्यांत तिकडे दृष्टि वळली. त्यांतलें एक हरीण थेट तिच्या कपिलेसारखें तिला दिसलें, त्याबरोबर तिनें बेभान होऊन हांक मारली, " कपिले ! "

यशोदेच्या तोंडची 'कपिले' ही हांक ऐकतांच पिराजी, नाथाजी व पिलाजी ह्या तिघांनींही चटकन् क्षणभर त्या हरणाकडे व नंतर दुसऱ्याच क्षणाला यशोदेकडे पाहिलें. पिराजी म्हणाला, " मुक्ते ! ती आपली कपिला नव्हे ! "

" खरेंच ! ती आपली कपिला नव्हे. पण कपिलेसारखेंच तें हरीण दिसतें नाहीं का ? " यशोदा कपिलेच्या आठवणीनें खिन्न होऊन म्हणाली.

" हो थेट कपिलेसारखें दिसतें खरें." नाथाजी म्हणाला. त्या बाबतींत सर्वांचें एकमत झालें.

" नाथा ! त्या हरणाला मारूं नकोस." यशोदा त्या हरणाकडे टक लावून पहात डोळ्यांत उभीं राहिलेलीं आंसवें पुशीत म्हणाली.

" मारूं नको कां ? नाथा ! तीर मार पाहूं रे ! मात्र मारशील तो असा चतुराईनें मार कीं त्या हरणाचा प्राण तर बचवावा व पाय मात्र जायबंदी व्हावा. म्हणजे मुक्तेची कपिला नाहींशी झाली ती तिला ही कपिला मिळवून देऊं. मार, नाथा ! नीट सांभाळून तीर मार." पिराजी म्हणाला.

" नका रे, त्या हरणाला मारूं नका." यशोदा नाथाजी व पिलाजी यांना हात जोडून विनवूं लागली, " तुम्हां तिघांनाही माझें दोन्ही हात जोडून असें सांगणें आहे कीं, यापुढें तरी अशा निरपराधी प्राण्यांची करमणुकी-साठीं हत्या करण्याचें सोडून द्या." ती पिराजीकडे वळून म्हणाली, " त्या प्राण्यांनाही आईबापें असतील, त्यांचे शाप तुमच्या माथीं बसतील. आजवर अशा हत्या तुमच्या हातून घडल्या म्हणूनच देवानें तुमचा मुलगा तुमच्या डोळ्यांदेखत असा ओढून नेला. जसें करावें तसें भरावें हा देवाघरचा न्यायच आहे. हें ओळखून तरी आजपासून शपथ घ्या कीं, निरपराधी जीवांची हत्या म्हणून करायची नाहीं."

यशोदा बोलत होती व पिराजी ऐकत होता. पण तेवढयांतल्या तेवढ्यांत यशोदेचा डोळा चुकवून त्यानें नाथाजी व पिलाजी यांना डोळ्यानें खूण

केली, त्याबरोबर त्यांच्या तिरकमठ्याचे तीर सूं सूं करीत सुटले. नाथाजीच्या तीरानें कपिलेसारख्या दिसणाऱ्या हरिणाचा पाय घायाळ होऊन तें कोलमडून खालीं पडलें व पिलाजीचा तीर दुसऱ्या हरणाच्या पोटांत घुसून तें तर गतप्राण होऊन पडलें. यशोदेनें तें पाहिलें मात्र, व एकदम 'अरेरे ! चांडाळांनो ! घात केलात. असे कसे रे निर्दय मांग तुम्ही !' असे उद्गार काढीत त्या घायाळ झालेल्या हरणाला हाताचा आधार देण्यासाठीं म्हणून ती दरडीवरून खालीं वांकली, तोंच तिच्या पायाखालील दगड निसटून खालीं कोसळली. तिला सांवरण्यासाठीं म्हणून पिराजी, नाथाजी व पिलाजी धडपड करतात तोंच—विधिघटनाच तशी होती त्याला कोण काय करणार !—कोठूनसे इस्माईल व त्याचे सात साथीदार पिसाळलेल्या कुत्र्यांसारखे त्यांच्यावर चालून आले. त्यांपैकीं सहाजणांनीं पिराजी वगैरे तिघांशीं लढत मांडली व दुसऱ्या दोघांनीं यशोदेला घेरलें. पिराजी वगैरेंनीं झगडून त्या काळांच्या कचाट्यांतून सुटण्याची शिकस्त केली व नाथाजी आणि पिलाजी मोठ्या शहामतीनें निसटले. पण पिराजीला सर्वांनींच अडवून धरल्यामुळें त्याचा मात्र कांहीं इलाज चालेना. यशोदाही दुर्दैवानें असहाय परिस्थितींत पडली असल्यानें तिच्या देहाला घेरणाऱ्या त्या दोघां सैतानांना आयतेंच फावलें. नाहीं तर प्रत्यक्ष चंद्रसेनाला—तो मस्तावलेल्या वाघासारखा बळकट असतां-नाही जिनें आपल्या शौर्याची चुणूक दाखविली, ती ह्या दोन माकडांच्या माकडचेष्टा थोडीच सहन करती असती ! त्या दोघां रोहिल्यांनीं—मुजफरअली व झियाउद्दीन यांनीं—यशोदेला घेऊन तिच्या तोंडांत बोळा कोंबून व हात बांधून व उचलून खांद्यावर घेतलें. झियाउद्दीन तिला खांद्यावर घेण्यासाठीं धडपडत होता. पण तो मुजफरअलीपेक्षां अंमळ कमी ताकदवान असल्यानें त्याचे मनोरथ पूर्ण न होतां त्याला मुकाट्यानें हिरमुसला होऊन मुजफरअलीच्या मागोमाग चालावें लागलें.

इतका वेळ पिराजी वगैरेंशीं इस्माईल व इतर रोहिले लढत होते, ते यशोदा हस्तगत झालेली पहातांच आपल्या ताब्यांतील तिघांना पकडण्याच्या कामीं जरा ढिलाई करून व नाथाजी आणि पिलाजी यांचा शोध करावयाचा विसरून यशोदेकडेच आशाळभूत नजरेनें पहात उभे राहिले.

आतां ह्या आडदांड मुसंड्यांशीं एकट्यानें झगडण्यांत आपल्या प्राणांवर

मात्र बेतावयाचें, यापेक्षां कांहींच निष्पन्न व्हावयाचें नाहीं, हें मनांत ओळखून पिराजी निरुपायास्तव नमत्या सुरांत त्यांना म्हणाला, "यशोदेला ते कुठें घेऊन चालले आहेत ?"

"हरामजादे ! तुम् मत् पुछो ! तुला आतां तिच्याशीं काय करावयाचें आहे ?" इस्माइलनें दरडावून विचारलें. खिलाजी व नाथाजी हातावर तुरी देऊन पळाले, त्याचा वचपा आतां एकट्या पिराजीवर तो काढूं पहात होता. बाकीचे त्याचे साथीदार यशोदेच्या लावण्यमदिरेचें पान करतां करतां गुंगून-झिंगून बेभान होऊन गेले होते.

"इस्माईल ! असले अत्याचार तुझ्या अल्लाला मानवणार नाहींत. आम्ही आजवर तुझ्या वाटेला मुळींच गेलों नाहीं, मग तूंच कां असा मुद्दाम आडवाटेनें जातोस ? तूं जर आमच्याशीं समजुतीनें वागलास तर धनीसाहेबांना सांगून मी तुला आणि तुझ्या साथीदारांना शतवीरांत घ्यावयाला सांगेन." पिराजी म्हणाला. त्याला इतक्या गरीबपणानें बोलण्याशिवाय गत्यंतरच नव्हतें.

"तूं ? तूं आणि मला शतवीरांत घ्यावयाला सांगणार ? पण आतां तुझा धनी जाग्यावर राहील तर तुम्ही शतवीर एवढी शेखी मिरवणार ना ? लांकुडतोड्या वृक्षाच्या बुंध्यावर कुऱ्हाडीचे घाव घालीत असतां वृक्षाच्या फांद्यांनीं 'आम्हांला तोडूं नकोस; आम्ही तुला वसंतऋतूंत सुवासिक फुलें व मधुर फळें आणून देऊं' असें सांगण्यापैकींच हा मामला आहे ! हरामखोरांनो ! तुमचा कावेबाजपणा आम्हांला कळत नाहीं असें तुम्हांला वाटतें काय ? पण आज मारे फुलें-फळें द्यावयाला स्वखुषीनें नाचत तयार होणाऱ्या ह्याच फांद्या आजवर आमच्या मस्तकावर कडाडून मोडून आमच्या माना मोडूं पहात होत्या, हें मी विसरलों नाहीं. सेनापतीच्या सांगण्यावरून आम्हीं तुमच्या शाहूमहाराजांचा राजवाडा सुरुंग लावून उडवून देण्याचा बेत रचिला तेव्हां–" इस्माईल पिराजीला एक जोराचा धक्का देऊन म्हणाला, "हरामखोरांनो ! तुम्हींच आमच्याविरुद्ध कारस्थानें रचिलीं व कमळा आणि कमळजा आमच्या हातीं सांपडल्या असतां त्यांना पळवून नेलें. सांग, त्या दोघी खुबसुरत औरती कुठें आहेत त्या सांग पाहूं !"

इतके दिवस राजवाडा उडवून देण्याच्या व कमळा आणि कमळजा यांना पळविण्याच्या मुळाशीं काणे घरभेदे होते याचा तपास लागला नव्हता, तो

आज लागला. पण तें आपण मुळींच मनावर घेतलें नाहीं असें प्रसंगा-वधानपूर्वक भासवून पिराजी उत्तरला, "त्या दोघींविषयीं मला कांहींच माहीत नाहीं."

"माहीत नाहीं काय ? ठीक आहे." इस्माईल पिराजीला आणखी एक ठोसा लगावून म्हणाला, "बदमाष! याद राख! तुझ्याकडून–तुझ्या हड्डीकडून ही माहिती काढून घेईन तरच नांवाचा इस्माईल!" लगेच इस्माईल आपल्या इतर साथीदारांकडे वळून एकाला म्हणाला, "कादीर! आतां विचार करीत बसून भागावयाचें नाहीं. प्रथम त्या दोघां काफिरांना गांठून त्यांना जिवंत किंवा त्यांचे मुडदे तरी सेनापतीसमोर नेले पाहिजेत. तसेंच ती औरत मुजफरअली एकटाच हजम करूं पहात आहेसें दिसतें. तिलाही आपण जपलें पाहिजे."

जी कांक्षा इस्माइलच्या मनांत डांचत होती तीच त्याच्या इतर साथी-दारांच्याही मनांत डांचत होती. कादिरानें विचारलें, "आणि समज, आम्हीं सर्वांनीं त्या काफिरांना पकडलें, तर मग त्या औरतीची वांटणी कशी करावयाची ?"

"तें आपण मागाहून पाहूं." इस्माईल कावेबाजपणानें उत्तरला.

इस्माइलचा आपलपोटा स्वभाव सर्वांच्या पूर्ण परिचयाचा होता. दोन वर्षांपूर्वीं इस्माइलनें एका सुंदर मराठ्या मुलीला पळवून तिच्याशीं लग्न लावलें तेव्हां तिला पळविण्याच्या कामीं त्याला ह्या सर्व साथीदारांची मदत झाली होती; पण अखेर मात्र त्या सर्वांच्या तोंडाला पानें पुसून एकट्या इस्माइलनें ती बळकावली! तसाच प्रकार ह्याही वेळीं व्हावयाचा ह्या शंकेनें इब्राहिम नांवाचा एक रोहिला म्हणाला, "इस्माईल! मला वाटतें, ह्या औरतीबद्दल आमच्यांत आपसांत निष्कारण भांडणतंटे माजतील. त्यापेक्षां तिलाच अजिबात काढून टाकावी म्हणजे झालें."

"नहि, नहि! औरतकू काटो मत. इस्लामका किताब ऐसा नहि. प्रत्येक मुसलमानानें निदान एक तरी काफिर बाटवावा किंवा ठार मारावा, किंवा काफिरांच्या एका तरी औरतीला भ्रष्ट करावी, म्हणजे त्याला हज केल्याचें पुण्य लागतें. तो मग मेल्यावर स्वर्गांत जातो. त्याला तिथें सुंदर बगीच्यांत भरपूर शराब प्यावयाला मिळते, सुंदर पलंगावर अस्मानच्या परीशीं मनसोक्त विलास

करावयाला मिळतात, अशी त्याच्या जीवाची मग तेथें चैनच चैन होते." इस्माईल म्हणाला.

इस्माईल हा मुल्ला होता. त्यानें प्रत्यक्ष कुराण बेताचेंच वाचलें होतें; पण हिंदूंविरुद्ध अत्याचार करण्यासाठीं अडाणी मुसलमानांना प्रवृत्त करण्याकरितां धर्मवेडानें माथेफिरू बनलेल्या मुसलमानांनीं कुराणाच्या नांवावर केलेला असा आगलावा उपदेश मात्र त्यानें अनेकवार ऐकला होता. त्याच्याबरोबरच्या इतर मुसलमानांनीं कुराण वाचलेलें नव्हतें, त्यामुळें त्यांचा इस्माइलच्या बोलण्यावर तेव्हांच विश्वास बसला व प्रत्येकाच्या मनांत अशी इच्छा उत्पन्न झाली कीं, 'असें जर आहे तर आपण एका काफिराला मारून ह्या स्वर्ग-सुखाचे धनी कां होऊं नये ? तसेंच ती खुबसुरत औरत जर आपल्या हातीं लागली, तर तिला बाटवून तिच्याशीं शादी केल्यानें आपली ह्या जन्मांत चैनच चैन होऊन शिवाय मेल्यावर स्वर्गांतही चैन होईल'. पण प्रत्येकानें ही इच्छा मनांतल्या मनांत झांकून ठेवली. कारण, त्या सहाजणांपैकीं प्रत्येक-जण ह्या सुखाची अपेक्षा करणार; अर्थात् त्या औरतीसाठीं वेळीं सर्व एक-मेकांचे जीव घ्यावयालादेखील तयार व्हावयाचे ! त्यांतून कुणाचें तक्दीर शिकंदर असेल तें खरें ! यशोदेला हस्तगत करणें हें सर्वांनाच अवघड होतें. पण एका तरी काफिराला मारणें कांहीं तितकें अवघड नव्हतें. त्यांच्या दृष्टीनें एक काफिर—पिराजी त्यांच्या हातींच होता. अर्थात् त्याला ते तेव्हांच ठार करूं किंवा बाटवूं शकले असते. पिराजीला ह्या संकटाची तेव्हांच कल्पना करतां आली. तो एकटा असल्यानें त्या सहाजणांशीं झगडण्याला अगदीं असमर्थ होता. या वेळीं आपण पळून जाण्याची खटपट केली तर ती मुळींच यशस्वी व्हावयाची नाहीं हें ओळखून स्वतःचा जीव बचावण्यासाठीं तो त्या सहाही बेरडांना विनवूं लागला, "बाबांनो ! तुम्ही जर मला बाटवीत किंवा ठार मारीत नसाल तर मी माझे दुसरे दोघे साथीदार व त्या दोन औरती यांना पकडून देण्याच्या कामीं तुम्हाला मदत करीन."

"तर मग तूं आमच्याबरोबर चल." इस्माईल म्हणाला.

आतां सर्वजण नाथाजी व पिलाजी यांचा शोध करावयाचा व यशोदेला एकट्या मुजफरअल्लीच्या पंक्तीं पडूं द्यावयाचें नाहीं ह्या उद्योगाला लागले. यशोदेवर नजर ठेवण्याच्या कामगिरीवर नासिरुद्दीन व कमरुद्दीन हे दोघे

निघाले, तेव्हां पिराजीनेंही त्यांच्याबरोबर जाण्याची इच्छा दर्शविली. पण बोलून चालून तो काफिर पडला, त्याच्यावर इतका विश्वास टाकणें इस्माइलला योग्य वाटलें नाहीं. त्यानें त्याला आपल्याबरोबर ठेविलें. पण ते थोडे पुढें चालून जातात न जातात तोंच अकस्मात् झाडींतून तीर सणसणत आले, ते नेमके कादीर, इब्राहीम व त्यांचा तिसरा सोबती मुबारिक यांच्या मर्मस्थानीं घुसून त्यांना चांगलेच घायाळ करावयाला पुरले. रहातां राहिला इस्माईल. त्यानें आणिबाणीचा प्रसंग ओळखून डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच तेथून पोबारा केला. घायाळ रोहिले आपल्या शरीरांत रुतलेले तीर उपटून फेंकून देऊन पिराजीवर तुटून पडण्याच्या इराद्यानें उठूं लागले. पण त्यांच्या मागाहून दोघे मराठेगडी मांजराप्रमाणें पाऊल न वाजवितां तरवारी परजीत पळत आले व डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच त्यांनीं त्या अविंधासुरांचीं शिरें धडावेगळीं केलीं.

पिराजीनें त्या दोघां मराठी गड्यांकडे पाहतांच त्यांना ओळखलें व विस्मित होऊन हांक मारली, "कोण, नाथा! पिलाजी!"

"उगी रहा. यांचे दुसरे साथीदार आजूबाजूला असतील, त्यांना जर आमचा सुगावा लागला तर मोठा कठीण प्रसग ओढवेल." नाथाजी पिराजीच्या अगदीं जवळ येऊन हळूच विचारूं लागला, "पण यशोदेची काय खबर?"

हा प्रश्न ऐकतांच पिराजीच्या नेत्रांतून खळकन् दोन अश्रु गळले. ते पुशीत तो उद्गारला, "यशोदा गेली! तिला ह्या राक्षसांच्या दुसऱ्या साथीदारांनीं धरून नेली! मुक्या जीवांचे शाप बाधतात असें ती म्हणाली ते तिचे शब्द हातोहात खरे झाले!"

"तें खरें; पण तिला कोणत्या बाजूला नेली?" नाथाजीनें विचारलें.

"ह्या बाजूला." पिराजीनें ज्या वाटेनें यशोदेला नेण्यांत आलें होतें तिकडे बोट दाखवीत म्हटलें.

"चला पाहूं तर, तिचा शोध लागतोसा पाहूं!" नाथाजी म्हणाला. लगेच ते तिघे जास्त वाटाघाट न करतां तीन वाटांनीं यशोदेच्या शोधार्थ निघाले.

दर्शन सातवें

## आतां आग भडकणार !

अजून पिराजी वगैरे मंडळी कशी आली नाहींत म्हणून बाळाजीपंत फिकिरींत पडून कोणाला तरी त्यांचा शोध करावयाला पाठविण्याच्या बेतांत आहेत तोंच कृष्णराव प्रतिनिधि चंद्रसेनांकडून निरोप घेऊन आले, "नानासाहेब ! 'तुमचे तिघे हुजरे पिराजी राऊत, नाथाजी धुमाळ व पिलाजी जाधव यांनीं आमचा अक्षम्य गुन्हा केला आहे. तरी त्यांना पाठवून द्यावें' असा सेनापतींचा तुम्हांला निरोप आहे."

सकाळींच स्वामींनीं पिलाजी व नाथाजी यांच्या जीविताच्या सुरक्षिततेविषयीं शंका प्रदर्शित केली होती, त्याची बाळजीपंतांना या वेळीं आठवण झाली. ते चंद्रसेनाचा निरोप ऐकून कृष्णरावांना म्हणाले, "कृष्णराव ! चंद्रसेनाला सांगा, गुन्ह्याचा एकंदर प्रकार मला कळला आहे. माझ्या हुजऱ्यांपैकीं कोणींही बुद्धिपुरःसर गुन्हा केलेला नाहीं. निदान चंद्रसेनाचा तरी त्यांच्या चुकीशीं कांहीं संबंध पोंचत नाहीं. ते मला शरण आले आहेत व मीं त्यांना अभय दिलें आहे. या उप्परही त्यांतील कोणाला कांहीं शिक्षा चंद्रसेनाच्या मनांतून करावयाची असली तर म्हणावें, काय शिक्षा करावयाची तें लिहून पाठवा, म्हणजे त्याप्रमाणें योग्य ती तजवीज मी करतों."

कृष्णराव म्हणाले, "नानासाहेब ! सेनापति अत्यंत चिडलेले आहेत. त्यांचें अशा उत्तरानें समाधान व्हावयाचें नाहीं, व तुम्हां दोघांमधील वितुष्टाचा वणवा मात्र जास्त भडकेल. त्यापेक्षां तुम्ही माझें ऐका, मुकाटयानें त्या तिघांना सेनापतींच्या स्वाधीन करा."

बाळाजीपंत गंभीरपणानें उद्गारले, "कृष्णराव ! शरण आलेल्यांना मरण द्यावयाचें काय ? माझ्या नोकर-चाकरांचें रक्षण जर मला करतां आलें नाहीं तर मी त्यांचा धनी कसला ? आणि चंद्रसेनानें तरी असा भलताच हट्ट धरावा यांत माझी अमर्यादा नाहीं काय ?"

"पहा बुवा ! सेनापतींचा स्वभाव तुम्हांला माहीत आहे. विषाची परीक्षा पाहण्यांत राम नाहीं." कृष्णरावानें कांहीं वेळ थांबून बाळाजीपंतांच्या

तोंडून कांहींच उत्तर मिळत नाहीं असें पाहून पुन्हा विचारलें, "मग काय नानासाहेब! सेनापतींना काय सांगूं?"

"मीं जें सांगितलें तेंच सांगा." बाळाजीपंत उत्तरले.

"आणि त्यामुळें सेनापतींनीं चिडून तुमचेंच पारिपत्य करण्याचें मनावर घेतलें तर?" कृष्णरावांनीं मुद्दाम खोंचिकपणानें विचारलें.

"त्याच्याशीं तुम्हांला काय करावयाचें आहे? तुम्ही सेनापतींचे बगल-बच्चे आहां हें मला माहीत आहे. दोन कोंबडयांची झुंज लावून मौज पहात बसणारे तुम्ही आहां, मी तुम्हांला पुरा ओळखतों. पण कृष्णराव! ही मौज पाहात बसण्याजोगी वेळ नाहीं. आपण एकमेकांची मौज पाहाण्यासाठीं आज घरांतून बाहेर पडलों नसून आपणां सर्वांच्याच डोक्यावर महाराष्ट्राच्या तरणोपायाची जबाबदारी आहे. ती विसरून कसें चालेल! तुमचा माझ्यावर दांत आहे,–पर्शरामपंत प्रतिनिधींना कैदेंत लोटावयाला मी कारण झालों असा तुमचा गैरसमज झालेला आहे; पण ईश्वरसाक्ष खरा प्रकार तसा नाहीं. शाहूमहाराजांच्या सुटकेच्या वेळीं मी त्यांचा सत्पक्ष ओळखून व भविष्यकाळीं महाराष्ट्राचें मंगल कसें होईल याचा विचार करून त्यांच्या पक्षाला मिळालों व प्रतिनिधि ताराबाई आईसाहेबांनाच चिकटून राहिले, म्हणून शाहूमहाराज माझ्यावर प्रसन्न झाले व प्रतिनिधींवर अप्रसन्न झाले हें खरें. पण मला प्रति-निधींच्या अढळ स्वामिनिष्ठेची पूर्ण पारख आहे. ते थोर पुरुष आज कैद-खान्यांत इतक्या आपत्ति भोगीत असूनही अजून ताराबाई आईसाहेबांना दिलेल्या इमानापासून अणुरेणुही ढळले नाहींत! धन्य त्यांची! त्यांचेच पुत्र तुम्ही! तुम्हीं त्यांचें नांव राखावयाचें होतें. तुमच्या मनाचा ओढा ताराबाई आईसाहेबां-कडे व जनांत दाखवायला मात्र आपण शाहूमहाराजांच्या पक्षाचे, असली दुटप्पी वर्तणूक प्रतिनिधींच्या मुलाला मुळींच शोभत नाहीं."

"त्यांत काय आहे! 'यथा राजा तथा प्रजा'. महाराजांना आम्हां देशस्थां-च्या राजनिष्ठेपेक्षां तुम्हां चित्पावनांची राजनिष्ठा जर जास्त भरींव वाटते, तर आम्हांलाही तसा भेदभाव कां आढवूं नये?" कृष्णराव बाळाजीपंतांना पूर्ण-पणें बोलूं न देतां उतावळेपणानें म्हणाले.

"कृष्णराव! इतके क्षुद्र मनाचे तुम्ही असाल असें मला वाटलें नव्हतें. प्रति-निधि मात्र खास तसे नाहींत. तुम्ही कसले देशस्थ व चित्पावन घेऊन बसलां?

तिकडे प्रत्यक्ष कृतान्तकाळ दिल्लीचा मुसलमान बादशहा हिंदवी-स्वराज्याची वाताहात करून हिंदुलोक व त्यांचा हिंदुस्थान एकजात बाटवून मुसलमानमय करून टाकण्यासाठीं टपून बसला आहे; अशा आणीबाणीच्या प्रसंगीं आपण सर्वांनीं एकजुटीनें आपसांतील सर्व मतभेद विसरून आपला हिंदुधर्म, आपलें हिंदु नांव व आपलें हिंदवी-स्वराज्य राखण्यासाठीं झटावयाचें, तें सोडून हे असले कसले भिकेचे डोहाळे तुम्हां-आम्हांला आठवत आहेत ! ताराबाई आई-साहेब व शाहूमहाराज एकमेकांना पाण्यांत पाहातात ! घाटगे, निंबाळकर, भोंसले, कदम वगैरे अस्सल मराठेच मराठशाही उलथून पाडण्यासाठीं झटतात ! मराठशाही ज्या धनाजीबाबांच्या बाहुबलावर आजवर जीव धरून राहिली त्यांचाच औरस पुत्र वडलांच्या कीर्तीला काळोखी फांसून राजकारणांत ब्राह्मण-ब्राह्मणेतर हा क्षुद्र वाद वाढवून नव्या नव्या विघ्नांना पाचारण करतो ! आणि कृष्णराव ! तुमच्यासारखे सुविचारी ब्राह्मण तर आपल्या ब्राह्मण जातींतच देशस्थ-चित्पावन अशी दुही माजवून स्वतःच्या हातानें स्वतःच्या पायांवर कुऱ्हाड घालून घेऊं पहातात ! हर हर ! कृष्णराव ! अशानें कसें होईल ? अशानें आम्हां महाराष्ट्रीयांतच कोणाचा पायपोस कोणाच्या पायीं नाहींसा होईल व मुसल-मानांना मात्र आमचा देश, आमचा धर्म, आमचें सर्वस्व स्वतःच्या मुसलमानी धर्माच्या व राजसत्तेच्या भट्टींत जाळून भस्मसात् करावयाला फावेल ! "

"तें सारें खरें; पण मला आतां बोलत बसावयाला वेळ नाहीं. मी जातों व सेनापतींना तुमचा निरोप सांगतों. मग ते आणि तुम्ही काय वाटेल तो गोंधळ घाला." असें म्हणून कृष्णराव कपाळाला आंठ्या घालून तेथून निघाला. बाळाजीपंतांना आपल्या बोलण्याचा त्यानें असा अनादर केलेला पाहून खेद झाला. पण तो त्यांनीं बोलून कोणापाशीं दाखवावा !

बाजीराव जवळच बसून हें सर्व संभाषण ऐकत होता. त्यावरून त्याला भावी अरिष्टाची अटकळ करतां येणें अशक्य नव्हतें. तो बाळाजीपंतांना म्हणाला, "बाबा! आतांपर्यंतच्या एकंदर रागरंगावरून ही वितुष्टाची ठिणगी विझण्याचा रंग दिसत नाहीं. चंद्रसेनाला त्या ठिणगीचा वणवा पेटविण्याची खुमखुमी आलेली दिसते. अर्थात् आपणही प्राप्त प्रसंगाला तोंड देण्याला तयार असलें पाहिजे. मी आमच्या सैन्याला सावध राहण्याचा इषारा देऊन ठेवतों. यावर तुमचें काय मत ?"

"खरें आहे. आपण एवढी सावधगिरी ठेवलीच पाहिजे. पण ज्यांच्या-साठीं हा एवढा अनर्थपात होत आहे, ते पिराजी, नाथाजी व पिलाजी अजून कुठें आले नाहींत ते ? कीं त्यांना ह्या सैतानांनीं तिकडच्या तिकडेच घेरलें ?" बाळाजीपंत म्हणाले.

"आतां अगोदर सैन्याला इषारा देतों व मग मीच त्यांच्या शोधाला जाऊन येतों." असें म्हणून बाजीराव बाहेर निघाला. जातां जातां एक मांजर त्याला आडवें गेलें. तिकडे त्याचें लक्ष गेलें नाहीं पण बाळाजीपंतांचें लक्ष गेलें.

"बाजी ! मागें फीर व अंमळ अवकाशानें जा." बाळाजीपंत म्हणाले.

"कां ?" बाजिरावानें मागें वळून विचारलें.

"मांजर आडवें गेलें; अपशकून झाला." बाळाजीपंत म्हणाले.

"छे ! तें मांजर उंदीर धरावयाला जात असेल, त्यालाच मी आडवा जाऊन अपशकून केला. अशा ऐन आणीबाणीच्या वेळीं शकून-अपशकून पाळून कसें चालेल !" असें हूडपणानें म्हणत बाजीराव तेथून निघून गेला.

अपशकुनाची प्रचीति म्हणून असो कीं कांहींही असो; बाजीराव आपल्या सैन्याला इषारा देऊन घोड्यावर स्वार होऊन पिराजीच्या शोधार्थ म्हणून गेला, तो परत येण्यापूर्वींच चंद्रसेनाच्या हुकुमावरून त्याच्या स्वारांचें एक पथक आपल्यावर चालून येत असल्याची खबर बाळाजीपंतांना मिळाली. चंद्रसेनाचें अफाट सेनासामर्थ्य व खुनशीपणा ओळखून बाळाजीपंतांनीं आपलें इतर सैन्य बाजिरावाबरोबर असावें अशी व्यवस्था करून तांतडीनें आपल्या 'शतवीर' पथकासह अंबाजीपंत पुरंदरे व चिमाजी यांना बरोबर घेऊन सचिवांच्या आश्रयाला जाण्यासाठीं थेट नैर्ऋत्येकडे पुरंदरला जाण्याचें ठरविलें, व शतवीरांतील दहा निवडक शिलेदारांना बाजूला काढून त्यांना जवळ बोलावून एकंदर परिस्थिति समजावून देऊन निर्वाणीचा संदेश सांगितला, "माझ्या विश्वासांतील वीरांनो ! अशा आणीबाणीच्या वेळीं माझ्या बाजीचें भवितव्य सर्वस्वीं तुमच्या हातीं देऊन मी पुढें पाऊल टाकीत आहें. लक्षांत ठेवा कीं तुम्ही सेवक माझे नाहीं; सेवक त्या गो-ब्राह्मण-प्रतिपालक छत्रपति शाहूमहाराजांचे. महाराजांच्या पक्षाला विश्वासांतील कर्ते पुरुष असे आज कोणी उरले नाहींत; जिकडे तिकडे फंदफितुरी माजली आहे. अशा प्रसंगीं

माझ्या हातून महाराष्ट्राचें अल्पस्वल्प रक्षण झालें तर तो तुम्हां शतवीरांच्या पुण्याईचा प्रभाव ! त्यांत माझें कांहीं नाहीं. आजवर शतवीरांकडून कर्तव्य-पालनाच्या कठोर शपथा मीं घेवविल्या, त्या मींही तशीच शपथ घेऊन माय-देशाच्या मंगलास्तव छत्रपतींच्या चरणीं रुजू केल्या आहेत. त्या शपथांचें रहस्य ओळखून तुम्ही वागा व महाराष्ट्राच्या मंगलतेचे मानकरी व्हा. यापेक्षां जास्त मी काय सांगूं ! "

हा संदेश देतांना बाळाजीपंतांच्या डोळ्यांतून अश्रूंचा पूर वाहूं लागला. त्या पुरांत पाषाणही द्रवले असते. मग त्यांच्या परमविश्वासांतील शत-वीरांची गोष्ट कशाला ! त्या दहा शिलेदारांपैकीं प्रमुख जो वीरसेन त्यानें आपल्याबरोबरच्या इतर नऊ वीरांच्या वतीनें पुढें होऊन बाळाजीपंतांच्या चरणांना स्पर्श करून शपथ घेतली, "धनीसाहेब ! आम्हांपैकीं एकही वीर आपल्या शपथेपासून ढळणार नाहीं. पराजयानें काळें झालेलें तोंड घेऊन माघारे फिरणें हें शतवीरांचें ब्रीद नाहीं. आम्ही विजयलक्ष्मीला वरूं तेव्हांच आपणाला तोंड दाखवूं व तरच शतवीरांचें नांव सांगूं. आमच्यापैकीं पराजित व जिवंत असा एकही शतवीर आपणाला माघारा आलेला आढळावयाचा नाहीं, याविषयीं आपण निःसंदेह असा."

शतवीरांकडून एवढें आश्वासन घेऊन बाळाजीपंत पुरंदरच्या वाटेला लागतात तोंच त्यांच्या अटकळीप्रमाणें चंद्रसेनाचें पथक त्यांच्यावर चालून आलें. पण बाळाजीपंत एकदां निसटले ते शत्रूच्या हातीं थोडेच लागतात !

दर्शन आठवें

## यशोदेसाठीं यादवी !

मेलेल्या किंवा मरणोन्मुख प्राण्याचें मांस खाण्यासाठीं चटावलेल्या गिधाडांच्या कचाटींत एखादा व्रणार्त जीव सांपडला तर त्याची कधीं तरी धडगत लागेल काय? यशोदेचीही थेट तशीच केंविलवाणी अवस्था आज झाली होती. आपणालाही परमेश्वरानें आयाबहिणी दिल्या आहेत हें विसरून परधर्मांतील स्त्रियांचे आपल्या पाशवी कामाग्नीला बळी देण्यासाठीं जेव्हां जेव्हां संधि सांपडेल तेव्हां तेव्हां सज्ज असणाऱ्या आडदांड अविंधांच्या हातीं ती बिचारी आज सांपडली होती. तिला प्रथम पकडण्यांत आलें तेव्हां ती बेशुद्ध होती; तरी तेव्हांपासूनच तें पूर्ण विकसित सौंदर्यपुष्प कोणीं हुंगून आपल्या अपवित्र श्वासोच्छ्वासांनीं करपवून टाकावें, याविषयीं त्या पहिल्या दोघां रोहिल्यांत कुरबुर सुरू झाली होती, व जो तो आपापल्या मनाशीं त्या पुष्पाच्या प्राप्तीसाठीं प्रसंगीं प्राणत्याग करावा लागला तरी बेहेत्तर इतका प्राणांवर उदार बनून राहिला होता. त्यांतल्या त्यांत मुजफरअल्ली विशेष डोकेबाज होता. यशोदा हातीं लागतांच आपल्या साथीदाराला दूर सारून त्यानें तिला उचलून खांद्यावर घेतलें तें तरी तिच्यावर आपला चालू वहिवाटीचा मालकी हक्क शाबीत करण्यासाठींच.

कांहीं अंतर चालून गेल्यावर मुजफरअल्लीनें झियाउद्दिनाशीं—आपल्या साथीदारापाशीं—बोलणें सुरू केलें, "दोस्त! आपल्या कुराणांत असें सांगितलें आहे कीं, मुसलमानानें मुसलमानाशीं भांडूं नये, त्याचा प्राण घेऊं नये, किंवा त्याला त्रास देऊं नये. हें तुला कबूल आहे ना?"

"बरें; मग?"

"मग काय? ही औरत प्रथम माझ्या हातीं लागली आहे. अर्थात् ती माझी बायको होणेंच रास्त आहे. तूं आणि मी मुसलमानभाई आहोंत. अर्थात् तूं तिच्यासाठीं माझ्याशीं तंटा करतां कामा नये. आतां, कमळजा अथवा कमळा यांपैकीं कोणी जर हातीं लागली तर ती मात्र तूं घ्यावीस."

झियाउद्दिनाला मुजफरअल्लीच्या ह्या कावेबाजपणाविषयीं मनांतून कितीही

तिट्कारा वाटत असला तरी मुजफरअल्ली स्वभावाचा अत्यंत कडवा व शरीरानेंही मस्त रेड्यासारखा ताकदवान असल्यानें त्याच्याविरुद्ध ब्र काढण्याचीदेखील त्याची छाती नव्हती. पण सहजासहजीं यशोदेविषयींचा मोह आवरता घेण्याइतका मनोनिग्रह किंवा नीतिमानपणाही त्याच्या ठायीं नव्हता. कमळजेची लालूच फुकट आहे हेंही त्याला माहीत होतें. तरीही मनांत नाखूष होऊन तो गप्प राहिला.

"झियाउद्दीन! तूं बोलत कां नाहींस? मला दगा देण्याचा तुझा विचार आहे कीं काय?" मुजफरअल्लीनें अंमळ रागानें विचारलें.

"माझें म्हणणें तुला जर ऐकावयाचें असेल तर ती प्रथम शुद्धीवर येऊं द्या. मग तिलाच आपण आपणां दोघांपैकीं कोणातरी एकाला पसंत करावयाला सांगूं." झियाउद्दीन म्हणाला. त्या सर्व रोहिल्यांत तो विशेष उमदा, तरुण, गोरा व सुंदर असल्यानें आपण यशोदेला सहज भुलवूं असें त्याचें मन त्याला सांगत होतें.

मुजफरअल्लीला हा निकाल अर्थातच मान्य नव्हता. त्याला पक्कें माहीत होतें कीं, यशोदेला पळविण्यांत ज्या अर्थीं आपण प्रामुख्य घेतलें आहे त्या-अर्थीं ती शुद्धीवर येतांच प्रथम आपल्याच नांवानें खडे फोडूं लागणार. ती सुटका करून घेण्याची धडपड करील; पण त्यांत तिला यश येण्याची आशा नाहीं, व आपणाला कोणातरी मुसलमानाच्या नांवानें बाटण्याशिवाय गत्यंतर नाहीं असें कळतांच ती जेव्हां आम्हां दोघांतून आपल्या प्रियकराची निवड करूं लागेल तेव्हां झियाउद्दीनच तिच्या मनांत जास्त भरेल व ती त्याच्या गळ्यांत पडेल. तेव्हां हा न्याय मुजफरअल्लीला अर्थातच मान्य नव्हता. त्याचा न्याय म्हणजे त्याची मनगटमस्ती. त्या जोरावर तो झियाउद्दिनाला म्हणाला, "छे! मला हा न्याय पसंत नाहीं. त्यापेक्षां मी एक खाशी तोड काढतों. तूं आणि मी आपसांत लढूंया. त्या लढतींत जो कोणी दुसऱ्याला खतम करील त्याला अर्थातच ही औरत मिळेल."

मुजफरअल्ली नुसतें एवढें म्हणूनच थांबला नाहीं; त्यानें ताबडतोब यशोदेला खांद्यावरून उतरून खालीं ठेवलें व तरवार सरसावून तो झियाउद्दिनाशीं लढण्याला सज्ज झाला. आतां मात्र झियाउद्दिनाचा सर्वस्वी नाइलाज झाला. आतां आपण लढूं नये तर हकनाक मरावें, त्यापेक्षां नशिबाची परीक्षा पहाण्यासाठीं

दोन हात केलेले काय वाईट, असा पोक्त विचार करून तोही तरवार सरसावून सज्ज झाला. तेथूनच पंचवीस-तीस पावलांच्या अंतरावर एका गुहेच्या तोंडाशीं औरसचौरस बारा हात मोकळी जागा होती तेथें ते दोघेही जाऊन लढूं लागले. ते एकमेकांचा जीव घेण्याच्या आसुरी महत्त्वाकांक्षेनें इतके बेभान झाले होते कीं, त्यांच्या मागोमाग कोणां दुसऱ्या दोघांनीं येऊन यशोदेला केव्हां घेरलें याची त्यांना दादच लागली नाहीं. दाद कशी लागेल ! ते जरी एकमेकांना ठार करण्यासाठीं तरवारी परजीत लढत होते तरी 'ही कामाची तरवार करिल ज्या वार ठार तो समजावा' ह्या न्यायानें ते दोघेही यापूर्वींच विवेकदृष्ट्या ठार झाले होते. त्यांतच ह्या युद्धाची भर पडल्यावर तर काय विचारावयालाच नको. दोघांनींही एकमेकांना ठार करण्यासाठीं जिवावर उदार होऊन हातघाईवर येऊन तरवारीचे वार करण्याला सुरवात करून एकमेकांना अनेक जखमा केल्या. त्यांतल्या त्यांत झियाउद्दीन पट्टीचा खड्गयुद्ध-निपुण असल्यानें त्यानें मोठ्या शहामतीनें मुजफरअल्लीचा उजवा हात कलम केला, त्याबरोबर मुजफरअल्लीच्या हातांतील तरवार हातासह गळून पडली. पण त्याची ताकद व धैर्य असामान्य होतें. त्यानें लगेच डाव्या हातानें तरवार उचलून घेऊन निकरानें झियाउद्दिनावर चाल केली व त्याचा डावा हात तरवारीच्या एका घावासरसा समूळ तोडला. झियाउद्दिनानेंही खालीं पडतां पडतां एक असा सफाईचा वार केला कीं, त्यानें मुझफरचें डोकें तत्काळ धडावेगळें झालें. तरीही त्यानें मरतां मरतां झियाउद्दिनाच्या पोटांत डाव्या हातानें जोरानें तरवार भोंकसलीच. त्यामुळें तोही खालीं कोसळला. त्यानें आयुष्याच्या अखेरच्या क्षणाला यशोदेला जेथें ठेवण्यांत आलें होतें त्या जाग्याकडे पाहिलें, तेव्हां नासिरउद्दीन व कमरुद्दिन तिला पळवीत असतांना त्याला आढळले. आपल्या दोघांच्या झगड्यांत तिसऱ्याचा लाभ झालेला पहातां पहातां मरणोन्मुख झियाउद्दीन आपल्या प्रतिस्पर्ध्याविषयींचा सर्व हेवादावा विसरून त्याच्या कंठाला मिठी मारून रडण्यासाठीं धडपडत गुडघे टेंकून जरा पुढें सरकला. पण आंगीं त्राण नसल्यानें तो नेमका प्रतिस्पर्ध्याच्या प्रेतावर उपडा पडला. तशा स्थितींतही त्यानें मुजफरअल्लीच्या गळ्याला मिठी मारली असती; पण मुजफरचा गळा कुठें जाग्यावर होता ! उलट झियाउद्दीनाला तेव्हां आपली मान सांवरतां न आल्यानें त्याची हनुवटी

नेमकी मुजफरच्या कापलेल्या रक्तबंबाळ कंठावर टेंकली गेली व कंठांतून वहाणाऱ्या रक्ताच्या झऱ्यांतून झिरपणारें रक्त नेमकें त्याच्या तोंडांत गेलें ! हा सारा प्रकार हां हां म्हणतां म्हणतां घडून आला. आतां आपण वांचत नाहीं खास अशी झियाउद्दिनाची खात्री झाली, तेव्हां आयुष्याच्या अखेरच्या क्षणीं अल्लाचें नांव घेण्यासाठीं त्यानें तोंड उघडलें. पण असल्या पाप्यांना मरणघडीला तरी एवढें पुण्य कोठून घडावयाला ! मुजफरअल्लीचें मुंडकें अकस्मात् छाटलें गेल्यामुळें त्याच्या मुखांतून अल्लाचें नांव निघणें शक्यच नव्हतें, व झियाउद्दिनाचे ओंठ 'या अल्ला' म्हणण्यासाठीं हलतात न हलतात तोंच गुहेंतून एक वाघ भुकेनें वखवखून जो बाहेर आला तो नेमकी उडी घालून झियाउद्दिनाचें नरडें पकडून फोडूं लागला तेव्हां झियाउद्दिनाला अल्लाचें नांव घेण्याइतकीही उसंत न मिळतां प्राण सोडावा लागला !

## दर्शन नववें

# खंडोबाच्या देवालयांत

"अरे देवा! मी ही कुठें आहें!" यशोदा शुद्धीवर येऊन उद्गारली.

"प्यारी! तूं अशी भिऊं नकोस." नासिरुद्दीन लोंचटपणानें तिच्याजवळ जाऊन म्हणाला.

"काय, प्यारी? नीचा! तूं मला प्यारी म्हणणारा कोण रे? तुम्हीं मुसलमान आपल्या आया-बहिणी-बायकांना प्यारी ह्याच नांवानें हांक मारतां वाटतें! खबरदार असली पाजीपणाची भाषा पुन्हा बोलशील तर!" यशोदा क्षणभर सभोंवतीं नजर फिरवीत म्हणाली.

वरील संवाद पूर्वनिर्दिष्ट भुलेश्वराच्या अतिप्राचीन शिवालयाशेजारीं, चार-पांचशें कदमांवर असलेल्या खंडोबाच्या पुरातन देवालयांत चालला होता. हें देवालय इतकें पुरातन होतें कीं, तें कधीं व कोणीं बांधिलें, याविषयीं तत्कालीन लोकांनादेखील कांहींच विश्वसनीय माहिती नव्हती. पण दंतकथा अशी होती कीं, 'देवालयांतील खंडोबाची पहिली मूर्ति पिंगट रंगाच्या संगमरवरी दगडाची भव्य अशी होती. त्या मूर्तीचा मुकुट व हातांतील गदा सुवर्णाची असून त्यांवर बहुमोल रत्नें बसविण्यांत आलीं होतीं. त्यांत गदेवर झळकणारा एक हिरा तर लाख दीड लाख रुपये मोलाचा होता. त्या हिऱ्याच्या अंगीं कांहीं अलौकिक दैवी शक्ति होती. पुढें औरंगजेब बादशहाच्या जुलमी कारकीर्दींत हिंदुधर्माचा व हिंदुबांधवांचा सर्रास उच्छेद सुरू झाला व त्या उच्छेदांत अनेक हिंदु देवालयें उध्वस्त करण्यांत आलीं, त्यांतच ह्या देवालयावरही संकट कोसळलें. कोणा मुसलमान अरेरावानें ह्या देवालयावर हल्ला करून आंतील खंडोबाची मूर्ति विद्रूप केली व तिच्यावरील जडावांतील सर्व रत्नें उखटून घेतलीं. ह्या अत्याचाराचा दाखला त्या मूर्तिभंजन करणाऱ्या अत्याचाऱ्यांना तेथल्यातेथेंच हातोहात पटला. देवमूर्तीची वाताहात करून ते बाहेर येतात न येतात तोंच त्या मूर्तीच्या आसनाच्या बाजूला भिंतींत एका मनुष्याचें डोकें जाईल एवढें भगदाड होतें, त्यांतून भुंग्यांचा थवाच्या थवा घोंगावत बाहेर पडला व मुसलमानांना चावून बेजार करूं लागला; तेव्हां त्यांना तेथून पळ काढावा लागला; पण

एवढ्यानेंही त्या अविंधांचे डोळे उघडले नाहींत. त्या टोळीच्या नायकानें त्या रत्नांनीं जडित अशी एक सुवर्णाची पिकदाणी तयार करून ती बादशहाला नजर केली. वर निर्देशिलेला मूल्यवान् हिरा, त्यावर रोज बादशहाची थुंकी पडावी ह्या इराद्यानें, मुद्दाम त्या पिकदाणीच्या बुडाशीं बसविण्यांत आला होता. हिंदूंची देवमूर्ति फोडून तिच्यावरील रत्नांना सतत आपल्या बादशहाच्या थुंकींत लडबडत ठेवण्याचा पराक्रम करणाऱ्या त्या वीराला बादशहानें मोठ्या मानमान्यतेला चढविलें. पण ज्या दिवसापासून बादशहा ती पिकदाणी वापरूं लागला, त्या दिवसापासून रोज रात्रौ त्याच्या आणि हा अत्याचार करणाऱ्या अविंधांच्या स्वप्नांत खंडोबानें यावें व आपल्या हातांतील गदेचा टोला त्यांच्या मस्तकांत हाणावा. त्या धास्तीनें त्यांनीं जागें होऊन पहावें तों कुठें काय आहे! बादशहा काय किंवा इतर मुसलमानी धर्मवेत्ते मुल्ला-मौलवी-मौलाना काय, सर्वांना वाटे कीं, हिंदुलोक जे दगडधोंड्यांच्या अथवा धातूच्या मूर्ति करून मारे त्यांची पूजा करतात, तो त्या दगडधोंड्यांत अथवा धातूंत देव थोडाच आहे! जर त्यांत देव असता, तर गझनीच्या महमुदानें आपल्या हातांतील सोट्यानें सोरटी सोमनाथाची मूर्ति फोडली तेव्हां किंवा तेव्हांपासून आजवर आम्हीं मुसलमानांनीं जो हिंदूंच्या देव-देवालयांचा विध्वंस आरंभिला आहे, तो हिंदूंच्या देवांना बरा मानवतो! हे सारे देव आम्हीं केलेला छळ निमूटपणें बरा सहन करतात व आमच्या लाथांच्या ठोकरांसरसे बरे मरून पडतात! पण बादशहाला देखील जेव्हां पिकदाणीच्या निमित्तानें हिंदूंच्या मूर्तिपूजेंतील देवकळा कळूं लागली, तेव्हां त्यानें ती पिकदाणी वापरण्याचें सोडलें, इतकेंच काय; पण आपल्या मागचा हा ससेमिरा चुकण्यासाठीं आपल्या विश्वासांतील एकही पीर आळवावयाचा ठेवला नाहीं! पण काय असेल तें असो; कोणताच पीर त्याच्या नवसाला पावेना. अखेर शहाजादी झुल्पिकार बेगम हिला स्वप्नांत दृष्टान्त झाला व येसूबाई आईसाहेबांनींही तिला तोड सुचविली, त्यावरून तिनें बादशहाची समजूत घातली कीं, जेजुरीला खंडोबा नांवाचेंच जागतें दैवत आहे, त्याला नवस बोलावा, म्हणजे आराम पडेल. बादशहा व खंडोबाच्या देवालयाचा विध्वंस करणारा तो सरदार यांनीं बेगमचे शब्द मानून जेजुरीच्या खंडोबाला नवस केला कीं, आराम पडल्यास तुला एक रत्नजडित मुकुट व रत्नजडित गदा अर्पण करूं.

त्याबरोबर त्यांना आराम पडला व बादशहानें त्याच सरदाराला जेजुरीला पाठवून तो नवस फेडला. झुल्पिकार बेगम हिला हिंदु, हिंदूंचे देव व हिंदूंचा धर्म यांविषयीं, संभाजी महाराजांचा तिच्याकारणें वध झाला तेव्हांपासून आदर वाटत होता, तो ह्या प्रसंगानें द्विगुणित झाला व पुढें बादशहानें येसूबाई आईसाहेब आणि शाहू ह्या मायलेकांना बाटविण्याचा घाट घातला असतां तिनेंच बादशहाची परोपरीनें समजूत घालून तो प्रसंग टाळला. तात्पर्य, भुलेश्वराच्या घाटांतील खंडोबानें बादशहासारख्या हिंदुधर्मांतील मूर्तिपूजेच्या कट्टया दुस्मानांनाही मूर्तिपूजेंतील देवकळेची एकवार ओळख पटवून दिली.

त्याच खंडोबाच्या देवालयांत आज हा प्रकार चालला होता. अत्याचारी मुसलमानांनीं हीच जागा नेमकी शोधून काढण्याचें कारण वरील अत्याचार घडल्यापासून आज बरेच दिवस ती जागा सर्व हिंदूंना अत्यंत भयानक वाटूं लागली होती. मुसलमानांनीं तेथल्या देवमूर्तींचा विध्वंस केल्यावर त्या अपवित्र जागीं भुतेंखेतें वास्तव्य करीत असावीं असा तेथल्या सर्व रहिवाश्यांचा पक्का समज होऊन राहिला होता. त्यामुळें तेथें सहसा कोणी जाऊं धजत नसे.

असो. यशोदेनें नासिरुद्दिनाच्या तोंडच्या 'प्यारी!' ह्या संबोधनानें चिडून त्याची निर्भर्त्सना करीत नीट लक्ष्यपूर्वक आजूबाजूला पाहिलें, तेव्हां आपण कोणत्या भयाण परिस्थितींत येऊन पडलों आहों याची तिला यथावत् कल्पना झाली. तिला या वेळीं खंडोबाची मूर्ति दूर फेंकून देऊन त्या मूर्तीखालच्या चबुतऱ्यावर निजविण्यांत आलें होतें. आपल्या अब्रूवर दरोडा पडण्याची ही वेळ आहे हें तर ती ओळखून चुकलीच; तरीही तिचा स्वतःच्या पातिव्रत्यावर इतका अढळ विश्वास होता कीं, या वेळींही ती स्वतःच्या अब्रूविषयीं डगमगली नाहीं. थोड्या वेळापूर्वीं सोन्यासारखा पोटचा पोरगा मारला गेला, त्या दुःखाचाही तिला अजून पूर्णपणें विसर पडला नव्हता, तरी त्या दुःखापेक्षांही जास्त दुःख तिला पिराजीची काय अवस्था झाली असेल ह्या चिंतेमुळें वाटत होतें. पिराजी कोठें असेल ? तो हयात असेल कीं मेला असेल ? तो हयात असता तर आपली ही दशा होईतों एथवर यावयाचा खास राहिला नसता; पण तो ज्याअर्थीं आला नाहीं त्याअर्थीं ह्या राक्षसांनीं त्याचा नायनाट केला असेल खास, ह्या अभद्र भयानें तिच्या सर्वांगाला दरदरून घाम

सुटून घशाला कोरड पडली होती. पण ती वेळा भिण्याची नव्हती; धीर दाखवून संकट टाळतां आलें तर पाहण्याची होती. तशा स्थितींत प्रथम तिला आपण कोठें आहों याची कल्पना होईना; पण तितक्यांत तिची बाजूला फेंकून देण्यांत आलेल्या खंडोबाकडे दृष्टि वळतांच ती एकदम चकित होऊन उद्गारली, "हें काय हें? अरे चांडाळांनो! हें देवालय आहे. तुम्हीं आमचें देवालय भ्रष्ट केलेंत! आमच्या देवाची तुम्हीं विटंबना केलीत! हीं पापें कुठें फेडाल?"

"देव! म्हणे आमचा देव!" नासिरुद्दीन बेदरकारपणें उठून पलीकडे फेंकून देण्यांत आलेल्या खंडोबाच्या मूर्तीवर लत्ताप्रहार करीत म्हणाला. "हा तुझा देव का? प्यारी! असल्या दगडधोंड्यांत कधीं देव असतो का?"

यशोदेच्यानें ही देवाची विटंबना पाहवेना. ती दोन्ही हातांनीं डोळे झांकून घेत उद्गारली, "देवा! तुझें देवपण आजच लयाला गेलें का रे?—" पुढें तिच्याच्यानें बोलवेना. ती अर्धवट बेशुद्ध पडली.

लगेच नासिरुद्दिनाच्या सांगण्यावरून कमरुद्दिनानें थोड्या वेळापूर्वीं यशोदेला सावध करण्यासाठीं देवालयाजवळ सांपडलेल्या एका कांठ फुटलेल्या गाडग्यांतून पाणी आणलें होतें, त्यांतलें कुळचाभर पाणी घेऊन तिच्या मस्तकावर शिंपडलें. भांड्यांत पाणी सारें एक कुळचाभरच होतें तें संपलें, पण यशोदा कांहीं शुद्धीवर आली नाहीं; तेव्हां कमरुद्दिनानें चपळाई करून जवळच्या टांक्याकडे धांव घेतली. तो टांक्यावर जाऊन भांडें भरून घेण्यासाठीं खालीं वांकतो तोंच एकाएकीं मागाहून त्याचा गळा पकडला गेला. आधींच ती किर्रर झाडी, तशांत एकाएकीं आपला गळा पकडला जातांच कमरुद्दीन एकदम भिऊन ओरडला, "या अल्ला! या खुदा! सैतान! सैतान!"

तो पिलाजीच होता. यशोदेच्या शोधनार्थ हिंडतां हिंडतां नाथाजी व तो दोघेही अचानक एथवर येऊन पोंचले होते.

"चूप! ओरड करशील तर मुंडी छाटून टाकीन!" पिलाजीनें कमरुद्दिनाला उताणा पाडून डाव्या हातानें त्याचा गळा दाबून धरला व उजव्या हातांतील खंजिराचें टोंक त्याच्या नरडीला भिडवीत उजवा गुडगा त्याच्या छातीवर टेंकून व डाव्या गुडघ्याखालीं डावा हात दडपून तो पवित्रा ठोकून बसतांबसतां दरडावून म्हणाला, "बदमाष! मुकाट्यानें यशोदा कुठें आहे तें सांग."

" हमकु मालुम नहि !" असें उत्तर देत कमरुद्दीन पाठीखालीं सांपडलेला आपला उजवा हात सोडवून घेण्याची धडपड करूं लागला; पण नाथाजीनें तेवढ्यांत पुढें होऊन इतक्या जोरानें त्याच्या उजव्या छाताडावर लाथ मारली कीं, त्यामुळें कमरुद्दिनाचें सर्व बळ नाहींसें होऊन त्याला रक्त ओकण्याची पाळी आली.

" हरामखोर ! मुकाट्यानें यशोदेचा पत्ता सांगतोस कीं ठार करूं ?" नाथाजीनें दांत-ओंठ खात विचारलें, " मागें कमळजा व कमळा यांना पळवलीत, तो डाव साधला म्हणून हाही साधेल असें तुम्हाला वाटलें काय ?"

आतां हट्ट धरण्यांत आपल्या जिवाला खास अपाय आहे असें कमरुद्दिनाला कळून चुकलें. बरें; यशादेचा पत्ता सांगितल्यानें तरी आपली सुटका होईल अशीही त्याला खात्री नव्हती. पण सुटका झालीच तर पत्ता सांगितल्यानें होईल व तेथवर जाईपर्यंत आपण जिवंत राहिलों तर कदाचित् नासिरुद्दीन आपल्या मदतीला धावून येऊन आपल्या प्राणावरील संकट टाळील, ह्या आशेनें तो उत्तरला, " मला ठार मारणार नसाल तर मी पत्ता दाखवितों."

" चल दाखव !" असें म्हणून पिलाजी कमरुद्दिनाच्या छातीवरून उठतां उठतां नाथाजीला म्हणाला, " नाथा ! अगोदर डोकीचा पटका सोडून ह्या दगेखोराचे हात बांध पाहूं !"

नाथाजीनें डोकीचा पटका सोडला व दोघांनीं कमरुद्दिनाला त्याच्या दोन दंडांना धरून उभा केल्यावर त्याचे हात पाठीमागें घट्ट बांधण्यांत आले. नंतर पिलाजी त्याला दरडावून म्हणाला, " चल, पत्ता दाखव."

" चला दाखवतों." असें म्हणून कमरुद्दीन आपलें आतांचें मरण पाव घटकेपर्यंत तरी टळलें म्हणून मनांतल्या मनांत अल्लाला दुवा देत चालूं लागला. त्याच्या डाव्या उजव्या बाजूनें नाथाजी व पिलाजी चालूं लागले. दहापांच पावलें चालून गेल्यावर कमरुद्दिनाला आपण झऱ्यावर कशासाठीं आलों होतों याची आठवण झाली. तो म्हणाला, " ओ औरत मर जाती है ! तिला प्यावयाला पाणी पाहिजे होतें तें नेण्यासाठीं मी झऱ्यावर आलों होतों."

" हरामखोरा ! हें प्रथमच कां नाहीं सांगितलेंस ?" नाथाजी कमरुद्दिनाच्या कमरेंत जोरानें एक लाथ मारून मग पिलाजीकडे वळून म्हणाला, " पिलाजी ! आपण बरोबर पाणी घेतलें पाहिजे. मागें फीर."

पिलाजी कमरुद्दिनासह मागें वळून म्हणाला, "पण पाणी घ्यावयाला भांडें कुठें आहे?"

"मैं हमारेसाथ मट्टीका मडका लाया था." कमरुद्दीन म्हणाला.

त्याच मडक्यांतून पाणी घ्यावें ह्या इराद्यानें ते झऱ्यावर गेले; पण पाहतात तों आतांच्या दंगलींत त्या मडक्याचा चुराडा होऊन गेला होता. आतां पाणी कशांतून घ्यावयाचें हा सर्वांनाच मोठा पेंच पडला. पिलाजी तेवढ्यांत आपल्या डोकीचा पटका सोडून नाथाजीच्या हातीं देत म्हणाला, "नाथा! हा पटका पाण्यांत भिजवून घे."

नाथाजीनें पटका पाण्यांत भिजवून त्याचा पिळा करून बरोबर घेतला. लगेच ते देवालयाच्या अनुरोधानें चालूं लागले.

## दर्शन दहावें

# कठिण समय येतां कोण कामास येतो !

"अंबाजीपंत !" बाळाजीपंतांनीं पुरंदर किल्ल्याच्या आसपास येतांच मागें वळून हांक मारिली.

"काय म्हणतां ?" अंबाजीपंतांनीं विचारलें.

समोरून सचिवांच्याच घरची कोणी एक बालविधवा रिकामी घागर घेऊन पाण्याला जात होती तिला उद्देशून बाळाजीपंत म्हणाले, "आपण एथवर मोठ्या आशेनें सचिवांच्या आश्रयाला आलों खरे; पण काय असेल तें असो, आपणांला शकून कांहीं चांगले होत नाहींत."

"शकून काय करतील ? ते का तुमच्या आमच्यासमोर रडतील ? समजून उमजून तुम्हीं वाटेची आडवाट आंखली, आतां त्या आडवाटेंत जागोजाग कांटेरीं आहेत अशी कुरकुर करण्यांत अर्थ काय ? आतां मुकाट्यानें चला." अंबाजीपंत नाखुषीनें उद्गारले.

बाळाजीपंत यांवर कांहीं न बोलतां मुकाट्यानें चिमाजीला हाताशीं धरून चालूं लागले. पुरंदर किल्ल्याचा गणेश दरवाजा आतां दिसूं लागल्यानें कोणी ऐकेल ह्या भयानें असल्या गोष्टी बोलण्याची सोयच नव्हती. दुसरें असें कीं, माळशिरसचा घाट सोडल्यापासून बाळाजीपंतांनीं जेव्हां प्रथम सचिवांपाशीं आश्रय मागावयाचा ओढा दर्शविला तेव्हांच अंबाजीपंतांनीं स्पष्ट-पणें विरुद्ध मत दिलें होतें. संक्राजी नारायण सचीव, अंबाजीपंत, व बाळाजी विश्वनाथ हे ऋणानुबंधी होते; बाळाजीपंत व पुरंदरे यांना पुढें नांवारूपाला आणा-वयाला सचीवच कारण झाले होते; व शाहूमहाराजांच्या सुटकेच्या वेळींही सचिवांनीं बाळाजीपंतांच्या सल्ल्यानें शाहूमहाराजांचीच बाजू उचलून धरली हें सारें खरें. पण ताराबाईनें आपल्या वेड्या शिवाजीच्या राज्यारोहणसमयीं ज्या थोर पुरुषांना शिवाजीशीं आमरण—फार काय, पिढ्यान् पिढ्या राजनिष्ठ राहण्या-विषयीं राजसिंहासनासमोर शपथा घेवविल्या होत्या, त्यांपैकींच सचीव हे एक होते. त्यांची राजनिष्ठा परशरामपंत प्रतिनिधींच्या राजनिष्ठेप्रमाणेंच एकमार्गी ऊर्फ आंधळी होती. राजकीय दृष्ट्या बाळाजीपंत व सचीव यांच्यांत ह्यामुळें

जरी परस्पर विरोध उत्पन्न झाला, तरी त्याचा एकमेकांशीं असलेल्या खासगी वर्तनावर कांहीं परिणाम न होतां दोघेही विचारी असल्यानें राजकारणांतील मतभेद तसाच राहूं देऊनही खासगी रीत्या स्नेहीसे वागत.

हें मित्रत्वाचें नातें ओळखून, सचीव जरी राजकारणांत आपले प्रतिस्पर्धी आहेत तरी खासगी नात्यांत ते व आपण एकमेकांचे जिव्हाळ्याचे दोस्तच आहों व यदाकदाचित् आपणाशीं उघड उघड स्नेह ठेवण्याला सचिवांना भय वाटलें तरी अशा आणीबाणीच्या वेळीं ते आपणाला खास दूर लोटणार नाहींत अशा दृढ भरंवशानें बाळाजीपंत आज मुद्दाम पुरंदरला सचिवांच्या आश्रयाला आले होते. अंबाजीपंतांना मुळापासूनच ही योजना मान्य नसल्यानें त्यांनीं जरी बाळाजीपंतांचें अनुकरण केलें तरी तें केवळ नाखुषीनेंच केलें होतें.

" एथवर तर आलों खरे! आतां श्रीगजाननाच्या कृपेंकरून काय होईल तें खरें! असें म्हणून बाळाजीपंत चिमाजीला हाताशीं धरून पाऊल उचलूं लागले, तोंच मावळत्या सूर्याच्या संधिप्रकाशांत कांहींसा दुरूनच एक तरुण किल्ल्याच्या गणेशदरवाजांतून बाहेर पडतांना त्यांनीं पाहिला, तेव्हां अंबाजीपंतांना संशयानें विचारलें, " अंबाजीपंत, कोण हो तो? प्रतिनिधींचा मुलगा कृष्णराव तर नसेल?"

एवढ्यांत बाळाजीपंत व अंबाजीपंत किल्ल्याच्या गणेशदरवाजांतून जाऊन पोंचले. तरुणही त्याच रस्त्यानें चार पावलें सामोरा चालत आला, तेव्हां तो कोण आहे याचा विचार करण्याचें कारणच उरलें नाहीं. बाळाजीपंतांचा संशयच खरा ठरला. ते अंबाजीपंतांच्या उत्तराची वाट न पाहतां आपण होऊनच म्हणाले, "होय. तो कृष्णरावच. पण इतक्या तांतडीनें तो इकडे कशाला बरें आला असावा?"

"बाळाजीपंत! तो यमदूत आहे!" "अंबाजीपंत म्हणाले," चंद्रसेन-जाधवाच्या वतीनें तो सचिवांचे कान फुंकण्यासाठीं आला असला पाहिजे."

"तसें असलें तर आपलें नशीब! आतां संक्राजीपंतांच्या परीक्षेची वेळ आहे खरी. पाहूं तर खरें काय होतें तें!" असें म्हणून बाळाजीपंत पुढें चालूं लागले.

थोड्याच वेळांत त्या दोघांची कृष्णरावाशीं गांठ पडली. त्याबरोबर कृष्णराव उपहासपूर्वक हंसून म्हणाला, " बाळाजीपंत! सेनापतींच्या भयानें पळत पळत

सचिवांच्या आश्रयाला आलां म्हणावयाचे ! आतां सचिवांना फितूर करण्याचीं कारस्थानें रंगाला यावयाचीं असतील. पण एकंदरींत आजचा दिवस तुमच्या आयुष्यांत अपशकुनी उगवला असावा असें वाटतें ! ”

बाळाजीपंतांना कृष्णरावाच्या ह्या मर्मभेदक बोलांची चीड आली. सचिवांपाशीं तो जो आला तो असल्याच कृष्णकारस्थानाची उभारणी करण्यासाठीं आला असावा, याविषयीं त्यांना आतां शंका राहिली नाहीं. सकाळींच त्या दोघांची थोडीशी बाचाबाच झाली होती, तोच डाव मनांत धरून कृष्णराव बोलतो आहे असें पाहतांच बाळाजीपंत 'जशास तसें' या न्यायानें उत्तरले, “ हो, तसें वाटतें खरें. कारण आज सकाळपासून दोन वेळां मला तुमचें तोंड पहाण्याची पाळी आली.”

कृष्णराव ह्या उत्तरानें खजिल होऊन मुकाट्यानें पुढें चालता झाला. नंतर बाळाजीपंत व अंबाजीपंत किल्ल्यावरील सचिवांच्या वाड्यांत गेले. सचीव कृष्णरावाला चार पावलें पोंचविण्यासाठीं गणेश-दरवाजापर्यंत आले होते ते तेथेंच सदरेवर सचिंत मुद्रेनें येरझारा घालीत होते. त्यांनीं बाळाजीपंतांना पाहातांच शिष्टसांप्रदायाप्रमाणें नमस्कार केला व बसावयाला सांगितलें. चिमाजीची घरांत चांगलीच ओळख असल्यानें तो 'काकू' 'काकू' अशा येसूबाईला—सचिवांच्या पत्नीला हांका मारीत थेट घरांत गेला. बराच वेळपर्यंत एकमेकांच्या कुशलवृत्ताच्या गोष्टी झाल्या. पण आज अशा वेळीं इकडे येण्याचें कारण काय असें सचिव कांहीं विचारीनात. अखेर आपणच आपलें दुखणें वेशीला टांगलें पाहिजे असा विचार करून बाळाजीपंत म्हणाले, “ संक्राजीपंत ! एकंदर प्रकार तुम्हांला कृष्णरावाकडून कळलाच असेल; आतां सांगावयाचें तें एवढेंच कीं, आम्ही तुमच्या आश्रयाला आलों आहों. आतां आम्हांला तारणें किंवा मारणें तुमच्या हातीं आहे.”

“ माझ्या हातीं काय आहे ! ” सचीव निराशापूर्ण स्वरानें म्हणाले, “ नाना ! आम्ही ताराबाई आईसाहेबांचे ताबेदार. त्यांच्या हातांतील बाहुलीं आम्ही. आम्ही जिवंत माणसें नाहीं; कळसूत्री बाहुलीं आहों. जशी कळ दाबली जाईल तशी हालचाल आम्ही करणार. आतां, तुमचा—आमचा ऋणानुबंध-ध्यानीं घेऊन मला एवढेंच तुम्हांला सांगावयाचें कीं, तुम्ही आल्या पावलीं माघारे जा. मला तुमचें रक्षण करतां यावयाचें नाहीं. ”

" संक्राजीपंत !" बाळाजीपंतांनीं विस्मयानें हांक मारून विचारलें, " तुम्ही सचीव म्हणून मी तुमच्यापाशीं सेनाकर्ता ह्या नात्यानें आलों नाहीं. पण तुमचा-आमचा इतक्या दिवसांचा घरोबा, तेव्हां अशा अडचणीच्या वेळीं मित्रानें मित्राला साह्य केलें पाहिजे असें तुम्हांला वाटत नाहीं का ?"

" पण मी आतां तुमचा मित्र राहिलों नाहीं. मी माझाही नाहीं तर तुमचा कोठून असेन ? माझा स्वभाव तुम्हांला माहीत आहे. तुम्ही मूळपासूनच ताराबाई आईसाहेबांच्या विरुद्ध आहां. तशांत सेनापतींचे तुम्ही गुन्हेगार आहां. 'बाळाजीपंतांना थारा दिल्यास मी तुम्हांला जमीनदोस्त करीन' असा आतांच सेनापतींचा निरोप कृष्णराव मला कळवून गेला; " त्याअर्थीं मी तुम्हाला आश्रय देऊं शकत नाहीं. "

" एकूण तुम्ही-आम्ही शत्रु आहों, असें तुम्ही मानतां म्हणावयाचें !" बाळाजीपंत म्हणाले.

" कांहींही म्हणा, वस्तुस्थिति ही अशी आहे." सचीव म्हणाले.

बाळाजीपंतांना सचिवांचे हे बोल ऐकून घेतांना मनस्वी दुःख झालें व अपमानही वाटला. पण त्यांनीं तो बाहेर दिसूं न देतां 'कठिण समय येतां कोण कामास येतो' येवढे शब्द उच्चारून चार उसासे सोडले.

चिमाजीची आंघोळ व जेवण आटोपून येसूबाई बाहेरील संवाद ऐकण्यासाठीं दरवाजाआड येऊन उभी राहिली होती; ती इतक्यांत पुढें येऊन पतीला म्हणाली, "पुरे झालें. इष्टमित्रांची ओळख नाहीं, बायकामुलांची ओळख नाहीं, असलें कसलें हें राजकारण ? इतका विरक्तपणा अंगीं आला असेल तर संसारांत राह्यचें त्यापेक्षां मी म्हणत्यें, संन्यास घ्यावा ! कधीं नव्हत्याचे भावजी आपल्या दारीं आले ती त्यांची अशी शोभा करणें चांगलें वाटतें ! त्यांनीं तरी आपलें असें काय घोडें मारलें आहे ? आपण आपल्या धन्याशीं नेकी राखतां तसे ते त्यांच्या धन्याशीं नेकी राखतात. भांडणें भांडायचीं तीं तिकडे दरबारांत नाहीतर लढाईच्या मैदानावर भांडा; त्यांचें सोयरसुतक घरींदेखील पाळायचें हा कुठचा न्याय ?"

सचीव येसूबाईच्या शब्दावर एक अक्षरदेखील बोलले नाहींत. येसूबाई अत्यंत शहाणी, प्रेमळ व व्यवहारदक्ष स्त्री होती. ती वावगें असें कधींच बोलायाची नाहीं असा सचिवांचा तिच्या ठायीं पूर्ण भरंवसा होता. पण त्यांची

शपथ! ती शपथ त्यांना आंत-बाहेर पूर्ण ग्रासून बसली होती. त्या शपथेची यथावत् पाळणूक करण्यासाठींच कीं काय, ते मुकाट्यानें तेथून उठून बाहेर गेले. त्यांच्या मागोमाग बाळाजीपंत व अंबाजीपंतही निघाले. पण येसूबाईनें पुढें येऊन घरोब्याच्या अधिकारानें सांगितलें, "भावजी! तुम्ही दोघे आलांत ते घांसभर भात खाल्ल्याशिवाय जायचें नाहीं, मी सांगत्यें. तिकडच्यावर रागावूं नका. तिकडे ताराबाईला विकून घ्यायचें झालें आहे. तुम्ही दोघेही तिकडचा स्वभाव ओळखतांच!"

"होय, वहिनी! मी संक्राजीपंतांना पूर्ण ओळखतों. म्हणूनच माझा त्यांच्या-विषयीं कधीं गैरसमज व्हावयाचा नाहीं." बाळाजीपंत म्हणाले.

"झालें तर. वडील वहिनी मी तुमची, नव्हे का?" येसूबाईनें अंबाजी-पंतांकडे पाहून विचारलें.

"होय." अंबाजीपंत म्हणाले.

"तर मग कपडे उतरा पाहूं अगोदर! दमलां असाल, चांगली उन्हुन पाण्यानें आंघोळ करा आणि पहिल्यानें जेवून आजची रात्र इथें झोंप घ्या! उद्यांचें उद्यां, पुढचें पुढें पहातां येईल." येसूबाई म्हणाली.

बाळाजीपंत म्हणाले, "वहिनी! शत्रूचा ससेमिरा पाठीवर असतांना कसली झोंप व कसलें जेवण घेऊन बसलां? आम्हांला पुढचा पल्ला गांठला पाहिजे."

"पहा बरें! पुढ्यांत वाढून आलेल्या अन्नाचा अव्हेर करणें म्हणजे आपणच आपणाला अपशकून करणें आहे. भावजी! अगदीं पहिल्यानें तुम्ही आमच्या घरीं आलां तो दिवस आठवा. माझ्या हाताचा अन्नाचा गुण म्हणूनच तुम्ही तेव्हांपासून आजवर एवढ्या योग्यतेला चढलां. आणि मध्यें आमच्या-कडे यायला तुम्हांला फावेना म्हणून देवानें कोणत्या ना कोणत्या निमित्तानें आज तुम्हांला इथें आणलें. पुन्हां एकदां ह्या वडील वहिनीच्या हातच्या अन्नाचा गुण तर पहा! मीच माझ्या हातगुणाची स्तुति करत्यें असें नाहीं. पण— आपलें सांगत्यें." येसूबाई म्हणाली.

रडत्यालाही हंसवील असा येसूबाईचा स्वभाव होता. तिची वाणी व करणी यांत गंमत, लज्जत व माधुरी होती. बाळाजीपंतांना ह्या सर्व गोष्टी परिचयाच्या होत्या व येसूबाई म्हणजे साक्षात् लक्ष्मी आहे; तिचा शब्द व तिचा आशीर्वाद कधीं खोटा व्हावयाचा नाहीं अशी तिच्या ठायीं त्यांची भक्ति होती. सचिवांनीं

आश्रय देण्याचें नाकबूल केल्यामुळें तिकडून आशेचा उन्हाळा झाला होता, तरीही येसूबाईचा शब्द मोडावासा त्यांना वाटेना. त्यांनीं निमूटपणें कपडे काढले व स्नान केलें. तोंवर येसूबाईनें घरांत सांगून स्वयंपाक तयार करविला होताच; तिनें आपल्या हातानें त्या दोघांना जेवूं घातलें. जेवण होतांच आपल्या शतवीरांची हालहवाल पहाण्यासाठीं व बाजिरावाचें आपल्या मागें काय झालें असेल वगैरे गोष्टींची चौकशी करण्यासाठीं ते दोघेही निघाले. तेवढ्यांत सचीवही बाहेरून आले. बाळाजीपंत मोकळ्या मनानें त्यांना म्हणाले, "संक्राजीपंत ! आम्ही आतां येतों. आम्हांला पुढचा पल्ला पाहिला पाहिजे."

"या. परमेश्वर तुमचें कल्याण करील. मला तुमच्यासाठीं कांहीं करतां येत नाहीं हें खरें असलें तरी तुमच्यासारख्या निष्ठावंतांना परमेश्वर कशाचेंही उणें पाडावयाचा नाहीं." असें म्हणून सचिवांनीं बाळाजीपंत व अंबाजीपंत ह्या दोघांनाही कडकडून मिठी मारून निरोप दिला. तेव्हां त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वहात होत्या. बाळाजीपंतांचा तर त्यांच्याविषयीं प्रतिकूल ग्रह कधींच झाला नव्हता; पण अंबाजीपंतांच्या मनांत कांहींसें किल्मिष सांचलें होतें तेंही त्या अश्रूंनीं पार धुऊन निघालें.

बाळाजीपंत निघाले तेव्हां चिमाजीही त्यांच्याबरोबर निघाला. पण येसूबाईला एवढ्याशा मुलाला वणवण करीत पाठविणें बरें वाटलें नाहीं. ती बाळाजीपंतांना म्हणाली, "भावजी ! तुम्ही जाणारच तर जा बापडे, पण चिमाजीला कशाला उगंच बरोबर नेतां ? तुमच्या ग्रहदशेचा फेरा संपून सुखरूपपणें तुमचे पाय राजधानीला लागले म्हणजे त्याला न्या. तोंवर तो इथेंच माझ्यापाशीं राहूं द्या. बाजिरावालादेखील उगाच तिकडे एकटा सोडून आलां. तो आल्यावर त्यालादेखील पाहिजे तर माझ्याकडे पाठवा. राजकाजाची दगदग ही परमेश्वरानेंच त्यांच्या वांट्याला घातली आहे. पण इतक्या पोरवयांतच त्यांच्यामागें ह्या यातायाती कशाला ?"

बाळाजीपंत यावर हंसून म्हणाले, "वहिनी ! उद्यां आमच्या मुलांच्या डोक्यावर जी जबाबदारी पडावयाची, तिची त्यांना आजपासूनच जाणीव असलेली बरी. आणि शिवाय मीं माझ्या मुलांना केवळ स्वतःच्या इच्छेनें बरोबर घेतलें असें नाहीं; त्यांनींच तसा हट्ट धरला."

"होय का रे ?" येसूबाईनें चिमाजीच्या हनुवटीला हात लावून लडिवाळपणानें विचारलें.

"होय! आम्हांला नको का लढतां यायला?" चिमाजी म्हणाला.

"मग काय, हा चिमणा वीर आतां बापाच्या बरोबरीनें लढणार तर!" येसूबाई चिमाजीच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाली.

"हो! लढणार म्हणजे? लढणारच! आणि मग बाजीनें जशी शाहूमहाराजांकडून सोन्याच्या मुठीची तलवार बक्षीस मिळविली, तशी मीही मिळवणार!" चिमाजी अभिमानानें उत्तरला.

"चला, बाळ! आतां चलायचें. तूं चालशील ना?" बाळाजीपंत चिमाजीला म्हणाले.

"हो! हो! मी चालेन तर काय झालें? चार वर्षांपूर्वीं मी आईबरोबर इथें आलों होतों तेव्हां एकटा एका दमांत गडावरून पायथ्यापर्यंत धावत जाई. आतां तर काय, मी मोठा झालों. माझा सांवळा गडाखालीं आहेच. त्याच्यावर स्वार होऊन मी कसा दौडत येतों पहा तरी!" चिमाजी म्हणाला.

बाजीराव व चिमाजी हे जात्याच कुशाग्र बुद्धीचे व शूर असल्याची त्यांच्या परिचयांतील सर्व लोकांची खात्री होती. त्यामुळें सर्वांचें त्यांच्यावर अतोनात प्रेम होतें. त्यांतल्या त्यांत चिमाजी धाकटा असल्यानें बाळाजीपंतांना काय, राधाबाईंना काय, किंवा इकडे पुरंदरला आल्यावर येसूबाई-सचीव ह्या मंडळींला काय, त्याचें विशेष कौतुक वाटे. सचिवांचा नारायणही आज सुमारें सोळा वर्षांचा होता. तोदेखील धडधाकट, चुणचुणीत व पाणीदार होता. तो इतक्यांत बाहेरून फेरफटका करून आला तेव्हां येसूबाई त्याला सहज म्हणाली, "नारायण! चिमाजी पहा कसा तुझ्याहून लहान असूनही आपल्या वडिलांबरोबर मोहिमेवर निघाला आहे."

नारायण यावर उत्तरला, "मीदेखील माझे बाबा मोहिमेवर निघाले म्हणजे त्यांच्याबरोबर जाईन."

"मग आजच माझ्याबरोबर चलेनास?" चिमाजी म्हणाला.

"आई! मी जाऊं का?" नारायणानें विचारलें.

"तिकडे विचार." येसूबाई म्हणाली.

" बाबा ! मी जाऊं का ? " नारायणानें सचिवांना विचारलें.

सचीव क्षणभर गोंधळल्यासारखे झाले. पण दुसऱ्याच क्षणाला म्हणाले, " हो, जा. आणि काकांपाशीं लढाई करावयाला शीक."

नारायण लगेच हौशीनें कपडे करण्यासाठीं आंत गेला.

" खरेंच का नारायणाला भावजींबरोबर पाठवायचा ? " येसूबाईनें विचारलें.

" हो, खरेंच पाठवावयाचा." सचीव म्हणाले. लढाईवरच काय, पण आईबापांपासून दूर जावयाचाही नारायणावरील हा पहिलाच प्रसंग होता. त्यामुळें येसूबाईचें मन बरेंच गोंधळल्यासारखें झालें. पण चिमाजी आपल्या नारायणापेक्षां वयानें लहान असून देखील इतकी बहादुरी करतो, त्याच्या पुढें आपला मुलगा मेषपात्र ठरूं नये ह्या महत्त्वाकांक्षेनें प्रेरित होऊन ती आपलें मन दगडासारखें घट्ट करून नारायणाला कपडे करण्यासाठीं आंत गेली.

बाळाजीपंत व अंबाजीपंत ह्या दोघांनाही त्या दोघांच्या मनाची एकाएकीं इतकी तयारी झालेली पाहून अचंबा वाटला. बाळाजीपंत सचिवांना म्हणाले, " संक्राजीपंत ! ही थट्टा तर नव्हे ना ? "

" थट्टा कसली त्यांत ? " सचीव म्हणाले, " आजचा सचीव एकवार करूं नये ती प्रतिज्ञा करून शाहूमहाराजांच्या सेवेला मुकला; तो वस्तुतः सचीवपदाला नालायक ठरला. आतां त्याचा हा एकुलता एक मुलगा तरी महाराजांच्या सेवेंत रुजू व्हावा व त्यानें आपल्या पराक्रमाच्या जोरावर महाराजांना प्रसन्न करून आज बुडूं घातलेलें सचीवपद तरतें करावें, यास्तव मी ह्याला तुमच्या स्वाधीन करीत आहें. तुम्ही कोणी परके नाहीं; तुम्ही त्याचे काका आहां. माझ्या आजवरच्या व विशेषतः आजच्या वर्तनावरून तुमचा व शाहूमहाराजांचाही गैरसमज होण्याचा संभव आहे. तसें होणें क्रमप्राप्तच आहे. पण माझी शपथ माझ्यापुरती आहे; ती पाळावयाला माझा मुलगा बांधलेला नाहीं. बाळाजीपंत ! तुम्ही शाहूमहाराजांचे उजवे हात; धनाजी जाधवांच्या पश्चात् मराठशाहीचें भवितव्य सर्वस्वी तुमच्या कर्तबगारीवर अवलंबून आहे. तुम्हीं माझ्या दारीं आश्रयासाठीं यावें व मी तुम्हांला विन्मुख करून परतून लावावें !—पण ईश्वरेच्छा ! " सचीव दोन उसासे सोडून म्हणाले, " असो. बाळाजीपंत ! तुमच्या बाबतींत मित्रकर्तव्य करण्यालादेखील मी अभागी असमर्थ ठरलों त्याबद्दल दंड म्हणून आज मी माझा मुलगा तुमच्या हवालीं करीत आहें. यापुढें तो

तुमचा झाला. बाजी व चिमाजी हे दोघे त्यांतलाच हा तिसरा मधला मुलगा असें मानून तुम्ही त्याला वागवा. जी तुमची व तुमच्या दोघां मुलांची गत होईल तीच तिसऱ्याची होईल. माझें भविष्य मला कळतें आहे. माझें कर्तव्य-पालन माझ्या नाशाला कारण होणार व तुम्ही आणि शाहूमहाराज अखेर विजयी होणार यांत संशय नाहीं."

सचिवांचे हे बोल अंतःकरणाच्या कळवळ्यापासूनचे होते, मग ते बाळाजी-पंत व अंबाजीपंत यांच्या अंतःकरणांत जाऊन भिडले यांत आश्चर्य तें काय? त्या दोघांना यावर कांहींच बोलतां येईना.

इतक्यांत नारायण घरांतून चिमणा स्वार सजून ओसरीवर आला. येसू-बाईनीं त्याला व चिमाजीला जवळजवळ उभे करून त्यांची दृष्ट काढली व देवाच्या पायां पडण्यासाठीं घरांत नेलें. देवाच्या पायां पडून झाल्यावर त्या दोघांनींही सचीव, येसूबाई, बाळाजीपंत व अंबाजीपंत यांना नमस्कार केला.

सर्वांचे निरोप घेऊन झाल्यावर बाळाजीपंत व अंबाजीपंत, चिमाजी व नारायण यांसह गड उतरून खालीं येतात, तोंच एक घोंगड्या स्वार चपळाईनें तेथें येऊन थडकला. शतवीरांपैकीं जे दहा शिलेदार माळशिरसच्या घाटांत ठेवण्यांत आले होते, त्यांपैकीं वैकुंठ नांवाचा हा वीर होता.

" वैकुंठ्या! काय खबर आहे?" बाळाजीपंतांनीं विचारलें.

वैकुंठ्या उत्तरला, " सरकार! सेनापतींनीं पिराजी वगैरे मंडळीच्या नाशाच्या कामगिरीवर इस्माईल व त्याचे साथीदार यांची नेमणूक केली आहे. आपणाला गारद करण्याचा डाव न साधल्यामुळें सेनापति फार चिडले आहेत, व सर्व सैन्य हातीं घेऊन आपल्या पाठलागावर निघण्याच्या बेतांत आहेत. सैन्याची एक तुकडी यापूर्वींच आपल्यावर रवाना झाली आहे. तसेंच कृष्णराव प्रतिनिधिही माघारे जातांना मला वाटेंत आढळले. ते आपल्या-विरुद्ध सचिवापाशीं कलागत लावण्याला आले असावे."

" तें मला कळलें. पण बाजीची खबर काय?"

" धाकटे सरकार मी तेथून निघालों तोंवर सुरक्षित होते. पण त्यांना देखील घेरण्याचा सेनापतींचा विचार आहे."

" ठीक आहे. तूं आतां चपळाई करून माघारा जा व सर्व मिळून बाजीचें रक्षण करून हातीं लागेल तेवढें सैन्य घेऊन आमच्या मागोमाग

पांडवगडाकडे चालून या. आमची काळजी करूं नका. श्रीगजाननाच्या कृपें-करून आम्ही तेथवर सुरक्षितपणें जाऊन पोंचूं. तुम्ही सारे तेथवर आल्यावर तेथून पुढें पुढचा पल्ला पाहूं. जा. ही तुम्हां सर्वांच्या कसोटीची वेळ आहे."

"आज्ञा सरकार !" असें म्हणून वैकुंठ्या बाळाजीपंतांना मुजरा करून वाटेला लागला.

लगेच बाळाजीपंतही चिमाजी, नारायण व शतवीर यांसह पांडवगडाच्या अनुरोधानें निघाले.

## दर्शन अकरावें

# धुमश्चक्री

देवालयाजवळ जाईतों नाथाजी व पिलाजी यांनीं कमरुद्दिनाला कोणताच प्रश्न विचारला नाहीं. त्यावरून त्याला अंमळ, धीर आला कीं हे आपणाला ठार तरी मारणार नाहींत खास. शिवाय तशीच वेळ आली तर नासिरुद्दीन आपल्या मदतीला धावून येण्यासारखा आहे. पण देवालयाच्या आंत सर्वांनीं पाऊल टाकतांच सर्व सृष्टि एकदम पालटलेली दिसली. यशोदा शुद्धीवर येऊन गर्भाशयांतील वाढत्या वेदनांमुळें तळमळत होती; तिच्यासमोर व्यासराव जखमी होऊन बेशुद्ध स्थितींत यशोदेच्या कृष्णाच्या प्रेताला उराशीं धरून अस्ताव्यस्त पडला होता व नासिरुद्दीन खवळून यशोदेला वारंवार बजावीत होता, "ए बेवकूब लवंडी! गिल्ला मत करो. नहि तो हम् यहांसे यहां तेरी इज्जत लेयेंगा!"

देवालयाच्या दरवाजाकडे नासिरुद्दिनाची पाठ असल्यानें व तो काम-क्रोधानें आंधळा बनून गेला असल्यानें नाथाजी वगैरे मंडळी आंत केव्हां आली इकडे त्याचें मुळींच लक्ष्य गेलें नाहीं. पण यशोदा एकसारखी कोणी-तरी आपल्या साह्याला धावून येईल ह्या आशेनें सभोंवार पहात होती; तिनें नाथाजी व पिलाजी यांना नेमकें पाहून हांक मारली, "नाथा! पिलाजी! तुमच्या बहिणीची ही अशी विटंबना होत असलेली तुम्हांला रुचते का रे?"

नासिरुद्दीन एकदम मागें वळून पहातो तों मागें नाथाजी व पिलाजी उभे! ते दोघेही हा एकंदर प्रकार पाहून मनस्वी चिडले व तरवारी उपसून नासिरुद्दिनावर तुटून पडले.

"कमरुद्दीन! कमरुद्दीन! काफिरोंने दगा दिया! अफसोस! उन्हों दोनोंकूभी काट डालो!" नासिरुद्दीन तरवार उगारीत ओरडला. पण कमरु-द्दिनाचे दोन्ही हात बांधलेले असल्यानें त्याचा नाइलाज झाला. नासिरुद्दिनाला वाटलें कीं हा काफिरांना फितूर झाला, म्हणून त्यानें कमरुद्दिनावर अशा सपाट्यानें हातांतील तरवारीचा वार केला कीं त्यानंतर कमरुद्दीनाला जगण्याची फारशी आशा करण्याचें कांहींच कारण नव्हतें. लगेच नाथाजी व पिलाजी

यांनाही लोळविण्याचा नासिरुद्दिनाचा बेत होता. पण ते दोघेही सावध होते; त्यांनीं त्यालाच उलट कापून काढलें.

यशोदा शारीरिक व मानसिक अशा दुहेरी आपत्तींनीं गांजलेली होती, तरीही तिला छळणाऱ्या, तिची बेअब्रू करण्यासाठीं टपून बसलेल्या दुरात्म्यांना त्यांच्या दुष्कर्माबद्दल यथायोग्य प्रायश्चित मिळालेलें पाहून तिला इतका आनंद झाला कीं, त्या आनंदाच्या भरांत ती आपलें दुःख क्षणभर विसरून नाथाजी व पिलाजी यांना धन्यवाद देऊं लागली. पण परमेश्वराला त्या मंडळींचें तेवढेंही सुख पाहवलें नाहीं. आतां अशा स्थितींत तिला निवाऱ्याच्या जागीं कोठें न्यावयाची याचा विचार त्यांच्यांत चालला आहे तोंच त्या देवालयासभोंवार दहा-बारा सशस्त्र मुसलमान सैनिकांचा गराडा पडला. ह्या छाप्याचा म्होरक्या कोण आहे तें नाथाजी व पिलाजी मागें वळून पाहातात तों तो इस्माईल! नाथाजी व पिलाजी यांनीं तेवढ्या आणीबाणीच्या वेळींही चपळाई करून यशोदेला घेऊन तेथून पळ काढला असता; पण जावयाला रस्ताच नाहीं. देवालयाला सारा एकच दरवाजा व तोही शत्रूनें अडविलेला.

यशोदा जरी असहाय होती, तरी इतके मुसलमान आपणावर तुटून पडलेले पाहून यांत आपल्या अब्रूला धोका आहे हें तिनें तेव्हांच ओळखलें. त्याबरोबर तिच्या अंगीं एकाएकीं चंडिकेचें अवसान संचारलें. ती कंबर कसून व जवळच मरून पडलेल्या दोघां मुसलमानांच्या दोन तरवारी हातीं घेऊन धीरानें पुढें सरतां सरतां नाथाजी व पिलाजी यांना म्हणाली, " तोंडें पहात उभे राहूं नका; तुमची बहीण, तुमचा धर्म व तुमचा देव यांची विटंबना करण्यासाठीं हे दैत्य चालून आले आहेत. कमळजा व कमळा यांना बलात्कारानें पळविणारा बेरड तो पहा! त्याच्यापासून आपला धर्म, आपली बहीण व आपला देव यांचें रक्षण करणें हें तुमचें काम आहे. परमेश्वर आपला पाठीराखा आहे म्हणून तर आपण इतक्या अनर्थपरंपरेंतून बचावून एथवर आलों. आठ अविंध आपल्या जिवावर उठले, त्यांपैकीं सातांना परमेश्वरानें कसें देहान्तप्रायश्चित्त दिलें तें तुम्हींआम्हीं पाहिलेंच आहे. आतां परमेश्वराचें नांव घ्या व पुढें सरा. बोला, हरहर महादेव! "

इस्माईल यशोदेच्या ह्या आवेशयुक्त बोलण्यानें अत्यंत चिडला. तो मुठी आंवळीत व ओंठ चावीत म्हणाला, " ए मगरूर लवंडी! सात मुसलमान

मेले, त्यांतलाच आठवा मी आहे. मी त्या सातांच्या मरणाचा सूड घेण्या-साठीं आलों आहे समजलीस ?"

"तर मग मेल्या ! चांडाळा ! जी गत सातांची झाली तीच तुझी आठव्याचीही होईल ! मी कांहीं कमळजा किंवा कमळा नाहीं, याद राख !" यशोदा म्हणाली.

"देखेंगे ! देखेंगे ! मेरी गुल्‌जार प्यारी ! अस्मानकी परी ! देखेंगे !" इस्माईल निर्धोकपणें म्हणाला. त्यांच्या तोंडून हे शब्द निघतांच यशोदा संतापून तरवारी परजीत त्याच्यावर धावली. नाथाजी व पिलाजी यांनींही नेटानें पुढें होऊन पहिल्याच सपाट्याला आपल्या तरवारीच्या एकेका वारा-सरसा एकेक मुसलमान देवालयाच्या दरवाजांत सांपडला तेवढा कापून काढला. यशोदेनेंही इस्माइलावर दोन वार केले. पण एक वार त्यानें आपल्या हातांतील ढालीवर तोलला; तेवढ्यांत यशोदेच्या हातांतील एक तरवार मोडून निकामी झाली. दुसऱ्या तरवारीनें तिनें दुसरा वार केला, तों दुसरा एक मुसलमान इस्माइलला बचावण्यासाठीं मध्यें आला तोच कापला जाऊन इस्माइलचा जीव बचावला. तरीही यशोदा, पिलाजी व नाथाजी यांनीं मर्दपणाची शिकस्त चालविली. इस्माईल एरव्हीं शूर व दांडगट होता खरा; पण त्या तिघांच्या शौर्यधैर्यसंपन्न युद्धकौशल्यापुढें त्याचें कांहीं चालेना. त्याला जरा माघार घेऊन देवालयाबाहेर जावेंच लागलें. ह्या श्रमांनीं यशोदेच्या पोटांत कळ उठूं लागली, ती थांबविण्यासाठीं तेथेंच नाथाजीचा ओला फेटा पडला होता तो घेऊन तिनें घाईघाईनें एका हातानें आपल्या पोटाला गुंडाळला, तरी दुसरा हात तरवार गाजवीत होताच. हा तुंबळ रणसंगर थोडा वेळ तसाच चालला होता. इतके मुसलमान देवालयाबाहेर उभे होते पण एकाचीही यशोदेवर वार करण्याची अथवा तिचा पाडाव करण्याची छाती होईना. अखेर झगडतां झगडतां ती श्रमून घेरी येऊन पडली, तेव्हां नाथाजी व पिलाजी दरवाजांत उभे राहून आपल्या शौर्याची शिकस्त करीत तिचें रक्षण करूं लागले. आतां यशोदा कांहीं केल्या हातीं लागत नाहीं ही इस्माइलची चिंता व एवढ्या शत्रुसंघासमोर आपण टिकाव धरावा तरी कसा ही पिलाजी आणि नाथाजी यांची चिंता होती. इस्माइलकडे मनुष्यबळ तरी होतें; पण त्यांच्याकडे तेंही नाहीं. इस्माईल व त्याचे साथीदार यांनीं

आडवेतिडवे वार करून पिलाजी व नाथाजी यांना नामोहरम करण्याची शिकस्त केली, तरी पिलाजी व नाथाजी जिवावर उदार होऊन लढत असल्यानें तेथें कोणाची कांहीं मात्रा चालेना. पण यशोदेनें हांक मारल्यावरून पिलाजी क्षणभर मागें वळून पहात आहे अशी संधि साधून इस्माइलनें त्याच्या मस्तकावर एक जोराचा वार केला व पिलाजी आधींच हैराण झालेला असल्यानें त्याला हा वार सहन न होऊन मटकन् खालीं बसावें लागलें. आतां मात्र त्या तिघांचाही धीर खचला. सर्व मुसलमान विजयश्रीनें शेफारून देवालयांत घुसूं लागले. तोंच बाहेर 'हरहर महादेव' अशी आरोळी ऐकूं आली, त्याबरोबर हें नवें संकट कोणतें आलें त्याचा प्रतिकार करण्यासाठीं त्यांना पुन्हा हत्यारें सरसावून मागें फिरावें लागलें. आतां मात्र आपली अब्रू बचावणें दुस्तर आहे असें यशोदेला निश्चयपूर्वक वाटूं लागलें. ती काकुळतीला येऊन नाथाजीला म्हणाली," नाथा! आतां आपला बचाव होणें शक्य नाहीं."

इतक्यांत बाहेर एकाएकीं एवढी दंगल माजली कीं, त्या गजबजाटांत यशोदा व नाथाजी यांनाही एकमेकांचें बोलणें ऐकतां येणें अशक्य झालें. त्यांतच पिलाजी पुन्हा उठून लढण्यासाठीं जात असतां मूर्च्छित होऊन खालीं पडला, त्याची भर पडली. "नाथा! नाथा! जी अमंगळ शंका माझ्या मनांत आली तीच अखेर खरी होणार! तूं माझा भाऊ! भाऊराया, आपली बहीण ह्या मुसंड्यांनीं भ्रष्ट करूं नये अशी तुझी इच्छा असली तर–मीच माझ्या हातानें माझा शेवट केला असता; पण तरवार उचलण्याइतकें देखील बळ माझ्या मनगटांत नाहीं रे! ती तरवार घे व माझें पातिव्रत्य अभंग राखण्यासाठीं मला ठार मारून अमर कर!" असें म्हणून यशोदेनें नाथाजीच्या गळ्याला कडकडून मिठी मारली.

यशोदेच्या विनवणीप्रमाणें नाथाजी हें कटुकर्तव्य पार पाडण्यासाठीं तर–वारीला हात घालतो, तोंच 'हर हर महादेव' असा जयघोष करीत देवालयांत घुसणाऱ्या मराठा गड्यांपैकीं कोणीशीं हांक मारली "नाथा!"

ती हांक ऐकतांच यशोदा व मरणोन्मुख नाथाजी आणि पिलाजी हेही चौकसदृष्टीनें मागें पाहूं लागले.

योगायोग जुळून यावयाचे असले म्हणजे असे जुळून येतात. पिराजी, पिलाजी व नाथाजी यांनीं तिघां रोहिल्यांना डोंगरांत लोळविल्यावर यशोदेचा शोध करण्याला प्रारंभ केला; पण चंद्रसेनाच्या चिथावणीनें शेफारलेले रोहिले आपल्या शोधार्थ ठायीं ठायीं हिंडत आहेत हें पाहून स्वसंरक्षणासाठीं त्यांना तेथून खोल जंगलांत पळ काढावा लागला. त्या धांदलींत त्यांची जूट मोडली व तिघे तीन दिशांना झुकले. कांहींशा अवकाशानें नाथाजी व पिलाजी यांची गांठ पडली. मग त्या दोघांनीं मिळून पिराजीचा शोध केला, पण फुकट! त्यांतल्या त्यांत त्या दोघांना नासिरुद्दीन व कमरुद्दीन हे दोघे यशोदेची मोट बांधून नेतांना दिसले म्हणून त्यांना त्यांचा पाठलाग करून त्यांना गांठून यशोदेचा शोध लावतां आला. पण पिराजी मात्र तिकडे एकटाच वणवण करीत होता. तो अखेर यशोदा, नाथाजी व पिलाजी यांच्या शोधाविषयीं निराश होऊन बाळाजीपंतांच्या आश्रयाला निघाला. पण त्या तिघांनीं मिळून दुखविलेला इस्माईल त्याच्या आयुष्याची दोरी खबरदार असल्यानें जिवावरच्या संकटांतून बचावून आपल्यावरील अत्याचाराचा सूड घेण्यासाठीं लपत छपत पिराजीच्या मागोमाग चालला होताच. पिराजीचें नशीबच खडतर, तो बाळाजीपंतांच्या मकाणाजवळजवळ जातो न जातो तोंच चंद्रसेनानें बाळाजीपंतांवर चढाई करण्याची जय्यत तयारी केली असून त्या भयानें बाळाजीपंतांना तेथून एकाएकीं पळ काढावा लागला, ही अशुभ वार्ता त्याच्या कानीं आली. आतां मात्र आपण सर्वस्वी अनाथ झालों असें वाटून पिराजी हताश होऊन आपल्या भावी दुर्दशेविषयीं चिंता करीत अंमळ दूर एका बाजूला जाऊन बसला. आतां स्वतःचा जीव बचावावयाचा, कीं जिकडे धनी तिकडे आपण जिवाची पर्वा न करतां जावयाचें, कीं आपल्या प्रिय पत्नीला आविंधांच्या कचाटींतून सोडविण्यासाठीं शिकस्त करावयाची, अशीं एकाहून एक महत्त्वाचीं तीन कर्तव्यें त्याच्यासमोर मूर्तिमंत येऊन उभीं राहिलीं. ह्या तिहींपैकीं कोणतेंही कर्तव्य स्वीकारलें तरी त्यांत आपलें जीवित सुरक्षित राहील अशी आशा करण्याला त्याला कोठेंच जागा नव्हती. अर्थात् स्वसंरक्षणासाठीं धडपड करणें भ्याडपणाचें असूनही परिणामीं जर आपणाला मरावयाचेंच तर कर्तव्य करून तरी कां मरूं नये असें त्याच्या मनानें घेतलें. पण कर्तव्य तरी कोणतें करावयाचें? स्वामिसेवा व पत्नीच्या पातिव्रत्याचें रक्षण

हीं दोन्ही कर्तव्यें सारख्याच बिनमोल महत्त्वाचीं होतीं; पण दोन्ही ह्या घटकेला सारखींच दुर्घट होऊन बसलीं होतीं. धनी गेला त्याच्या मागोमाग आपण गेलों तर ज्या अर्थीं ह्या सर्व वादाचें मूळ आपणच आहों, त्या अर्थीं आपल्या मागावर शत्रु असणार व आपण त्यांच्या हातीं सांपडलों तर ते आपला बळी घ्यावयाला कमी करणार नाहींत. अर्थात् तो आत्मघाताचाच मार्ग उरेल. असा आत्मघातच जर करावयाचा, तर तो आपल्या पत्नीची अब्रू राखण्यासाठीं शक्य ते प्रयत्न करण्याच्या मार्गानें कां करूं नये? पण असें करण्यांत बाईलवेडेपणा आपल्या पदरीं येईल कीं काय? अशा अनेक विचारांचा हलकल्लोळ अंतःकरणांत माजल्यामुळें पिराजीला काय करावें व काय करूं नये हेंच सुचेनासें झालें.

इतक्यांत एक घोंगड्या कुणबी आपल्याकडे येतांना पिराजीनें पाहिला. त्याला त्यानें तेव्हांच ओळखून लाजेनें खालीं मान घातली. तो वीरसेन होता. तो पिराजीजवळ येऊन त्याच्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला, "पिराजी! वेड्या! असा हताशपणें कपाळाला हात लावून काय बसलास? शतवीरांतील वीर तूं, आपल्या मस्तकावर कर्तव्याचा केवढा बोजा आहे याची तुला जाणीव नाहीं का? चंद्रसेनानें कसा फांस टाकला आहे हें तुला माहीत आहे? थोरले धनीसाहेब दैवदुर्विलासाच्या फेऱ्यांत सांपडून पुरंदराकडे गेले, तरी त्यांनीं धाकट्या धनीसाहेबांना मुद्दाम तुमच्या रक्षणासाठीं ठेविलें आहे. धन्यानें नोकरांच्या जिवांवरून आपल्या पोटच्या लेंकराची अशी मीठमोहरी ओंवाळावी व नोकरांनीं मात्र तुझ्यासारखें माशा मारीत स्वस्थ बसावें! चल ऊठ. माझ्याबरोबर चालूं लाग. आपण त्या मंडळींचा शोध करूं."

पिराजीची मोहसंमूढ व दुःखार्त मनःस्थिति पालटण्याला एवढी जागृति पुरी पडली. तो आपल्या ह्या वेळपर्यंतच्या कर्तव्यहीनतेबद्दल शरमिंदा होऊन वीरसेनाबरोबर निघाला. त्यांना वाटेंतच त्यांचे आणखी तिघे साथीदार शतवीर भेटले. तेही या वेळीं अर्थातच घोंगडीबहाद्दर बनलेले होते. त्यांनीं खंडोबाच्या देवालयाचा तपास लावून आणला होता, त्यामुळें तेथें जाणें त्या पांचहीजणांना सुलभ गेलें. ते ऐन वेळीं तेथें जाऊन पोंचले. इस्माइलच्या साथीदारांचा इतका वेळ धुव्वा उडविला तो त्यांनींच, व आतां 'नाथा' अशी हांक मारली तीही पिराजीनेंच मारली. यशोदा, नाथाजी दरवाजाच्या बाजूला विव्हळत

पडलेला पिलाजी ह्या तिघांनींही पिराजीला पाहिलें त्याबरोबर त्यांना आनंद झाला. नाथाजी यशोदेची मिठी सोडवीत जणुं काय आपणाला आतांपर्यंत कांहींच त्रास झाला नाहीं अशा उमलत्या उमेदीनें हंसत हंसत तिला म्हणाला, "यशोदे! पहा! परमेश्वर आपला पाठीराखा आहे कीं नाहीं?"

"परमेश्वरा! तुझी लीला अगाध आहे!" असें म्हणून यशोदेनें बाजूला मुसलमानांनीं फेंकून दिलेल्या खंडोबाच्या मूर्तीला हात जोडले.

पिराजीला पाहून यशोदा, पिलाजी व नाथाजी यांना परमानंद वाटला. पण पिराजीला मात्र तो प्रसंग मरणप्राय दुःखदायक झाला. तो कपाळावर हात मारून घेऊन म्हणाला, "एकूण चंद्रसेनानें भाकीत केलें तेंच खरें ठरलें! यशोदे! स्वतः मरावें पण धर्मपत्नीचें पातिव्रत्य रक्षण करावें असा निर्वाणीचा निर्धार करून मी एथवर आलों तो हेंच पहाण्यासाठीं–जिच्यासाठीं मी मरायाला तयार झालों, तिनें ह्या देवालयासारख्या पवित्र जागीं अशा प्रसंगींदेखील आपल्या जाराच्या गळ्याला मिठी मारून पापाचा कळस केलेला पहाण्यासाठींच आलों! नशीब माझें!"

"पिराजी! पिराजी! असला घाणेरडा संशय तुला घेववला तरी कसा?" नाथाजी म्हणाला. पिलाजी व यशोदा यांनींही तसेच उद्गार काढले. पण पिराजी ते ऐकण्याला तेथें क्षणभर देखील न थांबतां हातांतील ढाल व तरवार तेथल्या तेथें टाकून निःशस्त्र स्थितींत भ्रमिष्टासारखा तडक् बाहेर गेला व इस्माईल वगैरे मुसलमान अजून निकरानें लढत होते त्यांच्यासमोर जाऊन उभा राहून म्हणाला, "मी तुमच्या स्वाधीन झालों आहें. मला ठार मारा; एवढी माझ्यावर दया करा!"

इस्माईल वगैरे मंडळी तर पिराजीच्या नाशासाठीं टपूनच बसलेली होती. त्यांनीं पिराजी स्वखुषीनें स्वाधीन होतोसा पाहतांच क्षणाचाही विलंब न लावतां त्याला कैद केलें. वीरसेन व दुसरे दोघे शतवीर देवालयाबाहेर इस्माइलच्या लोकांशीं शिकस्तीनें लढत होते; पण एकतर इस्माइलचे लोक संख्याबळानें जास्त असल्यानें त्यांची सरशी होती, तेव्हां त्यांनीं जिवावर उदार होऊन लढतां लढतां दोघां शतवीरांना चोहोंकडून घेरून लोळविलें. राहातां राहिला वीरसेन. तो अजूनही एकटाच हिंमतीनें लढत होता. तो एकटा अनेकांना भारी होता; इस्माइलसारख्या कैकांना लोळविण्याचें सामर्थ्य

त्याच्या अंगीं होतें; सारें खरें. पण पिराजीनें एकाएकीं त्याचा अवसानघात त्या केला. आतां त्यानें लढावयाचें तरी कोणासाठीं! समोर नाथाजी, पिलाजी व व्यासराव तर मरणोन्मुख स्थितींत पडलेले; शिवाय प्रत्यक्ष पिराजीनेंच यशोदेच्या वर्तनाविषयीं संशय घेतांच त्यांत कांहींच अर्थ नसावा असें कोणाला वाटेल! बरें; पिराजीनें तरी संशय घेतला तो आपल्या मतें सकारणच घेतला. नाथाजी व यशोदा यांना गळ्यांत गळा घालून बोलत असतांना त्यानें पाहिलें त्याबरोबर त्याला संशय ओघानेंच आला. चंद्रसेनही तेंच म्हणाला होता, व्यासरावाचीही तशीच समज झाली होती आणि प्रत्यक्ष दृश्य दिसलें तेंही तेंच! प्रसंग असा आणीबाणीचा, कोण जागतो व कोण मरतो याचा देखील नेम नाहीं; आणि देवालयासारखी पवित्र जागा! इतकी रणधुमाळी चालली होती ती यशोदेचें पातिव्रत्य रक्षण करण्यासाठीं. पण पिराजीच्या मतें यशोदा पतिव्रता कोठें होती! अशा आणीबाणीच्या वेळीं व अशा पवित्र स्थलीं, पुढच्या क्षणाला आपलें मरण ओढवणार अशी खात्री असतां देखील यशोदा व नाथाजी एकमेकांच्या गळ्याला मिठी मारून ह्या जगांतील अखेरचा व्यभिचारी शृंगार साजरा करावयाला लाजलीं नाहींत; अर्थात् यापुढें लढण्याचें, विजयी होण्याचें अथवा जगण्याचें देखील कांहींच कारण उरलें नाहीं असें पिराजीच्या मनानें घेतलें. यशोदा दुराचारी आहे याविषयीं त्याला आतां जरादेखील शंका उरली नाहीं. ती एकवार पातकी ठरली; आतां ती मरो, नाथाजीच्या गळ्यांत पडो कीं कोणा मुसलमानाच्या हातीं लागो. ती पवित्र नाहीं त्या अर्थीं तिच्यासाठीं लढण्यांत अर्थ नाहीं. बरें स्वतःचा जीव बचावण्यासाठीं लढावयाचें, तर जगून तरी अमक्यातमक्या व्यभिचारी बाईचा हा नामर्द नवरा अशी जगाकडून छीः थूः करून घेण्यासाठींच जगावयाचें कीं नाहीं! असल्या बेअब्रूत जगण्याइतका पिराजी कमअस्सल मराठा नव्हता. आतां काय रक्षावयाचें? पत्नीचें पातिव्रत्य कीं स्वतःचें प्राण, अशा चिंतानलांत होरपळत होरपळत पत्नीचें पातिव्रत्य स्वतःच्या प्राणांहून जास्त मोलाचें आहे असें ठरवून जो वीर 'मरेन पण पत्नीचें पातिव्रत्य राखीन' अशा निर्धारानें एथवर आला, त्याला त्याच्या मतानें पत्नीच्या पातिव्रत्याला अशी चूड लागलेली पाहून जगण्यांत गोडी कशी वाटावी!

पिराजी कैद झाला, त्याला सोडविण्यासाठीं वीरसेनानें लढण्याची शिकस्त केली. पण पिराजी जेथें भ्रमिष्ट बनून स्वखुषीनें कैद झाला, तिथें वीरसेनाचा

काय इलाज चालणार! तरी पण त्या वीरानें चांगलीच तरवार गाजविली व लढतां लढतां आपल्या दुसऱ्या दोघां साथीदारांप्रमाणें शतवीरांना शोभेशा शौर्यानें तो धारातीर्थी मेला!

पिराजी कैद झाल्यावर इतर मराठा शिपायांची अशी लांडगेतोड झाली व इस्माईल मात्र विजयश्रीनें शेफारून गेला. त्यानें देवालयांत प्रवेश करून यशोदेला प्रथम हस्तगत करून घेतली व खंडोबाची मूर्ति फोडून तोडून लाथांखालीं तुडवून त्याबरोबर नाथाजी व विलाजी यांच्या मस्तकांतही लत्ताप्रहार करण्याला कमी केलें नाहीं. हा अपमान त्या दोघांना असह्य झाला. पण त्याची परतफेड करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं नसल्यानें दुःखातिरेकानें ढळढळां आंसवें गाळण्यापलीकडे त्यांना कांहींच करतां येण्यासारखें नव्हतें. तेवढ्यांत यशोदेनें जवळची तरवार उचलून आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला. पण 'मेरी प्यारी! ऐसा बुरा काम मत करना' असें म्हणून इस्माइलनें चटकन् तिच्या हातांतील तरवार काढून घेतली. नाथाजीनें आपल्या अंगीं होतें नव्हतें तेवढें बळ मनगटांत एकवटून यशोदेला ठार करण्यासाठीं तरवारीला हात घातला; पण तितक्यांत इस्माइलनें तरवार पायानें दूर लोटून पुन्हा एकदां नाथाजीच्या मस्तकांत जोराचा लत्ताप्रहार केला व यशोदेला उचलून घेऊन तो बाहेर आला. यशोदा जातां जातां नाथाजीकडे पाहून कळवळून उद्गारली, "नाथा! तूं मला वेळींच ठार केलें नाहींस म्हणून ही विटंबना माझ्या कपाळीं आली. चांडाळा! तूं किडे पडून मरशील व मेल्यावर नरकांत जाशील!"

बंदिवान् पिराजी बाहेरून हा सर्व प्रकार पहात होता. यशोदेच्या तोंडचे शब्द ऐकून त्याचा तिच्याविषयींचा संशय मात्र जास्त दुणावला. 'मरावयाचें तें देखील नाथाजीच्याच हातून मरावयाचें, असा जो यशोदेचा निर्धार झाला होता, तो तिचें त्याच्याशीं तसेंच नाजुक नातें असल्याशिवाय उगाच झाला असेल! हर! हर!' असें म्हणून त्यानें लाजेनें आपल्या दोन्ही हातांनीं आपलें तोंड झांकून घेतलें.

यशोदेला इस्माइलनें बाहेर आणीतों तिची कल्पना होती कीं पिराजी मेला. पण बाहेर येऊन पहाते तों पिराजी जिवंत आहे; तो मुसलमानांचा कैदी होऊन रडत समोर उभा आहे! त्याला पहातांच यशोदा रडत रडत बेभानपणें पिराजीशीं असलेलें पत्नीचें नातें विसरून बाळपणींचें बरोबरीचें नातें आठवून

उद्गारली, " नामर्दा ! मला मुसलमानांच्या हातीं सांपडलेली पहाण्यासाठींच जिवंत राहिलास वाटतें ! त्यापेक्षां माझी सुटका करतां करतां नाथाजी—पिलाजी-प्रमाणें मेला कां नाहींस ? फुकट रे फुकट मी तुझ्या नांवानें कपाळाला कुंकू लावून बाटलें ! "

यशोदेनें आवेशाच्या भरांत आपल्या कपाळींचें कुंकू पुसलें. पण पिराजीनें तिच्याकडे ढुंकूनदेखील पाहिलें नाहीं. मग त्याला काय वाटलें कोण जाणे ! हा विचित्र देखावा पाहून इस्माईलला व इतर मुसलमानांना मात्र निर्लज्जपणें खद्खदां हंसावयाला फावलें. लगेच प्रथम यशोदेचे व मग पिराजीचे हात घट्ट बांधण्यांत आले. यशोदेला इस्माइलनें उचलून खांद्यावर घेतली व तो पुढें चालूं लागला. दुसरे दोघे मुसलमानही त्याच्या मागोमाग पिराजीसह चालूं लागले. यशोदा सर्वस्वी पराधीन झाल्यामुळें ढसढसां रडत होती. पण देवालाही तिची करुणा येईना, मग माणसांना—त्यांतून तिच्या जीवितसर्वस्वाचा सत्यनाश करण्यासाठीं टपून बसलेल्या अविंधांना करुणा कोठून येणार !

इस्माईल वगैरे मंडळी डोंगर उतरून पायथ्याशीं येते न येते तोंच कांहीं मुसलमान 'बाजीराव आपलें गाय-वासरूं घेऊन पळतो आहे' अशी तक्रार घेऊन आले; त्याबरोबर इस्माइलच्या मनानें घेतलें कीं, हा काफर बरा सांपडतो आहे, याला पकडावयाचें.

## दर्शन तेरावें

# अत्याचारांचा कडेलोट !

"हें काय ? ही चालत कां नाहीं ?" असें स्वतःशीं म्हणून बाजीरावानें आपल्या मांडीखालील घोड्याला जरा चुचकारून उभा केला व बरोबरची गाय इतका वेळ चांगली झपझप चालत होती ती एकाएकीं रेंगाळूं लागलेली पाहतांच तिची शेपटी पिरगळून तिला चालण्याचा प्रेमळ इषारा दिला; पण ती चालेनाच. ती चालेना म्हणून तिचें वांसरूंही चालेना. यशोदा व पिराजी वगैरे मंडळींचा शोध करतां करतां इस्माइलच्या हाताखालील कांहीं मुसलमान गुंड यशोदेच्या झोंपडीसमोरील गाय-वांसरावर तुटून पडतांना पाहून त्यानें त्यांच्याशीं झगडून मोठ्या शिकस्तीनें त्या मुक्या प्राण्यांची मुक्तता केली होती; तीच ही गाय! अखेर बाजीराव आपल्या घोड्यावरून खालीं उतरला व एका हातीं घोड्याची लगाम आणि दुसऱ्या हातीं गाईचें दावें धरून चालूं लागला, तरीही ती चालेना; तेव्हां बाजिरावानें वैतागून स्वतःशींच पण तिला उद्देशून उद्गार काढले, " जणुं काय मघांच्याप्रमाणें कसाईच तुझी मान कापावयाला येत आहेत."

बाजिरावाच्या तोंडचें वाक्य बोलून संपतें न संपतें तोंच समोरून त्याला कर्कश आवाज ऐकूं आला, " ओ देखो बदमाष काफिर भाग जाता है!"

हे शब्द ऐकून बाजिरावानें ओळखलें कीं पुन्हा पूर्वींचे तेच मुसलमान आपल्या राशीला आले; त्याबरोबर त्याचें मन कच खाऊं लागलें. इतका वेळ गाईचें पाऊल कां उचलत नव्हतें याची त्याला आतां अटकळ करतां आली. गाय हें जनावर खरें; पण जनावरालादेखील आपला जीव प्यारा असतोच. शिवाय देश-काल-परिस्थितीचा परिणाम जसा माणसांवर होतो, तसाच जनावरांवरही कांहीं अंशीं होतोच. जनावरांना माणसांसारखी वाचा नसते, पण त्यांचीं घ्राणेंद्रियें व श्रवणेंद्रियें माणसांपेक्षां फार तीव्र असतात. शिवाय तेव्हां मुसलमानांनीं सर्रास गो-ब्राह्मणांचा इतका अमानुष छळ करावा कीं, त्यामुळें मुसलमान आपली मान कापणारा अरेराव शत्रु आहे हें तेव्हांच्या गरीब गाईनादेखील कळत असे. वाघ जनावरांना मारून खातो; त्याची फेरी

जवळपास आली, कीं तो माणसांच्या अवलोकनांत येण्यापूर्वीच जनावरांना त्याचा वास येतो व तीं अनेकदां प्राणभयानें हंबरूं लागतात. तशीच स्थिति औरंगजेबाच्या मुसलमानी अमलांत असहाय व दीन बनलेल्या गाईची होती. एक तर गोमांस हें मुसलमानांचें अन्न, व दुसरें, गोमाता हें हिंदूंचें दैवत, त्या गोमातेची मान अमानुषपणें चरचर कापण्यांत आपला मोठा धर्म-विजय आहे ही मुसलमानांची भावना; असा मुसलमानांच्या हातचा दुधारी सुरा नेहमीं गोमातेच्या मानेवर लटकत असावयाचा. त्याचा घाव केव्हां पडेल व आपली मान केव्हां तुटेल याचा बिचाऱ्या गाईंना काय भरंवसा ! त्यामुळें मुसलमान हा शब्द ऐकतांच त्यांनीं बिचकावें व प्रत्यक्ष मुसलमान पाहातांच अथवा त्यांची नुसती चाहूल लागतांच आपला मरणकाळ समीप आला ह्या भयानें त्यांची गाळण उडून जावी.

बाजिरावानें गाईला उद्देशून 'जणुं काय मघांच्याप्रमाणें कसाईच तुझी मान कापावयाला येत आहेत' हे शब्द उच्चारावयाला व खरोखर तिची मान कापण्यासाठीं केव्हांपासून हपापलेले मुसलमान चवताळून पूर्वीच्याहूनही मोठ्या जमावानें पुढें यावयाला एक गांठ पडली. ते जरा जास्त जवळ येतांच बाजिरावानें इस्माइलला व त्याच्या खांद्यावर असलेल्या यशोदेला ओळखलें. त्याच्या मागोमाग पिराजीही बद्धकर असा चालत असलेला त्यानें पाहिला. थोड्या वेळापूर्वीं पराभूत पावून पळत सुटलेले मुसलमान इस्माइलपाशीं बोभाटा घेऊन गेले व बाजीराव एकटा आहे हें कळतांच त्याला घेरण्यासाठीं आतुर झालेल्या इस्माइलनें ती संधि वांया दवडली नाहीं. तो तसाच बरो-बरच्या इतर मुसलमानांसह चाल करून येत होता. आतां मात्र यांच्यापुढें आपला टिकाव लागणार नाहीं अशी बाजीरावाची बालंबाल खात्री झाली. पहिल्या क्षणीं त्याच्या मनांत आलें कीं, आपण आपल्या घोड्यावर स्वार होऊन आपल्या सैन्यांत पळाल्यास आपला बचाव होईल. पण समोर गाय व तिचें वांसरूं पहातांच त्याला त्यांना सोडून जाण्याचा धीर होईना. बरें, त्यांचें रक्षण आपल्या हातून होईल असाही विश्वास त्याला वाटेना. आतां काय करावें व कसें करावें याचा विचार करण्यालाही त्याला अवसर मिळाला नाहीं. तो एकटा गाय-वांसरासह चालला आहे असें पहातांच आधींच पूर्वींच्या बाचाबाचीमुळें संतप्त झालेल्या मुसलमानांचा संताप बेतालपणानें

चाढूं लागला. जितका आपला प्रतिस्पर्धी दुबळा असेल, तितकें त्याला जास्त गांजण्यांत मुसलमानांच्या शौर्याला पालवी फुटावयाची, व विरोध जितक्या प्रमाणांत होईल तितक्या प्रमाणांत त्यांनीं माघार घ्यावयाची. हा जो आरंभशूर मुसलमानांचा सामान्य मनोवृत्तिविशेष, त्याला हे मुसलमानही अपवाद नव्हते. शत्रु चालून आला व आपण एकाकी, ह्यामुळें बाजीराव गोंधळल्यासारखा झाला व तो गोंधळल्यासारखा झालेला पाहून त्याच्या शत्रूंच्या आरंभशूरतेला उधानाची भरती येऊं लागली. त्यांनीं त्याला चोहों बाजूंनीं घेरलें व त्याच्यावर तरवारी रोंखून निःशस्त्र व्हावयाला भाग पाडलें. कांहीं मुसलमान चेवले होते ते तेथल्या तेथेंच त्याला नेस्तनाबूत करण्याला उतावळे झाले होते. पण इस्माइलनें त्यांना आंवरलें. कारण, बाजीराव म्हणजे कोणी सामान्य माणसाचा मुलगा नव्हता. शिवाय ते पडले चंद्रसेनाचे सैनिक. त्यांनीं हा भयंकर गुन्हा केला असता तर त्या गुन्हेगारीचें खापर चंद्रसेनाच्या माथीं फुटून केवढा हाःहाःकार उडाला असता ! मग त्याला आणि त्याच्या वतीनें इतर मराठा सरदारांना बादशहाच्या पक्षाला वश करून घ्यावयाचें व ह्या कामगिरीबद्दल बादशहाकडून एखाद्या सुभ्याची सुभेदारी पटकावावयाची ह्या इस्माइलच्या बेतांवर पाणी पडलें असतें.

पण स्वतः जिवंत राहून तो भयानक देखावा देखत डोळां पाहाण्याचें जेव्हां बाजिरावाच्या कपाळीं आलें, तेव्हां तो पहाण्यापेक्षां स्वतःला एथल्या एथें मरण आलें असतें तरी बरें झालें असतें असें त्याला वाटलें. त्यानें थोड्या वेळापूर्वीं चिडविलेल्या मुसलमानांपैकीं एकानें आपली तलवार सरसावली आणि— यापूर्वींच आपल्या काळांना पहातांच ती गाय व तिचें वांसरूं प्राणभयानें अर्धमेलीं होऊन थरथर कांपत होतीं, तशांत ते जवळ येतांच तर गाय व तिच्या अंगाला अंग भिडवून तिचें वांसरूं मोठमोठ्यानें हंबरून आपल्या भाषेंत भगवंताला आळवूं लागलीं. पण त्या अभागी जीवांचा धावा भगवंताच्या कानांपर्यंत जाऊन पोंचला नाहीं; आणि त्या अविंधाच्या तरवारीच्या एका घावासरशी त्या पाडसाची मान धडावेगळी–शिव शिव ! बाजिरावाला तो अत्याचार पहावेना. त्यानें डोळे मिटून घेतले. पण बाह्यदृष्टि मिटून घेतां आली तरी अंतर्दृष्टि थोडीच मिटून घेतां येते ! शिवाय त्यानें डोळे मिटले; पण दर्शनेंद्रियाची ज्ञानशक्ति श्रवणेंद्रियाच्या ज्ञानशक्तीच्या आश्रयाला

जाऊन उभी राहतांच त्यानें जरी त्या अनाथ जीवांचा अंतकाळींचा हंबरडा ऐकूं येऊं नये म्हणून कानांत बोटें घातलीं, तरी गोमातेचा हंबरडा तीं सर्व बंधनें तोडून त्याला ऐकूं गेलाच ! गोमातेनें एकदांच हंबरडा फोडला व तो क्षणोक्षणीं क्षीण होऊन अखेर निष्कंप झाला. पण बाजिरावाच्या अंतःकरणाला त्या हंबरड्याचे एवढे जबरदस्त आघात बसले कीं, त्या आघातांच्या असह्यतेंत त्याला एकवार–फक्त एकवार तरी डोळे उघडावे लागलेच. पण त्याच्या उघड्या डोळ्यांना काय दिसलें ?—शिव शिव ! गोमातेला परमदैवत मानणारा कोणता रक्ताचा अस्सल हिंदु शांत मनानें त्या अत्याचाराचा उच्चार करील !

" तेरी मा मरगया ! " इस्माईल बाजीरावाकडे पाहात व्याजोक्तीनें म्हणाला.

बाजीराव यावर कांहीं बोलला नाहीं. तो काय बोलणार ! पिराजी व यशोदा त्या तांड्यांत होतीं, तीं हा देखावा पाहून मनांतल्या मनांत किती चेवलीं असतील. पण उपयोग काय ! तीं दोघेंही बंदिवान् होतीं. त्यांनीं बाजिरावा-कडे व बाजिरावानें त्यांच्याकडे जेव्हां पाहिलें, तेव्हां त्या तिघांनाही कळून चुकलें कीं, आपला सर्वस्वी घात झाला. पिराजी एवढा स्वामिनिष्ठ सेवक; पण डोळ्यांदेखत आपला स्वामिपुत्र कैद होतांना त्याला निमूटपणें पहात रहावें लागलें. तसेंच बाजीराव इतकी यातायात करीत होता तो पिराजी व यशोदा यांचें रक्षण करण्यासाठीं; पण तीं दोघेंही आपल्या पूर्वींच शत्रूच्या स्वाधीन झालेलीं पाहाण्याचें त्याच्या कपाळीं आलें.

पण त्यांचा कर्मभोग एवढ्यावरच संपला नव्हता. इस्माईल कांहीं मुसल-मानांना त्या गाय-वासरांच्या मांसाची रुचकर मेजवानी तयार करावयाला सांगून बाकीच्या साथीदारांसह चंद्रसेनाकडे जावयाला निघाला, तेव्हां त्यानें मुद्दाम आपल्या लोकांना बाजीराव व पिराजी यांच्या डाव्या-उजव्या दंडांना दोरखंडें बांधून आपल्याबरोबर चालविण्याला सांगितलें. यशोदेला मात्र आपल्या खांद्यावरून खालीं न उतरतां तो तेथल्या तेथें सांडलेल्या गोमातेच्या रक्तांत हात भिजवून तिच्या ओंठांना फांसून सैतानी हास्य करीत म्हणाला, "प्यारी ! तुम् तो अभी मुसलमान हो गयी ! "

यशोदेचे हातपाय घट्ट बांधलेले असल्यानें इस्माइलाचा प्रतिकार करण्याला किंवा आपल्या ओंठांना त्या चांडाळानें बळेंच फांसलेलें रक्त पुसण्यालाही ती

सर्वस्वी असमर्थ होती. इस्माइलचा डोळा मुख्यतः यशोदेवर होता, म्हणून तिची एकटीची अशी विटंबना करण्यांतच त्याला धन्यता वाटली.

इस्माइलनें यशोदेची अशी विटंबना केली, तरी बाजीराव व पिराजी बद्धकर असल्यानें त्यांना त्या विटंबनेचा मुळींच प्रतिकार करतां आला नाहीं. पण त्यांचा कोपाग्नि आंतल्या आंत इतका अनावर भडकला होता कीं, ज्यांना त्यांचा स्वधर्माभिमान व स्वदेशाभिमान माहीत होता, अशा कोणीं त्यांना त्या स्थितींत पाहिलें असतें तर ह्या अग्नीला जरा मोकळेपणाचा वारा लागतांच हा एकदम पेट घेऊन आपल्या शत्रूंना केव्हां जाळून भस्मसात् करून टाकील याचा नेम नाहीं असेंच कोणालाही वाटलें असतें. पण क्षणिक विजयानें बेहोष झालेल्या त्या माजोरी सैतानांना त्याची जाणीव कशी असावी!

## दर्शन चौदावें

## तळघरांत

"हें काय ? आम्ही कोठें आहों ?" नाथाजीनें सभोंवार पहात उद्गार काढले. पण त्याला उत्तर मुळींच मिळालें नाहीं. अंमळशानें पिलाजीही शुद्धीवर आला. व्यासरावही तेथेंच एका खाटेवर पडून होता. पण तो अजून बेशुद्ध स्थितींतच होता. पण दोघेही आजूबाजूचा देखावा पाहून एकदम चकित झाले. तो देखावा चकित करण्यासारखाच होता. नाथाजी व पिलाजी आतां जेथें होते तें एक विशाल तळघर होतें. तेथें एका बाजूला एक धुनी पेटत होती व त्या धुनीसमोर तीन दर्भासनें मांडलेलीं होतीं. तेथें बाहेरून प्रकाश येण्याजोग्या उघड्या वाटा जरी मुळींच दिसत नव्हत्या तरी तेथें प्रकाश मात्र पुरेसा होता व हवाही पुरेशी खेळत होती एवढें खरें. प्रकाशमार्गाची रचना अशा खुबीनें करण्यांत आली होती कीं, आरपार कांहीं दिसूं नये पण सूर्याच्या किरणांना व हवेच्या लाटांना मात्र आंत वक्रगतीनें अचूक प्रवेश करतां यावा. मग हें अजब रचनाकौशल्य मानवांचें असो कीं निसर्गाचें असो. ज्याप्रमाणें प्रकाशमार्गाचा व वायु-मार्गाचा पत्ता लागण्यासारखा नव्हता, त्याप्रमाणेंच माणसांनीं आंत ये-जा कोणत्या मार्गानें करावयाची याचाही पत्ता लागण्यासारखा नव्हता. तळघराच्या सभोंवार दिंडीदरवाज्यावजा चार खिंडारें होतीं. पण यांतला कोणता रस्ता खरा व कोणता खोटा हें कोणीं कसें ओळखावें ! त्यांतूनही पिलाजी व नाथाजी यांनीं आपल्या मर्दुमकीनुसार अशा बिकट जाग्यांतूनही मार्ग शोधण्याला कमी केलें नसतें. पण एकतर ते खंडोबाच्या देवालयांत झालेल्या तुंबळ रणसंगरांत भयंकर जखमी झाले होते, व दुसरें, तशा स्थितींतही धडपड करावयाचें त्यांनीं मनांत आणलें असतें तरी त्यांना तें शक्य नव्हतें. ज्या सुंभानें विणलेल्या बांबूच्या बाजांवर घोंगड्या आंथरून त्यांवर त्यांना निज-विण्यांत आलें होतें, त्या बाजांनाच त्यांचे हात, पाय व मान हे अवयव इतके जखडून बांधून ठेवण्यांत आले होते कीं, त्यांना जरादेखील हालचाल करतां येऊं नये.

अशी आपली अवस्था कोणीं केली हें पिलाजी व नाथाजी ह्या दोघांनाही कळेना, व यापुढें आणखी कोणते भोग आपल्या कपाळीं यावयाचे आहेत याचीही अटकळ करतां येईना. पण कोणींही आपणाला इथें आणलें असलें तरी आपल्या कल्याणासाठीं आणलें आहे अशी आशा कारण्याला मात्र त्यांना जागा होती. कारण त्यांच्या शरीरावरील जखमा त्यांच्या बेशुद्ध स्थितींतच कोणीतरी औषध लावून व्यवस्थितपणें बांधल्या होत्या. त्यावरून आपणाला बाजांशीं जखडून बांधण्यांतदेखील आपणांला येथें आणणाऱ्या माणसाचा कांहीं दुष्ट हेतु नसावा असें मानण्याला त्यांना जागा होती.

पण आपणाला येथें आणलें कोणीं व ही जागा तरी कोणती, याचा मात्र त्यांना कांहीं केल्या उलगडा होईना. सारा दिवस उपासमार झाल्यामुळें व प्यावयाला पाणीदेखील न मिळाल्यामुळें त्यांचे प्राण कासावीस होत होते. जरा पलीकडे एक पाण्याचें मडकें भरलेलें दिसत होतें. पण त्या मडक्यांतील पाणी आणून त्यांच्या तोंडाला लावावें कोणीं ! अशा चिंतेंत बराच वेळ गेला. सभोंवारच्या झरोक्यांतून आंत येणारा प्रकाश मंद मंद होऊं लागला, व आणखी कांहीं वेळानें तर प्रकाश जवळजवळ येईनासाच झाला. आतां सारी रात्र ह्या भयानक जागीं अन्नपाण्याशिवाय कंठावी लागते कीं काय अशी दारुण चिंता त्या दोघांच्याही मनांत बलवत्तर होऊं लागली. अखेर अखेर त्या जागीं पूर्ण अंधार पडूं लागतांच तर त्यांना वाटूं लागलें कीं, अशाच यातनांत तहानभुकेनें तडफडत मरावयाचेंच जर आपल्या कपाळीं असलें, तर ज्या कोणीं आपल्या जखमा वगैरे बांधण्याचे श्रम घेतले, त्यांनीं आम्हांला तेथल्या तेथेंच ठार कां मारलें नाहीं ?

अशा दारुण चिंतानलांत नाथाजी व पिलाजी हे दोघे होरपळत असतां एकाएकीं एका खिडारांतून कोणी तरी एक बुरखेवाली व्यक्ति एका हातांत एक मोठी लोखंडी समई व दुसऱ्या हातांत एक मिणमिण तेवणारी दिवली घेऊन तळघरांतील त्या दालनाच्या मध्यभागीं आली त्या व्यक्तीनें समई खालीं ठेवली व जवळच्या कोनाड्यांतील वातींच्या जुडग्यांतून वाती घेऊन त्या समयींत घालून त्याच कोनाड्यांत मातीचें गाडगें तेलानें भरलेलें होतें त्यांतील तेल त्या समईंत ओतून दिवलीनें समई पेटविली.

दिवा लावून झाल्यावर ती व्यक्ति आंत जाऊं लागतांच नाथाजी तिला

ऐकूं जाईल अशा बेतानें म्हणाला, "तहानेनें माझे प्राण कासावीस झाले आहेत; मला घोटभर पाणी पाहिजे."

पिलाजीनेंही तशीच विनवणी केली. ती ऐकून ती व्यक्ति क्षणभर थबकून विचार करून म्हणाली, "तुम्हांला कुपथ्य होईल म्हणून अन्नपाणी कांहीं द्यावयाचें नाहीं असें गुरुजींनीं सांगितलें आहे. ते आतां इतक्यांतच देवाची धूपारती आटोपून तुमच्या समाचारासाठीं येतील; त्यांना काय सांगावयाचें तें सांगा."

ती व्यक्ति एवढें बोलून आल्या वाटेनें आंत निघून गेल्यावर नाथाजी व पिलाजी यांना पाणी प्यावयाला न मिळाल्यामुळें जरी दुःख वाटलें तरी येथें माणसें आहेत, व येथें कोणी एक साधुपुरुष असून तो आपली काळजी घेत आहे असें कळतांच त्यांना बरेंच समाधानही वाटलें. आतां हा साधु व बुरखेवाली व्यक्ति हीं माणसें कोण असावीं याविषयीं एक नवी जिज्ञासा त्यांच्या मनांत उत्पन्न झाली. एखाद्याची जिज्ञासा जितकी प्रबल तितकी ती तर्कांच्या वळणावळणानें जिज्ञासा-विषयाचा परिचय करून घेण्यासाठीं धडपडत असते. तो मार्ग मग किती अवघड कां असेना! तर्कांचा एकेक टप्पा गांठीत त्या मार्गाचें आक्रमण करण्यांत जिज्ञासु जीवाला कधींच कंटाळा यावयाचा नाहीं. नाथाजी व पिलाजी यांचें-ही असेंच झालें. ज्याअर्थीं समोर धुनी पेटलेली दिसते आहे व आपल्याला कुपथ्य होऊं नये म्हणून इतकी काळजी ज्याअर्थीं हे कोणी गुरुजी घेत आहेत, त्याअर्थीं ते फार थोर पुरुष असावे; तसेंच दिवा लावणाऱ्या व्यक्तीनें ज्या-अर्थीं बुरखा घेतला होता, व तिचा आवाजही ज्याअर्थीं मंजुळ निघाला, त्याअर्थीं ती स्त्री असली पाहिजे असा दोघांचाही तर्क झाला. नाथाजीचा तर्क तर याच्याही पुढें चालला. ती व्यक्ति दालनांत आली व दिवा लावूं लागली तेव्हां तिचे कोमल पाय व हात पाहून तिच्याशीं बोलण्यापूर्वींच ती स्त्री असावी असा तर्क त्यानें केला होता आणि ती बोलली तेव्हां तर त्याच्या अचपळ मनानें एथवर धाव घेतली कीं, ही आपली कमळजा किंवा कमळा तर नसेल! त्यानें आपली ही शंका पिलाजीपाशीं हलकेच बोलून दाखविली तेव्हां ती व्यक्ति कमळजा असावी असे उद्गार काढले, व पिलाजी जरी त्यावर कांहीं बोलला नाहीं, तरी त्याला वाटलें कीं, ही कमळा असावी. दोघांचाही असा भिन्न भिन्न समज होण्याचें कारण कमळजा व कमळा ह्या

दोघीही जणुं काय जुळ्या बहिणी असाव्या तशासारख्या रूपारंगाच्या होत्या. बाह्यसौंदर्याची ही गोष्ट झाली, अंतःसौंदर्यांत मात्र दोघींमध्यें थोडें अंतर होतें. पण त्या अंतराला रुचिभिन्नतेपेक्षां जास्त महत्त्व नव्हतें. दोघीही सदाचारी व सद्विचारी होत्या, पण कमळजेच्या ठायीं सोज्ज्वलता आणि शालीनता यांचें प्राधान्य होतें व कमळेच्या ठायीं जाज्वल्यता आणि सडेतोड-पणा यांचें प्राधान्य होतें. आतां जेथें त्या व्यक्तीचें अवगुंठनाच्छादित मुख-मंडलदेखील दिसलें नाहीं, तेथें नाथाजीला किंवा पिराजीला तिच्या एका ओझरत्या शब्दावरून अमकीच ती अशी खात्री कशी पटावी! पण हें मन! हें मन कोणत्या वस्तूंत केव्हां आपल्या आवडत्या वस्तूचें प्रतिबिंब पाहील याचा काय नेम सांगावा! त्यांतूनही जोंवर आवडत्या वस्तूच्या प्राप्ती-विषयीं आशा नसते तोंवर विरही मन कसाबसा आपल्या मनाचा विरंगुळा करूं शकतें. पण तीच आशा उत्पन्न झाली कीं, त्या आशावारूवर बसून मन इतकें सैरावैरा पळूं लागतें कीं वेगवान् वाऱ्यालादेखील त्याच्यासमोर हार खावी लागेल! पिलाजी व नाथाजी यांचीही आज थेट अशीच अवस्था झाली होती. इस्माईल वगैरे मंडळींनीं आपले कमळजा व कमळा यांना पळविल्याबद्दलचे बेत ओकून टाकीपर्यंत त्या दोघांची अशीच कल्पना होती कीं, कमळजा व कमळा ह्या एव्हांना कोणा दुष्ट अविंधांच्या अधमपणाला बळी पडून त्यांच्या बायका तरी शोभत असतील किंवा त्यांच्या अधमपणा-समोर मान वांकाविण्याचें नाकबूल करून नानापरींच्या यातना भोगतांना मरून तरी गेल्या असतील. त्या पुन्हा आपणांला कसल्या भेटतात! पण त्या दोघीही शत्रूंच्या हातांवर तुरी देऊन निसटल्या असें कळतांच परमेश्वरा-ची कृपा झाली तर त्या आज ना उद्यां आपणाला भेटणें अशक्य नाहीं असें त्या दोघांनाही वाटूं लागलें. आशावादानें एवढी मनोभूमिका तयार केल्यावर जें ध्यानीं तेंच मनीं व तेंच स्वप्नीं या न्यायानें त्या तळघरासारख्या अज्ञात जागीं अज्ञात व ओझरती ओळख देणारी व्यक्ति म्हणजे आपली आवडती कमळजा अथवा कमळाच असावी असें नाथाजी व पिलाजी यांना वाटल्यास नवल नाहीं.

वास्तविक ती कमळजा असती तर नाथाजीची प्रियकरीण व पिलाजीची बहीण म्हणून, किंवा कमळा असती तर पिलाजीची प्रियकरीण व नाथाजीची

बहीण म्हणून, दोघांनाही प्रिय वाटली असती. त्या दोघांही बहीण-भावंडांचें एकमेकांवर कमी अथवा कृत्रिम प्रेम होतें असें मुळींच नाहीं. पण निर्हेतुक स्वर्गीय प्रेमाच्या कविकल्पनामय भराऱ्या प्रत्यक्षांत फारशा जमेला धरावयाच्या नसतात, निदान ह्या तशा जमेला धरतां येत नसतात, हा व्यावहारिक सिद्धांत प्रमाण मानून बोलावयाचें तर त्या अवगुंठित व्यक्तीला पाहून नाथाजीला ती कमळजा असावीसें वाटलें व पिलाजीला ती कमळा असावीसें वाटलें, यांत वावगें किंवा निदान अनैसर्गिक असें कांहीं नव्हतें.

पिलाजी व नाथाजी ह्यांना त्या अज्ञात व्यक्तीविषयीं 'ही आपली प्रियकरीण असेल का' अशी क्षणांत आशा वाटावी व लगेच दुसऱ्या क्षणाला त्या आशेच्या पाठीला पाठ लावून निराशा जन्माला यावी, 'छे ! असें कसें असूं शकेल ! ती जर कमळजा अथवा कमळा असती तर आपणाला ओळखून आपणाशीं मनमोकळेपणानें बोलती नसती का ? बरें; आपणांला तिनें ओळखलें नाहीं म्हणावें तर तोंडावरचा बुरखा जरा दूर करून आमच्याकडे ती निरखून तरी खास पहाती असती'.

अशा निराशेंत पिलाजी व नाथाजी हे दोघेही गुरफटले जातात न जातात तोंच एक साधुपुरुष ज्या खिंडारांतून ती स्त्री व्यक्ति आंत गेली होती त्याच खिंडारातून आंत आला. त्याची ती पिळदार व तेजःपुंज अंगकांति, ती पाणीदार नजर, ती भगवी कफनी, ते सर्वांगावर उठविलेले भस्माचे व गोपीचंदनाचे पट्टे व त्रिपुंड्र, त्या गळ्यांत व मनगटांत रुळणाऱ्या रुद्राक्षांच्या माळा, असा वेश पाहून हाच तो साधु असावा अशी नाथाजी व पिलाजी यांची खात्री झाली. पण दुसऱ्या क्षणाला त्यांना वाटलें कीं, हा कोणी घरभेद्या साधुत्वाचें ढोंग पांघरून हिंदूंना बाटविण्यासाठीं तर अशा गुप्त जागीं वास्तव्य करीत नसेल !

औरंगजेब बादशहाच्या अमदानींत राज्यांतील सर्व रयतेला बाटविण्याच्या इराद्यानें राजसत्तेचा वरवंटा हिंदुसमाजावरून सर्रास फिरत असतांना त्याच राजसत्तेच्या अप्रत्यक्ष प्रोत्साहनानें किंवा ज्याअर्थीं राजा कडवा मुसलमान व कट्टा हिंदुद्वेष्टा आहे त्याअर्थीं त्याच्या अमदानींत आपण हिंदूंवर कसाही जुलूम केला तरी तो चालण्यासारखा आहे असा मुसलमान धर्मठांना व असमंजस गुंडांना विश्वास वाटत असल्याकारणानें—जो मुसलमान उठावा, त्यानें कोणी फकीर तर कोणी हकीम तर कोणी आणखी कांहीं बनून

खुशाल हिंदूंच्या देशांत हिंडून हिंदु नर-नारींना परोपरीनें बाटविण्याचा सपाटा सुरू ठेवला होता. ह्या बाटवाबाटवीचे धागेदोरे खास बादशाही अंमलाबाहेर महाराष्ट्रांतही ठिकठिकाणीं गुप्तपणें पसरले होते. शाहूमहाराज हे जन्मानें व जातीनें मराठे असले तरी त्यांचें सारें बाळपण मुसलमानी रीतिरिवाजांत गेलें असल्यानें ते मनानें मुसलमान असले पाहिजेत व त्यांना स्वतंत्र हिंदवीस्वराज्यापेक्षां बादशहातीविषयींच जास्त अभिमान वाटत असला पाहिजे असा सर्वसाधारण मुसलमानसमाजाचा समज होता; शिवाय देशाभिमान—धर्माभिमान—जात्यभिमानशून्य पण पराक्रमी असे चंद्रसेन जाधव, सर्जेराव घाटगे, रंभाजी निंबाळकर वगैरे मराठशाहीच्या अस्तनींतील निखारेसे शोभणारे अनेक खलपुरुष, फार दूर कशाला, ताराबाईदेखील स्वार्थांध बनून शाहूमहाराजांचा मोड करण्यासाठीं प्रसंगोपात्त मुसलमानांशीं संगनमत करण्याला तेव्हां तयार असल्यानें मुसलमानांना मराठमुलखीं येऊन कोंपरखळ्या मारण्याला आयतेंच फावे.

असे किती मुसलमान कोणत्या वेशानें व कोणत्या मिषानें मराठशाहींत आपल्या धर्मप्रसाराचें जाळें पसरीत आहेत याची अचूक अटकळ तेव्हां कोणालाच नव्हती. अशांपैकींच एक ढोंगी फकीर सातार्‍यांत आला व कमळजा आणि कमळा यांना फुसलावून घेऊन गेला, आणि त्याच्या पुढारीपणाखालींच चंद्रसेनानें शाहूमहाराजांचा राजवाडा सुरुंग लावून जमीनदोस्त करण्याचा राक्षसी डाव रचिला होता, हें कारस्थान पिलाजी व नाथाजी यांना नुक्तेंच कळून आल्यानें आतां त्यांच्यासमोर आलेला साधु हा त्यांपैकींच कोणीतरी नसेल ना, अशी शंका पहिल्या प्रथमच त्यांच्या मनांत आली. ते दोघेही साशंक मुद्रेनें त्या साधूच्या एकंदर हालचालींकडे पहात होते.

त्या साधूनें तेथें येतांच प्रथम कोंपर्‍यांतील एक परळ पुढें घेऊन हातांतून आणलेल्या कमंडलूमधील पाण्यानें ओंजळी भरून उभ्या उभ्याच 'श्री भार्गवराम! कृपा करा!' 'श्री भार्गवस्वामी! कृपा करा!' 'श्री समर्थ! कृपा करा!' असें म्हणून तीन अर्घ्यें त्या परळांत सोडलीं व नंतर त्या परळांतील पाणी पुन्हा कमंडलूंत ओतून कोनाड्यांतील एक मातीचा वाडगा घेऊन तो प्रथम व्यासरावाच्या बाजेपाशीं गेला.

थोडा वेळ तो साधु बाजेपाशीं उभा राहिला. पण व्यासरावानें त्याच्या-

कडे डोळा उघडून पाहिलें नाहीं किंवा कांहीं विशेष हालचालही केली नाहीं. अखेर त्यानें हांक मारून विचारलें, " तुला अजून आराम पडत नाहीं का ? "

तरीही व्यासराव कांहीं बोलेना. तो शुद्धीवरच नव्हता तर बोलणार कोठून ? अखेर त्या साधूनें आपल्या कमंडलूंत हात बुडवून व्यासरावाच्या डोळ्यांना पाणी लावलें व चार थेंब त्याच्या तोंडांत घातले. नंतर तो नाथाजी व पिलाजी यांच्यापाशीं आला व विचारूं लागला, " तुम्हांला प्यावयाला पाणी पाहिजे आहे ना ? "

साधूच्या त्या प्रेमळ परामर्शानें पिलाजी व नाथाजी यांच्या मनांतील त्याच्याविषयींच्या शंका-कुशंका बऱ्याच मावळल्या, व विश्वास वाटूं लागला. दोघांनींही साधूच्या प्रश्नाला होकारार्थी उत्तर दिलें.

साधूनें तो ज्या खिडींतून बाहेर आला होता त्या खिडीच्या तोंडाशीं जाऊन हांक मारली, " ऋद्धि ! "

" जी ! " आंतून हांकेला उत्तर मिळालें.

" बाहेर एक कटोरा भरून पाणी आण पाहूं ! " साधु म्हणाला.

नाथाजी व पिलाजी यांच्या कानांना हें नांव परकें वाटलें. त्यांच्या अपेक्षे-प्रमाणें ती कमळजाही नव्हती व कमळाही नव्हती; ती ऋद्धि होती. ते दोघेही बुचकळ्यांत पडले कीं, ही ऋद्धि कोण ?

दहा अंक मोजण्याच्या आंतच पूर्वोक्त अवगुंठित स्त्रीनें एक कटोरा बाहेर आणला व तो साधूच्या पुढ्यांत ठेवून ती पुन्हा आंत जाऊं लागली.

साधु म्हणाला, " हा माझ्यापुढें कशाला ठेवलास ? आपल्या पाहुण्यांना पाणी प्यावयाला पाहिजे आहे असें तूंच म्हणालीस ना, तें त्यांना नेऊन दे.

आणि हें पहा, त्यांना आजचा दिवस आंथरुणावरून हलूंद्यावयाचें नाहीं. यास्तव तूंच आपल्या हातानें हळूहळू त्यांना थोडथोडें पाणी पाज. पण अगोदर एक कर. तुला मीं तीन नांवांचा मंत्र शिकविला आहे ना, तो हातीं तुळशीपत्र घेऊन एकवार जपून तें तुळशीपत्र त्या पाण्यांत घाल व मग तें तीर्थ म्हणून त्यांना पाज; म्हणजे त्यांना उद्यांला आराम पडतो कीं नाहीं पहा."

लगेच ऋद्धि आंत गेली व थोड्याच वेळांत त्या साधूनें सांगितल्याप्रमाणें करून बाहेर आली. बाहेरील कोनाड्यांत एक करवंटी घांसून केलेली वाटी

होती, ती घेऊन तिनें तिच्यांतून प्रथम नाथाजीला पाणी पाजलें व त्याचें पिऊन झाल्यावर वाटी विसळून पिलाजीला पाजलें. एवढें करतांना तिला आपल्या चेहऱ्यावरील अवगुंठन अंमळ बाजूला सारावें लागलें. पण तें तिनें अशा बेतानें बाजूला सारलें कीं, तिला तर हातांतील वाटी नाथाजी किंवा पिलाजी यांच्या ओंठाला लावावयाला दिसावें पण त्यांना तिचें मुखमंडल दिसूं नये. ती दोघांनाही पाणी पाजून परत चालली तेव्हां साधु म्हणाला, "ऋद्धि ! याचा अर्थ काय ? तें कशासाठीं म्हणून? आजच तुला बुरखा घ्यावयाला बरें फावलें ?"

ऋद्धि यावर कांहीं उत्तर न देतां आंत निघून गेली.

"बुवाजी ! ही मुलगी कोणाची कोण व आपण कोण ? आपणच आम्हांला इथें आणलें का ?" नाथाजी पाणी पिऊन अंमळ हुशार झाल्यावर विचारूं लागला, "आम्ही देवालयांत विव्हळत पडलों होतों एवढें आम्हांला आठवतें. पण तें देवालय कुठें आहे व आम्ही तेथून इथें कसे आलों यांतलें आम्हांला कांहींदेखील माहीत नाहीं, म्हणून विचारतों."

"पण मला अगोदर सांगा, तुम्ही कोण कुठले ?" साधूनें विचारलें.

नाथाजीनें आपली उभयतांचीही कुळकथा साधूला निवेदन केली. तो बोलून बोलून दमला कीं, पिलाजी मधून मधून सांगे. त्या दोघांच्या तोंडून इतर सर्व वृत्तान्ताबरोबर कमळजा व कमळा यांविषयींचा वृत्तान्तही बाहेर पडला. तें सर्व ऐकतांना साधूच्या चर्येवर क्षणोक्षणीं अधिकाधिक गांभीर्य दृग्गोचर होत होतें. त्या दोघांचें बोलून झाल्यावर साधूनें एक दीर्घ निःश्वास सोडून उद्गार काढले, "एकूण ऋणानुबंध हा असा होता !"

"पण आपण आपला वृत्तान्त कांहींच सांगितला नाहीं !" नाथाजी म्हणाला.

इतक्यांत व्यासराव एकदम ओरडला, "मुक्ते ! मुक्ते ! तूं कुठें आहेस ?"

व्यासरावाचे शब्द ऐकतांच साधु चटकन् त्याच्यापाशीं गेला. पहातो तों व्यासराव झोंपेंतच बरळत होता. साधूनें हलकेच त्याला हांक मारली, "व्यासराव !"

व्यासरावानें एकदम दचकून शुद्धीवर येऊन समोरच्या व्यक्तीकडे पहात

म्हात विचारलें, "मुक्ते!–आं! तूं कोण, आणि माझी मुक्ता कुठें आहे! मुक्ते!"

पण मुक्ता ओ कोठून देणार! तिच्या ऐवजीं तो अपरिचित साधु समोर उभा असलेला पाहून व्यासरावाच्या भ्रमिष्ट मनांत एका क्षणांत येऊं नयेत तसले तर्ककुतर्क येऊन गेले. त्यांतच भर त्याला बाजेला बांधून ठेवण्यांत आलें होतें त्याची पडली. त्याला वाटलें कीं, हा साधु त्या गुंड मुसलमानांपैकींच कोणी असावा. ह्यानेंच मुक्तेची विटंबना केली असावी व आपलाही हा तसाच छळ करणार, अशी समजूत करून घेऊन व्यासराव निराशापूर्ण स्वरानें म्हणाला, "अरे सैतानांनो! तुम्ही कां आमच्या असे राशीला आलां? आणि तुमचीं हीं अघोर कर्में देवाला तरी कशीं दिसत नाहींत?"

व्यासरावानें आणखी कोणत्या परीनें त्या साधूला शापलें असतें याचा कांहीं भरंवसा नव्हता. पण तो येथवर भोगलेल्या यातनांनीं इतका हतबल झाला होता कीं, याहून जास्त बोलण्याइतकें बल त्याच्या अंगीं मुळींच नव्हतें. तो बोलला हेंच फार झालें. तेव्हां त्याचा आवेश इतका दुर्दमनीय होता कीं, त्यामुळें त्याच्या सर्व नसानसांतून रक्तप्रवाह फार वेगानें वाहूं लागला व छातीवर व दंडावरील जखमांना बांधलेल्या पट्टया रक्तानें चिंब भिजून गेल्या.

नाथाजी व धिलाजी यांना त्या साधूविषयीं बराच विश्वास वाटूं लागला होता. त्यांना व्यासरावानें विमनस्कतेच्या भरांत साधूची निंदा केलेली ऐकून विषाद वाटला. नाथाजी व्यासरावाचा गैरसमज दूर करण्याच्या इराद्यानें म्हणाला, "व्यासराव! बुवाजी आपले रक्षणकर्ते आहेत. त्यांना असें बोलूं नये."

नाथाजीचे शब्द ऐकतांच एखाद्यानें दुखविलेला सर्प दावा धरून लपून बसावा व तो दुखविणारा माणूस नजरेच्या टापूंत येतांच फूत्कार करीत त्याच्यावर धावून यावा त्याप्रमाणें व्यासराव एकदम उसळून ओरडला, "कोण, नाथा! अरे चांडाळांनो! माझ्या मुक्तेच्या जन्माची माती करण्याच्या कामीं तुम्ही हिंदूंसारखे हिंदु–तुम्ही अखेर मुसंड्यांना सामील झालां काय? ही अस्सल हिंदूंची अवलादच नव्हे. आं! तुमच्या बहिणींना

मुसंड्यांनीं पळवून बाटविलें तें तुमच्या कुकर्मांचें फळ तुम्हांला मिळालें. हाय हाय! देवा! हे धिंडवडे पाहाण्याचें माझ्या कपाळीं आलें, त्यापेक्षां मला लौकर मरण कां रे येत नाहीं!"

बोलतां बोलतां म्यासरावाला रक्ताची गुळणी आली. त्यासरसा तो जोराची चाळवाचाळव करतां करतां बाजेसह उलटूनच पडावयाचा; पण साधूनें तेवढ्यांत सावधगिरी करून बाज सांवरून धरली, व लगेच डोळे मिटून एकाग्र चित्तानें हात जोडून 'भगवन्! ह्या म्हाताऱ्याला आराम पडो' अशी परमेश्वराची प्रार्थना करून आपल्या कमंडलूंतील पाणी त्याच्या सर्वांगावर शिंपडलें, डोळ्यांना लावलें आणि प्रथम फडक्यानें त्याचें रक्ताळलेलें तोंड पुसून स्वच्छ करून चार थेंब त्यांच्या तोंडांत घातले. नंतर तो नाथाजी व पिलाजी यांच्याकडे वळून विचारूं लागला, "हा म्हातारा आतां तुमच्या नांवानें कळकळला तो कां? त्याच्या मुक्तेला मुसलमानांच्या स्वाधीन करण्यांत तुमचें अंग होतें असें तो म्हणाला, त्याचा अर्थ काय?"

"स्वामी! तो त्यांचा वृथा गैरसमज झाला आहे. चंद्रसेनानें आम्हां सर्वांवर सूड घेण्यासाठीं आमच्यावर तसा आळ घेतला; तो आम्हांला आणखी कोठवर नडणार भगवान् जाणे!" नाथाजी उद्गारला.

"ठीक आहे! आतां तुम्ही ज्याअर्थीं इतकें सांगतां त्याअर्थीं मला ती मुलगी व पिराजी यांचा तपास केला पाहिजे." असें म्हणून साधूनें खिडीकडे तोंड करून हांक मारली, "ऋद्धि!"

हांक ऐकून ऋद्धि पूर्वींप्रमाणेंच बुरख्यांत पुढें आली. पण साधूनें या वेळीं तिला बुरखा घेण्याबद्दल हिणविलें नाहीं.

"मी आतां बाहेर जाऊन येतों, तोंवर तूं व सिद्धि ह्या दोघींनीं मिळून ह्या तिघांना संभाळा. म्हाताऱ्यानें मागितलेंच तर त्याला पाणी फक्त द्या आणि ह्या दोघांना मात्र थोडथोडी पेज द्या. मी येईतों जागत रहा." असें म्हणून साधु कोंपऱ्यांतील एक मोठी कुबडी हातीं घेऊन पलीकडच्या खिंडींत शिरला. त्यावरून नाथाजी व पिलाजी यांनीं अंदाज केला कीं, बाहेर जावयाची वाट तेथूनच असावी.

साधु बोलल्यावरून ऋद्धीनें आपल्या मुखावरील बुरखा तात्पुरता दूर

केला; पण ती खिडकीच्या आंत आडोशाला उभी राहिली. साधूनें ऋद्धी-बरोबरच सिद्धीचें नांव घेतलेलें ऐकतांच नाथाजी व पिलाजी यांना कल्पनातीत अशीं आशाजनक स्वप्नें पडूं लागलीं. ह्या ऋद्धि-सिद्धि कोण वगैरे वृत्तान्त त्यांनाच विचारावा असें त्यांच्या मनानें घेतलें. पण त्या शुश्रूषेसाठीं बाहेर येईतों त्यांना तशाच उत्कंठेत काळ काढणें प्राप्त होतें.

## दर्शन पंधरावें

# स्वराज्यद्रोह्यांचें कृष्णकारस्थान

"खाविंद ! आपल्या हुकुमाप्रमाणें हे दोन काफिर व ही औरत धरून आपल्या पायाशीं आणलीं आहेत. आतां यांचा इन्साफ आपण काय करावयाचा तो करावा." इस्माईलनें बाजीराव, पिराजी व यशोदा यांना चंद्रसेनासमोर उभीं करून म्हटलें.

"ही मंडळी तुम्हांला कोठें सांपडली?" चंद्रसेनानें विचारलें.

इस्माईलनें आतांपर्यंत घडलेला सर्व वृत्तांत त्यांत जरूर तेवढी आपल्या पदरची भर घालून व जरूर तेवढा-यशोदेच्या तोंडीं गोमातेचें रक्त घालून तिला बाटविण्यासारखा भाग अजिबात गाळून चंद्रसेनाला निवेदन केला.

चंद्रसेन इस्माईलच्या एकंदर पराक्रमावर अगदीं खूष होऊन गेला. आतांच त्याला बाळाजीपंताविरुद्ध पुरंदरच्या बाजूनें मोहिमेवर निघावयाचें होतें; त्या मोहिमेला हा शुभ शकूनच झाला असें त्याला वाटलें. त्यानें पार्वतीबाईला मुद्दाम हा देखावा पाहाण्यासाठीं बाहेर बोलावलें. ती हंसत हंसत तेथें आली. आपल्या संभाजीच्या घाताला कारणीभूत होणारीं बाजीराव, पिराजी व यशोदा हीं तीनही माणसें आपले कैदी बनून आपल्यासमोर उभीं असलेलीं पहातांच तिला इतका आल्हाद झाला कीं, तितका आल्हाद तिला प्रथम पुत्ररत्न झालें तेव्हां तरी झाला असेल किंवा नाहीं नकळे ! तिनें इस्माईलला विचारलें, "इस्माईल ! आणि यांचे ते दुसरे दोघे दोस्त कुठें आहेत ?"

इस्माईल उत्तरला, "बाईसाहेब! ते दुसरे दोघे व तो थेरडा व्यासराव देखील आमच्याशीं झगडतां झगडतां अल्लाच्या दारीं मरून पडले."

नाथाजी व पिलाजी यांची गोष्ट राहो; पण व्यासराव आपला आश्रित म्हणून देखील त्याच्या मरणाची वार्ता ऐकून चंद्रसेन व पार्वतीबाई यांना खेद वाटला नाहीं. चंद्रसेन जणुं काय आपणच छत्रपति आहों व आपली पत्नी महाराणी आहे अशा ऐटीनें म्हणाला, "पार्वती ! हे गुन्हेगार तुझ्यासमोर आणून उभे करण्यांत आले आहेत. नाहीं म्हणावयाला आतां एकच बडा

गुन्हेगार बाळाजीपंत तुझ्या पायाशीं आणून उभा करावयाचा आहे. त्याचा न्याय मागाहून होईल, तूर्त ह्या गुन्हेगारांना काय शासन करावयाचें तें कर."

पार्वतीबाईला वाटलें कीं, आपण किती भाग्यवान् ! लगेच ती न्याय करूं लागली, "माझ्या संभाजीच्या नाशाला हींच तीन माणसें कारण झालीं." ती प्रथम बाजिरावाला उद्देशून म्हणाली, "हा भिक्षुकाचा पोर ! याच्या बापजाद्या भटांभिक्षुकांनीं आजवर कधीं राजकारण केलें होतें का ?"

"हां ! सेनापतीणबाई ! जरा सांभाळून बोला. उगाच माझे बापजादे कशाला काढतां ? माझे बापजादे भटभिक्षुक होते आणि सेनापतींचे वाड-वडील हुजरे-चोपदार-भालदार-चवरजी नव्हते कीं काय ? पण त्यांत काय आहे? कर्तबगारी अंगीं असली तर ती कसल्याही बिकट परिस्थितीच्या कडेकपारी फोडून जोमदार जिवंत झऱ्याप्रमाणें खळखळ वाहूं लागतेच लागते; पण परळाच्या पाटबंधाऱ्यांत पोहरे ओतून जिवंत झरा थोडाच निर्माण होतो ! वाडवडिलांची कर्तबगारी अथवा बद्कर्तबगारी कधीं कोणाच्या भाग्योदयाला उपयोगी पडत नाहीं, किंवा भाग्योदयाच्या वाटेंत अडचणीही उत्पन्न करीत नाहीं. करील त्याचा कारभार व मारील त्याची तरवार. खरे पराक्रमी पुरुष आपल्या बापजाद्यांच्या वैभवावर जगत नसतात; स्वतःच्या पराक्रमावर जगत असतात. पण नवऱ्याच्या मोठेपणावर मिरवणाऱ्या तुमच्यासारख्या बायको-माणसाला पुरुषार्थाची काय पारख असणार !"

"बस्स ! बस्स ! जास्त बोलण्याची गरज नाहीं." पार्वतीबाई बाजिरावा-ला दरडावून चंद्रसेनाकडे वळून म्हणाली, "आमचा पुजारी व्यासराव मेला, त्याच्या जागीं हा कोंकणचा भट आमचा पुजारी-आमचा नोकर झाला पाहिजे." लगेच ती चंद्रसेनाकडे वळून म्हणाली, "माझ्या सासूबाईनीं व त्यांच्या सासूबाईनीं भटांभिक्षुकांच्या घरीं भांडीं घांसलीं असतील व धुणीं धुतलीं असतील, त्याची सव्याज फेड—म्हणून आपण कालच कबूल केलें आहे. भटांच्या घरच्या बायकामाणसांनीं आमच्या जाधवांच्या घरीं भांडीं घांसलीं पाहिजेत, जाधवांच्या बायकांचीं लुगडीं धुतलीं पाहिजेत, व त्यांच्या पुरुषांनीं जाधवांच्या गोठ्यांत शेण भरलें पाहिजे. काय ? माझा हा न्याय आपणाला मानवतो ना ?"

"हो ! मानवतो." चंद्रसेन पार्वतीबाईच्या प्रश्नाला मान तुकावून म्हणाला.

"इतिहासाची पुनरावृत्ति झालीच पाहिजे. आज इतके दिवस शेफारलेल्या भटांचा नक्षा असा उतरलाच पाहिजे."

बाजीराव म्हणाला, "चंद्रसेनजी! जाधवांच्या थोर कुळांत तुमचा जन्म झालेला, शाहूमहाराजांचे जाधव म्हणजे उजवे हात!—"

"म्हणूनच त्या उजव्या हातांतील तरवार महाराष्ट्राच्या राजकारणांत धुड-गुसणाऱ्या भटांभिक्षुकांना बेचिराख करून हिंदवी-स्वराज्याचें मराठशाही हें नांव सार्थ करील." चंद्रसेन संतप्त मुद्रा करून म्हणाला, "भटांनो! आज तुम्हांला मराठशाहींत रान मोकळें सांपडलें आहे, नव्हे का? ताराबाई आईसाहेब म्हणतात तें खोटें नव्हे. शाहूमहाराजांचें रक्त अस्सल भोंसल्यांचें खास नाहीं. संभाजीमहाराजांच्या अवसानानंतर देखील राजमातापदाचा मोह येसूबाई आईसाहेबांना अनावर झाला म्हणून त्यांनीं कोणा कुणब्या-तेल्या-तांबोळ्याचा कीं बादशहाच्या जनानखान्यांतील कोणा दासी-बटकीचा मुलगा आणवून बिन् विधीनें दत्तक घेऊन पोसला असेल, तो आज मारे शाहूमहाराज झाला. खरा मराठा राजा कधीं तरी असा भटाभिक्षुकांच्या हातांतील बाहुलें बनून राहील काय? आम्ही सारे एकाहून एक पराक्रमी मराठे काय मेलों होतों? बस्स! असल्या नादान छत्रपतीला त्याच्या भट-भिक्षुक साथीदारांसह जमीनदोस्त करून ताराबाई आईसाहेबांच्या मुलाला पुन्हा छत्रपति बनवून त्याचा मुख्य प्रधान होईन आणि महाराष्ट्रांतील भटां-भिक्षुकांना होते कीं नव्हतेसे करून सोडीन तरच नांवाचा जाधव. बाळाजी-पंतादि हांवऱ्या भटांना म्हणावें, कोल्हापूरच्या गादीची स्थापना महाराष्ट्रां-तील भटांना नामशेष करून ह्या भटाळलेल्या महाराष्ट्राला भटेतरांचा-खऱ्या-खुऱ्या मराठ्यांचा महाराष्ट्र बनवून सोडण्यासाठीं झाली आहे. दुर्दैवानें हा डाव साधलाच नाहीं तर हा जाधव मराठशाहीवर लाथ मारून परधर्मी मुसल-मान बादशहालाही सामील होईल व त्याचा सरदार अथवा दिवाण बनून त्या परक्या सत्तेच्या जोरावर भटांचीं पाळें-मुळें महाराष्ट्रांतून खणून काढील; पण खणून काढील!"

बाजिरावाला चंद्रसेनाचे हे सैतानी बोल ऐकून किती खेद वाटला असेल त्याची कल्पनाच केलेली बरी! पण तो तरी बाळाजीपंतांचाच पुत्र होता. तो सूक्ष्मविवेकी व दूरदर्शी होता. आपला हात सध्यां दगडाखालीं सांपडला

आहे, अशा वेळीं नमतें घेण्याचें नाकारलें तर त्याचा कांहीं उपयोग न होतां उलट आपल्या व आपल्या पित्याच्या जीवितावर निखारा फुंकण्यालाही चंद्रसेन कमी करावयाचा नाहीं हें त्याला पक्कें माहीत होतें. पण इतकेंही करून त्याचा चंद्रसेनाच्या हिंदुत्वावर अजून विश्वास होता. मुसलमानांनीं आपली व पिराजी, यशोदा वगैरे मंडळीची विटंबना केली ती चंद्रसेनाच्या चिथावणीवरूनच केली याविषयीं जरी त्याला संशय नव्हता, तरी त्यांनीं मुद्दाम गोवध करून गोमातेच्या रक्तानें यशोदेला बाटविण्यालाही कमी केलें नाहीं, हें कळतांच चंद्रसेनाच्या अंतःकरणाला पीळ पडेल अशी त्याला आशा होती. त्या आशेनें प्रेरित होऊन तो अंमळ शांतपणें उद्गारला, "चंद्रसेनजी! तुम्ही आम्हां ब्राह्मणांच्या नांवानें जळणार तर खुशाल जळा; पण ह्या घाणेरड्या व्यक्ति-वादाच्या भरीं पडून हिंदुत्वाची सर्व बाजूंनीं गळेचेपी करण्याला टपून बसलेल्या मुसलमानांना शेफारूं देऊं नका. ब्राह्मण झाले काय किंवा ब्राह्मणेतर झाले काय, हिंदूच आहेत. ते आपसांत कितीही भांडोत; पण दोघांचें भांडण व तिसऱ्याचा लाभ या न्यायानें त्यांनीं मुसलमानांना आपल्या घरांत वाव करून देतां कामा नये. आम्हांला पकडावयाचेंच तुमच्या मनांत होतें तर पकडावयाचें होतें. पण तुम्हीं ज्यांना ती कामगिरी सांगितली, ते हे मुसलमान तुमचे सेवक असूनही तुमच्या नांवावर त्यांनीं आज उघड उघड गोवध केला व गोमातेच्या रक्तानें ह्या आमच्या बहिणीला—ह्या तुमच्या कन्येला-ह्या यशोदेला बाटविलें हें तुम्हांला रुचतें काय?"

आतां बाजू आपणावर उलटण्याचा संभव आहे असें पहातांच इस्माईल निव्वळ खोडसाळपणानें म्हणाला, "खाविंद! माझ्या लोकांनीं गोवध केला खरा, व त्यांना यशोदा बोलूं नये तसलीं दुरुत्तरें बोलली. तिनें पैगंबराला शिव्या दिल्या, त्यामुळें चिडून मी तिचें तोंड आंवरीत असतां माझ्या हातानें तिच्या तोंडाला रक्ताचे डाग पडले असतील; पण तें मीं बुद्ध्या कांहीं केलें नाहीं. आणि तिनें तरी आम्हांला व आमच्या पैगंबराला बोलूं नये तसले अपशब्द कां बोलावे?"

यशोदा व पिराजी इतका वेळ अगदीं स्तब्ध होती. पिराजी यशोदेच्या दुर्वर्तनाविषयीं इतका संशयग्रस्त होऊन गेला होता कीं, जवळ कोणाचें काय संभाषण चाललें आहे इकडे त्याचें लक्ष जाणें शक्यच नव्हतें. यशोदा मात्र

अंतरंगांतून सारखी जळत होती. वस्तुतः ती पवित्र-परमपवित्र होती; पण आतां मात्र आणीबाणीची वेळ आहे, आतां आपल्या अब्रूची जतन करणें आपल्या आटोक्याबाहेरचें आहे असें पाहून चंद्रसेनाला, निदान पार्वतीबाईला आळवून तरी आपली अब्रू बचावली गेली तर पहावी असें तिला वाटलें. इतर कांहीं असलें तरी आपल्या जातीच्या एका कुलस्त्रीच्या अब्रूवर कामांध मुसंड्या सैतानांचा दरोडा पडत असलेला पाहून तरी चंद्रसेन व पार्वतीबाई यांच्या पाषाणहृदयांना पाझर फुटेल ह्या आशेनें व इस्माईलच्या खोडसाळ बोलांनीं त्यांना भूल पडूं नये म्हणून ती शोक-दुःख-संतापाच्या त्रिविध आवेगानें उद्गारली, " चंद्रसेनजी ! हा माजलेला गळेकापू निव्वळ खोटें बोलतो आहे—"

" खबरदार ! तुझ्या तोंडचा एक शब्द देखील ऐकण्याची माझी इच्छा नाहीं." चंद्रसेन यशोदेला पुरतेपणीं बोलूं न देतां दटावून गप्प करीत बाजिरावाकडे वळून म्हणाला, " बस्स ! मला मुसलमान पत्करले; पण भट नकोत. मुसलमानांनीं तिला बाटविलें त्याबरोबरच तुलाही बाटविलें असतें तरी बरें झालें असतें. महाराष्ट्रांत भटांचा बींमोड व्हावा म्हणून मी मुसलमानांशीं एकदां सोडून शंभरदां संगनमत करीन. भटांना मुसलमानांनीं बाटवून भटांची जात बुडविली तर त्यामुळें देशाचें कांहींच नुकसान व्हावयाचें नाहीं. मी तर उलट असें म्हणेन कीं, मुसलमान हे तरी आमच्याप्रमाणेंच भटेतर आहेत. ह्या सर्व भटेतरांनीं एकजुटीनें भटांची देशद्रोही अवलाद बेचिराख करण्यासाठीं झटलें पाहिजे. इस्माईल ! तूं केलेंस तें यथायोग्य केलेंस. ह्या तुझ्या कामगिरीबद्दल तुला ही नखरेल नार बक्षीस !" चंद्रसेन यशोदेकडे बोट दाखवून म्हणाला.

चंद्रसेनाच्या तोंडचे शब्द ऐकून इस्माईल तर आनंदानें बेहोष होऊन गेला. इतर मुसलमानांनाही आपल्यावरचा अत्याचाराचा आळ टळला म्हणून इतका संतोष झाला कीं, त्या संतोषाच्या भरांत एकट्या इस्माइलला यशोदेसारखी खुबसुरत नार बक्षीस मिळाल्यामुळें वैषम्य मानण्याचेंही ते विसरून गेले! यशोदेवर मात्र जणुं काय आकाश कोसळून पडलें. पिराजी इतका तिच्याविषयीं मनांतून क्रुद्ध झालेला; पण त्यालाही आपल्या अंतःकरणावर आकाशाची कुऱ्हाड कोसळल्याप्रमाणें वाटलें. तो चंद्रसेनाला

हात जोडून म्हणाला, "चंद्रसेनजी! ह्या कुलटेनें यापूर्वींच माझ्या नशीबाला चूड लावली आहे. तिच्याविषयीं माझ्या मनांत केंसभरही आपलेपणा उरलेला नाहीं; पण ती कशी झाली तरी हिंदु स्त्री आहे. यास्तव माझी तुम्हांला अशी विनंति आहे कीं, तिला पाहिजे तर तुम्ही तुमच्या घरांत दासी-बटीक म्हणून जन्मभर राबवा किंवा त्याहीपेक्षां उत्तम उपाय म्हणजे तिला इथल्याइथें ठार मारा; पण मुसलमानांच्या हवालीं करूं नका! एक हिंदु पुरुष मुसलमान झाल्यानें हिंदुधर्म केवळ एकाच संतानाला मुकतो व तो एकटाच शत्रु होतो; पण एक हिंदु स्त्री मुसलमान झाल्यानें त्या पिकत्या शेतावर आपला शत्रुसमाज विस्तारून पोसतो. ते एकाचे एकवीस होऊन मग आपणांला अधिकाधिक नडूं लागतात."

"कां आतां कां?" पार्वती मध्येंच डिंवचलेल्या नागिणीसारखी फूत्कार करीत पुढें येऊन म्हणाली, "ह्या शिरजोर पोरीनें आजवर माझा कसकसा पाणउतारा केला आहे तें तिलाच विचार. तिला तेव्हां वाटलें कीं, मी महाराजांच्या मर्जींतील भटाच्या हुजऱ्याची बायको झालें म्हणजे जशी कांहीं मराठशाहीची राणीच झालें! बस्स! आज तुम्हां सर्वांचा न्याय माझ्या मुखानें व्हावयाचा असें सेनापतींनीं फर्माविलें आहे. इस्माईल! ही मगरूर पोर तुला बक्षीस घे आणि तिचा हा नादान नवरा तिच्याबरोबरच तिचा गुलाम म्हणून राबविण्यासाठीं घेऊन जा. त्याला गुलाम म्हणून राबव, बाटवून मुसलमान कर किंवा ठार कर; काय वाटेल तें कर."

पिराजी ह्या ग्रहदशेच्या फेऱ्यांत सांपडून वेडापिसा झाल्यासारखा शून्य चित्तानें सभोंवार पाहूं लागला. आपल्या आयुष्यसर्वस्वाचाच पोरखेळ परमेश्वरानें केला, तिथें ह्या सामान्य उलाढालींना कांहीं जास्त महत्त्व आहे असें त्याला कसें वाटावें! यशोदेची स्थिति तर पिराजीहूनही करुणास्पद होती. ती कितीही शूर व करारी असली तरी ती स्त्री होती. स्त्रियांची स्थिति वेलीसारखी असते. वेलीला जशी वृक्षाच्या आधाराशिवाय गति नाहीं, तशीच स्त्रीलाही पुरुषाच्या आधाराशिवाय गति नाहीं. मूर्ति आणि प्रकृति, शिव आणि शक्ति, दीप आणि दीप्ति, मूर्ति आणि छाया, त्याप्रमाणेंच पुरुष आणि स्त्री हीं अन्योन्याश्रयी असून त्यांतही स्त्रीचें जीवित ही तत्त्वतः पुरुषाच्या जीविताची पडसांवली असते. आज यशोदेचा पति आपण होऊन तिच्याविरुद्ध त्राग्या

करूं लागल्यावर तिनें बिचारीनें तरी कोणाच्या तोंडाकडे पहावें! ती मोकळी असती तर आत्महत्त्या करून तरी स्वतःची अब्रू बचावती; पण तेवढेंही स्वातंत्र्य तिला आज नव्हतें! सोन्यासारखा पुत्र नुकताच डोळ्यांदेखत मृत्यु-मुखीं पडलेला, शारीरिक यातनांमुळें आपली व आपल्याबरोबरच आपल्या गर्भवासी बालकाची काय गत होते याचा भरंवसा नाहीं, जीवनसर्वस्व असा पति नेमका याच वेळीं संशयाच्या पिशाचानें ग्रासलेला व त्यांतच त्याचा अमानुषपणें अंत करण्यासाठीं कृतांत काळ समोर तिष्ठत उभा! इतकी यशोदेच्या जीवितसर्वस्वाची होळी पेटवूनही तिच्या दुर्दैवाचें समाधान न होतां अखेर तें तिच्या पातिव्रत्याचा बळी घ्यावयाला टपलेलेंच! चंद्रसेन व पार्वतीबाई यांची करुणा भाकावी तर तीही आशा खुंटलेली! तरीही ती पुन्हा मनाचा हिय्या करून पार्वतीबाईच्या पायां पडून दीनवाण्या स्वरानें म्हणाली, "पार्वतीबाई! तुम्हीच माझी आई! माझें रक्षण तुम्ही करणार नाहीं का? आपण जातिवंत मराठ्यांच्या बायका, पातिव्रत्य स्त्रीच्या जितेपणापेक्षांही अनंत-पटींनीं बहुमोलाचें आहे हें का मीं तुम्हांला सांगायला पाहिजे! तरी तुम्हीच —तुम्ही स्त्री असून ह्या पशूंना दिवसाढवळ्या माझ्या—ह्या तुमच्या कन्येच्या पातिव्रत्याची लूट करायला सांगतां! प्रसंग कोणावर कधीं अन् कसा येईल याचा काय नेम सांगावा! समजा, येऊं नये ते भोग उद्यां तुमच्या वांट्याला आले—"

"खबरदार! चवचाल पोरी!" चंद्रसेन एकाएकीं उसळून म्हणाला, "पुन्हा तोंडावाटे असा एक शब्द जर उच्चारशील तर तुझी जीभच छाटली जाईल. तूं काय समजतेस? महाराष्ट्रांतल्या सर्वच मराठा स्त्रियांचे नवरे तुझ्या ह्या नामर्द नवऱ्यासारखे षंढ आहेत काय?" लगेच चंद्रसेन पिराजीकडे वळून गर्जना करूं लागला, "ए बेहिमती हरामखोरा! असा षंढासारखा तोंडें काय पहातोस!" पुन्हा इस्माईलकडे वळून तो म्हणाला, "जा, इस्माईल! ह्याला घेऊन जा. तीन गुन्हेगारांपैकीं दोघे आपल्याच कर्मानें मेले, हा तिसरा हातीं लागला त्याला मी देहान्त शिक्षा फर्मावतों. त्या शिक्षेची अम्मलबजावणी तुम्हीं करावयाची आहे. जा. ह्या दोघांनाही घेऊन जा."

"काय? मीं काकुळतीला येऊन इतक्या विनवण्या केल्या तरी कोणा-च्याही अंतःकरणाला दयेचा पाझर फुटत नाहीं काय?" यशोदा चंद्रसेन,



यशोदाः—पार्वतीबाई ! तुम्हीच माझी आई ! माझें रक्षण तुम्ही करणार नाहीं का ?

फोटोग्राफर—एस्. जी. नाईक, पुणें.] [पृष्ठ १२८.

पिराजी, बाजीराव व पार्वती यांच्याकडे पहात जणुं काय जिवावर उदार झाल्यासारखी बोलूं लागली, "एकूण हे सारे हिंदुत्वाच्या तोंडाला काळोखी फांसणारे जिवंत मुडदेच ठरले ? "

हा माझा पति—पण हा कसला पति ! आपल्या डोळ्यांदेखत आपल्या धर्मपत्नीची बेअब्रू अविंधांच्या हातून होत असलेली निर्लज्जपणें पाहणारा हा कसला आला आहे पति ? ह्या नामर्दाच्या नांवानें मीं फुकट फुकट रे देवा, माझ्या कपाळाला कुंकवाचा डाग लावला !" यशोदा आवेशासरसें कुंकू घुशीत बाजिरावाकडे वळून म्हणाली, "हे आमचे धनी, माझे पाठीराखे भगवान् श्रीकृष्ण हे !—धनीसाहेब ! तुम्हांला तुमच्या बहिणीची अब्रू बचावतां येईना; असले दुबळे लोक तुम्ही महाराष्ट्र-मायभूमीची अब्रू काय बचावणार! चंद्रसेनजी ! पार्वतीबाई ! मीं तुम्हांला आईबाप मानलें, तरीही मला-आपल्या ह्या पतिव्रता कन्येला—मुसंड्यांच्या स्वाधीन करण्यांत तुम्हांला भूषण वाटलें ! देवा परमेश्वरा ! ह्या जगांत ह्या अनाथ अबलेचा वाली कोणीच नाहीं का रे ? आपल्या आया-बहिणींच्या अब्रूची किंमत ज्यांना कळते असा येथें कोणीच माणूस नाहीं कसा ?"

"आळव ! आळव ! अशीच आणखी परमेश्वराला आळव. यशोदे ! एकापेक्षां एक पराक्रमी अशा पांडवांची पत्नी द्रौपदी हिला कौरवांच्या सभेंत दुःशासनानें केंसांना धरून फरफरां ओढून आणली व तिला नागवी करण्यासाठीं तिच्या पदराला हात घातला, तेव्हां तिनें असाच आपल्या पांच नामर्द पतींचा व श्रीकृष्णाचा—मानलेल्या भावाचा—धावा केला. तो भाऊ तसाच पराक्रमी व ती बहीणही तशीच पतिव्रता, म्हणून तेव्हां तिच्यावरचा तो प्रसंग टळला; म्हणून उठल्यासुटल्या मुलुखभवानीनें जर तसाच आव आणला, तर तें सोंग तिला थोडेंच साधणार आहे ! म्हणे मानलेला भाऊ आणि मानलेलीं आईबापें ! त्याबरोबरच त्या मानलेल्या दोघां नवऱ्यांच्या नांवांची आठवण बरी केली नाहींस ! देवाचा धावा काय, आपल्या पापाचरणावर पांघरूण घालण्यासाठीं तुझ्यासारखी कोणतीही गांवगंगा करील; पण असल्या गांवगंगांच्या धाव्याला धावून येण्याइतका देव थोडाच नादान बनेल !" चंद्रसेन पार्वतीकडे पाहून उपहासपूर्वक हंसत म्हणाला.

पार्वती आपल्या भुंवया चढवून यशोदेची टर करण्याच्या इराद्यानें

म्हणाली, " पाहूं बरें ! यशोदे ! 'पतिव्रता', 'पतिव्रता' हे शब्द आतांच्या आतां पांचचार वेळां तुझ्या तोंडून ऐकले, ती तूं जर खरी पतिव्रता असशील तर तुझी आतां कशी सुटका होते पाहूं. बस्स! तुझ्या पातिव्रत्याचें हेंच दिव्य. तूं ह्या इस्माईलच्या तावडींतून अब्रूनिशीं बचावलीस तर पतिव्रता खरी. मग मी तुझे पाय धरीन; तुला देवी मानीन. पार्वती बाजीराव व पिराजी यांच्याकडे पाहून म्हणाली, " का हो यशोदेचे पाठिराखे भाऊ ! अहो ! नामर्द नवरोबा ! मीं काय पण लावला आहे तो ऐकलांत का ?"

पार्वतीच्या बोलांतील गर्भित उपहास पिराजीला ओळखतां आला; पण तिचे बोल त्याला उपेक्षणीय मात्र वाटले नाहींत. त्याचें मन यापूर्वींच संशयविकृत झालें होतें; त्यामुळें त्याला वाटलें कीं, आपल्या पत्नीच्या पातिव्रत्याची खरी कसोटी ठरावयाची तर ती अशा दिव्यांतच ठरेल. सीतादेवीविषयीं जनापवाद उत्पन्न झाला, तेव्हां तिनें जनतेची आपल्या पातिव्रत्याविषयीं खात्री पटवून देण्यासाठीं अग्निदिव्य केलें. ती काया-वाचा-मनानें पतिव्रता होती म्हणूनच तिनें अग्नींत प्रवेश करतांच अग्नि शांत झाला व ती पतिव्रता ठरली. खऱ्या पतिव्रतेच्या पातिव्रत्याची साक्ष देण्याला पंचमहाभूतेंही तयार असतात, मग यशोदेलाही तोच न्याय कां लागूं नसावा असें पिराजीला वाटलें. आतां, पिराजीसारख्या सामान्य माणसांनीं राम-सीतेसारख्या देव-देवतांशीं आपली बरोबरी करूं नये खरी; पण एकतर पिराजी विवेकशून्य बनलेला व शिवाय तो खराखुरा एकपत्नीव्रती होता. तो सामान्य शिपाईगडी खरा; पण सच्चारित्र्य असामान्य थोरामोठ्यांच्या पदरीं असतें व सामान्य गोरगरिबांच्या पदरीं नसतें असें थोडेंच आहे ! पिराजी आजवर यशोदेशीं इतक्या एकनिष्ठेनें वागत आला होता कीं, आपल्या पत्नीपासून अशा प्रकारच्या भयंकर दिव्याची अपेक्षा करण्याचा त्याला नैतिक हक्क होताच. शिवाय तो आजूबाजूच्या एकंदर परिस्थितीमुळें ईर्षेला पेटला होता. तो उद्गारला, " सेनापतीणबाई ! तुम्ही आमचा उपहास करण्याच्या हेतूनें बोललां तरी मी म्हणतों कीं, तुमच्या मुखानें साक्षात् देवता बोलली. यशोदा खरी पतिव्रता असेल तर ती तुमचा हा पण जिंकील !"

" तेंच, मी तरी तेंच म्हणतें. हं इस्माईल ! त्या दोघांना घेऊन चालते व्हा." पार्वती पूर्वोक्त उपहासात्मक भावानें म्हणाली. बोलून चालून हें

कलियुग! सत्ययुगांतल्या सीतेसारखा साक्षात्कार कलियुगांतील यशोदेच्या आयुष्यांत कसा घडावा! ह्या अशक्यप्राय पणानें आपल्या तोंडाला काळोखी फांसली असें पाहून यशोदा सर्वस्वी हताश झाली. पण इस्माइलानें कांहीं दया-माया न दाखवितां तिला तशीच उचलून खांद्यावर घेऊन चालविली. बाकीच्या लोकांनीं बंदिवान् पिराजीला तिच्या मागोमाग चालविलें. पार्वती यशोदा जारिणी होती असें म्हणून निर्लज्जपणानें हंसत उभी राहिली. चंद्रसेन इस्माईलला हांक मारून म्हणाला, "इस्माईल! सर्जेरावांना आतांच्या आतां इकडे पाठव."

"जशी आज्ञा!" असें म्हणून इस्माईल चालूं लागला.

बाजीराव इतका वेळ स्तब्ध होता, तो यशोदा व पिराजी यांची अशी वाट लागलेली पाहून म्हणाला, "सेनापतीणबाई! देवाला आपल्या देवपणाची लाज असली व यशोदेची पुण्याई तेवढी जबरदस्त असली तर तिनें हा पणदेखील जिंकला असेंच तुम्हां-आम्हांला ऐकूं येईल; पण असल्या पोरकटपणाच्या निमित्तानें पतिव्रतेची विटंबना करण्याचें महत्पाप ज्यांनीं ज्यांनीं जोडावें, त्यांना त्यांना मात्र तें मरेपर्यंत नडेल, महाकुष्ठासारखें तें त्यांना पीडादायक होईल. चंद्रसेनजी! आपण आलों कोणत्या कार्यासाठीं व करतों काय, याचा विचार तुम्हीं केला तर तुम्हांला तुमच्या ह्या दुष्कर्मांची लाज वाटेल. तुम्ही शाहूमहाराजांच्या वतीनें वागा कीं विरुद्ध वागा, त्या राजकारणाच्या भानगडींत बोलण्याचा अधिकार मला नाहीं. तरीपण माणसाच्या ठायीं नेकी असली पाहिजे एवढें मीच नव्हे, मराठमुलखींचें एखादें रांगतें बागडतें पोरही तुम्हांला सांगूं शकेल. तुम्ही नांवरस मराठ्याची सांगावी व करणी बेहिमतीची करावी, याला काय म्हणावें! आपले वाडवडील कसे वागत आले याचा कांहीं तरी विचार करावयाचा होता! हे मुसलमान—तुमच्या सैन्यांत माजलेले हे पोळ—तुम्हां आम्हां हिंदूंच्या देवाधर्माची व बायका-मुलांची दिवसाढवळ्या इज्जत घेतात, गोमातांच्या माना चरचरां चिरतात, आम्हां हिंदूंना बलात्कारानें बाटवितात, आमच्या देव-देवालयांचा विध्वंस करितात, व त्यांचा तुम्ही गौरव करितां! ह्याच अत्याचारी अविंधांनीं उद्यां तुमच्या-आमच्या बायकांवर हात टाकला नाहीं तर नांव कशाला हवें! मराठ्यांचे सेनापति आपण, ते कैक पिढ्यांच्या मुसलमान शत्रूंशीं झगडून मराठशाहीचें वैभव वाढीला लावण्याचें

सोडून आपल्या जातगोतांतील बायका-मुली त्यांना बक्षीस देतां व त्यांच्याशीं अशी अधर्माची सोयरीक करण्यांत भूषण मानतां! असलीं स्वाभिमानशून्य व बेहिमती कर्में अस्सल अवलादीच्या हिंदूंच्या हातून कधींच व्हावयाचीं नाहींत.–"

बाजिरावाचे शब्दशर चंद्रसेन व पार्वती यांच्या अंतःकरणाच्या फाडफाडून चिंध्या चिंध्या करीत होते. हाच एखादा सामान्य माणसाचा मुलगा असता तर चंद्रसेनानें त्याची गर्दन केव्हांच छाटून टाकली असती. पण तो पडला सेनाकर्त्यांचा मुलगा! त्याला भट, शागीर्द, हुजऱ्या असलीं दुरुत्तरें बोलून त्याची टर करणें सोपें होतें. पण ते शब्द प्रत्यक्ष कृतींत आणणें अथवा त्याला शासन करणें महाकर्म कठीण होतें. त्यामुळें धरावा तर चावतो व सोडावा तर पळतो अशी बाजिरावाविषयीं चंद्रसेनाची मनोवृत्ति द्विधा झाली होती. पण माणसाच्या सहनशीलतेलाही मर्यादा असतेच. बाजिरावाच्या रागाची व प्रच्छन्न शिव्याशापांची तीव्रता प्रतिक्षणीं वाढत चाललेली पाहून आतां काय वाटेल तें करून याचें द्वाड तोंड बंद केलेंच पाहिजे अशी जोराची तिडीक चंद्रसेनाच्या मस्तकांत उठली. तोंच सर्जेराव घाटगे तेथें येऊन दाखल झाला.

"सर्जेराव! आतांच्या आतां माझ्या डोळ्यांदेखत ह्या मगरूर पोराच्या हातापायांत बेड्या ठोकून याला बंदिवान् करा व स्वारीबरोबर घेऊन चला. आतां बिलंब लावूं नका, लौकर निघा. सेनाकर्त्यांचा पाठलाग करून त्यांना कैद केलेंच पाहिजे. श्रीजगदंबेच्या कृपेनें ताराबाई आईसाहेबांना व आपणां सर्वांना नडणारी ही भटांची अवलाद आज अचानक आपल्या हातीं लाभण्याचा संभव आहे. हा मोका साधून आपण त्यांना पकडून ताराबाई आईसाहेबांसमोर उभें केलें, कीं आपला पुढचा मार्ग निष्कंटक आहे. ह्या भटांना एकदांचें विशाळगडावर कैद्यांच्या कोठडींत जन्मावेरी गाडून टाकलें, कीं शाहूमहाराजांना नामशेष करण्याला, निदान कोल्हापूरची गादी बळकट करून मराठशाहीचीं सर्व सूत्रें हातीं घेण्याला आपणाला मुळींच श्रम पडावयाचे नाहींत. चला, मीं सांगितल्याप्रमाणें लौकर करा."

सर्जेरावाला ही कुणकुण अगोदरच कळली असल्यानें त्यानें बेड्या घेऊन चार शिपाई बरोबर आणलेच होते. त्यानें तेथल्या तेथें बाजिरावाच्या पायांत बेड्या ठोकविल्या, व त्याला नीट बंदोबस्तानें नेण्याला बजावून वाटेला लावून

मग तो चंद्रसेनाकडे वळला व म्हणाला, " सेनापतिसाहेब! आपल्या सांगण्या-प्रमाणें कोणतीही गोष्ट करण्याला मी एका पायावर तयार आहें; पण त्यापूर्वी आपणाला एक महत्त्वाची गोष्ट सुचवून ठेवावयाची कीं, आपण हातीं घेतलेलें काम अत्यंत अवघड आहे याची जाणीव ठेवून वागावयाला हवें. नाहींतर ताराबाई आईसाहेबांची कोल्हापूरच्या सवत्या सुभ्याची कल्पना फलद्रूप होते न होते तोंच सातारकर व त्यांचे हे भट बगलबच्चे यांनीं कोल्हापुरचा नामधारी छत्रपति व त्याची प्रभावळ स्वराज्यद्रोही आहे अशी सरास बदनामी चालविली आहे, तोच डाग तुमच्या-आमच्या नांवाला कायमचा लागून रहावयाचा; व आमच्या कम्नशिबानें कोल्हापुरच्या राज्यस्थापनेचा आपला बेत फसून सातारकरांनाच पुन्हा शरण जाण्याचें आमच्या वांट्याला यावयाचें. मग कुत्रा देखील आमचे हाल खावयाचा नाहीं."

" त्याची काळजीच सोडा तुम्ही. जाधव आणि घाटगे ही कडव्या मराठ्यांची दुक्कल जोंवर कायम आहे, तोंवर ताराबाई आईसाहेब बायको-माणूस पडल्यानें व राजे वेडसर असल्यानें कोल्हापूरच्या सवत्या सुभ्यांत आम्ही करूं ती पूर्वदिशा होणारी आहे. तेवढ्यासाठीं एक गोष्ट मात्र अवश्य झाली पाहिजे; ह्या भटांचा मराठशाहीच्या राजकारणांतून प्रथम उठावा केला पाहिजे."

" कोठेंही पहा, हे भट तेवढे सारेच मोठे पाताळयंत्री. बाळाजीपंतांचीच गोष्ट कशाला? सचिव पहा, प्रतिनिधि पहा, अमात्य पहा, जो तो कसा मोठ्या सावधपणानें आपली बाजू सांभाळून आहे. ह्या तिघांनींही ताराबाई आईसाहेबांपाशीं राजनिष्ठेच्या शपथा घेतल्या, त्या खऱ्या आहेत असें तुम्हांला वाटतें का?" सर्जेरावानें विचारलें.

" सारे लेकाचे चोर आहेत. मी त्या सर्वांना ओळखतों." चंद्रसेन त्याच्या लहानग्या रामचंद्रासह पार्वतीबाई आड उभी राहून लडिवाळपणानें बाहेर जाण्याला खुणावूं लागली तेव्हां तो दुडुदुडु धावत आलेला पाहून त्याला मांडीवर घेऊन म्हणाला, " सेनापतीसारखे मातबर लोक ताराबाई आई-साहेबांच्या बाजूला आहेत, ते आज ना उद्यां शाहूमहाराजांना नामशेष करून अखेर ताराबाई आईसाहेबांचाच पक्ष विजयी करणार, हें ओळखून प्रतिनिधीनें कैद पत्करली व सचीव तटस्थ राहिला आहे. त्यामुळें इकडे ताराबाई आई-साहेबही खूष असाव्या व तिकडे शाहूमहाराजांनाही वाटावें कीं सेवक पदरीं

असावे तर असे नेकजात असावे. सचिवाचेंही असेंच. तो ताराबाई आई-साहेबांसमोर मान नमवितो तो शपथेनें बांधला गेला म्हणून, व शाहूमहा-राजांसमोर नमून वागतो, तो सत्तेपुढें शहाणपण नाहीं म्हणून ! अमात्याची वर्तणूकही थेट याच मासल्याची. एकूण काय, मराठशाहीचें बारसें होवो, कीं बारावें होवो, ह्या बुभुक्षित भटांची आपली जेवावयाला तयारी आहेच. सर्जेराव ! ह्या सर्व भटांना समूळ गाडल्याशिवाय कोल्हापूरच्या गादीचा जम बसावयाचा नाहीं."

"मराठशाहींत मूळ धनाजीबावांनीं ह्या श्रीवर्धनकर भटाला बोट शिरकूं दिलें हीच त्यांची मोठी चूक झाली !" सर्जेराव म्हणाला.

खरेंच ! बाबा शूर होते खरे; कर्णार्जुनांच्या तोडीचे रणझुंझार ते होऊन गेले. पण मुत्सद्देगिरीशीं त्यांचें वांकडें होतें. ते रोखठोक शिपाईगडी पडले, म्हणून हा भट त्यांना ग्रासूं शकला. इथूनतिथून भटांची अवलादच अशी आप्पलपोटी व आगलावी आहे. प्रत्येक राजा आपल्या मुठींत असावा असें प्रत्येक भटाला वाटतें. त्यासाठीं तो मग काय पाहिजे तीं अनन्वित कृत्यें करील. छत्रपति थोरल्या शिवाजीमहाराजांच्या राज्याभिषेकाच्या वेळीं ते पूर्णपणें आपल्या आहारीं पडणार नाहींत असें पाहून, ह्या भटांनींच ते क्षत्रिय नाहींत असा कांगावा केला. छत्रपति संभाजीमहाराजांना नानापरींचे छंद लावून त्यांची समूळ वाताहात करणारा कलुषा कबजी हाही भटच होता."

"आणि ताराबाई आईसाहेबांविरुद्ध शाहूमहाराजांना सामील होऊन मराठशाहींत एवढी दुफळी माजविणारा बाळाजीपंत हाही भटच आहे !"

"पहा तरी ! म्हणूनच मी म्हणतों कीं, ह्या एका भटाचा नक्षा उतरून भागावयाचें नाहीं; मराठशाहींत उपाध्या म्हणून, देवाचा पुजारी म्हणून, कुळकर्णी म्हणून, सरदार-जहागीरदार म्हणून, जेथें जेथें भट सांपडेल तेथें तेथें त्याला ठेंचला पाहिजे. मराठशाहींतलि भटांना एकजात बाळींत टाकलें पाहिजे. त्यांचीं वतनें जप्त केलीं पाहिजेत, त्यांच्या नोकऱ्या काढून घेतल्या पाहिजेत, वाटेल त्या उपायांनीं त्यांचीं पाळें-मुळें खणून काढलीं पाहिजेत. काय सांगूं हो सर्जेराव ! माझ्या उड्या फार मोठ्या आहेत. देवदयेनें ताराबाई आईसाहेबांचा पक्ष मात्र पूर्ण विजयी व्हावयाला हवा, म्हणजे मग ह्या साऱ्या भटांना म्हणावें, ह्या जाधवांचा इंगा पहा ! माझ्या मनासारखें झाल्यावर

पहिल्यानें मी छत्रपतींच्या नांवामागें आजवर 'गोब्राह्मणप्रतिपालक' अशी बिरुदावळी लावण्यांत येते ती बदलून 'गोधर्मप्रतिपालक' अशी नवी बिरुदावळी प्रचारांत आणीन व भटीसत्तेचा उगम ज्या जगद्गुरु शंकराचार्यांच्या पीठा-पासून होतो, तें पीठ मोडून तेथें नव्या भटेतर शंकराचार्यांची स्थापना करून मराठशाहींतील सर्व भटांना त्या पीठासमोर मान नमवावयाला लावीन. एवढें सारें केलें नाहीं तर ही जाधवाची अवलादच नव्हे!" चंद्रसेनानें ब्राह्मणांच्या विरुद्ध आणखी कितीतरी गरळ ओकलें असतें. पण इतक्यांत कृष्णराव तेथें आला, त्यामुळें त्याला जीभ जरा आवरती घ्यावी लागली.

"काय कृष्णराव! सचीव काय म्हणतात?" चंद्रसेनानें विचारलें.

"सचिवांनीं आपली आज्ञा शिरसावंद्य केली." कृष्णराव म्हणाला, "पण सेनापतिसाहेब! आपलें एक चुकलें. आपण बाळाजीपंतांना आश्रय न देण्या-विषयीं सचिवांना हुकूम केला, त्याबरोबरच बाळाजीपंत हातीं लागल्यास त्यांना कैद करून ठेवा अशीही आज्ञा केली पाहिजे होती. कारण बाळाजी-पंत मी गडावरून सचिवांकडून परत येतांना मला वाटेंत भेटले."

"म्हणजे? सचिवांनीं माझा शब्द मोडून बाळाजीपंतांना आसरा दिला कीं काय?" चंद्रसेनानें भुंवया चढवीत विचारलें.

"छे! त्यांनीं त्यांना विन्मुख परतून लावलें खरें. तेवढ्यासाठींच मीं माझे दोघे बातमीदार पाळतीवर ठेवले होते. त्यांनीं तशी बातमी आतांच मी येतां येतां आणली. पण एकंदरींत सचीव तोंडपुजे—देखल्या देवाला दंडवत करणारे आहेत एवढं मात्र मीं ओळखलें."

"ते कसे काय?" चंद्रसेनानें विचारलें.

त्यांनीं बाळाजीपंतांना परतवून तुमची आज्ञा पाळली पण बाळाजीपंतांचें व त्यांच्या मार्फत शाहूमहाराजांचें मन राखण्यासाठीं आपला मुलगा नारो शंकर याला त्यांच्या बरोबर पाठविलें."

"याला म्हणतात भटी कावा!" चंद्रसेन उसळीसरसा म्हणाला. त्याच क्षणाला त्याची कृष्णरावाशीं दृष्टादृष्ट झाली तेव्हां त्याला कृष्णरावाचा चेहरा गोरामोरा झालेला दिसला. आपले शब्द त्याच्या मनाला झोंबले असावे असें चंद्रसेनाला वाटून त्यानें जीभ चावली, व झाली चूक सुधारून घेण्याचा प्रयत्न केला, "कृष्णराव! माझा हा आरोप तुम्हां देशस्थांना लागू नाहीं; मीं फक्त

चित्पावनांविषयीं बोललों. नाहीं तर उगीच तुम्ही ते शब्द तुमच्या मनाला लावून घ्यावयाचे."

कृष्णरावासारख्या क्षुद्र मनाच्या, स्वार्थी व स्वाभिमानशून्य माणसाला कोणाच्याही तोंडच्या पोकळ स्तुतीनें शेफारून जावयाला कितीसा उशीर! तो आधींच बाळाजीपंतांचा वाढता उत्कर्ष पाहून मनांत जळत होता; तशांत चंद्रसेनाच्या शब्दांनीं माकडाच्या हातीं कोलीत दिल्याप्रमाणें त्याची अवस्था झाली. बाळाजीपंत चित्पावन व आपण देशस्थ ह्या भेदभावाचें विष आधींच त्याच्या अंगीं भिनलेलें आल्यामुळें चंद्रसेनाच्या विषारी बोलांतील विष त्याला बाधलें नाहीं. अफू-चंडोलासारख्या घातुक व्यसनांच्या आधीन झालेल्या लोकांना संवयीनें त्या मादक विषारी पदार्थांचें विष बाधेनासें होतें, इतकेंच काय, एखादे वेळीं तलफेसरसा त्यांना अफू-चंडोल मिळाला नाहीं तर ते विषारी नागिणीला आपल्या मादलोलुप जिभेला दंश करावयाला लावून तिच्या खऱ्या-खुऱ्या विषावर आपली तलफ भागवितात, त्यांतली कृष्णरावाची अवस्था होती.

चंद्रसेनाच्या शब्दावर कृष्णराव उद्गारला, "तुम्ही खरें तें बोललां त्याबद्दल मीं कां रागवावें? पण आपणाला आतां लौकर पुढचा पल्ला गांठला पाहिजे."

"हो! तेंच मी आतां तुम्हांला सांगणार होतों." चंद्रसेन सर्जेरावाकडे वळून म्हणाला, "सर्जेराव! चला, उठा, तयारी करा."

सर्जेराव व कृष्णराव सैन्यांत जावयाला निघतात तोंच सर्जेरावाचे जे शिपाई बाजिरावाला कैद करून हंसत हंसत घेऊन गेले होते, ते हिरमुसल्या तोंडानें माघारे आले व सर्जेरावाला म्हणाले, "धनीसाहेब! पांचसात कुणबटांनीं आमच्यावर अचानक हल्ला करून आम्हांला मारहाण करून बाजिरावाला सोडवून नेलें!"

"काय, बाजीराव सुटला?" चंद्रसेनानें चमकून विचारलें, "आणि ही बातमी सांगायला तुम्ही जिवंत मुडदे एथवर आलां काय?"

"सरकार! आमचा नाइलाज झाला!" एक शिपाई खालच्या मानेनें म्हणाला. ताबडतोब सर्जेराव व कृष्णराव त्या शिपायाला आणखी शिव्या हांसडीत बाजिरावाच्या शोधासाठीं निघाले. पण पिंजऱ्यांतला राघू उडाला तो पुन्हा पिंजऱ्यांत थोडाच येतो!

## दर्शन सोळावें

## बोलईच्या डोंगरांत

बाळाजीपंतांनीं पुरंदरचा रस्ता धरतांना ज्या दहा शतवीरांना बाजीराव, व पिराजी, यशोदा वगैरे मंडळींच्या संरक्षणासाठीं मागें ठेवलें होतें, त्यांनीं अंगीकृत कार्यांत आपण यशस्वी होऊं तरी किंवा मरूं तरी अशी शपथ घेऊन बाळाजीपंतांना स्वसंरक्षणार्थ जावयाला निरोप दिला तेव्हांच त्यांतल्या पांचांनीं यशोदा, पिराजी, नाथाजी व पिलाजी यांच्या रक्षणार्थ जावें, व उरलेल्या पांचांनीं धाकट्या धनीसाहेबांच्या–बाजिरावाच्या जीविताचें संरक्षण करावें अशी आपसांत कामाची वांटणी केली होती. पैकीं यशोदा वगैरेंच्या रक्षणाची जबाबदारी शिरावर घेतलेल्या पांचांनींच भुलेश्वराच्या देवालयांत इस्माईलशीं दोन हात केले; पण त्यांत त्यांना यश आलें नाहीं. कारण एकतर इस्माईलच्या अनुयायांचा जमाव मोठा व दुसरें, खुद्द पिराजीच यशोदेविषयीं भलताच संशय घेऊन पिसाटासारखा शत्रूंच्या स्वाधीन झाला! त्या दंगलींत तीन शतवीर धारातीर्थीं पतन पावले तरीही यशोदा आणि पिराजी शत्रूच्याच स्वाधीन राहिलीं. बाजीरावही अवचित इस्माईलच्या हातीं सांपडला व चंद्रसेनाचा बंदिवान् झाला; पण बाजिरावाचें भाग्य–किंवा खरें बोलावयाचें तर मराठशाहीचें भाग्य-थोर, म्हणून बाजिरावाच्या रक्षणाची जबाबदारी शिरावर घेतलेल्या पांच शतवीरांची बाजिरावाला बंदिवान् करून नेणाऱ्या सर्जेराव घाटग्याच्या शिपायांशीं मार्गांत अवचित गांठ पडली, व त्या पांच वीरांनीं मोठ्या बहादुरीनें बाजिरावाची मुक्तता केली. त्या झगडण्यांत दोघे शतवीर बळी पडले, व जे तीन शिल्लक उरले, त्यांच्यासह बाजीराव ह्या अरिष्टाची शाहूमहाराजांना खबर देण्यासाठीं साताऱ्याकडे वळला, तो वाल्ह्याच्या सातरांजण डोंगरापर्यंत येऊन पोंचला. तेथें एका पडक्या झोंपडींत तो व त्याचे तिघे शतवीर यांनीं एक दिवस वस्ती केली, तरीही सर्जेरावाचे लोक त्यांचा पाठलाग करीत आलेच. त्यांच्यापासून आपला बचाव करण्यासाठीं दुसऱ्या दिवशीं रातोरात बाजिरावाला जवळच्या बोलईच्या डोंगराचा आश्रय करावा लागला. थोडक्याबर निभावलें, नाहींपेक्षां त्यांच्या

पाठीवर असलेल्या सैनिकांना त्यांचा नेमका सुगावा लागला होता. त्यांनीं ताबडतोब चढाई केली नाहीं याचें कारण ते सारे दहापांचच लोक होते व बाजिरावाबरोबर बरेंच सैन्य असेल अशी त्यांची अटकळ होती. त्यासाठीं जास्त कुमक मागविण्याकरितां म्हणून त्यांनीं एक सैनिक माघारा माळशिरसकडे पाठविला व आपण डोंगरा-सभोंवारच्या साऱ्या वाटा रोंखून बसले. आतां आपलें कसें व्हावयाचें या-विषयीं बाजीराव, कंठाजी वगैरेंना मोठी चिंता पडली. पण कंठाजी त्या प्रदेशाचा चांगला माहितगार असल्यानें बाजीराव शतवीरांसह रातोरात त्याच्या साह्यानें शत्रूच्या हातावर तुरी देऊन बोलईचा डोंगर गांठूं शकला. प्रथम त्याचा विचार डोंगरांतच आडोशाला एक गुहा होती तेथें एखादा दिवस राहून शत्रु निघून गेल्यावर पुढचा पल्ला गांठावयाचा होता. पण एक दिवस गेला, रात्र गेली तरी कंठाजी वगैरे शतवीरांनीं टेहळणी केली त्यावरून शत्रु तेथून हलण्याचीं कांहींच चिन्हें दिसेनात. नुसत्या डोंगरांत रहाण्याची तर सोय नाहीं व बाहेर जाण्याचे सर्व रस्ते रोंखलेले ! शत्रूचा सैनिक जो कुमक मागण्यासाठीं म्हणून गेला, तो चंद्रसेनाला भेटून इस्माईल व त्याचे पंचवीस साथीदार रोहिले यांना घेऊन आला. त्या सर्व मंडळीची कल्पना अशी कीं, बाजीराव वाल्ह्याच्या डोंगरांतच कोठेंतरी दडून बसला आहे, म्हणून ते तेथली नाकेबंदी करून त्याचा शोध करीत होते. ही शत्रूची धाड उठेतों बाजिरावाला बाहेर पडतां येणें शक्यच नव्हतें. सुदैवानें तेथें जवळच त्या डोंगरांत बोलईचें देवालय होतें व त्या देवालयाला जाण्याची अत्यंत अवघड वाट कंठाजीला माहीत होती, म्हणून त्याच्या साह्यानें बाजिरावाला त्या देवा-लयाचा आश्रय करितां आला. वाल्ह्याच्या आसपास नाकेबंदी करून बसलेल्या इस्माइलादि शत्रूंनाच काय पण खऱ्या माहितगाराशिवाय दुसऱ्या कोणालाही देवालयाची वाट सांपडणें शक्य नव्हतें. शिवाय इस्माईलही एका दैवी संकटामुळें हवालदील झाल्यामुळें बाजिरावाला हुडकून काढण्याच्या कामीं त्याच्याकडून साहाजिकपणेंच ढिलाई होऊं लागली होती. इस्माईलचा जहांगीर एकाएकीं आजारी पडला, व चंद्रसेनाच्या कृपाप्रसादानें त्याच्या मालकीची झालेल्या यशोदेचाही अपरिमित यातनांमुळें वाटेंतच गर्भपात झाला, तेव्हां त्याला बोलई डोंगराच्या वायव्येशीं असलेल्या त्याच नांवाच्या

खेड्यांत बिऱ्हाड करणें भाग पडलें. अशी संकटपरंपरा कोसळूं लागल्यावर त्याला आपली कामगिरी तरी कशी सुचणार ? त्यांतून तो बोलून चालून मुसलमान पडला. त्याला वस्तुतः बाजीराव हातीं लागला काय किंवा मेला काय, दोन्ही गोष्टी सारख्याच कवडीमोलाच्या होत्या. त्याला यशोदा पाहिजे होती व ती त्याला मिळाली होती. आतां ती आपणाला सामोपचारांनीं वश कशी होते एवढाच प्रश्न त्याच्यासमोर होता. आपला म्होरक्याच असा ढिला पडल्यावर त्याच्या साथीदारांना तरी बाजिरावाच्या शोधार्थ जिवाचें रान करण्याचें काय प्रयोजन होतें ! ते आजूबाजूला जुजबी पाहारा ठेवून सभोंवारच्या खेड्यापाड्यांत लुटालूट करण्यांत गढून गेले होते. अशी परिस्थिति असल्यानें बाजिरावानें बोलईचें मंदीर गांठलें, तें फार सुरक्षित ठिकाण होतें.

ठिकाण सुरक्षित मिळालें तरी तेथें दिवसांचे दिवस बसून करावयाचें काय व खावयाचें काय हा अवघड प्रश्न बाजिरावासमोर होताच. पण माणसावर प्रसंग पडला, कीं त्याला उपाय सुचतो. बाजीराव व त्याचे तिघे शतवीर बोलईच्या डोंगरांतील बोलईदेवीच्या पुरातन मंदिरांत रातोरात आले, तेव्हां—परमेश्वरच सत्पक्षाचा पाठीराखा असतो—तेथें एक म्हातारी आपलें भिकारसें बिऱ्हाड थाटून देवसेवा करून राहात असलेली त्यांना आढळली. त्या म्हातारीचा त्यांना केवढा मोठा आसरा मिळाला ! मोठा आसरा म्हणावयाचा एवढ्यासाठीं कीं एरव्हीं अशा रानांत व अशा अडचणीच्या वेळीं दुसऱ्या कोणाचा आसरा मिळणार ! अशा जंगलांत जेथें मी मी म्हणणाऱ्या वीरालाही एकाट्यानें एक दिवस वस्ती करण्याचें भय वाटावयाचें, तेथें ही एकटी म्हातारी कशी रहाते याचा बाजीराव वगैरे मंडळींला मोठा अचंबा वाटला. त्यांच्या मनांत अशीही शंका आली कीं, ही कोणी वेडी तर नसेल !

कंठाजीनें पुढें होऊन गरीबपणानें त्या म्हातारीच्याच पोटांत रिघून बोलण्यास सुरवात केली, "आजीबाई ! आजचा दिवस आम्हांला इथें ह्या देवालयांत आसरा द्याल का ?"

"तुम्ही कोण ?" म्हातारीनें विचारलें.

"आम्ही प्रवासी आहों. आम्हांला बोलईदेवीच्या दर्शनाला यावयाचें होतें. पण वाट ओळखीची नसल्यामुळें आम्ही मध्यंतरीं रस्ता चुकलों व

चालतां चालतां हे असे येथें येऊन पोंचलों. आजची रात्र आम्हांला विश्रांति पाहिजे आहे !" कंठाजी मुद्दाम खोटें बोलला.

पण म्हातारीनें तें ओळखलें. तिनें त्या चौघांकडेही नीट निरखून पाहिलें व उत्तर दिलें, "तूं खोटें बोलतोस. तुम्ही प्रवासी नाहीं. प्रवासी लोक शिधापाणी व धडधडोतीं बरोबर बाळगतील; अशीं तुमच्यासारखीं हत्यारेंपात्यारें कशाला बाळगतील ? मला तुमचा संशय येतो. तुम्ही त्या निमकहराम चंद्रसेन जाधवाचे शिपाई असाल. बाजिरावाला त्याच्या इतर साह्यकर्त्यांना पकडण्यासाठीं तुम्ही इकडे हिंडत असलां पाहिजे. तुम्हांला इथें मुळींच आसरा मिळायचा नाहीं."

म्हातारीचे हे बोल ऐकून सर्वांना मोठा अचंबा वाटला, कीं ह्या म्हातारीला इतक्या गुलदस्तांतील बातम्या कशा माहीत झाल्या ! यावरून आपणापैकींच कोणीतरी शतवीर किंवा शत्रूचे कोणी सैनिक आपल्या तपासासाठीं एथवर येऊन गेले असावे अशी त्यांना जबर शंका आली. त्या शंकेचें निरसन म्हातारीपासून करून घेण्यासाठीं त्यांनीं खरा प्रकार तिला नीट समजावून सांगितला व तो म्हातारीलाही पटला. ती बाजिरावाकडे निरखून पाहात म्हणाली, "तूंच बाजी काय ?"

"होय आजीबाई !" बाजीराव उत्तरला.

"मग बैस माझ्या बाळा ! इथें बैस. तुम्ही सर्वजण इथें रहा. हें देवद्वार आहे, ही कांहीं माझी वजनदारी नाहीं. पण तुम्हांला हातपाय धुवायला व प्यायला पाणी पाहिजे काय ?"

"होय आजीबाई !" बाजीराव म्हणाला.

"तर मग या माझ्या मागोमाग, मी तुम्हांला पाणी देतें." असें म्हणून म्हातारी हातीं एक दिवटी घेऊन देवालयापासून थोडया अंतरावर असलेल्या गुहेच्या तोंडाशीं आली, व 'आतां नीट माझ्या मागोमाग या' असें म्हणून गुहेंत शिरली. तिच्या मागोमाग बाजीराव व इतर तिघे शतवीर चालूं लागले. सुमारें पन्नास कदमांपर्यंत आंत जातांच गुहेला वळण होतें तेथून म्हातारी उत्तरेकडे वळली, ती तशीच आणखी बरेंच अंतर चालत गेली, बाजीराव वगैरे मंडळी मुकाटयानें तिच्या मागोमाग चालत होती.

"इथें हातपाय धुवा." म्हातारी तळ्याजवळच गुहेच्या भिंतींतील

कोनाड्यांत असलेल्या एका कोऱ्या मडक्याकडे बोट दाखवून बाजिरावाला म्हणाली, "तें मडकें कोरें आहे. त्यांतून तुला पाणी पिण्यासाठीं घ्यावयाला हरकत नाहीं." नंतर कंठाजी वगैरे बाकीच्या तिघांकडे वळून तिनें म्हटलें, "तुम्हांला प्यायला पाणी देवळांत आहे."

सर्वांनीं हातपाय स्वच्छ धुतले व बाजिरावानें मडकें पाण्यानें भरून बरोबर घेतलें. माघारे येतां येतां बाजिरावानें त्या गुहेंत दूरवर डोकावून पाहिलें पण कांहीं पत्ता लागेना. तेव्हां त्यानें म्हातारीला विचारलें, "आजीबाई! ही गुहा कोठवर दूर आहे?"

"भगवान् जाणे! मला माहीत नाहीं." म्हातारी उत्तरली. म्हातारीच्या उत्तरानें बाजिरावाचें समाधान कांहीं होईना. पण तो कांहीं बोलला मात्र नाहीं.

पुन्हा देवालयांत येतांच सर्वांचें पाणी पिणें झाल्यावर म्हातारीनें बाजीरावाला विचारलें, "तुम्हां सर्वांना भूक लागली असेल. ह्या तिघांना मी भाकरी भाजून वाढतें. तूं मात्र तुझ्यापुरती भाकर कर. करशील का?"

"हो! करीन" बाजीराव म्हणाला. हें उत्तर देतांना बाजिरावाला ह्या आपल्या दैवाच्या लीला पाहून हंसूं आलें. कंठाजी वगैरेंनाही अत्यंत विषाद वाटला. एवढा आपला धनी! ज्याच्या अन्नावर आपले पिंड पोसावयाचे, त्यालाच आज ह्या देवालयाच्या धर्मशाळेंत एका भिकारणीच्या आधारानें स्वतःच्या हातानें तिच्या पदरच्या पिठाचा तुकडा करून खाण्याची वेळ आली! पण त्यांचा तरी त्याला काय इलाज होता! बाजीराव ब्राह्मण पडला व ते पडले मराठे! त्यांच्या किंवा म्हातारीच्या हातचें अन्न बाजिरावाला थोडेंच चालणार होतें! बाजीरावही ह्या प्रसंगाला डगमगला नाहीं. प्रसंग कसाही बिकट आला, तरी तो तोलून नेण्याचें बळ उपजतच त्याच्या अंगीं होतें. तशांत ही आपली सेवा स्वामिचरणीं—श्रीशाहूमहाराजांच्या चरणीं रुजू व्हावयाची आहे व तिच्यांतूनच मराठशाहीचें मांगल्य उज्ज्वलतेला चढावयाचें आहे हें त्याला माहीत असल्यानें हे कष्ट सोसण्यांत त्याला कमीपणा किंवा दुःख न वाटतां उलट मोठेपणा व भूषण वाटलें.

म्हातारीनें ठावकीं व पीठ दिलें, चूल सारवून पेटवून दिली, व बाजिरावानें आपल्या हातानें भाकर तयार केली. कंठाजी वगैरेंसाठीं म्हातारीनें

निराळ्या चुलीवर रोडगे भाजले. ती कांदा-भाकर सेवन केल्यावर सर्वांना हुषारी आली. मग त्यांना त्या म्हातारीची चौकशी करण्याला फावलें.

"आजिबाई! तुम्ही कुठच्या कोण? आणि इथें ह्या जंगलांत अशा एकट्या कां राहतां? तुम्हांला घरदार, मूलबाळ कांहीं नाहीं का?"

हा प्रश्न ऐकून म्हातारीचा चेहरा एकाएकीं संतापानें लाल झाला. ती म्हणाली, "मला सर्व कांहीं होतें; पण तें सर्व गेलें. माझा सोन्यासारखा गडगंज संसार होता पण तो मातीला मिळाला. आतां त्याविषयींच्या गोष्टी बोलून काय करायच्या? माझ्या सुखासाठीं माझी द्रौपदी मला भेटविण्याचें कोणी कबूल करील तर त्याच्यापाशीं बोलून उपयोग. तूं मला माझ्या पोरीची भेट करवून देशील?"

बाजिरावानें आपल्या साथीदारांकडे वळून आश्चर्यपूर्वक विचारलें, "ही द्रौपदी कोण?"

"तें तिलाच विचारा तर खरें?" कंठाजी म्हणाला. बाजिरावानें विचारण्यापूर्वीच म्हातारी म्हणाली, "माझी द्रौपदी! त्या मेल्या मांगानें- त्या राक्षसानें—इस्माईलनें दोन वर्षांपूर्वीं माझी पोर पळवून नेली व तिला बाटवली! ती माझी द्रौपदी!" असें म्हणून म्हातारीनें रडत रडत आपली सर्व कहाणी निवेदन केली. बाजीराव वगैरे मंडळींनीं दोन वर्षांपूर्वीं असाच एक अत्याचार घडलेला प्रत्यक्ष डोळ्यांनीं पाहिला होता त्याच अत्याचाराची ही कहाणी. इस्माईलनें मराठ्याची मुलगी पळवून आणली होती ती हीच. त्या मुलीची आई दाद मागण्यासाठीं चंद्रसेनापाशीं रडत गेली असतांना चंद्रसेनानें तिला धुडकावून लावलें; ती म्हातारी आई हीच, व पिलाजी नाथाजी यांनीं इस्माईलाशीं झगडा केला तो ह्याच मायलेकींसाठीं. ह्या एकंदर प्रकाराची बाजिरावाला व इतरांनाही तंतोतंत ओळख पटली, तेव्हां त्यांना पराकाष्ठेचा खेद झाला.

"तेव्हांपासून तूं इथेंच आहेस?" बाजिरावानें विचारलें.

म्हातारी उत्तरली, "होय. माझें घर-दार-पोर-बाळ सर्व वाटोळें झालें. तेव्हांपासून मी ही इथें बोलईआईच्या पायांपाशीं येऊन राहिल्यें आहें. प्रथम कांहीं दिवस पायथ्याशीं असलेल्या खेड्यांत एका नातलगाच्या घरीं राहून भिक्षा मागून पोट भरीं. तेथें देव-दयेनें माझ्या द्रौपदीसारख्याच दोन

मुली मला सोबतीणी मिळाल्या होत्या. त्या दोघींनाही घर-दार कांहीं नव्हतें. त्याही माझ्यासारख्याच भीक मागून पोट भरीत. त्या बिचाऱ्या द्रौपदी-सारख्याच मुसलमानांच्या अत्याचारांत सर्वस्वाला मुकल्या होत्या. पण देवाला आमचें तेवढेंही सुख बघवलें नाहीं. तो नातलग सहा महिन्यांपूर्वीं मरून गेला व त्याच्या भाऊबंदांनीं त्या दोघी पोरींना मुसलमानांना विकून गब्बर होण्याचा घाट घातला तेव्हां त्या ज्या नुक्त्या आठ दिवसांपूर्वीं नाहींशा झाल्या त्यांचा पत्ताच नाहीं. त्या मेल्या लोकांना माझा संशय आला. मींच त्या पोरींना पळून जावयाला सांगितलें असें म्हणून त्यांनीं मला घराबाहेर घालवून दिलें. तेव्हां मी इथें येऊन राहूं लागल्यें. आतां रोज गांवांत जाऊन भीक मागून आणल्यें व त्यावर निर्वाह करून देवीची सेवा करत्यें." म्हातारीनें बोलतां बोलतां भडभडून आलेला शोकावेग आवरीत बाजिरावाला विचारलें, "आतां सांग, माझी द्रौपदी परत मला तूं आणून देशील का? मला तिची एकदां भेट तरी होईल का?"

"आजीबाई! परमेश्वराची कृपा झाली, तर सर्व कांहीं होईल." बाजीराव म्हणाला.

"परमेश्वर? परमेश्वर ह्या जगांत आहे तरी का? नाहीं रे बाबा! आजकाल ह्या जगांत परमेश्वर उरला नाहीं. देवळें आहेत, त्या देवळांत दगडाच्या मूर्ति आहेत, पण तिथें देखील परमेश्वर नाहीं. जगांत परमेश्वर असता तर करूं नये तसले अत्याचार करणाऱ्या मुसंड्या अरेरावांच्या मुंडी त्यानें केव्हांच मुर्गाळल्या असत्या. परमेश्वर असता तर परस्त्रियांवर व परधर्मी लोकांवर सर्रास जुलूम करून त्यांना धाय मोकलून रडवितां रडवितां स्वतां राजे म्हणून वैभवांत मिरवण्याची मुसलमानांची काय माय व्याली असती! आपलें मनाचें समाधान होत नाहीं म्हणून परमेश्वर परमेश्वर करायचें इतकेंच!"

यावर बाजीराव तरी काय बोलणार!

* * *

ती रात्र गेली, दुसरा दिवस उजाडला, कंठाजी गुप्त वेषानें शत्रूचा तपास करून आला, तरी शत्रूच्या गोटांतून मोकळीक होण्याची आशा दिसेना. असा एक दिवस गेला, दोन दिवस गेले, तीन गेले, चार गेले, आठ गेले तरी बाहेर जाण्याला मार्ग नाहीं. रोज त्या म्हातारीनें गांवांत जाऊन भिक्षा

मागून आणावी व तिच्यावर सर्वांनीं उपजीविका करावी, असे पहिले दोन दिवस गेले, पण त्या म्हाताऱ्या बायको-माणसानें आपणासारख्या मर्दांसाठीं राबावें हें शतवीरांना पसंत पडेना. तेव्हां तिसऱ्या दिवसापासून ते—कंठाजी, हैबती व वैकुंठा असे तिघेही भिकाऱ्याच्या वेषानें गांवांत जाऊन भिक्षा मागून आणूं लागले. भिक्षाही मागावयाची व शत्रूवर टेहळणीही करावयाची, अशीं दोन्ही कामें ह्या निमित्तानें त्या तिघांना करतां येऊं लागलीं. सुदैवानें त्यांना पांचव्या दिवशीं इस्माईलच्या खास गोटांत प्रवेश करतां आला, तेव्हां पिराजी व यशोदा अजून इस्माईलच्याच ताब्यांत आहेत, यशोदेला वश करण्यासाठीं इस्माईल तिचा फार छळ करीत आहे, पिराजीच्या छळाला तर सीमाच नाहीं, व एक दोन दिवसांत यशोदा आणि पिराजी धर्मांतर करण्याला राजी झालीं नाहींत तर त्यांच्यावर मोठा कठिण प्रसंग ओढवण्याचा संभव आहे अशी खबर त्यांना लागली. एवढा पत्ता तर लागला. पण त्या दोघांची मोकळीक कशी करावयाची याविषयीं कोणालाच कांहीं उपाय सुचेना. बरें; इतकी बातमी कळल्यावर यशोदा व पिराजी यांची मुक्तता करण्याचा प्रयत्न न करतां सातारा गांठावा हेंही बाजिरावाला रुचेना. पिराजीची व यशोदेची मुक्तता करण्याची संधि केव्हां येते याची वाट पहात बसावें तर तिकडे चंद्रसेन बाळाजीपंतांची केव्हां कशी वाट लावील याचा कांहीं भरंवसा नव्हता. आज सहा दिवस झाले, तरी तिकडे बाळाजीपंतांची काय गत झाली असेल याविषयीं कांहींच वार्ता बाजिरावाला कळली नव्हती. तसेंच त्याच्या कुमकेला देण्यांत आलेल्या शतवीरांपैकीं पांच पडले, तीन त्याच्या-बरोबर होते, पण राहिलेले दोघे हे कोठें आहेत, ते हयात आहेत कीं गेले याचीही वार्ता कांहीं कळेना.

आतां परमेश्वराचें नांव घेऊन पुढें पाऊल टाकावयाचें ह्या निश्चयानें बाजिरावानें आठव्या दिवशीं यशोदा वगैरे मंडळींच्या मोकळिकीची जबाबदारी इतर शतवीरांवर सोंपवून स्वतः साताऱ्याला शाहूमहाराजांकडे जावयाचें ठरविलें. बाजिरावाचा स्वभावच असा होता कीं, एकवार निश्चय झाला कीं तो कोणत्याही उपायांनीं तडीला न्यावयाचाच. त्यासाठीं त्यानें शतवीरांना कोणत्या बाजूला शत्रूचा पाहारा कमी ढिलाईचा आहे याचा निश्चित शोध करून यावयाला सांगितलें. दोन प्रहरीं शतवीर आपल्या त्या कामगिरीवर गेले व

बाजीराव एकटाच विचार करीत बसला होता. तोंच म्हातारी गुहेंतील तळ्या-वर पाणी आणण्यासाठीं गेली होती ती हळदी-कुंकवानें माखलेला एक नारळ हातीं घेऊन हंसत हंसत तेथें आली व तो बाजिरावासमोर ठेवून म्हणाली, "बाजी ! हा देवाचा प्रसाद घे."

"हा तुम्हांला कोठें मिळाला ?" बाजिरावानें विचारलें.

"मी तळ्यावर पाण्याला गेल्यें होत्यें तेव्हां पाण्यावर तरंगतें काय म्हणून पाहूं लागत्यें तों हा नारळ ! मनांत म्हटलें, इथें कोणी येत नाहीं कीं जात नाहीं, मग हा नारळ कुठचा ? तेव्हां हा देवाचाच प्रसाद असला पाहिजे." म्हातारी म्हणाली.

बाजिरावानें हा नारळ कोठून आला असावा याचा विचार केला; पण त्याला कांहींच कल्पना करतां येईना. तो तसाच उठून तळ्याच्या कांठीं गेला, व सभोंवार निरीक्षण करूं लागला, तों त्याला कांहीं पत्ता लागेना. तळें तर तेथल्या तेथेंच मर्यादित दिसत होतें. मग नारळ कोठून आला ? गुहा मात्र तेथून आंत अत्यंत दूरवर होती. ती किती दूरवर होती हें कोणालाच माहीत नव्हतें. तेथें आल्यापासून दुसऱ्याच दिवशीं बाजीराव व त्याचे सोबती यांनीं आंत दूरवर जाऊन तपास लावण्याचा प्रयत्न करून पाहिला तरी त्यांना अंत कांहीं लागला नव्हता. आंत जसजसें पुढें जावें तसतसा अंधार मी म्हणत असल्यानें अनोळखी माणसाला पुढें पाऊल टाकण्याचा धीरच होत नसे. त्यांतूनही बाजीराव पुढें जाण्याला धीटपणानें तयार झाला असता; पण न जाणो, आपण गुहेच्या दुसऱ्या टोंकाला पोंचावयाचे ते नेमके शत्रूच्या हातीं तरी सांपडावयाचे किंवा एखाद्या श्वापदाच्या भक्ष्यस्थानीं तरी पडावयाचे, ह्या भयानें त्याच्या साथीदारांनीं त्याला आवरून धरलें होतें. पण आज हा नारळ हातीं लागतांच बाजिरावाला पुन्हा गुहेचा तपास करण्याची इच्छा झाली. त्या इच्छेमागोमागच गुहेंतून आपण गेल्यास कांहीं संकट ओढवेल का, कांहीं अनर्थ होईल का, असे भीतिप्रद विचारही त्याच्या मनांत आले. शोध करण्याची इच्छा तर आवरेना व धीर तर होईना. तो तळ्याच्या कांठावर बसून तळ्यांतील संथ जलप्रवाहांत स्वतःचें अंधुक प्रतिबिंब पहातां पहातां, काय करावें व कसें करावें अशी बराच वेळ चिंता करीत होता. तेवढ्यांत तळ्याच्या बाजूनें एक औदुंबराचें फळ

तळ्यांत वहात आलेलें त्यानें पाहिलें तेव्हां तर त्याची जिज्ञासा कमालीची वाढली. ह्या तळ्याचा विस्तार फार मोठा असला पाहिजे व त्याच्या पैल-तीराला औदुंबराचा वृक्ष असला पाहिजे असा त्यानें तर्क केला. असा एक वृक्ष भुलेश्वरावरील तळ्याच्या कांठीं पाहिला असल्याचें त्याला आठवलें व तसें असल्यास आपण ह्या गुहेंतून थेट तेथें जाऊन पोंचूं शकूं असें त्याला वाटलें. पण दुसऱ्याच क्षणाला तो स्वतःशीं म्हणाला, "कुठें भुलेश्वर व कुठें बोलाईचा डोंगर!"

कांहीं असलें तरी आपण ह्या गहनगूढाचा शोध करावयाचाच अशा निश्चयानें बाजीराव अखेर आपली तरवार, भाला वगैरे आयुधें बरोबर घेण्यासाठीं म्हणून तडक देवालयांत आला.

"काय? कांहीं तपास लागला का?" म्हातारीनें विचारलें.

"नाहीं. पण तपास लावावयाचा." असें म्हणून बाजीराव सज्ज होऊन निघतो तोंच शत्रूकडील बातमी काढण्यासाठीं गेलेले कंठाजी व हैबती हे दोघे शतवीर तिसऱ्या एका माणसाला हळुहळू हाताशीं धरून चालवीत येतांना त्यानें दुरून पाहिले. तेव्हां प्रथम त्याला वाटलें कीं, वैकुंठा जखमी झाला, त्याला घेऊन हे दोघे येत आहेत. पण शतवीर जवळ जवळ येऊं लागले, तेव्हां त्यानें चौथ्या हैराण माणसाला ओळखलें. तो सुभानजी-यशोदेच्या मुक्ततेची जबाबदारी शिरावर घेऊन त्याप्रीत्यर्थ कामगिरीवर गेलेल्या पांच शतवीरांपैकीं एक होता. तो शुद्धींत नव्हता. त्याच्या सर्वांगावर असंख्य जखमा झाल्या असून त्यांतल्या कांहीं सुकलेल्या, कांहीं अर्धवट सुकलेल्या व कांहीं ओल्या होत्या. आंगांतील आंगरखा व मांडचोळणा यांचे बाभाडे निघालेले असून कपडे रक्तानें भिजून लाल झाले होते. कंठाजी व हैबती यांच्याही सर्वांगावर कांहीं जखमा व रक्ताचे डाग होते; पण त्यांची अवस्था सुभानजीच्या इतकी चिंताजनक नव्हती. त्या दोघांनीं सुभानजीला देवालया-समोरच्या पिंपळाच्या वृक्षाखालीं वाऱ्यावर एक घोंगडी आंथरून तिच्यावर निजविलें, तरी तो बेशुद्धच होता. त्याच्यासाठीं म्हणून म्हातारी धावत जाऊन पाणी घेऊन आली. सर्वजण त्याच्या मस्तकावर पाणी शिंपडून त्याला सावध करण्याच्या उद्योगाला लागले.

## दर्शन सतरावें

# बाजीराव निसटला !

"कंठाजी ! हा काय प्रकार आहे ? सुभानजीची अशी दशा कोणीं केली ?" बाजिरावानें विचारलें.

"धनीसाहेब !" कंठाजी एकीकडे सुभानजीच्या मस्तकावर पाणी शिंपडीत उत्तरला, "आम्ही चोरवाटांनीं परत येत असतां डोंगराच्या पायथ्याशीं पांच-सहा मुसलमान सुभानजीला एका वडाच्या झाडाच्या फांदीला उफराटा टांगून खालीं वणवा पेटवून त्याला भाजून ठार मारण्याच्या उद्योगांत होते. त्याचा आर्तस्वर आमच्या कानीं येतांच, व ह्या मुसंड्यांना पहातांच आम्हांला संशय आलाच कीं हे कोणातरी हिंदूला छळीत असावे. लगेच आम्ही त्या जागीं गेलों. पहातों तो सुभानजी ! ते राक्षस आम्हांला पहातांच 'काफिरोंकू काट डालो' असें ओरडत एकदम आमच्यावर तुटून पडले. आमच्या कमनशिबाची गोष्ट ही कीं त्यांत दोन हिंदूही होते. त्यांची आमची बराच वेळ चांगलीच लढत जुंपली होती. त्या लढतींत आम्हीं दोघां मुसलमानांना कापून काढलें, बाकीच्या तिघांचौघांना जखमी केलें, तेव्हां ते जीव घेऊन पळत सुटले. अर्थात् एवढ्या अनर्थांत आम्हां तिघांनाही जखमा झाल्याच. आम्हीं ताबडतोब सुभानजीला सोडवून उचलून घेतलें व एका चोरवाटेनें इकडे निघून आलों.—"

म्हातारीनें मध्येंच विचारलें, "आणि ते हिंदु मेले का ?"

"नाहीं. ते पळाले." कंठाजी म्हणाला.

"ते मेले मेले कां नाहींत !" म्हातारी म्हणाली. तिला संशय तिचा छळ करणाऱ्या दोघां घरवाल्यांचा होता.

"आणि वैकुंठा कुठें आहे ?" बाजिरावानें विचारलें.

कंठाजी उत्तरला, "आम्ही ज्या वाटेनें इकडे यावयाला निघालों, ती वाट शत्रूला माहीत असली तर शत्रू आमचा पाठलाग करीत येईल, त्याचा आम्ही दूर जाईतों प्रतिकार करण्यासाठीं वैकुंठा आमच्या वाटेच्या तोंडाशीं उभा राहिला आहे."

इतक्यांत सुभानजी हळुहळू शुद्धीवर येऊं लागला. त्याचा श्वासोच्छ्वास जोमाजोमानें वाहूं लागला. त्यानें एकवार डोळे उघडून सभोंवार पाहिलें. बाजिरावाची त्याच्याशीं दृष्टादृष्ट होतांच बाजिरावानें त्याला हांक मारली, " सुभानजी "

" धाकटे धनीसाहेब ! ": सुभानजी आपल्या आंगचें सारें मावळतें सामर्थ्य आपल्या वाणींत एकवटून म्हणाला, " आपण भेटलां; बरें झालें. मी तर आतां मरणारच. पण आपली भेट न होतां मेलों असतों तर शतवीरांच्या नांवाला काळोखी लागली असती. कीड-मुंगीच्या जगण्यामरण्याहून माझ्या जगण्यामरण्याची कांहीं जास्त किंमत नाहीं असें मग झालें असतें. असो. आपण आतां इथें एक क्षणभर देखील राहूं नका. असेच्या असे ह्या डोंगरापार कुठेंतरी निघून जा. शत्रूला आपला तपास लागला आहे."

" खरेंच ? " बाजिरावानें चिंतामग्न स्वरांत विचारलें, " कशावरून ? "

सुभानजी म्हणाला, मी आतां आलों तो थोरल्या धनीसाहेबांना पांडवगडावर सुरक्षित पोंचवून तेथून त्यांच्या सुरक्षितपणाची खबर आपणाला देण्यासाठीं म्हणून आपला शोध करीत आलों. "

" पण आम्ही ह्या डोंगरांत आहों असा तुम्हांला तरी तिकडे कसा तपास लागला ? " बाजिरावानें विचारलें.

" कसा तपास लागला म्हणजे ? आपले शतवीर झोंपा घेत आहेत अशी आपली कल्पना आहे कीं काय ? " सुभानजी अभिमानानें म्हणाला.

" बरें; थोरल्या धनीसाहेबांकडील खबर काय ? "

" खबर काय सांगूं ? थोरले धनीसाहेब व अंबाजीपंत पुरंदरे सचिवांचा पुत्र व छोटे धनीसाहेब यांना बरोबर घेऊन शतवीरांसह पुरंदरहून निघाले ते परिंच्यापर्यंत सुखरूप गेले. पण सेनापति त्यांचा पाठलाग करीत होताच; त्यांच्या पांचशें सैन्याच्या एका तुकडीसह सर्जेरावानें परिंच्याला आमच्या सैन्यावर छापा घातला. त्या लढाईंत आपले सुमारें चाळीसपन्नास शतवीर धारातीर्थीं पतन पावले—"

" अरेरे ! " बाजीराव हळहळूं लागला.

" त्यांत काय आहे धाकटे धनीसाहेब ! त्यांत एवढें हळहळण्यासारखें काय आहे ? आपले शतवीर मेले खरे पण ते शत्रूच्या दोन-तीनशें सैनिकांना

कापून व आमच्या पक्षाला विजयी करून मग मेले. आम्हांला—मला व यादवजीला—कोणीं सांगितलें कीं, इस्माईल आपणाला, यशोदेला कैद करून परिंच्याला जाऊन राहिला आहे; म्हणून आम्ही चपळाई करून तेथें गेलों. तों तेथें हा निराळाच प्रकार! तिथें जातांच आमच्या जिवाची जी काय त्रेधातिरपिट उडाली, ती विचारूं नका. शत्रूचा तात्पुरता मोड करून आम्ही गडावर चढूं लागलों तो गडकरी आम्हांला वर चढूं देईना. आम्हीं त्याची परोपरीनें समजूत घालून पाहिली पण कांहीं इलाज चालेना. शाहू-महाराजांची परवानगी आणा तर वर या असें त्यानें स्पष्ट सांगितलें. आतां शाहूमहाराजांची परवानगी आणणार केव्हां आणि तोंवर शत्रूच्या जबड्यांत उघड्या पठारावर रहावयाचें कोठें! पण गडावरच्या दुय्यम गडकऱ्याशीं माझी चांगली जानपछान होती, त्याला मीं वळवून आमच्या बाजूला घेतलें व रातोरात गडकऱ्याचे मेणे आणवून त्याच्याच कबिल्याची नेआण चालली आहे असा बहाणा करून सर्वांना सुरक्षितपणें गडावर पोंचतें केलें. पण हा आमचा डाव उजाडल्यावर कदाचित् उघडकीला येईल, व न जाणो, गडकरी आपल्या मर्जीविरुद्ध ही कारवाई चालली आहे म्हणून चिडून धनीसाहेबां-सह सर्वांना पकडून सेनापतींच्या स्वाधीन करील, या भयानें शाहूमहाराजांचें गडकऱ्यावर आज्ञापत्र आणण्यासाठीं मी, यादवजी व अंबाजीपंत पुरंदरे असे तिघे रातोरात दुय्यम गडकऱ्याचे तीन उमदे घोडे घेऊन साताऱ्याला गेलों. महाराजांना हा वृत्तान्त कळतांच ते फार संतापले. त्यांनीं लगेच 'सेनाकर्त्यांना गडावर आश्रय द्यावा' असें आज्ञापत्र गडकऱ्याला लिहून तें माझ्या हातीं दिलें व सेनापतींच्या नांवानें 'सेनाकर्त्यांच्या वाटेस जाऊं नये. त्यामुळें आमचा तुमच्यावर रोष होईल. तुम्हीं ताबडतोब मोहीम सोडून माघारे यावें' असें अलाहिदा आज्ञापत्र लिहून ते यादवजीच्या स्वाधीन केलें. 'सेनापति मदांध झाला आहे; तो आपलें आज्ञापत्र जुमानणार नाहीं' असें अंबाजीपंतांनीं महाराजांना समजावून सांगितलें; व जर तसें झालें, तर सेनापतींचा बंदोबस्त कसा करावा याचा विचार करण्यासाठीं अंबाजीपंत मागें राहून आम्ही दोघेही मागच्या पावलीं माघारे पांडवगडाला यावयाला निघालों ते उजाडतें न उजाडतें तों तेथें जाऊन पोंचलों. मग मोठ्या चतुराईनें गुप्तवेषानें गडावर चढून मी गडकऱ्याला आज्ञापत्र दाखवितांच त्यानें तें

बिनतक्रार मान्य केलें व त्या एका गोष्टीपुरते आम्ही सर्व निर्घोर झालों. पण—!" सुभानजी मध्येंच अडखळला. त्याच्याच्यानें पुढें बोलवेना. त्याचा कंठ दाटून आला. त्यांतच त्याच्या शारीरिक निर्बलतेची भर पडली होती.

"सुभानजी! तुला अशक्तपणा फार आला आहे, तूं जरा सावकाशीनें बोल." कंठाजी म्हणाला.

सुभानजी थोडा वेळ विश्रांति घेतल्यावर पुन्हा बोलूं लागला, "आम्ही दोघे पांडवगडावर जाऊन पोंचतों न पोंचतों तोंच सेनापति, सर्जेराव घाटगे व कृष्णराव प्रतिनिधि हें त्रिकूट आपल्या सैन्यासह किल्ल्यासभोंवार गराडा घालून बसलें होतें. यादवजी महाराजांचें आज्ञापत्र घेऊन सेनापतीकडे गेला; तेव्हां सेनापतीनें तें आज्ञापत्र वाचून पाहून संतापानें पायांखालीं तुडविलें व महाराजांविषयीं बोलूं नयेत तसलीं दुरुत्तरें बोलून कृष्णराव प्रतिनिधींच्या हातीं 'महाराज जर सेनाकर्त्यांना पाठीशीं घालतील, तर आम्हांला महाराजांचे पाय अंतरतील. ह्या गोष्टींत महाराजांनीं मन घातल्यास तें मराठशाहीच्या अनिष्टाला कारण होईल'. असा उद्दामपणाचा जबाब महाराजांना पाठविला."

"आणि यादवजीचें पुढें काय झालें?" बाजिरावानें विचारलें.

"त्याला सेनापतीनें तेथल्या तेथें ठार मारलें!" सुभानजी उतरला.

यादवजीचा अशा रीतीनें नाश झाला हें ऐकून सर्वांना पराकाष्ठेचें दुःख-ही झालें व संतापही आला. कोणाच्याही तोंडून शब्द निघेना.

"धाकटे धनीसाहेब! आमच्या कर्माची ही अशी कहाणी आहे. थोरले धनीसाहेब गडावर सुरक्षित आहेत व अजूनही पांच पन्नास शतवीर त्यांच्या सभोंवार आपल्या देहाचा कोट उभारून उभे आहेत हें खरें; पण शत्रूचें बळ अफाट आहे. शत्रु केव्हां काय करील याचा नियम नाहीं. गडावरचें सैन्य व शतवीर मिळून गडावर टिकाव धरून आहेत. पण बाहेरून कुमक गेल्या-शिवाय त्यांचा तरणोपाय नाहीं. यास्तव थोरल्या धनीसाहेबांनीं मला आपला शोध करून आपणांला निरोप देण्यासाठीं पाठविलें आहे, कीं अंबाजीपंत साताऱ्याला महाराजांकडे गेलेच आहेत व तुम्हीही जा; आणि कुमक पाठविण्यासाठीं महाराजांना विनवून सांगा. हा निरोप सांगण्यासाठीं मी धावपळ करीत एथवर आलों.—"

इतक्यांत वैकुंठा धावत धावत देवालयांत आला व म्हणाला, "धाकटे

धनीसाहेब ! आतांच्या आतां ही जागा सोडून चला. इस्माईलच्या शिपायांना आपला सुगावा लागला असून ते मोठ्या जमावानें इकडे चालून येत आहेत. चला ! उठा ! निघा अगोदर ! इथें एक क्षणभरदेखील थांबूं नका."

शत्रु पाठलाग करीत असल्याची वार्ता ऐकून सर्वजण बुचकळ्यांत पडल्यासारखे झाले. पण आतां विचार करीत बसण्यालादेखील वेळ नव्हता. बरें, जावयाचें तर कोठें जावयाचें ! डोंगराच्या सभोंवार शत्रूच्या सैन्याचा पहारा होता, व शत्रूला कळणार नाहीं अशी एकच चोरवाट—ज्या वाटेनें गेले सात-आठ दिवस ही मंडळी ये जा करीत होती, तीही शत्रूला कळून चुकली होती. आतां जागच्या जागीं रहावें किंवा शत्रूवर चालून जावें तर सरळ मृत्यूच्या जबड्यांत उडी घालण्यापलीकडे त्यांत कांहींदेखील अर्थ नव्हता. बाजीराव व त्याचे हे तिघे शतवीर अतुल पराक्रमी होते खरे; पण प्रतिपक्षाच्या संख्या-बलासमोर त्यांचा टिकाव लागणें सर्वथैव अशक्य होतें. आतां नशिबाचा खेळच पहावयाचा म्हणून त्या गुहेंतून पलीकडे जाण्याचा प्रयत्न करून पाहावा असा निर्वाणीचा उपाय बाजिरावानें सुचविला, व तो इतरांना मान्यही झाला. तो मान्य न करून तरी काय करणार ! पण सुभानजीची काय व्यवस्था करावयाची हा त्यांच्यासमोर मोठा प्रश्न होता. त्याला चालतां येण्याजोगें नव्हतें इतकेंच नव्हे, तर त्याला उचलून नेण्याचीदेखिल सोय नव्हती. त्याची प्रकृति इतकी क्षीण झाली होती कीं, आणखी जरासा धक्का लागला किंवा त्रास झाला तर तो जो उद्यां मरावयाचा तो आज मरावयाचा !

" आजीबाई ! तुम्ही ह्या तुमच्या मुलाला संभाळाल का ?" बाजीराव सुभानजीकडे बोट दाखवून म्हातारीला म्हणाला, " एवढे उपकार जर तुम्हीं आमच्यावर केले तर आम्ही तुमच्या मुलीची काय वाटेल तें करून तुम्हांला भेट करवून देऊं."

म्हातारी तशी सुज्ञ होती. प्रसंगाचें महत्त्व तिला कळत होतें. तिनें सुभानजीला सांभाळण्याचें आनंदानें कबूल केलें. इतकेंच काय, पण तिचें डोकें याच्याहीपुढें चाललें. तिनें बाजिरावाला विचारलें, " ही एक दुखणाईत माणसाची व्यवस्था झाली. पण समजा, मुसंडे तुमचा तपास करीत इथें आले व गुहा पाहून त्या वाटेनें तुम्ही पळालां असाल असा संशय घेऊन गुहेंत घुसले, तर कसें होईल ?"

" खरेंच ! " कंठाजी म्हणाला. तसें झालें तर कसें करावयाचें याचा सर्वांनाच पेंच पडला.

म्हातारी म्हणाली, " त्यासाठीं मी सांगत्यें तशी युक्ति करा. गुहेच्या तोंडाशीं दगड आहेत ते सगळे लाघून झपझप नीट रचा व मग आंत जा. मी ह्या माझ्या सरपणाच्या मोळ्या त्यावर मग रचत्यें. म्हणजे कुणाला-देखील संशय यायचा नाहीं. तुम्हांला परत यायचें झालें तर कांहीं दगड लोटून यायला अडचण पडणार नाहीं."

म्हातारीची ही युक्ति सर्वांना सोळा आणे पटली. लगेच कंठाजी, हैबती व वैकुंठा देवाचें नांव घेऊन गुहेच्या तोंडाशीं दगड रचूं लागले. म्हातारी जास्त देवभोळी, म्हणून तिनें पाहिला शकुनाचा दगड स्वतः देवालयाच्या आंगणांतून उचलून गुहेच्या तोंडाशीं नेऊन टाकला. तिच्या मागोमाग बाजिरावानें सर्व नको नको म्हणत असतां एक मोठी शिला उचलून गुहेच्या तोंडाशीं ठेवली.

" धनीसाहेब ! आपणाला जर असलीं कामें करावीं लागलीं, तर आम्ही आपले सेवक आपल्याबरोबर रहावयाचे ते कशासाठीं ? " कंठाजी म्हणाला.

बाजीराव दुसरा दगड उचलतां उचलतां म्हणाला, " कंठाजी ! धनी आणि सेवक हें नातें घरीं; इथें त्याचें काय ? इथें तुम्ही आम्ही सारेच आमच्या धन्याचे-शाहूमहाराजांचे सेवक आहों. महाराजांच्या राजवटीचा पाया रचण्याची कामगिरी सध्यां आपण पत्करली आहे. ह्या पायावर हिंदवी-स्वराज्याचें भव्य मंदिर बांधावयाचें तें पुढेंच आहे. तुम्ही शतवीरांनीं हा पाया रचण्यासाठीं आपल्या रक्त-मांसाचा चिखल मळून दिला, मग त्या चिखलांत पायाचे दगड रोवण्याचें काम देखील जर मीं केलें नाहीं, तर मी माझ्या मायभूमीच्या—ह्या महाराष्ट्रभूमीच्या सेवेंत कुचराई केल्याच्या पापाचा धनी होणार नाहीं काय ? "

" आपण असें म्हणूं लागल्यावर आमचें बोलणेंच खुंटलें ! " कंठाजी म्हणाला.

सर्वांनीं दगड रचावयाला घेतल्यावर गुहेचें लहानसें खिंडारें तोंड बुजवलें जाण्याला कितीसा उशीर लागणार ! हां हां म्हणतां तें बुजालें. आतां जेम-तेम एका माणसाला उडी मारून आंत जातां येईल एवढी खिंड मोकळी होती,

तिच्यांतून प्रथम बाजीराव व मागाहून कंठाजी, हैबती आणि वैकुंठा हे उड्या मारून आंत गेले. लगेच म्हातारीनें त्या खिंडीवर आपल्या सरपणाच्या मोळ्या व गोंवऱ्या रचून तिथें गुहा होती कीं नव्हतीशी करून सोडली.

अगदीं थोडक्यांत निभावलें. म्हातारी माघारी वळून देवालयांत येते न येते तोंच शिकारी चित्ते सावजाच्या वासानें धांवत यावे त्याप्रमाणें इस्माईलचे दहा-बारा लोक तेथें धावत आले. त्यांचा पायरव ऐकूं येतांच सुभानजीनें म्हातारीला मंडळींचा पत्ता न सांगण्याविषयीं बजावून आपलें तर मरण आतां ओढवणारच हें ओळखून देवाचें नांव घेण्याला सुरुवात केली. म्हातारी आपली देवीच्या पुढ्यांत बसून जणुं काय आपणाला कांहींच माहीत नाहीं असें भासविण्यासाठीं भिक्षा मागून आणलेलें धान्य निवडीत बसली होती. मुसलमानांनीं तेथें येतांच प्रथम सुभानजीला विव्हळत पडलेला पाहिला, त्याबरोबर त्यांना विलक्षण चेव आला. आपण आतां ह्या हिंस्र पशूंच्या तडाक्यांतून वांचत नाहीं याविषयीं सुभानजीला तिळप्राय शंका नसल्यानें, व एरव्हींही आपण यापुढें जगूं शकणार नाहीं अशी त्याची खात्री असल्यानें उद्यां मरावयाचें तें आज मरावयाचें असा मनाचा विरंगुळा करून बेफिकीर होता. त्याला मरणाचें भय वाटलें असतें पण केव्हां ! त्यानें अंगीकारलेलें कार्य त्याच्या हातून पूर्ण न होतां त्याला मरण आलें असतें तर ! तें कार्य त्याच्या हातून नुक्तेंच पूर्ण झालें होतें व आतां मरण्यांत त्याला एक प्रकारचा अभिमान वाटत होता. त्याला मरणोन्मुख स्थितींत पहातांच एथवर धावून आलेल्या मुसलमानांना चेव येणें व त्याचा बळी घेण्याच्या आसुरी स्फूर्तीचा संचार त्यांच्या ठायीं होणें क्रमप्राप्तच होतें. बोलूनचालून ते मुसलमान ! तशांत इस्माईलसारख्या बाटग्या बद्कर्तबगाराच्या खास देखरेखीखालीं दीनदुबळ्या व बायाबापड्या हिंदूंना कसें छळावें याचें शिक्षण त्यांना मिळालेलें ! हाच सुभानजी उभा होता तेव्हां त्यानें अशा तीन-चार मेणकट मर्दांना हां हां म्हणतां लोळविलें होतें. आणि तेव्हां सर्वांनीं मिळून त्याला एकट्याला घेरून जिवंत जाळण्याचा डाव तरीही रचिला; तेवढ्यांत कंठाजी, हैबत्या व वैकुंठा ह्या तिघां शतवीरांनीं एका झपाट्यांत त्यांच्या डावाचें तिरपागडें करून सोडलें होतें. पण तेव्हां भागूबाईप्रमाणें भिऊन पळालेले हे धेंदाड शिपाई तोच सुभानजी असहाय स्थितींत पडलेला पाहून पुन्हा

सोईस्कर रीतीनें पिसाळले व त्याच्यावर एकदम तुटून पडतां पडतां जंबूक-गर्जना करूं लागले, " वो देखो बदमाष काफिर मिला ! इस्कू काटो."

" काटो ! काटो ! नामर्द भागूबाईनो ! काटो ! अहारे बेहिंमती षंढ ! मी जर उभा असतों तर कांकडीसारख्या तुमच्या गर्दना काटल्या असत्या ! पण आतां मी दुबळा-पंगू होऊन तुमच्या तावडींत सांपडलों आहें. तरीही कांहीं हरकत नाहीं. माझें कार्य मीं केलें; आतां मरण्याला मी आनंदानें तयार आहें. काटा ! मला खुशाल काटा ! " सुभानजी मोठ्या कष्टानें उद्गारला.

सुभानजीचे हे अपमानकारक उद्गार ऐकून सर्व मुसलमानांच्या अंगाला आग लागल्यासारखी झाली. त्यांनीं आपल्या तलवारी एकदम सुभानजीच्या छातींत खुपसल्या; पुन्हा काढल्या, पुन्हा खुपसल्या ! सुभानजीनें पवित्र रामनामाचा मुखावाटे उच्चार करीत प्राण सोडला, तरी ते मुसलमान आपले त्याच्या शवावर मोठ्या आवेशानें तरवारीचे वार करीत होतेच !

सुभानजीची अशी वाट लागल्यावर त्या सर्व मुसलमानांची वक्रदृष्टि म्हातारी-कडे वळली. त्यांच्या म्होरक्यानें पुढें होऊन म्हातारीला दरडावून विचारलें," ए बेवकूब गद्धी ! तुला तुझी जात बचावावयाची असेल तर बऱ्या बोलानें सांग, वो बम्मनका बच्या बाजीराव कहां है ? "

" बाबांनों ! कुठचा बम्मन व कुठचा बाजी, मला काय माहीत ? " म्हातारी साळसूदपणानें कावरीबावरी मुद्रा करून कानावर हात ठेवीत म्हणाली.

" हरामजादी ! तुम् झुटी है ! " दुसरा मुसलमान म्हातारीवर तरवार उगारीत म्हणाला, " मुकाट्यानें खरें सांग ! तो बाजी व ह्या मुडद्याला एथें घेऊन येणारे ते तिघे मुर्दाड मराठे कोठें गेले ? "

" बाबांनों ! मला काय माहीत ? " म्हातारी जास्तच कावरीबावरी होऊन पण त्यांतही प्रसंगावधान राखून गुहेच्या थेट विरुद्ध दिशेला बोट दाखवीत उत्तरली, " आतां कोणसे तिघे चौघे लोक ह्या माणसाला इथें टाकून ह्या बाजूला डोंगरांत पळत गेले खरे ! "

" कोणत्या बाजूला ? ह्या बाजूला ? " म्होरक्यानें त्याच दिशेकडे बोट दाखवीत विचारलें.

" होय. तिकडेच कुठेंसे पळाले खरे ! " म्हातारी भीतीनें कांपत कांपत उत्तरली.

लगेच त्या म्होरक्यानें आपल्या शिपायांना त्या दिशेला दवडलें. इतक्यांत पूर्वीपासून ह्या अत्याचारांत सामील असलेले दोघे मराठे तेथें आले. त्यांनीं म्हातारीला पहातांच ओळखलें व तिनेंही त्यांना ओळखलें. लगेच त्यांनीं त्या टोळीच्या म्होरक्यापाशीं म्हातारीची चुगली केली, व तिला सर्व प्रकार माहीत असावा असे त्याचे कान फुंकले. म्हातारीनें त्यांना ओळखलें. ते तिचे छळवादी घरवाले रंभाजी व संभाजी होते. पण भीतीनें म्हातारी कांहीं बोलूं शकली नाहीं; मनांत मात्र त्यांच्या नांवानें जळूं लागली. व म्हातारीपासून आणखी कांहीं सुगावा लागला तर पाहावा त्या इराद्यानें तो म्होरक्या तिला जास्त धाकदपट देऊन तिला बाटविण्याची व ठार मारण्याची दहशत घालून तिला कबूल करवूं लागला. त्याची दहशत वस्तुतः पोकळच होती; म्हातारीच्या बावळटपणानें व घाबरटपणानें त्याच्या मनांत तरी तिच्याविषयीं बरीच अनुकंपा उत्पन्न केली होती. पण तो जात्याच मुसलमान पडला; त्याची ती क्रूर मुद्रा, ते लाल डोळे व तोंडची पोकळ बढाई पाहून म्हातारीला मात्र वाटलें, कीं हा आतां आपणाला खरोखरीच ठार करणार ! अशा वेळीं तिला आपल्या जीविताच्या सुरक्षिततेविषयीं धास्ती वाटणें ओघानेंच प्राप्त होतें. ती वेळीं बाजीराव वगैरे मंडळींचा खरा पत्ता सांगून स्वतःच्या प्राणांवर बेतलेलें संकट निवारण करण्याचा प्रयत्न करती असती; पण एकतर ती आतांच खोटें बोलून अडकून पडली होती. आतां खरें म्हणून सांगूं जावें व त्यामुळें आपल्या खोटेपणाचें प्रदर्शन होऊन त्या मुसंड्यांनीं इथल्याइथेंच आपली मुंडी छाटली तर काय घ्या ! आणि खरें सांगून तरी आपण जिवंत सुटूं याचा काय भरंवसा ! इतकी अंतःकरणांत भीतीनें कालवाकालव उडवून दिल्यावर व मृत्यु मूर्तिमंत समोर उभा दिसत असल्यावर इहलोकचा सारा कारभार आवरता घेतांना जीवाचा आपल्या जीवरक्षणाकडे जितका ओढा असतो, त्याच्या खालोखाल त्याचा आपल्या प्रियतम वस्तूकडेही ओढा असतो. ह्या न्यायानें म्हातारीचें प्रियनम जगांत आतां एकच उरलें होतें, तें हें कीं, माझी द्रौपदी मला एकदां भेटावी ! आणि म्हणूनच मुसलमानांचा म्होरक्या तिला जेव्हां ठार करण्याची धमकी घालूं लागला, तेव्हां तिनें त्याचे पाय धरून त्याला विनविलें, "बाबांनो ! तुम्ही मला ठार मारणार तर मारा, पण अगोदर माझी द्रौपदी मला एकवार भेटवा !"

"ही तुझी द्रौपदी कोण?" म्होरक्यानें ओघानेंच विचारलें.

म्हातारीनें तिला जेवढा वृत्तान्त कळला होता तेवढा त्याला नीट समजावून सांगितला. आज पांच-सहा दिवस लतिफा गांवांतून गल्लोगल्लीं भीक मागणाऱ्या एका भिकारणीला भेटण्याला अधीर झाली होती व जो कोणी भेटेल त्याच्यापाशीं घडींघडीं ती 'माझी आई मला एकदां भेटवा हो!' अशी ओरडत सुटे. ती आजारी असल्यानें वाताच्या झटक्यांत कांहीं तरी बरळते असा सर्वांचा समज होऊन सर्वजण तिकडे कानाडोळा करीत होते. पण आतां जेव्हां म्हातारीनें सारा वृत्तान्त निवेदन केला, तेव्हां त्या म्होरक्याची खातरजमा झाली कीं, ही लतिफेची आई आपल्या इस्माइलाची सासू! एवढें कळल्यावर तिला कोण कशाला मारतो!

बाजीराव वगैरे मंडळींच्या तपासासाठीं गेलेले मुसलमान तेवढ्यांत जसे हात हालवीत गेले तसे हात हालवीत परत आले. आतां हें पराजयाचें काळें झालेलें तोंड इस्माईलला कसें दाखवावें अशी त्यांना चिंता पडली होती. पण म्हातारी ही लतिफेची आई आहे व तिला इस्माईलसमोर नेऊन उभी केल्यास त्याच्या लतिफेचा आळ अनायासें पुरविला जाऊन आपल्यावर त्याचा घुस्सा व्हावयाचा वेळीं टळेल, निदान फारसा घुस्सा व्हावयाचा नाहीं, अशा उमेदीनें त्यांना तेवढेंच समाधान वाटलें. ते सर्वजण म्हातारीला घेऊन आपल्या गोटांत जावयाला निघाले. मात्र जातांजातां समोरची निरुपद्रवी बोलईदेवी पाहून, हा फत्तर आपलें काय शासन करण्याला अथवा आपला प्रतिकार करण्याला असमर्थ आहे अशी त्यांची अनुभवजन्य खात्री असल्यामुळें; त्यांनीं त्या देवीच्या मूर्तीवर अत्याचार करून तिला ओढून, पाडून, लाथांखालीं तुडवून व तिच्यावर थुंकून आपल्या मुसलमानी पराक्रमाचे टेंभे पाजळण्याला कमी केलें नाहीं. म्हातारीनें त्यांना देवीची अशी विटंबना न करण्याविषयीं परोपरीनें विनवून सांगितलें; पण तिचें कोण ऐकतो!

## दर्शन अठरावें

# ऋद्धि-सिद्धि कोठें गेल्या ?

खंडोबाच्या देवालयांतील अत्याचार घडल्याला आज आठवा दिवस ! ह्या आठ दिवसांत परमेश्वराच्या कृपेनें व स्वामी आणि त्यांच्या ऋद्धि-सिद्धि यांच्या अविश्रांत श्रमांनीं पिलाजी, नाथाजी व व्यासराव यांचा पुनर्जन्म झाला होता. पिलाजी व नाथाजी आतां बाहेरच्या जगांत जाण्याला अत्यंत उतावीळ झाले होते, व स्वामींनींही त्यांना आज बाहेर पाठविण्याचें कबूल केलें होतें. व्यासरावाला मात्र जरी आराम पडूं लागला होता, तरी त्याचें वेड कायमच होतें.

ह्या आठ दिवसांत आपण कोठें आहों, आपणाला इथें कोणीं आणलें व आपली सेवाशुश्रूषा करणाऱ्या ऋद्धि-सिद्धि ह्या कोणाच्या कोण, हें जाणण्याची नाथाजी आणि पिलाजी यांनीं शक्य तेवढी खटपट केली; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नव्हता. त्यांनीं रोज रोज स्वामींना ह्याविषयीं विचारावें पण स्वामींनीं 'यथाकालीं सर्व कांहीं समजेल' असें सांगून त्यांना गप्प बसवावें; व स्वामी आपले प्राणदाते आहेत, ते कोणतीही गोष्ट करीत असतील ती आपल्या कल्याणाचीच करीत असतील असा त्या दोघांचाही स्वामींच्या ठायीं दृढ विश्वास बसल्यामुळें त्यांना स्वामींच्या शब्दावर बोलण्याचें धाडस होऊं नये. नाहीं म्हणायला त्यांनीं स्वामींपाशीं यशोदा, बाजीराव व बाळाजीपंत वगैरे मंडळींची चौकशी मात्र रोजच्या रोज करावी; व स्वामी काय खबर देतील ती ऐकून स्वस्थ बसावें. स्वामी पहिल्या दिवशीं यशोदेचा तपास करण्यासाठीं म्हणून बाहेर गेले ते तपास लागत नाहीं अशी बातमी घेऊन आले. त्यानंतर रोज त्यांनीं बाहेर जावें व कांहीं ना कांहीं खबर आणावी, पण ते खबर कोठून आणतात याचा नाथाजी व पिलाजी यांना मात्र कांहींच सुगावा लागत नसे. त्या दोघांनीं ऋद्धि-सिद्धींशीं मधून मधून बोलण्याचा प्रयत्न करावा; पण त्यांनीं होय किंवा नाहीं अशा तुटक्या उत्तरावरच त्यांची संभावना करावी. त्या कधीं त्यांच्या पैकीं कोणाशीं जास्त बोलत नसत किंवा त्यांच्यासमोर आपल्या मुखमंडला-वरचा बुरखाही दूर करीत नसत. अशा स्थितींत नाथाजी व पिलाजी यांनीं

बोलावयाचें तें फक्त व्यासरावाशीं. पण पहिल्या तीन दिवसांत व्यासराव नीटसा शुद्धीवरच नव्हता आणि नंतर तो शुद्धीवर आला तरी यशोदा व कृष्णा यांना हांका मारावयाचा व कृष्णाचा घात करणारे नाथाजी आणि पिराजी हे दोघे 'हरामखोर' ठार झाले किंवा नाहींत याची चौकशी करावयाचा. ते दोघे समोर दिसले कीं, त्याच्या सर्वांगाचा तिळपापड व्हावयाचा. अखेर ह्या त्रासाला कंटाळून स्वामींनीं नाथाजी व पिलाजी यांना तेथून हलवून पलीकडच्या दालनांत नेऊन ठेविलें होतें. पहिल्या दिवशींच स्वामींनीं त्या दोघांनाही 'मी परत येईतों तुम्हीं इथून निसटून जाण्याचा प्रयत्न करतां कामा नये. गुहेंत इकडेतिकडे हिंडतां कामा नये, तसेंच ऋद्धि-सिद्धि ह्या गुरुकन्या—मी तुमचा रक्षणकर्ता असून त्या माझ्या कन्या आहेत, त्यांच्याशीं कोणताही अतिप्रसंग करतां कामा नये' असें स्पष्ट बजावून सांगितलें होतें. इतकी खबरदारी स्वामींनीं कां घ्यावी याची त्या दोघांनाही अटकळ नव्हती; पण ही आपल्या रक्षणकर्त्याची आज्ञा, आपण ती पाळलीच पाहिजे असा मात्र त्यांचा समज होता. त्या दोघांप्रमाणेंच ऋद्धि-सिद्धींनाही स्वामींनीं नीट वागण्याला उपदेशिलें होतें व त्यांची वागणूकही पूर्ण आज्ञाधारकपणाची होती. व्यासराव मात्र वेड्यांत जमा असल्यानें त्याला यांतला कोणताच निर्बंध लागू नव्हता. अशा कडक शिस्तींत नाथाजी व पिलाजी यांनीं पहिले चार दिवस अंथरुणावरच पडून काढले; पण चौथ्या दिवशीं स्वामी बाहेर गेले, ते एक दिवस गेला, दोन दिवस गेले, तीन दिवस गेले तरी परत येईनात; व नाथाजी आणि पिलाजी यांनाही चांगला आराम पडल्यामुळें तिथें त्या कैदखान्यांत मृतवत् पडून राहणें त्यांना रुचेना. आतां स्वामी केव्हां माघारे येतात व आपण केव्हां एकदां आपल्या शतवीरांना जाऊन मिळतों असें त्यांना होऊन गेलें होतें. ह्या कर्तव्याच्या कळकळीइतकीच ऋद्धि-सिद्धि ह्या कोणाच्या कोण हें जाणण्याविषयींची तळमळ त्यांच्या मनाला लागून राहिली होती; पण ती तळमळ कशी शांत व्हावी! रोज ऋद्धि-सिद्धि सेवाशुश्रूषा करण्यासाठीं आल्या कीं त्या दोघांनींही त्यांच्याशीं बोलण्याचा प्रयत्न करावा; पण फुकट! निदान एखादे वेळीं तरी त्यांचा मुखचंद्र दिसेल म्हणून त्या जवळ येतांच त्या दोघांनींही त्यांच्याकडे टक लावून पहावें; पण फुकट! त्या दोघीही मुलींनीं पहिल्या दिवशीं

जेवढ्याला तेवढें बोलण्याचें व बुरखा घेण्याचें जें व्रत स्वीकारलें होतें तें आज आठ दिवस अखंड चालविलें होतें.

अशा प्रकारचीं कृत्रिम बंधनें पाळून वागणें कोणाही माणसाला जडच जावयाचें. त्यांतल्या त्यांत नाथाजी व पिलाजी यांना तें जास्तच जड जात होतें. कारण आपण असें कां वागावयाचें याचें सयुक्तिक कारण तर त्यांना कांहीं सांपडेना, ऋद्धि-सिद्धि नेहमीं अशा बुरख्यांत कां ? त्या आपल्याशीं बोलत कां नाहींत ? आम्हीं एकमेकांशीं बोलूं नये अशी स्वामींचीदेखील इच्छा कां ? असे प्रश्न त्यांनीं वारंवार स्वतांशीं व अनेकवार आपसांत विचारावे; पण त्या प्रश्नांना उत्तर मात्र कोणाला कांहीं सुचूं नये. ऋद्धि-सिद्धि जरी त्यांच्याशीं किंवा त्यांच्या देखत एकमेकींशीं मोठ्यानें बोलत नसत, तरी त्या हळुहळू बोलत, त्यावरूनच एकाला वाटावें हा माझ्या कमलेचा आवाज तर दुसऱ्याला वाटावें हा कमळजेचा आवाज ! आपल्या मनांत जसें हें उत्कंठेचें आऊर उसळलें आहे; तसेंच ऋद्धि व सिद्धि यांच्या अंतःकरणांतही उसळलें असेल काय, अशीही शंका नाथाजी व पिलाजी यांच्या मनांत क्षणोक्षणीं येई. पण त्या शंकेलादेखील निश्चित असें उत्तर त्यांचें त्यांनाच कांहीं मिळत नसे. एकदां त्यांना वाटे कीं, ह्या जर कमळा व कमळजा नसत्या, तर रात्रीं बेरात्रीं जागून आपल्या औषधपाण्याविषयीं इतकी काळजी कशाला घेत असत्या ! बरें; त्या जर कमळा व कमळजा असत्या तर आपणाला त्या ओळखूं देखील शकल्या नाहींत हें कसें ? असे विचार नाथाजी व पिलाजी यांच्या डोक्यांत रोजच्या रोज यावे. त्यांनीं रोज आपसांत बेत करून ऋद्धि-सिद्धींना स्पष्टच विचारावयाचे बेत करावे; पण त्या दोघी अशी संधि त्या दोघांना देण्याचें होतां होईतों टाळीत. त्यादेखील कांहीं कमी मार्मिक व धोरणी नव्हत्या. त्या त्या दोघांचा मानस ओळखूनच कीं काय, होतां होईतों स्वामी तेथें असत तेव्हां त्यांच्या देखत दुखणाइतांचें औषधपाणी वगैरे उरकून घेत; त्यामुळें नाथाजी व पिलाजी यांना स्वामींच्या देखत—स्वामींची तशी स्पष्ट सांगी असल्यानें त्या दोघींशीं बोलण्याचें धाडस करवत नसे; व स्वामी बाहेर गेले असले म्हणजे त्या दोघीही दूर कुठच्या कुठें जाऊन बसत, त्यांचा नाथाजी व पिलाजी यांना पत्ता लागणें शक्य नसे.

पण चौथ्या दिवशीं स्वामी जे नेहमींप्रमाणें बाहेर गेले, ते एक दिवस

झाला, दोन दिवस झाले, तीन दिवस झाले तरी परत येईनात; व इकडे व्यासरावाची प्रकृति एकाएकीं कल्पनेबाहेर बिघडली. इतकी कीं, त्याचा घटकेचाही भरंवसा देण्याजोगी सोय उरली नाहीं. ऋद्धि-सिद्धींनीं स्वामींच्या सांगीप्रमाणें नियमित औषधपाणी द्यावें, नियमितपणें त्याला देवाचें तीर्थ प्राशन करावयाला लावावें, पण कांहीं गुण येऊं नये. आतां स्वामी जर आले नाहींत तर हा म्हातारा कांहीं वांचत नाहीं अशी सर्वांची खात्री होऊन चुकली. स्वामी कधीं इतके दिवसांचे दिवस बाहेर रहावयाचे नाहींत; पण आज राहिले. ते केव्हां परत येतील किंवा त्यांचेंही तिकडे कांहीं बरें वाईट झालें कीं काय, याविषयीं इकडे सर्वांच्याच मनांत शंकाकुशंका येऊं लागल्या, व सर्वांचें धाबें दणाणून गेलें. आतां काय करावयाचें याचा सर्वांनाच मोठा पेंच येऊन पडला. अखेर रात्रौ जेवणाच्या वेळीं पिलाजी व नाथाजी यांनीं प्रथम आपसांत खलबत करून ऋद्धि-सिद्धींपाशीं गोष्ट काढली, "हा आंधळ्या कोशिंबिरीचा खेळ आणखी किती दिवस चालावयाचा ? व्यासराव तर मरणगतीवर घातलेला आहे. त्याच्यापाशीं जाण्याची आम्हांला सोय नाहीं. तो वेडाच्या भरांत आम्हांला पहातांच संतापावयाचा व त्यांतच त्याचा अंतही वेळीं व्हावयाचा. स्वामी कोठें गेले त्याचाही पत्ता नाहीं. त्यांना तिकडे सेनापतीच्या शिपायांनीं संशयावरून पकडलें, कीं आणखी कांहीं अरिष्ट ओढवलें आहे, समजावें तरी काय ? त्यांचा तपास करावयाला नको काय ?"

"नको कसा ? तपास तर करायला हवाच." ऋद्धि म्हणाली.

"खरेंच; स्वामींना इतके दिवस कां लागले नकळे !" सिद्धि म्हणाली.

"पण तपास करावयाचा कसा व कोणीं ?" पिलाजी क्षणभर एकीकडे चौकस दृष्टीनें नाथाजीकडे पहात म्हणाला, "आम्ही दोघेही तपास करावयाला गेलों असतों; पण आम्हांला ह्या तुरुंगाबाहेर पडण्याचा रस्ता सांपडेल तेव्हां ना ?"

"ऋद्धि-सिद्धि आपणांला रस्ता दाखवितील." नाथाजी म्हणाला.

नाथाजीची ही सूचना अशीच होती कीं, ती ऋद्धि-सिद्धींना नाकबूल करतां येण्यासारखी नव्हतीच. ऋद्धि क्षणभर थांबून म्हणाली, "आजची रात्र आपण स्वामी येतातसें पाहूं, नाहींपेक्षां मग काय ठरवावयाचें तें ठरवूं."

आपणाला बाहेर जातां येईल तव्हां यईल; पण ऋद्धि-सिद्धि एवढ्या बोलल्या

झाल्या हेंही कांहीं कमी नाहीं, असें नाथाजी व पिलाजी ह्या दोघांनाही वाटलें. त्यामुळें त्यांना त्या दोघींशीं बोलण्याला जास्त धीर आला. पिलाजी म्हणाला, "ऋद्धि! व्यासराव या घटकेला आहे तर पुढच्याच घटकेला नाहीं अशी त्याची अवस्था आहे. शिवाय व्यासरावाची गोष्ट परती सोडून देऊं; तें पिकलें पान आज नाहीं उद्यां झडावयाचेंच; पण आमच्या डोक्या-वर आमच्या दुसऱ्या एका अति महत्त्वाच्या कर्तव्याचा डोंगर आहे. त्याची तुम्हां दोघींनाही कल्पना नसेल!"

"आम्हांला काय कल्पना असणार! आम्ही माणसें थोडींच आहों!" ऋद्धि खोंचिकपणें म्हणाली.

ऋद्धीचे शब्द ऐकून पिलाजीनें नाथाजीकडे पाहिलें. त्याच्या नजरेनें नाथाजीला कायसासा प्रश्न विचारला व नाथाजीच्या नजरेनें त्याला कायसेंसें उत्तर दिलें.

तेवढ्यांत ऋद्धि सिद्धीला म्हणाली, "खरें ना ग सिद्धि! आम्ही पडलों बायका व हे पडले पुरुष, आम्हांला यांच्या भानगडी कशा कळणार!"

"हो! आम्ही तर बोलूनचालून आडव्या सुडक्यांचीं बाईलमाणसें. बायकांची अक्कल चुलीपुरती!" सिद्धि म्हणाली.

सिद्धीचे बोल ऐकून नाथाजी पिलाजीकडे, आतां पिलाजी त्याच्याकडे पहात होता त्याचप्रमाणें, प्रश्नार्थक दृष्टीनें पाहूं लागला. प्रत्यक्ष असे दोघेही कांहीं बोलले नाहींत; पण त्यांचे डोळे जें बोलले, तेवढ्यानेंच त्यांना एक-मेकांना काय खूणगांठ पटावयाची ती पटली. त्याचा दृश्य परिणाम मात्र असा झाला कीं, दोघांचेही हात जेवावयाचें विसरून खोळंबून बसले व डोळे ऋद्धि-सिद्धींच्या अवगुंठित मुखमंडलांवर खिळून बसले. असें होणें कधीं शक्य नाहीं; पण ऋद्धि-सिद्धींना वाटलें कीं, हे चंद्रसूर्य निसर्गाचा निर्बंध मोडून पिलाजी व नाथाजी यांच्या नेत्रांच्या आश्रयानें एकाच वेळीं उगवून आपणांकडे पहात आहेत कीं काय! पहातां पहातां त्या दोघांना एकमेकांकडे पहाण्याचाही विसर पडला व त्यांची दृष्टि अंतर्मुख झाली. एकाएकीं त्या दोघांच्या मनोवृत्तींत दाणादाण उडालेली पाहून ऋद्धि-सिद्धींना अचंबा वाटणें ओघानेंच प्राप्त होतें. त्याही एकमेकींकडे आपल्या अवगुंठनांतून किलकिल्या नजरेनें पाहूं लागल्या. मग त्यांचे डोळे एकमेकांशीं काय बोलले नकळे!

"जेवायचे हात कां खोळंबले ?" ऋद्धीनें विचारलें.

"बायकांसारख्या बायका आम्ही, त्या तर मुळींच डगमगत नाहीं. आणि तुम्ही मर्दांसारखे मर्द, शतवीरांतले हिरे एका क्षणांत आपला पाणीदारपणा हरवून बसतां याला काय म्हणायचें ?" सिद्धि म्हणाली.

"ऋद्धि! खरें सांग. तुला देवाची शपथ आहे, खरें सांग! तुमचीं नांवें ऋद्धि-सिद्धिच का ?" पिलाजीनें विचारलें.

"म्हणजे ? हा काय भलताच प्रश्न विचारतां ?" ऋद्धि सिद्धीकडे पहात म्हणाली.

"तर! पहा तरी बाई! यांना आमच्या नांवांशीं काय करायचें ?" सिद्धि ऋद्धीकडे पहात गालांतल्या गालांत हंसत म्हणाली.

ऋद्धि-सिद्धि हें बोलतांना स्मित हास्य करीत असतील, अशी झांक त्या दोघींच्या शब्दोच्चारांत उमटलेली नाथाजी व पिलाजी यांना स्पष्ट दिसत होती. पण त्या दोघीही नजरेनें एकमेकींशीं कांहींतरी बोलत होत्या तें मात्र ह्या दोघांना कळणें शक्य नव्हतें.

"कां ? आतां कां कांकू करतां. आम्हीं तुम्हांला ओळखलें." पिलाजी म्हणाला, "चांगलें मुद्देमालासह ओळखलें. आतां लपवाछपवी चालावयाची नाहीं!"

"काय ओळखलेंत ?" ऋद्धि सिद्धीकडे वळून म्हणाली, "ऐक तरी बाई ?"

"तर! पहा तरी!" सिद्धि म्हणाली, "सांगा पाहूं तर काय ओळखलेंत तें ?"

"तेंच ओळखलें. तुम्ही कमळा व कमळजा आहां. आम्ही इथें आल्या-दिवसापासून आम्हांला तसा संशय होताच, तोच आतां खरा झाला."

"ह्या कमळा व कमळजा कोण ?" ऋद्धि सिद्धीकडे वळून म्हणाली, "सिद्धि! ह्यांनीं तर थेट गळेपडूपणा चालवला आहे कीं!"

सिद्धि पिलाजीला म्हणाली, "तुम्हांला त्या म्हाताऱ्याचें वेडें वारें तर लागलें नाहीं ना ?"

नाथाजी मध्येंच म्हणाला, "म्हाताऱ्याचें वारें कांहीं आम्हांला लागलें नाहीं; पण ऋद्धी-सिद्धींचें वारें लागल्यापासून काय वेड आमच्या अंगीं शिरलें असेल तें! कमळजे!—"

" कोण कमळजा ? " सिद्धीनें विचारलें.

" तूंच कमळजा ! " पिलाजी व नाथाजी एकदम उत्तरले. नाथाजी पुन्हा म्हणाला, " तूं कमळजाच ! कमळजे ! बुरख्याखालीं रूप झांकतां आलें तरी अंतःकरणाशीं भिडलेलें अंतःकरण गुजगोष्टी करूं लागल्यावर त्यांचीं तोंडें कोणाला कशीं झांकतां येतील ! आम्ही—मी व पिलाजीनें पहिल्या दिवशीं तुम्हां दोघींना ओझरतें पाहिलें तेव्हांच आमची खात्री पटली. नाहीं म्हणावयाची छाती असेल तर दोघीही तोंडावरचे बुरखे दूर करा पाहूं ! "

सिद्धि नाथाजीला कांहीं उत्तर न देतां ऋद्धीला म्हणाली, " ऋद्धि ! गुरुजी इथें नाहींत असें पाहून ह्या दोघां पाहुण्यांनीं पुंडाई माजवायला सुरुवात केली कीं ! "

" हो ! " ऋद्धि म्हणाली, " आतांच्या आतां हे म्हणूं लागले कीं, तुम्ही कमळा आणि कमळजा ! आणखी जराशानें हे वेळीं आणखीही कांहीं म्हणूं लागतील. आतां बाई करायचें तरी कसें ? "

इतक्यांत व्यासराव तिकडे आरडाओरड करूं लागला; इतका कीं, ती ऐकून ऋद्धि-सिद्धींचें इतर गोष्टींत मन रमणें शक्यच नव्हतें. त्या ताबडतोब तशाच्या तशाच तिकडे धावत गेल्या. पिलाजी व नाथाजीही तसेच अर्ध्या जेवणावरून उठले व त्या दोघींच्या मागोमाग व्यासरावाला जेथें ठेवलें होतें तेथें जावयाला निघाले. पण ते आंतल्या आंत ह्या वाटेनें किंवा त्या वाटेनें हिंडूं लागले तरी त्यांना ती वाट कांहीं सांपडेना ! वाट कशी सांपडेल ! बोलून चालून चक्रव्यूह तो ! ऋद्धिसिद्धींना तो माहीत होता म्हणून त्या चट्कन् तेथें जाऊं शकल्या. पण नाथाजी व पिलाजी मात्र त्या चक्रव्यूहांतच गुरफटले गेले. ऋद्धि सिद्धींनीं पाहिलें तों व्यासरावाची अवस्था अत्यंत चिंताजनक असलेली त्यांना दिसून आली. त्याला एकसारख्या रक्ताच्या गुळण्यांवर गुळण्या येऊन बिछान्यासभोंवार रक्ताची राड झाली होती, व तरीही गुळण्या सारख्या येतच होत्या. त्यांतच त्याला घरघर लागली होती. हीं अर्थातच त्याच्या आयुष्याच्या अंताचीं सूचक दुश्चिन्हें होतीं.

" सिद्धि ! यांची अवस्था फार कठीण दिसते बाई ! " ऋद्धि म्हणाली. " आतां यांना उपाय तरी काय करायचा ? "

" त्या दोघांना हांक मारूं का ? " सिद्धीनें विचारलें.

व्यासराव आपल्या क्लेशार्णवांत बुडून गटंगळ्या खात होता, त्याला ऋद्धि-सिद्धि आंत आल्याची दादच लागली नव्हती; पण सिद्धीनें त्या दोघांना बोलावण्याची गोष्ट काढतांच ते शब्द कसे नकळे, त्याला चट्कन् ऐकूं गेले. त्याबरोबर तो तशा मरणोन्मुख अवस्थेंतच ताडकन् उठून उभा राहिला व विचारूं लागला, " ते दोघे कोण ? नाथाजी व पिलाजी का ? "

ऋद्धि-सिद्धि यावर कांहीं बोलेनात. व्यासरावाला पिलाजी व नाथाजी यांचा किती तिट्कारा आहे हें त्यांना इतक्या दिवसांच्या अनुभवानें चांगलें माहीत झालें होतें. म्हणूनच त्या कधीं त्याच्यासमोर त्या दोघांविषयीं बोलत नसत व्यासरावालाही एरव्हीं शुद्ध नव्हती. पहिल्या दिवसापासून ऋद्धि-सिद्धि त्याची सेवाशुश्रूषा करीत होत्या; त्या त्याच्यासमोर असतांना अगदीं प्रथम प्रथम बुरखा घेत. पण त्यामुळें हे ते दोघे हरामखोरच बुरख्यांतून आपल्या नाशासाठीं इथें आले आहेत, असा व्यासरावाला संशय यावयाचा व तो त्या दोघींना मारावयाला धावावयाचा. व्यासरावाला वेडाच्या भरांत आणखी कांहींदेखील कळत नसे. पण कोणी नाथाजी व पिलाजी म्हणतांच किंवा ते प्रत्यक्ष समोर दिसतांच मात्र त्याला त्यांची तेव्हांच ओळख पटे, व एखादा दुखावलेला सर्प दावा धरून लपून बसलेला असला तरी ज्यानें त्याला दुखावलें त्याचा वारा लागतांच एकाएकीं उसळून फूत्कारत त्या दुस्मानाला डसावयाला धावतो, त्याप्रमाणें तो नाथाजी व पिलाजी यांच्या नांवानें जळफळून दांतओंठ खाऊं लागे. एरव्हीं त्याला माणसांची ओळख मुळींच नव्हती. त्यामुळें ऋद्धि-सिद्धि त्याचें पथ्य सांभाळण्यासाठीं मोकळ्या चेहऱ्यानें त्याच्यासमोर जात येत व नाथाजी-पिलाजींचें नांवही त्याच्यासमोर उच्चारीत नसत. इतकेंच काय, मधून मधून व्यासराव 'ते दोघे सैतान मेले का ? त्यांना तुम्हीं ठार मारलें का ?' असें ऋद्धि सिद्धींना विचारी व त्याही त्याची समजूत करण्यासाठीं हो म्हणत.

पण आज हा एकंदर भयानक प्रकार पाहून ऋद्धि-सिद्धींना तें प्रसंगावधान राखतां आलें नाहीं. सिद्धीच्या तोंडून सहज शब्द निघून गेला व त्यामुळें व्यासरावाच्या मस्तकांतील शीर उठली. तो तशा मरणोन्मुख स्थितींतही कृतांतकाळाप्रमाणें संतप्त होऊन मुठी आंवळीत व दांतओंठ खात अद्वातद्वा बोलूं लागला, " तुम्हीं माझ्या शत्रूंना अजून जिवंत ठेवलें आहे ना ? आणि

त्यांना सामील होऊन एकजुटीनें मला ठार मारण्याचा तुमचा बेत आहे ! हरहर ! देव तुम्हांला पाहून घेईल."

इतक्यांत नाथाजी व पिलाजी एकदांचे रस्ता चुकत चुकत तेथें येऊन पोंचले. त्यांना पहातांच ऋद्धि-सिद्धींनीं बुरखा घेण्याची चपळाई केली. ऋद्धीनें त्या दोघांनाही दोन्ही हात जोडून विनविलें, "तुम्ही दोघेही अगोदर बाहेर जा, नाहींपेक्षां व्यासरावांच्या हत्येचें पाप तुमच्या माथीं बसेल."

पण तेवढ्यांत व्यासरावानें नाथाजी व पिलाजी यांना पाहिलेंच. त्याबरोबर 'अरे हरामखोरांनो !' असें म्हणत तो मुठी आंवळीत त्यांच्यावर धावूं लागला. पण त्याच्या अंगीं त्राण कुठें होतें ! लगेच त्याला पुन्हा रक्ताची गुळणी आली व तो बेशुद्ध होऊन धाडकन् खालीं पडला.

"व्यासराव ! व्यासराव !" ऋद्धि पुढें होऊन त्याला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न करूं लागली. नाथाजी व पिलाजी चकित होऊन तेथेंच उभे होते. त्यांना सिद्धीनें हात जोडून विनविलें, "तुम्हीं जरा बाहेर जा म्हणतें ना. जा ! म्हातारा आतां वांचत नाहीं हें खास. त्याला मरण यायचें तें तरी शांतपणानें येऊं द्या."

नाथाजी व पिलाजी यांना वेळेचें महत्त्व कळत होतें. ते मुकाट्यानें मागें फिरले; पण चार पावलें माघारे येतात न येतात तोंच स्वामी त्यांच्यासमोर उभे ! ते त्यांना कांहींशा रागीट स्वरांत म्हणाले, "नाथाजी ! पिलाजी ! तुम्ही माझी आज्ञा उल्लंघन केलीत ! अगोदर आपल्या ओंवरींत चालते व्हा पाहूं !"

नाथाजी व पिलाजी ओशाळे होऊन मुकाट्यानें तेथून निघून गेले. स्वामींचा शब्द ऐकून ऋद्धि-सिद्धि बाहेर डोकावून पाहूं लागल्या. यावेळीं त्या दोघींच्याही तोंडावर बुरखा नव्हता. स्वामी त्या दोघींनाही अनुलक्षून म्हणाले, "आणि ऋद्धिसिद्धि ! तुम्हींही मला दिलेल्या त्या वचनाचा भंग केलात !"

"गुरुजी ! आम्हीं दोघींनींही आपल्या आज्ञेचें उल्लंघन मुळींच केलेलें नाहीं, व पुढेंही करणार नाहीं. आम्हांला आमच्या प्रतिज्ञेची पूर्ण जाणीव आहे. आपण आमच्याविषयीं मुळींच संशय घेऊं नका." ऋद्धि म्हणाली.

"तसें असेल तर फार चांगलें. कारण अजूनही तुम्हांला माझ्या आज्ञेंत वागावयाचें असेल तर तुम्हां सर्वांपासून मला माझें ऋण मागावयाचें आहे.

तें ऋण फिटेपर्यंत ऋद्धि-सिद्धि ह्या कोणाच्या कोणी नाहींत. नाथाजी-पिलाजी-च्या कमळा-कमळजा अविंधांच्या हातीं सांपडल्या तेव्हांच मेल्या; आतां समोर दिसतात ह्या माझ्या—नारायणस्वामींच्या धर्मकन्या आहेत. तुम्हांला संसार-सुखाला विन्मुख करावें अशी माझी इच्छा नाहीं; पण तूर्त सर्वांनीं एवढेंच ध्यानांत ठेवावयाचें कीं, मी माझ्या मायेची पांखरछाया घालून वाढविलेलीं तुम्ही चारी माझीं लेंकरें एकमेकांचीं बहीण-भावंडें आहां. हें तुम्हां सर्वांना मान्य आहे ? ”

दोघींनींही स्वामींना वंदन करून उत्तर दिलें, “ होय गुरुजी ! ”

“ तर मग जा, आपल्या जागीं जाऊन बसा. मी सांगेतों बाहेर येऊं नका.

“ आम्ही जातों. पण गुरुदेव ! व्यासरावांची अवस्था जरा पहावयाची होती.” ऋद्धि म्हणाली.

“ कां ? त्याची प्रकृति जास्त बिघडली आहे काय ? ” असें विचारीत स्वामी व्यासरावाकडे जाण्यासाठीं पाऊल उचलतात तोंच व्यासरावाचा आर्त स्वर त्यांच्या कानीं आला, “ अरे देवा ! मी मरतों ! मी मरतों ! अरे देवा ! ”

“ व्यासराव ! व्यासराव ! ” स्वामींनीं व्यासरावापाशीं जाऊन हांका मारल्या.

“ मी मरतों ! स्वामीजी ! मी मरतों ! ” व्यासराव अडखळत उद्गारला, “ पण मी मेल्यावर मला सद्गति मिळणार नाहीं. माझ्या कृष्णाचा खून त्या दोघां चांडाळांनीं केला व माझ्या यशोदेच्या पातिव्रत्यावर धाड घातली ! माझ्या पिराजीला जिवाचा जिवलग मानून त्या रांडलेकांनीं त्याचा असा केंसानें गळा कापला ! त्यांच्या बायकांच्या पातिव्रत्यावर मुसंड्यांचा दरोडा पडला तो यथायोग्य पडला ! ”

बोलतां बोलतां व्यासरावाला रक्ताची आणखी एक गुळणी आली. त्या-बरोबर तो मध्येंच थांबला. तेवढ्यांत ऋद्धि-सिद्धींनीं पाण्यानें भरलेला कमंडलु पुढें केला. स्वामी त्यांतील पाणी व्यासरावाच्या मस्तकावर शिंपडून व थोडें त्याच्या तोंडीं ओतून म्हणाले, “ व्यासराव ! शांत हो, शांत हो ! तूं शुद्धी-वर आहेस ना ? ”

“ होय. स्वामीजी ! मी शुद्धीवर आहें.” व्यासराव जरा सावध होऊन म्हणाला, “ तुमची कल्पना आहे कीं, व्यासरावाचें डोकें फिरलें आहे. पण

आतां व्यासराव चांगला शुद्धीवर आहे. मरणघडीला तरी देवानें त्याला शुद्धबुद्ध दिली. हा कदाचित् आपल्या पुण्यप्रद हस्तस्पर्शाचा प्रभाव असेल; पण मी आतां चांगला शुद्धीवर आहें." तेवढ्यांत व्यासरावाची समोर उभ्या असलेल्या ऋद्धि-सिद्धींकडे नजर गेली. त्याबरोबर त्यानें त्यांना ओळखलें. ही परमेश्वरी लीला असो कीं स्वामींच्या पुण्यस्पर्शाचा प्रभाव असो; पण त्यानें त्या दोघींनाही ओळखलें व टंवकारून त्यांच्याकडे पहात त्यांना विचारलें, "कोण ? कमळा आणि कमळजा ?"

ऋद्धि-सिद्धि दोघीही व्यासराव शुद्धीवर आलेला पाहून मनांत अत्यंत आनंदित होऊन त्याला म्हणाल्या, "व्यासराव ! आज आम्हांला तुम्हीं ओळखलें ! पण इतके दिवस कांहीं ओळख पटली नाहीं ! आजवर तुमची सेवा आम्हींच केली नाहीं का ? आठवतें का ?"

"हो आठवतें. पण तुम्हांला मुसंड्यांनीं पळविलें होतें ना ?" व्यासरावानें विचारलें.

"होय." ऋद्धि-सिद्धि उत्तरल्या.

"मग, तुम्ही त्यांच्या तावडींतून कशा निसटलां ? आणि अजून तुमच्या कपाळाला कुंकू ?"

"होय. व्यासराव ! तुम्हां वडील माणसांच्या व स्वामींच्या कृपेनें आम्हां दोघींचेंही कुंकू अढळ आहे." ऋद्धि म्हणाली.

"म्हणजे ? तुम्ही अजून पवित्र आहां ?"

"होय." ऋद्धि-सिद्धि एकदम उत्तरल्या.

"म्हणजे ? तुम्हांला मुसलमानांनीं बाटविलें नाहीं ?" व्यासराव आधींच आपल्या व्याधींनीं संत्रस्त झालेला होता, त्यांतच जास्त चिंतामग्न होऊन म्हणाला, "मग तुम्ही माझ्यासमोरून आतांच्या आतां चालत्या व्हा ! व्हा चालत्या अगोदर !"

"कां ?" स्वामींनीं विचारलें, "व्यासराव ! तुला तुझ्या ह्या कन्यांचें सौभाग्य सहन होत नाहीं का ?"

ऋद्धि म्हणाली, "व्यासराव ! मुक्ता तुमचें लेंकरूं तशींच आम्हीही तुमचींच लेंकरें नाहीं का ? आमच्याकडे जरा दयेचा डोळा उघडून पहा आणि आम्हांला 'अखंड सौभाग्यवती व्हा' असा आशीर्वाद द्या. व्यासराव ! ह्या गरीब लेंकरांना एवढी भीक घाला !"

" म्हणूनच सांगतों ना, माझ्या डोळ्यांपुढून चालत्या व्हा. तुम्ही माझ्या मुक्तेसारखींच माझीं लेंकरें, तुमच्या सेवाशुश्रूषेनें मी आजवर जगलों म्हणून तुमचें अकल्याण व्हावें अशी इच्छा मला करवत नाहीं, व माझ्या वैऱ्यांच्या जिवंतपणाची खूण म्हणून तुमच्या कपाळींचें कुंकू मला पहावत नाहीं. ह्या वेळ-पर्यंत मला एवढी तरी समाधानाला जागा होती कीं, माझ्या कृष्णाला ठार करणाऱ्या व माझ्या मुक्तेच्या पातिव्रत्याला आपल्या पापी नजरेनें दृष्ट पाडणाऱ्या माझ्या वैऱ्यांच्या संसाराची होळी परमेश्वरानें अगोदरच पेटविली आहे. पण आतां तेंही समाधान माझ्या कपाळीं नाहीं, व तें समाधान परमे-श्वरापाशीं मागण्याला आतां मला तोंडही नाहीं ! म्हणून सांगतों, माझ्या डोळ्यांपुढून चालत्या व्हा !" असें अडखळत बोलतां बोलतां व्यासराव पुन्हा बेशुद्ध पडला.

" ऋद्धि ! माझी सांबळी आण पाहूं !" स्वामी म्हणाले.

ऋद्धीनें ताबडतोब स्वामींच्या ओंवरींतून त्यांची सांबळी आणून दिली. स्वामींनीं तिच्यांतून कसलीशी एक मुळी काढून ती उगाळून व्यासरावाला पाजली व त्यांतलेंच थोडेंसें अंजन त्याच्या डोळ्यांत घातलें. नंतर थोडा वेळ ऋद्धि-सिद्धींना तेथें देखरेख करावयाला सांगून ते स्नानार्थ निघून गेले. स्वामींची मुळी म्हणजे खरोखरच दिव्यौषधी होती. तिनें आपला प्रभाव तेव्हांच दाखविला. पाव घटकेच्या आंत व्यासरावाला आराम पडून त्याचा डोळा लागला.

" ऋद्धि ! व्यासराव झोंपीं गेले; आतां इथें बसून काय करायचें ? चल, आपण आपल्या जागीं जाऊं. माझ्या मनांत एक नवीन विचार आला आहे तो तुला सांगतें." सिद्धि म्हणाली.

" कसला विचार ? आमच्या पुरुषांबरोबर आम्हांला देखील जाऊंद्या असें स्वामींना सांगायचें कीं काय ?" ऋद्धीनें विचारलें.

" चोराच्या मनांत चांदणें !" सिद्धि म्हणाली, "पण इतकी उतावळी मी नाहींच मुळीं. माझा विचार निराळाच आहे. माझें कर्तव्य मला माझ्या डोळ्यांसमोर दिसतें आहे. तें पार कसें पाडायचें याचाही विचार मीं निश्चित केला आहे. चल, तुला सांगतें." असें म्हणून सिद्धि ऋद्धीला घेऊन बाहेर गेली.

## दर्शन एकुणिसावें

# संशयकल्लोल !

स्वामींचें वास्तव्य ज्या गुप्त स्थानीं होतें, तें पूर्वनिर्दिष्ट स्थान वर्तमानकाळीं जेथल्या तेथेंच असेल किंवा काळाच्या उदरीं भूतकाळच्या इतर अनेक मनोरम दृश्यांबरोबर अदृश्यही झालें असेल; पण तेव्हां तें तेथें खास होतें, व आजही कोणीं जर त्या रहस्यस्थानाचा शोध करावयाचें मनांत आणलें, तर बोलईच्या डोंगरांत बोलईच्या देवालयाशेजारीं जी एक गुहा आजला देखील निकृष्ट स्थितींत आढळते, त्या गुहेंतून कांट्या-खुंट्यांची व विषारी जीव-जिवाणांची पर्वा न बाळगतां दृढनिश्चयानें पुढें चालत गेल्यास कदाचित् शोध लागेलही. नाहीं कोणीं म्हणावें ! पण ही वाट कथानकाच्या काळीं देखील अत्यंत बिकट होती, मग आज ती अति बिकट झाली असल्यास नवल नाहीं. नारायणस्वामी मायदेशाचें—आपल्या महाराष्ट्रदेशाचें मंगल करण्याच्या पवित्र हेतूनें काशीवास सोडून दक्षिणेंत आले व ब्रह्मेंद्रस्वामींना भेटले, तेव्हां ब्रह्मेंद्रस्वामींनीं त्यांना हें स्थान वास्तव्यासाठीं दाखवून दिलें होतें. ब्रह्मेंद्रस्वामींना प्रथम ज्यांनीं वैराग्यवृत्तीचें रहस्य समजावून सांगितलें, असे कोणी महान् सत्पुरुष फार वर्षांपूर्वीं या स्थानीं राहात असत. ते इतके विरक्त व एकांतप्रिय होते कीं, त्यांच्या ब्रह्मेंद्रस्वामी ह्या एका शिष्यवराशिवाय त्यांचें अस्तित्व जगाला मुळींच माहीत नव्हतें. खुद्द ब्रह्मेंद्रस्वामींनाही त्या सत्पुरुषाविषयीं कांहींच पूर्ववृत्तांत माहीत नव्हता. कांहीं महान् अवतारी सत्पुरुष असे असतात कीं, त्यांचा बाह्य जगाशीं तादृश कांहींच संबंध नसतो. पण ते आपल्या तपश्चर्येच्या योगानें विश्वकल्याण साधीत असतात. त्यांच्या तपःतेजांतून वातावरणांत नवशक्तीचा संचार होतो व त्या अदृश्य नवशक्तीच्या प्रभावावर जीवजगताच्या हालचाली चालतात. अशा कोटींपैकींच हे ब्रह्मेंद्रस्वामींचे गुरु होते. किंबहुना ब्रह्मेंद्रस्वामींना महाराष्ट्रमंगलाला प्रवृत्त करण्याला हेच सत्पुरुष कारण झाले, असें प्रस्तुत नारायण स्वामींना ब्रह्मेंद्रस्वामींकडून कळलें होतें. हे सत्पुरुष हयात असतांना त्यांच्या सन्निध राहण्याचा योग वारंवार साधण्यासाठीं ब्रह्मेंद्रस्वामींनीं भुलेश्वराच्या देवालयाच्या बाहेरच्या

बाजूला एक निराळी गुहा तयार करून घेतली होती, ती मात्र वर्तमान काळींही दर्शनसुलभ आहे. पुढें ह्या सत्पुरुषाचें निर्वाण झाल्यावर नारायणस्वामींची व ब्रह्मेंद्रस्वामींची प्रथम भेट झाली तेव्हां नारायणस्वामींची स्वदेशहिता-विषयींची तळमळ पाहून ब्रह्मेंद्रस्वामींनीं आपल्या गुरूच्या वास्तव्यानें पावन झालेल्या त्या स्थानीं नारायणस्वामींना वास्तव्य करावयाला सांगितलें. तात्पर्य, ब्रह्मेंद्रस्वामींचा धावडशीचा मठ हें जसें अठराव्या शतकाच्या मध्यकालापर्यंत महाराष्ट्राच्या राजकारणाचें केंद्रस्थान होतें, तसेंच नारायणस्वामींच्या वास्तव्यानें पावन झालेली भुलेश्वराच्या डोंगरांतील 'नारायणगुहा' हें दुसरें केंद्रस्थान होतें. ह्या दोघां सत्पुरुषांनीं तेव्हां हिंदवी स्वराज्याच्या मंगलाची जबाब-दारी स्वयंस्फूर्तिमय परमेश्वरी आदेशानुसार आपल्या शिरावर घेतली होती. मात्र ताराबाई वगैरे मंडळी ब्रह्मेंद्रस्वामींच्या विरुद्ध असल्यानें त्या वितुष्टांत नवीन भर पडूं नये म्हणून नारायणस्वामी तेव्हां प्रगटपणें ब्रह्मेंद्रस्वामींच्या साहचर्यानें महाराष्ट्रांत फारसा संचार करीत नसत, इतकेंच.

असो. वरून दिसावयाला घनदाट जंगल-झाडीनें आच्छादिलेल्या भुले-श्वराच्या डोंगराच्या उदरांतील ही नारायणगुहा जी कोणीं खोदली होती, तिची एकंदर रचना इतक्या गुंतागुंतीची होती कीं, स्वामी तिला विनोदानें चक्रव्यूहाची उपमा देत. ती उपमा सार्थ होती. गुहेचा आंतील घेर पाव एकराहूनही जरा मोठा होता. तेवढ्या आवारांत निरनिराळ्या नऊ ओंवऱ्या असून त्या ओंवऱ्यांत जाण्याचे मार्ग चक्रव्यूहाप्रमाणें गुंतागुंतीचे होते. तसेंच गुहेंतून बाहेर जाण्याचे मार्ग पूर्वीं कोणकोणत्या बाजूनें व किती होते भगवान् जाणे; पण स्वामींना माहीत असे फक्त दोन मार्ग होते. पैकीं एक मार्ग गुहेंतून जेथून सुरू होई, तेथेंच एक ओंवरी असून त्या ओंवरींत एक मोठें बांधीव कुंड होतें. तो अत्यंत बिकट व अंधारें असल्यानें स्वामी त्या मार्गानें कधींच जात येत नसत. तो त्यांनीं तात्पुरता बंद करून टाकला होता. त्या कुंडाची रचना अशी चमत्कारिक होती कीं, दिसावयाला तर तें कुंड अगदीं स्वतंत्र दिसावें; पण त्यांत पाणी मात्र बाहेरच्या तळ्यांतून वहात यावें. स्वामींनीं हेंच आपलें स्नानगृह केलें होतें. याप्रमाणेंच दुसऱ्या ओंवरींत स्वामींचें देवघर होतें. ह्या देवघरांत एक अखंड पाषाणांतून कोरून काढलेली श्रीगजाननाची भव्य मूर्ति होती. तिसऱ्या ओंवरींत स्वामींची

व्याघ्राजिनें व मृगाजिनें आंथरून तयार केलेली वेदपठणाची व समाधीची जागा होती. चौथ्या ओंवरींत स्वामींचा फलाहार ठेवलेला असे व तेथेंच स्वामी व्याघ्राजिनांच्या शय्येवर रात्रौ फक्त तिसऱ्या प्रहरीं शयन करीत. कमळा व कमळजा स्वामींच्या हातीं लागण्यापूर्वीं बाकीच्या ओंवऱ्या बहुधा रिकाम्याच असत. पण त्या दोघी आल्यापासून त्यांच्यासाठीं स्वामींच्या शयनगृहालगतच तीन ओंवऱ्या उपयोगांत आणल्या जाऊं लागल्या. तरीही दोन ओंवऱ्या रिकाम्याच होत्या, त्यांपैकीं एकींत नाथाजी व पिलाजी यांना व दुसरींत व्यासरावाला ठेवण्यांत आलें होतें. ह्या सर्व ओंवऱ्यांच्या रचनेंत रचनाकाराचें कौशल्य ओतप्रोत भरलेलें होतें. स्नानगृहाची ओंवरी व देवघर आणि त्यांतच अखंड पाषाणाची कोरलेली श्रीगजाननाची भव्य मूर्ति यांची रचना पाहून भूधराच्या पोटीं असलीं कौतुकपूर्ण व कौशल्यपूर्ण लेणीं खोदणाऱ्या कारागिराला कोणींही धन्यवाद दिले असतेच. पण त्याहीपेक्षां मानवी बुद्धिमत्तेला चकित करून सोडणारी एक पूर्वनिर्दिष्ट गोष्ट तेथें निदर्शनाला येई; ती ही कीं, गुहेंतील ह्या नऊही ओंवऱ्यांत नैसर्गिक प्रकाश दिवसभर इतस्ततः खेळे. सूर्योदयाच्या वेळीं श्रीगजाननाची पूजा व्हावयाची तेव्हां तर सूर्याचे सोनेरी किरण थेट देवमूर्तीवर पडत. पण बाहेरून भूगर्भांत इतका प्रकाश येण्याची सोय कोणीं कशी केली होती याचा कोणाला कांहींच थांगपत्ता लागण्यासारखा नव्हता.

गुहेंतून बाहेर जाण्याचा दुसरा रस्ता ह्या देवघराच्या ओंवरींतूनच होता. देवघराच्या ईशान्येकडील भिंतींत एक देवडीवजा लहानसें दार असून त्याची उघड-झांप करतां येत असे. ह्या देवडींतून खडकांत कोरलेल्या पांच पायऱ्या चढून जातांच वाट पूर्वेच्या बाजूला वळलेली दिसूं लागे. त्या वाटेनें आठ पायऱ्या चढून जातांच पुढें वाट बंद असलेली दिसे. पण वस्तुतः तेथेंच वाट होती. तेथें समोर एक उभा दगड दिसे, तो आंतल्या बाजूनें खडबडीत असून बाहेरच्या बाजूनें मात्र त्यावर गदाधारी हनुमान कोरलेला होता. तो दगड बाजूला सारतांच एक औरसचौरस बारा हात रुंद आणि पुरुषभर उंच अशी आंधारी पोकळी लागे. त्या पोकळीच्या एका कोंपऱ्यांत ही वाट होती व आंत येऊन तो दगड पुन्हा पूर्ववत् जागच्या जागीं बसवितांच तेथून वाट आहे हें कोणाच्या ध्यानीं मनींही येण्याजोगें नव्हतें. पोकळीच्या मध्यभागांतून डाव्या बाजूला एक व उजव्या बाजूला एक अशा दोन वाटा

खालपर्यंत पायऱ्या पाडून तयार केलेल्या सकृद्दर्शनीं मोकळ्या दिसून येत. पण त्या कांहीं गुहेंत जाण्याच्या वाटा नव्हत्या. जर कोणी शत्रू तेथवर आलाच, तर त्याची दिशाभूल करण्यासाठीं रचिलेल्या त्या यमगृहाच्या वाटा होत्या. त्या खालीं बऱ्याच अंतरापर्यंत बांधून नेल्या असून भुयारांत जेथें काळोख मुसमुसत होता, तेथें अशा अवघडपणें अर्धवट सोडल्या होत्या कीं, तेथवर गेलेला मनुष्य नेमका तीन पुरुष खोल गर्तेंत गाडला जावा. त्याला कोठें आजूबाजूला जातां येऊं नये कीं तो कितीही रडला ओरडला तरी त्याचा आर्तरव कोणालाही ऐकूं जाऊं नये. त्यामुळें बिनमाहीतगार माणूस इथें आलाच तर तो नेमका बळी पडावयाचा !

* * *

नाथाजी आणि पिलाजी स्वामींच्या आज्ञेनुसार आपल्या ओंवरींत येऊन बसले, तरी त्यांच्या डोक्यांत विचार केवळ ऋद्धि-सिद्धींविषयींच चालले होते, व कल्पनाही त्याच होत्या. पण अजूनही ह्या दोघी कमळा व कमळजाच असतील असा विश्वास मात्र त्यांना वाटत नव्हता. अशा द्विधा मनःस्थितींतच आज स्वामी आपल्यामागें नवी कामगिरी लावून देणार, व ती पार पाडून परत येईतों इकडे ह्या दोघींची काय दशा होईल कोण जाणे, ही चिंता त्यांच्या मनाला चटका लावून बसली होती. तिकडे ऋद्धि-सिद्धि जेव्हां हात-पाय धुण्यासाठीं स्नानगृहांत गेल्या, तेव्हां जातां जातां ऋद्धीनें व्यासराव जो नाथाजी व पिलाजी यांच्याविरुद्ध इतकें गरळ ओकला त्याचा अर्थ काय याविषयीं सिद्धीला विचारलें. सिद्धीला देखील हा प्रश्न ऋद्धीच्या इतकाच महत्त्वाचा वाटला. पण तो आळ खरा किंवा खोटा म्हणण्या-इतकी दोघींच्याही मनाची निश्चिति होईना. अखेर दोघींनींही पुन्हा जेव्हां नाथाजी व पिलाजी यांची भेट होईल तेव्हां त्यांना शपथ घालून ह्या प्रश्नाचा सोक्षमोक्ष करून घ्यावयाचें ठरविलें. पण अशी संधि पुन्हा केव्हां येणार होती कोण जाणे !

इतक्यांत स्वामींच्या देवघरांत शंख वाजला. रोज तीनत्रिकाळ पूजा झाली कीं स्वामी शंख वाजवीत. लगेच ऋद्धि-सिद्धि तीर्थप्रसादासाठीं तेथें जात. त्या दोघी स्वामींच्या आश्रयाला आल्यापासून असा क्रम अव्याहत चालला होता. त्या क्रमानुसार त्या तिकडे जाण्यासाठीं निघाल्या. पण त्या

स्नानगृहाबाहेर येतात न येतात तोंच समोरच्या भुयारांतून प्रकाशाचा झोत त्यांना दिसला. त्याबरोबर त्या घाबरल्या व धावत धावत स्वामींपाशीं येऊन म्हणाल्या, "गुरुजी! आंघोळीच्या ओंवरींत आतां भुयारांतून मोठा प्रकाश दिसला, तो कसला होता कोण जाणे!"

"काय? अखेर आमचे शत्रु एथवर आमचा पाठलाग करीत आले म्हणावयाचे!" स्वामी नाथाजी व पिलाजी यांना तेथें हांक मारून हा प्रकार त्यांना निवेदन करून म्हणाले, "आतां कसें करावयाचें?"

"कसें करावयाचें हें काय विचारतां? आल्या संकटाला तोंड दिलेंच पाहिजे. आम्ही शतवीर आहों. शतवीर संकटांची वार्ता ऐकून शून्यधैर्य होत नसतात; शत्रूंचें नांव ऐकून त्यांचीं नाकें कापण्यासाठीं शतवीरांचे बाहु स्फुरण पावत असतात. चला, आपण शत्रूंचा समाचार घेतलाच पाहिजे." पिलाजी म्हणाला.

इतक्यांत त्यांना व्यासरावाला ज्या ओंवरींत ठेवण्यांत आलें होतें, तेथून संभाषण ऐकूं येऊं लागलें, "ऐक! हा पहा इथें व्यासराव दिसतो आहे."

"खरेंच! धाकटे धनीसाहेब! कोणा तरी मुसंड्यांनींच व्यासरावाला इथें आणून ठेवलें असलें पाहिजे. ह्या चोरघरांत इस्माईलचे लोक तर दबा धरून बसले नसतील?"

"असें वाटतें खरें."

"मग काय, माघारे जावयाचें?"

"आतां माघारे जाण्याला रस्ता थोडाच सांपडणार आहे! आतां इथल्या-इथें काय सोक्षमोक्ष होईल तो खरा."

पिलाजी हें संभाषण ऐकून स्वामींना म्हणाला, "स्वामी! हे शत्रु नसून, आपलेच लोक असावेत. आतांच त्यांतला एक 'धाकटे धनीसाहेब' असें म्हणाला, त्यावरून मला वाटतें, बाजीरावसाहेब आपल्या लोकांसह कोठून तरी वाट चुकून इथें आले असावे."

यावर स्वामी, पिलाजी किंवा नाथाजी कोणी कांहीं बोलणार, तोंच व्यासरावाच्या ओंवरींत बोलत उभी असलेली मंडळी जास्त जवळ आली.

"धाकटे धनीसाहेब! आपण आतां मागें असा व आम्ही पुढें होतों. कारण तीं पहा तिथें माणसें दिसत आहेत." त्या मंडळींतील एक म्हणाला.

" खास ! हा कंठाजीचा आवाज ! " पिलाजी नाथाजीला म्हणाला.

" मी मागें कां राहूं ? प्राप्त प्रसंगाला सर्वांनीं सारखें एक जुटीनें तोंड दिलें पाहिजे." त्या मंडळींतून पुन्हा आवाज आला.

" हा तर धाकट्या धनीसाहेबांचा आवाज ! " नाथाजी म्हणाला.

" खास ? " स्वामींनीं विचारलें.

" खास ! " नाथाजी उत्तरला.

" तर मग देव आपला पाठीराखा आहे. चला, आपण त्यांना सामोरे जाऊं." असें म्हणून स्वामी पुढें, त्यांच्या मागोमाग नाथाजी व पिलाजी चालूं लागले.

नाथाजी व पिलाजी यांची कल्पनाच अखेर खरी ठरली. ती मंडळी बाजीराव व कंठाजी हीच होती. बाजीराव व स्वामी यांची दृष्ट दृष्ट होतांच एकमेकांनीं एकमेकांना तेव्हांच ओळखलें. बाजिरावानें कृतज्ञतापूर्वक स्वामींच्या चरणांवर मस्तक नम्र केलें व स्वामींनीं त्याला 'विजय भव' असा आशीर्वाद दिला. कंठाजीला नाथाजी आणि पिलाजी हे दोघे संवगडी शतवीर अचानक भेटतांच त्या तिघांच्याही आनंदाला पारावार राहिला नाहीं. लगेच स्वामी सर्व मंडळींसह देवघरांत बसण्यासाठीं गेले.

" नाथा ! तुम्ही दोघे आम्हांला अगदीं अचानक भेटलां. आतां धाकट्या धनीसाहेबांचें रक्षण कसें होईल याची चिंता करण्याचें कारण उरलें नाहीं. थोरले धनीसाहेब आम्हां दहा शतवीरांवर धाकट्या धनीसाहेबांच्या संरक्षणासाठीं विसंबून गेले आहेत. संकटें तर एकाहून एक पर्वताप्रमाणें विशाल स्वरूप धारण करून जबडा पसरून समोर चालून येत आहेत. त्यांच्या जबड्यांतून धाकट्या धनीसाहेबांचा जीव बचावण्यासाठीं आम्ही दहाही शतवीर बळी पडणार हें आम्हांला पूर्वीच माहीत होतें; पण दहांपैकीं नऊ एथवरच बळी पडले तरी काळाची भूक शांत झाली नाहीं; अशा स्थितींत आम्हां दहा शतवीरांच्या माथ्यावरील कामगिरीचा प्रचंड बोजा मी एकटा कोठवर तोलून धरूं शकेन अशी माझ्या मनाला एकसारखी चिंता लागून राहिली होती. पण देवाला आम्हां शतवीरांच्या अब्रूची व महाराष्ट्राच्या चिरस्थायित्वासाठीं जीवावर उदार होऊन झटणाऱ्या आमच्या धनीसाहेबांची काळजी आहे, म्हणूनच त्यानें माझ्या जोडीला दुसरे दोन शतवीर

हे तुम्ही दोघे अचानक आमच्या ध्यानींमनीं नसतां आम्हांला भेटविले." कंठाजी म्हणाला.

"खरें; पण तुम्ही आतां कोठून आलां ?" स्वामींनीं विचारलें. "तुम्हांला ह्या गुप्त स्थानाचा पत्ता कसा कळला ?"

"पत्ता कोठून कळणार ! पण स्वामी ! आंधळ्याच्या गाई देव राखी म्हणतात, त्यांतली अवस्था झाली." बाजीराव चंद्रसेनाच्या आज्ञेवरून स्वतः-च्या वांट्याला कैद आल्यापासून तों बोलईच्या डोंगरांतील गुहेंत रिघेपर्यंतचा सर्व वृत्तान्त स्वामींना निवेदन करून म्हणाला, "आम्ही—मी व कंठाजी, हैबती आणि वैकुंठा हे माझे तिघे शतवीर असे चौघे शत्रूपासून बचाव होण्याची आशा दिसेना तेव्हां जिवावर उदार होऊन गुहेंत घालून घेतलें, तेव्हां शेवटीं आम्ही येथें येऊन पोंचणार आहों अशी आम्हांला कल्पना देखील नव्हती. पण देव आमचा पाठीराखा होता."

"हो! गुहेंतून तुम्ही एथवर सुखरूप आलां, तो देव तुमचा पाठीराखा होता म्हणूनच आलां. नाहींतर ती वाट अत्यंत अवघड आहे. म्हणूनच मी इथें वास्तव्य करूं लागल्यापासून कधींच तिचा उपयोग केला नाहीं." स्वामी म्हणाले.

"पण स्वामी ! आपण एखादा नारळ तळ्यांत सोडला होता का ?"

"होय. व्यासराबावरून ओंवाळून मीं एक नारळ तळ्यांत टाकला होता खरा."

"तर मग तोंच मला सांपडला. माझा तर्क एकूण बरोबर होता."

"पण हैबती व वैकुंठा कुठें आहेत ?" नाथाजीनें मध्येंच विचारलें. पिलाजी बाजरीवाच्या तोंडून त्या म्हातारीची व दोघी मुलींची वार्ता ऐकून विचार करूं लागला, त्या आपल्या कमळजा व कमळा तर नसतील !

"मीं आतांच सांगितलें ना, ह्या वाटेनें येतांना एथल्या भूदेवाला आम्हांला ते दोन नरबली द्यावे लागले. एरव्हीं आम्हांला एथवर येतां येणें शक्यच नव्हतें." कंठाजी म्हणाला.

"म्हणजे ?" स्वामींनीं विस्मित होऊन विचारलें, "तुमच्यांतले दोघे वीर वाटेनें येतां येतां बळी पडले काय ?"

"होय स्वामीजी !" बाजीराव उद्गारला. "माझ्या दोघां शतवीरांनीं

वाटेंत माझ्या पायांखालीं आपल्या देहाच्या पायघड्या पसरल्या नसत्या तर मला एथवर येतांच आलें नसतें."

" तें कसें काय ?" स्वामींनीं विचारलें.

बाजीराव म्हणाला, " स्वामी ! गुहेंतला रस्ता इतका बिकट व भयानक आहे कीं, कोणीही त्या रस्त्यानें शीरसलामत एका टोंकाहून दुसऱ्या टोंकाला जाऊं शकणार नाहीं. पाऊण रस्ता पार पडेपर्यंत आम्ही चौघेही कसेबसे जीव बचावून आलों; पण पुढें मात्र आमचा कांहीं इलाज चालण्यासारखा नव्हता. तेथें मध्येंच आठ-नऊ हात लांबीपर्यंत अत्यंत खोल असें भगदाड आहे. तें किती खोल असेल याचा अंतच नाहीं. आंत पाणी आहे; पण दरडीच्या दोन्ही बाजूंनीं बोटभरदेखील मोकळी जागा नाहीं. शिवाय त्या भगदाडाच्या तोंडावर असंख्य कांटेरीं पसरलेलीं असल्यानें ती विहीर ओलांडून पुढें येणें कोणाही माणसाला शक्य नव्हतें. आम्हीं एकदां तसेंच माघारें जाण्याचा विचार केला; पण माघारें तरी शत्रूंच्याच जबड्यांत जावयाचें, त्यापेक्षां पुढें जाऊन मरणेंच उचित असा आम्हां सर्वांचा विचार झाला. लगेच माझ्या दोघां शतवीरांनीं त्या कांटेऱ्यांवर आपले देह आडवे टाकले व त्यांवरून आम्हांला वाट करून दिली. आमचें आयुर्बल जबरदस्त म्हणून आम्ही कसेबसे त्या वाटेनें विहिरीपार झालों. माझ्या मागाहून कंठाजी आला. पण आम्ही पुढें जातांच मग त्या दोघां हुतात्म्यांच्या रक्षणाचा कांहीं उपाय करणार, तोंच आमच्या वजनानें तीं कुजकीं कांटेरीं करकरां मोडून भगदाडांत पडलीं त्या-बरोबरच ते दोघे वीर खालीं कासळले !"

बोलतां बोलतां बाजिरावाचा कंठ गहिंवरानें दाटून आला. स्वामींनीं व नाथाजी आणि पिलाजी यांनाही त्या मृतवीरांच्या नांवानें धन्योद्गार काढले. स्वामी नाथाजी व पिलाजी यांना उद्देशून म्हणाले, " पहा ! ह्या शतवीरांनीं नांवासारखी करणी केली. तुम्हींही शतवीरच आहां. तुम्हींही मायदेशासाठीं मरण्याला भितां कामा नये. सध्यांची वेळच अशी आणीबाणीची आहे कीं, ही प्रतिकूल परिस्थिति असे कांहीं नरबली घेतल्याशिवाय शांत व्हावयाचीच नाहीं. हें ओळखून सर्वांनीं पुढें पाऊल टाकलें पाहिजे."

" स्वामी ! आपण आम्हांला जगविलें म्हणून आम्ही जगलों. आतां

आपण आम्हांला प्रत्यक्ष काळाच्या जबड्यांत उडी घालावयाला सांगितलें तरी आमची तयारी आहे." पिलाजी म्हणाला.

"ठीक आहे." स्वामी बाजिरावाकडे वळून म्हणाले, "बाजी ! मीं आज धावडशीहून येतांना ज्या गोष्टी करावयाचें योजिलें होतें, त्यांपैकीं एक महत्त्वाची गोष्ट तुझा शोध करून तुझी शाहूमहाराजांकडे पाठवण करणें ही होती, ती अनायासें अर्धी पार पडली. यदृच्छेनें ज्या भावी कार्याची जबाबदारी माझ्या शिरावर पडली आहे, त्या कार्याला हा शुभशकूनच झाला म्हणावयाचा. आतां तूं एक करावयाचें; वडिलांच्या सुटकेची तांतडीनें सोय लावण्यासाठीं प्रथम धावडशीहून स्वामींना घेऊन साताऱ्याला जावयाचें."

"माझादेखील तोच मानस होता." बाजीराव म्हणाला. "पण आपणाला तिकडची कांहीं खबर कळली का ?"

"होय. बाळाजीपंत पांडवगडावर आहेत व सेनापति गडाला वेढा देऊन बसला आहे; पण महाराजांनीं गडकऱ्याला बाळाजीपंतांचें रक्षण करण्याची आज्ञा केली असून सेनापतीलाही तावडतोब वेढा उठवून माघारा बोलावलें आहे, असें मला स्वामींपाशीं कळलें."

"पण त्यापुढचा प्रकार तुम्हांला नाहीं समजला."

"तो काय ?"

"सेनापतीनें महाराजांचें आज्ञापत्र मगरूरपणें पायांखालीं तुडवून तें आज्ञापत्र आणणाऱ्या शतवीराला जीवें मारलें, व 'महाराजांनीं सेनाकर्त्यांचा कैवार घेतल्यास आपणाला महाराजांचे पाय अंतरतील' असा उलट जबाब महाराजांना पाठविला असल्याचें कळलें आहे."

"काय ? सेनापतीच्या मगरूरपणाची मजल एथवर गेली काय ?"

"होय स्वामीजी !"

"ठीक आहे. माणसाचा विनाशकाल आला, कीं त्याला अशी विपरीत बुद्धि व्हावयाचीच. असो. तूं आतांच्या आतां स्वामींपाशीं जाऊन स्वामींना ह्या साऱ्या प्रकाराची खबर दे आणि त्यांना माझा निरोप सांग—किंवा थांब. निरोप कशाला ? मी स्वामींना चिठ्ठी देतों, तेवढी त्यांना पावती कर म्हणजे झालें." असें म्हणून स्वामींनीं एका कागदाच्या तुकड्यावर

'अग्रतश्चतुरो वेदान् पृष्ठतः सशरं धनुः
इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि !'

एवढा एक श्लोक लिहून तो कागद बाजिरावाच्या स्वाधीन केला.

नाथाजी व पिलाजी यांना आशा होती कीं, स्वामी आपणाला बाजिरावा-बरोबर जाण्याची आज्ञा देतील, व आपली ह्या कैदेंतून एकदांची मोकळीक होईल; पण स्वामींनीं तसें कांहीं केलें नाहीं. तरीही नाथाजीनें आपण होऊन पुढें जाऊन बाजिरावाला विचारलें, "धाकटे धनीसाहेब! आम्ही दोघेही आपल्याबरोबर येतों."

स्वामी म्हणाले, "तुम्ही त्यांच्याबरोबर जाऊन काय करणार? तुम्ही दोघेही बाहेर जावयाला अधीर झालां आहां हें मला माहीत आहे; पण इथें मला याहून महत्त्वाच्या कार्यासाठीं तुमची गरज आहे."

इतक्यांत बाहेरच्या बाजूला बांगड्यांचा मंजुळ आवाज ऐकूं आला तेव्हां बाजिरावानें तिकडे डोकावून पहात विचारलें, "बाहेर बांगड्या कोणाच्या वाजतात?"

"कोण आहे बाहेर? ऋद्धि?" स्वामींनीं तिकडे पहात विचारलें.

स्वामींची अटकळ बरोबर होती. त्या गुहेंत ऋद्धि-सिद्धींशिवाय कोणाच्या बांगड्या वाजणार! त्या दोघी बराच वेळ आपसांत कांहीं खलबत करून हांक ऐकतांच अवगुंठनासह पुढें येऊन उभ्या राहिल्या. त्या दोघींनीं यावेळीं इथें येण्यांत आपला आज्ञाभंग केला असें स्वामींना वाटून त्यांची चर्या कांहींशी रागीट दिसूं लागली.

"ह्या कोण?" बाजिरावानें विचारलें.

"गुरुजी! आपली आज्ञा उल्लंघन करून आम्ही दोघी इथें आलों याबद्दल क्षमा करा." ऋद्धि म्हणाली.

"पण तुम्ही इथें कशासाठीं आलांत?" स्वामींनीं विचारलें.

"पण स्वामी! ह्या कोण?" बाजिरावानें पुन्हा विचारलें.

"आम्ही एक विनंति करण्यासाठीं इथें आलों आहों." ऋद्धि-सिद्धि एकदम उतरल्या.

"कसली विनंति?" स्वामींनीं बाजिरावाच्या प्रश्नाकडे दुर्लक्ष्य करीत विचारलें.

"आमची प्रतिज्ञा पूर्ण करण्याची आम्हांला मोकळीक द्यावी." सिद्धि म्हणाली.

"तुमची प्रतिज्ञा तुम्ही पूर्ण करणार ?" स्वामींनीं विचारलें.

"होय." ऋद्धि-सिद्धि एकदम उत्तरल्या.

"पण ह्या कोण व ह्यांची प्रतिज्ञा कसली ?" पुन्हा बाजिरावानें विचारलें.

आतां ह्या गोष्टी गुप्त ठेवण्यांत स्वारस्य नाहीं असें पाहून स्वामी बाजिरावाला म्हणाले, "बाजी ! तुझ्या शतवीरांत स्त्रीवीर आहेत का ?"

"नाहींत. कां बरें ?" बाजिरावानें विचारलें.

"तर मग माझ्या ह्या दोन मुली तूं आपल्या शतवीरांत सामील करून घे." स्वामी ऋद्धि-सिद्धींकडे वळून विनोदानें म्हणाले, "मुलींनो ! आतां तो बुरखा टाकून द्या. पुरें झालें."

ऋद्धि-सिद्धींनीं लगेच आपल्या तोंडावरचे बुरखे दूर केले; त्याबरोबर सर्वांनीं त्यांना ओळखलें. त्या व कमळा व कमळजा होत्या. त्या दोघीही लाजून जरा दूर उभ्या राहिल्या. नाथाजी व पिलाजी यांना त्या आपल्या दोघी हृदयेश्वरींना पाहून पृथ्वीचें राज्य मिळाल्याइतका आनंद झाला.

नाथाजी म्हणाला, "पहिल्या दिवसापासूनच आमची कल्पना होती कीं, ह्या कमळा व कमळजाच आहेत."

"पण त्या अजून ऋद्धि-सिद्धिच आहेत. जोंपर्यंत त्या दोघींनीं श्रीगिजाननाच्या चरणांना स्पर्श करून केलेली प्रतिज्ञा शेवटाला गेली नाहीं, व जोंपर्यंत तुम्हीं दोघांनींही शतवीरांच्या नांवाला शोभेलसा विजय संपादन केला नाहीं, तोंपर्यंत त्या तुमच्या कमळा व कमळजा नव्हेत; त्या ऋद्धि-सिद्धि आहेत." स्वामी बाजिरावाकडे वळून म्हणाले, "बाजी ! तुम्ही बापलेक अगदीं पहिल्यानें देवदर्शनाला आलां तेव्हां मीं नाथाजी व पिलाजी यांच्या जिवाला जपण्यासाठीं तुम्हांला आग्रहपूर्वक सांगितलें होतें तें एवढ्याचसाठीं."

"पण स्वामी ! ह्या दोघींची गांठ आपणाशीं कुठें व केव्हां पडली ?" बाजिरावानें विचारलें.

"इथेंच, एथल्या खंडोबाच्या देवालयांत. तुम्ही मला भेटलां त्याच्या पूर्व दिवशींच मी कामानिमित्त बाहेर जात होतों, तेव्हां अचानक ह्या दोघी भिकाऱ्यांच्या वेशांत तेथें रडत बसलेल्या आढळल्या. आजकाल देशांत मुसलमानांचे अत्याचार कसे चालले आहेत हें मला माहीत होतें. तेव्हां

यांच्या कपाळीं कुंकूं नव्हतें. पण ह्या दोघींच्याही कपाळावर गोंदलेलें पाहून मीं ओळखलें कीं, ह्या हिंदु मुली असाव्या. मीं लगेच त्यांची विचारपूस केली, तेव्हां त्यांनीं आपली सारी कहाणी मला सांगितली. ती ऐकून मला त्यांची दया आली व माझ्या धर्मकन्या म्हणून मीं त्यांना आश्रय दिला."

नाथाजीनें मध्येंच उतावळेपणानें विचारलें, "तर मग इतके दिवस त्यांना मुसलमानांच्या आडदांड अत्याचारांना बळी पडून जिवंत राहणेंच मानवलें! अब्रूपेक्षां त्यांना प्राणांची किंमत जास्त वाटली. होय ना?"

नाथाजीचा प्रश्न इतरांना दिसावयाला सरळ दिसला; पण तो ऋद्धि-सिद्धींच्या ऊर्फ कमळजा व कमळा ह्या दोघींच्याही मात्र जिव्हारीं जाऊन झोंबला. त्या दोघीही रागानें लाल झाल्या. कमळजा मानीपणांत म्हणाली, "तुमच्या प्रश्नाचा आशय मला समजला."

"काय आशय समजला?" नाथाजीनें विचारलें.

"तें आमच्या तोंडून कशाला वदवतां?" कमळजा स्वामींकडे वळून म्हणाली, "एवढ्याचसाठीं स्वामी! आपण आम्हांला पहिल्या दिवशींच आमच्या घरीं पोंचविण्याला तयार असतांही आम्हांला इतक्यांत घरीं जावयाचें नाहीं असें आम्हीं सांगितलें. आमच्या कमनशिबानें आम्ही मुसंड्यांच्या हातीं लागलों, तेव्हां आमचे हे मर्द आमच्या शोधासाठीं कांहीं धडपड न करतां माशा मारीत बसले आणि आतां मात्र आमच्या पावित्र्याविषयीं संशय घ्यावयाला-देखील यांना लाज वाटत नाहीं!"

कमळजा बोलली तें नेमकें नाथाजीच्या मनांतलें बोलली. नाथाजीनें त्या संशयानें प्रेरित होऊनच तो प्रश्न विचारला होता.

कमळा कांहींशा शांतपणें नाथाजीला म्हणाली, "नाथा! तुमच्या बायका-बहिणींच्या पातिव्रत्याची तुम्हांला हीच पारख आहे काय?"

स्वामींनीं पाहिलें कीं, हा वाद आतां भलत्याच थराला जाऊन पोहोंचेल. तसें होणें ह्या घडीला इष्ट नसल्यानें ते 'रामाय स्वस्ति; रावणाय स्वस्ति' या न्यायानें म्हणाले, "आतांच ह्या गोष्टींचा ऊहापोह कशाला हवा? त्याचा विचार करण्याची वेळ येईल तेव्हां पाहूं. सध्यांचा प्रश्न आपणासमोरच्या प्राप्त-कर्तव्याचा आहे."

"तें कर्तव्य करण्याची मोकळीकच आम्हांला पाहिजे आहे." ऋद्धि

खेद आणि संताप यांनीं लालबुंद होऊन नाथाजी व पिलाजी यांच्याकडे बोट दाखवून म्हणाली, " ह्या दोघांनाही वाटलें असेल, कीं आम्हांला पदरीं घ्या अशी विनवणी करण्यासाठीं आम्ही इथें आलों, म्हणून ते माघार घेत असतील. पण आम्ही कशा आहों, कोणकोणत्या आपत्तींतून आम्हीं गेले अकरा महिने आमचा कसकसा बचाव केला, हें एक आम्हांला व दुसऱ्या त्या भगवंताला माहीत ! तिसऱ्या कोणाला तें कळावयाचें नाहीं व म्हणून आम्ही तें कोणाला सांगूंही इच्छीत नाहीं. स्वामी ! तुम्हांलादेखील आमच्या गळ्याची शपथ आहे; आमच्या अज्ञातवासाची कहाणी यांना मुळींच सांगूं नका. यांना त्याची किंमत काय कळणार ? आपल्यावरून जगाची परीक्षा करावयाची हा मनुष्यमात्राचा स्वभावच आहे. हे मोठे शतवीर एकाहून एक रथी–महारथी पडले; पण यांच्या नाकावर नाचूनच इस्माईलनें द्रौपदीला बाटवून आपली बटीक करून सोडली. यशोदेलाही यांच्या डोळ्यांदेखत त्यानें ओढून नेली. पण त्या राक्षसांचा प्रतिकार यांना करतां आला नाहीं. आणि आम्ही तर काय, बोलून चालून बायका. आमची अक्कल चुलीपुरती. आमच्या पावित्र्या-विषयीं यांना शंका येणें सहाजिकच आहे. बोलून चालून जे गाजरपारखी, त्यांना रत्नांची पारख कोठून असेल ? यशोदेसारख्या परस्त्रीवर पापी नजर ठेवणाऱ्या पापिष्टांना आपल्या बायकांच्या पातिव्रत्याविषयीं असा संशय आला नाहीं तरच आश्चर्य ! चोराला सारेच चोर दिसायचे ! "

" कमळजे ! त्या वेड्याच्या बरळण्यावर विश्वासून तुम्हीदेखील यशोदे-च्या बाबतींत आमच्या वर्तनाविषयीं संशय घेतां ना ? " नाथाजीनें विचारलें.

" आपल्या कुलवधूविषयीं निराधार संशय घेतांना जर तुम्हांला कांहीं दिक्कत वाटत नाहीं, तर व्यासराव धडधडीत तुमच्या नांवानें खडे फोडीत असतां आम्हांला तरी संशय कसा येणार नाहीं ? " कमळजेनें विचारलें.

" आम्हीं पाहिजे तर आमच्या पवित्र वर्तनाबद्दल दिव्य करूं ! " पिलाजी म्हणाला.

" तर मग आम्हीही दिव्य करून आमची पवित्रता अथवा अपवित्रता जी काय खरी असेल ती वेळ येईल तेव्हां सिद्ध करूं ! " कमळा उत्तरली.

" पण कमळे ! आपणाला त्याच्याशीं करायचें आहे काय ? मीं एकदां सांगून सोडलें कीं, कमळा व कमळजा मेल्या." कमळजा म्हणाली.

नाथाजी म्हणाला, "कमळजे! असा त्रागा करण्यांत अर्थ काय? तुम्ही जर तसें म्हणाल तर मग आम्हीही म्हणूं कीं, नाथाजी व पिलाजी मेले. तें तुम्हांला चालेल?"

हा कलह जास्तच विकोपाला जाऊं लागला असें पाहून स्वामी त्याला तेथेंच पूर्णविराम देण्याच्या इराद्यानें म्हणाले, "सध्यां तरी तुम्ही कोणाचीं कोण नव्हे. ऋद्धि-सिद्धि! तुम्ही आंत जा. तुम्ही सारीं एकमेकांना मेलां, मग हा वाद कशाला?"

"आम्हीं हा वाद काढलाच नाहीं." कमळजा रागांत म्हणाली, "स्वामी! आम्ही आपल्या आश्रयाला आलों व आपण आम्हांला आपल्या शिष्या कल्पून ऋद्धि-सिद्धि असें आमचें नामकरण केलें, तेव्हांच आम्हीं आपणांला सांगितलें आहे कीं, कमळा व कमळजा केव्हांच मेल्या, आतां त्यांची व त्यांच्यासारख्याच इतर अनाथ हिंदु अबलांची विटंबना करणाऱ्या दुरात्म्यांना रसातळाला नेऊन यथाशक्ति भूभार हलका करण्यासाठीं ऋद्धि-सिद्धि नवा जन्म घेऊन अवतरल्या आहेत त्या ह्या समोर दिसतात. हें अंगीकृत कार्य पार पाडण्यासाठीं आम्हांला आतां मोकळीक मात्र पाहिजे आहे."

"बरें आहे; तुम्ही अगोदर आंत जा." स्वामी म्हणाले.

लगेच ऋद्धि-सिद्धि संतापानें फणफणत आंत निघून गेल्या.

"नाथाजी! तुमचा माझ्यावर विश्वास आहे का?" स्वामींनीं विचारलें.

"होय स्वामीजी!" नाथाजी व पिलाजी एकदम उत्तरले.

"तर मग मी सांगेतों, तुम्ही कमळा व कमळजा यांच्याविषयींचा विचार डोक्यांतून अजिबात काढून टाकला पाहिजे. त्या पवित्र आहेत किंवा नाहींत याविषयीं तुम्हांला तूर्त चिंता करण्याचें मुळींच कारण नाहीं. ती वेळ येईल तेव्हां आपण तें पाहूं. तुम्हांला वाटतें त्याहून त्या मुलींची योग्यता फारच मोठी आहे."

"तें आम्हीं तरी कुठें नाकबूल केलें?" नाथाजी म्हणाला, "पण त्या मात्र दोघीही संशयी आहेत. आतांच आपण पाहिलें ना, त्यांनीं यशोदेविषयीं कसा संशय घेतला तो?"

"जें झालें, तें निसर्गाला धरूनच झालें. तुम्हींदेखील त्यांच्याविषयीं संशय घेतला कीं नाहीं?"

नाथाजी यावर कांहींच बोलेना.

"कां ? आतां बोलत कां नाहींस ? जो न्याय तुम्हांला लागू, तोच त्यांनाही लागू आहे. सभोंवारच्या परिस्थितीचा प्रांत इतका भयाण—इतका उजाड झाला आहे कीं, त्या प्रांतांत तुमच्यासारख्या दुबळ्या मनाच्या माणसांच्या आश्रयानें अशीं संशयाचीं पिशाचें वावरावयाचींच. एवढ्याचसाठीं मीं आजवर तुमची एकमेकांची ओळख पटूं दिली नव्हती. आणि तुम्हीं जर इतका उतावळेपणा केला नसता, तर सर्व गोष्टी यथाकालीं बिनबोभाट पार पडल्या असत्या. मी जाणतों कीं, तुम्ही तरुण आहां, त्या तरुण आहेत; संसारसुखाची लालसा तुमच्याठायीं असणें ओघानेंच प्राप्त आहे. पण कोणत्याही गोष्टीला काळ-वेळ असते. आजची वेळ अशी आणीबाणीची आहे कीं, या वेळीं सर्वस्वावर-घरादारांवर-बायकापोरांवर पाणी सोडून मायदेशाच्या मंगलासाठीं मरणाच्या मोलानें झटणारे जेवढे सुपुत्र व सुकन्या स्वयंस्फूर्तीनें पुढें येतील तितकीं थोडींच आहेत. हे तुमचे धाकटे धनी पहा, तिकडे काळाच्या जबड्यांत उभे असलेले थोरले धनी पहा, ते जे आज वणवण करीत हिंडत आहेत ते कशासाठीं बरें ? तसाच मी—मी बोलूनचालून सर्वसंग-परित्यागी संन्यासी ! असें असतां स्वदेश व स्वधर्म यांच्या रक्षणासाठीं मलादेखील ह्या आपत्तींच्या पेटत्या वणव्यांत आपखुषीनें उडी घालावी लागली. ब्रह्मेंद्रस्वामी काय किंवा मी काय, साधुसंन्याशांना ब्रह्मकर्म व तपश्चर्या सोडून महाराष्ट्राचें राजकारण आणि धर्मकारण यशस्वी करण्यासाठीं कधीं वीर तर कधीं हेर तर कधीं आणखी कांहीं बनावें लागतें; याची तुमच्यासारख्या महाराष्ट्राच्या कर्त्या पिढीला लाज वाटली पाहिजे. तुम्हांला तुमचा देश राखतां येईना म्हणून चोहों बाजूंला पुंड-लुटारूंकडून तो लुटला जात आहे. तुम्हांला तुमचें घर सांभाळतां येईना, म्हणून मोगलाईतील मुसंडे कोणी फकीर तर कोणी शिलेदार बनून तुमच्या घरांत घुसतात व तुमच्या डोळ्यांदेखत तुमच्या बायकांना ओढून नेतात. कालच पहा, अविंधांनीं खंडोबाच्या देवालयाचा कसा विध्वंस केला व यशोदेला कशी ओढून नेली. तुमच्यांतले शतवीर ह्या अत्याचाराचा प्रतिकार करतांकरतां मरून पडले; त्यांच्या रक्तानें रंगून अपवित्र झालेलें देवालय तुम्हीं जोंवर तुमच्या शत्रूंच्या रक्तानें धुऊन स्वच्छ केलें नाहीं तोंवर तुम्ही शतवीर तर नाहींच पण माणूसदेखील शोभणार नाहीं. ह्या अनर्थाची तुम्हांला कांहीं चीड असेल,

तर आतांच्या आतां ह्या श्रीगजाननाच्या चरणांना स्पर्श करून शपथ घ्या कीं, आमचा देश व आमचा धर्म यांच्या रक्षणासाठीं जे जे कोणी देशद्रोही व धर्मद्रोही असतील त्यांचा आम्ही निःपात करूं व हिंदवी-स्वराज्याच्या भरभराटीसाठीं मरेतों अहर्निश झटूं !"

स्वामी बोलले ते अंतःकरणाच्या कळकळीपासून बोलले, व त्याचा नाथाजी पिलाजी, बाजीराव वगैरे मंडळींच्या मनावर इष्ट तोच परिणाम झाला. नाथाजी व पिलाजी यांना इतका वेळ कांतेचा मोह जाचत होता; पण स्वामींनीं आपल्या जिवंत वाणीनें त्यांचें वर्तमान-कर्तव्य त्यांच्यासमोर मूर्तिमंत उभें करतांच त्यांना त्या कर्तव्याखेरीज दुसरें-तिसरें कांहीं दिसेनासें झालें. बाजि-रावाला स्वामींच्या अंतःकरणाची पुरी पारख नव्हती, ती आज झाली. त्यानें सर्वांच्या अगोदर पुढें होऊन स्वामींनीं सांगितल्याप्रमाणें शपथ घेतली. त्याच्या मागोमाग नाथाजी, पिलाजी व कंठाजी यांनींही शपथा घेतल्या व सर्वजण स्वामींच्या आज्ञेची वाट पहात त्यांच्यासमोर हात जोडून उभे राहिले.

"शाबास ! आतां तुम्हांला शतवीर हें नांव शोभतें." स्वामी नाथाजी व पिलाजी यांना उद्देशून म्हणाले, "आतां मी सांगतों त्या कामगिरीवर एक पुरंदराला व दुसरा पांडवगडावर असे तुम्ही चालूं लागा."

"पण स्वामी ! यशोदा व पिराजी इस्माईलच्या कैदेंत आहेत. त्यांचा व इतर हिंदु रयतेचा तेथें अमानुष छळ चाललेला आहे. त्यांच्या मुक्ततेची कांहींच तजवीज करायला नको का ?" कंठाजी म्हणाला.

स्वामी म्हणाले, "कंठाजी ! तुम्ही लढवय्ये पडलां. राजकारणाचे गुंतागुतीचे डाव तुम्हांला सोडवितां यावयाचे नाहींत. इस्माईलचा पाडाव करावयाचा झाला तरी सैन्यबळ पाहिजे; तें सैन्यबळ सेनापतीचें सेनाकर्त्यांना लागलेलें ग्रहण सुटल्याशिवाय कसें मिळेल ? नुसत्या भावनांना बळी पडून असल्या राजकीय उलाढाली पार पाडतां येत नसतात."

बाजिरावाला स्वामींचे दूरदर्शीपणाचे विचार सोळा आणे पटले. तो म्हणाला, "स्वामींचा शब्द आम्हांला शिरसामान्य आहे."

कंठाजीला यावर आणखी कांहीं बोलण्याला तोंडच नव्हतें. तरीही तो एवढेंच म्हणाला, "प्रसंग तर असा आहे. आतां ईश्वर काय करील तें खरें."

"ईश्वर सर्व कांहीं यथान्याय करील. ईश्वर न्यायी आहे." असें म्हणून

स्वामींनीं तेथल्या तेथें दोन चिठ्या लिहून त्या नाथाजी व पिलाजी यांच्या स्वाधीन केल्या व त्यांना बजावून सांगितलें, " नाथा ! तूं ही चिठी पांडवगडच्या गडकऱ्याला द्यावयाची. तो हरउपायांनीं बाळाजीपंतांना शत्रूच्या गोटापार करून देईल. तोंवर महाराजांकडून मदत आली असली तर ठीकच; नाहींपेक्षां जे शतवीर शिल्लक असतील, त्यांच्यासह त्यांनीं पुरंदरपावेतों यावें." स्वामी पिलाजीकडे वळून म्हणाले, " आणि पिलाजी ! ही चिठी घेऊन तूं पुरंदराला सचिवांना पावती कर, आणि त्यांनीं जर कांहीं उत्तर दिलें तर तें तावडतोब घेऊन ये."

" पण स्वामी ! आपल्या शब्दाचा त्या दोघांपाशीं उपयोग होईल ना ? " बाजिरावानें विचारलें.

" उपयोग होईल म्हणजे ? खास उपयोग होईल. ते दोघेही माझे शिष्य आहेत, त्यांच्याकडून अन्यथा वर्तणूक कदापि व्हावयाची नाहीं." स्वामी म्हणाले.

एवढा बेत ठरल्यावर सर्वांनीं मोठ्या पहांटेला उठून आपापल्या वाटेला लागावयाचें, असें बोलणें होऊन सर्वजण झोंपीं गेले. पहांट होतांच स्वामी सर्वांना नीट वाटेला लावून आपल्या दोघां धर्मकन्यांचा समाचार घेण्यासाठीं व त्यांना हिताच्या दोन गोष्टी सांगण्यासाठीं परत येतात, तों त्या दोघीही जाग्यावर नाहींत ! ह्या एकाएकीं कशा नाहींशा झाल्या याचा स्वामींना मोठा अचंबा वाटला. त्यांनीं सारी गुहा धुंडाळून पाहिली पण फुकट ! आतां त्यांचा शोध कुठें करावा हेंच त्यांना कळेना. त्या देवालयांतील वाटेनें गेल्या नसाव्या अशी स्वामींची खात्री होती. अर्थात् बाजीराव वगैरे ज्या भुयारांतून आले, त्या भुयारांतून त्या गेल्या असाव्या असा त्यांचा तर्क होता. तसें असेल तर त्या आतां जिवंत हातीं लागावयाच्या नाहींत; बाजिरावाच्या दोघां शतवीरांची जी गत झाली तीच त्यांचीही होणार ! पण याला इलाज काय ! स्वामी त्या दोघींचा शोध करण्यासाठीं जातील तर इकडे व्यासरावाची अवस्था फार कठीण होती. त्याला टाकून जावयाची सोय नव्हती. पण अशा स्थितींतही स्वामींना स्वस्थ बसवेना. ते व्यासरावाची प्रकृति जरा बरी आहे असें पाहून त्याच्या रक्षणाचा भार भगवंतावर घालून कमळा व कमळजा यांचा शोध लागला तर पहावा म्हणून तसेच गुहेच्या वाटेला लागले.

## दर्शन विसावें

# असें कसें झालें ?

यशोदा व पिराजी इस्माईलच्या हातीं सांपडल्यापासून त्या दोघांच्याही छळाची इतकी परमावधि झाली होती कीं, एकेक दिवस जावा तों एकेक संवत्सर आपण रौरव नरकांत डाम्बून पडलों आहोंत कीं काय, असा भास त्यांना होत होता. वस्तुतः ह्या अनर्थाचा सोक्षमोक्ष या पूर्वींच लागावयाचा पिराजी केव्हांच बाटविला जावयाचा किंवा ठार तरी व्हावयाचा. व यशोदा इस्माईलची बिब्बी बनावयाची. ह्या दोन्ही गोष्टी इस्माईलच्या हातच्या होत्या. पण त्या अंमलांत आणणें त्याला आजवर शक्य झालें नव्हतें. याचें कारण एक तर यशोदा पुत्रशोकानें झुरणीला लागली होती. त्यांतच ती गर्भारपणाच्या आजारानें आंथरुणाला खिळली असल्यानें व ती ह्या आजारांतून वांचते कीं ह्या आजारांतच मरते याचीच वानवा असल्यानें, तसेंच अशा परिस्थितींत कांहीं अतिप्रसंग करूं म्हटल्यास ती प्राणत्याग करील असेंही इस्माइलला भय असल्यानें प्रथम प्रथम तिच्या वाटेला जाण्याचें धैर्य त्याला होईना. त्यांतूनही त्यानें तेवढेंही पशुतुल्य आचरण करण्याला कमी केलें नसतें; असले अत्याचार करणें हा त्याचा नेहमींचाच व्यवसाय होता. पण लतिफा कांहींशी त्याच्या आड येत होती. आपल्या पतीची यशोदेवर पापी दृष्टि आहे असें पाहातांच लतिफेनें त्रागा सुरू केला होता, कीं जर तुम्हीं यशोदेला आपली सवत करून घरांत आणली, तर आपण आत्महत्या करूं. लतिफेचा हा त्रागा इस्माईलाला वरून दिसावयाला सवतीमत्सरासारखा दिसला, व लतिफा खरोखरच बोलल्याप्रमाणें आत्महत्या करावयाला कमी करणार नाहीं अशी त्याची बालंबाल खात्री होऊन चुकली, म्हणून त्याचें मन अत्याचार करण्याला कच खाऊं लागलें. त्याला वाटलें, जर आपण लतिफेचा शब्द मोडून यशोदेला बळजबरीनें तिची सवत बनविली, तर यशोदाही आत्मघात करावयाची व लतिफाही आपला बोललेला शब्द खरा करावयाची! मग हीही बायको नाहीं व तीही नाहीं. त्यांतूनही त्यानें लतिफेचा शब्द पायांखालीं तुडवून यशोदेला

बाटविली असती व लतिफेला जबरदस्तीनें ताळ्यावर आणण्याचे आसुरी उपाय अंमलांत आणण्याची शिकस्त केली असती; पण न जाणो, त्यामुळें त्याचा एकुलता एक जहांगीरही आपल्या आईबरोबर गमावला असता, निदान पोरका तरी झाला असता. यशोदा इस्माईलच्या हातीं लागावयाला व जहांगीर आजारी पडायला एक गांठ पडली असल्यानें इस्माईलला लतिफा वगैरेंच्या समजावणीनें वाटूं लागलें होतें कीं, हा यशोदेच्या तळतळाटाचा तर परिणाम नसेल ? खुद्द यशोदाही जेव्हां जेव्हां इस्माईल समोर येई तेव्हां तेव्हां निर्भयपणें त्याला शापी, "मेल्या ! चांडाळा ! मी जर खरी पतिव्रता असेन, तर माझे शाप माझा छळ करणारांचीं पाळेंमुळें खणून काढावयाला पुरून उरतील. तूं रणांगणावरील योध्यांचे तरवारीचे वार व शर बेळीं चुकविशील पण पतिव्रतेचे शाप तुला असे चुकवून चुकतां यायचे नाहींत."

लतिफेनेंही पुराणेतिहासांतील उज्ज्वल उदाहरणें सांगून पतिव्रतांचा छळ करणाऱ्या दुरात्म्यांचा सर्वनाश कसा होतो याचीं एकाहून एक भडक शब्दचित्रें इस्माईलसमोर रंगवावीं, तीं पाहून त्याचें मन भावी अनर्थांच्या भयानें थरथर कांपूं लागावें. त्याची आई सुलताना जरी हीन जातींतील स्त्री होती व ती बाटून मुसलमान झालेली होती, तरी तीदेखील जन्मानें हिंदु होती. तिला पुराणेतिहासांतील पतिव्रतांच्या उज्ज्वल कथा ऐकून माहीत होत्या. त्यांतच कावळा बसावयाला व डहाळी मोडावयाला एक गांठ पडावी त्याप्रमाणें जहांगिराच्या आजाराचा योगायोग जुळून आला होता. शिवाय आपल्या मुलाचा संसार सुखासमाधानानें पार पडावा यासाठीं झटणें हें तिचें कामच होतें. लतिफा कशी झाली तरी तिची सून होती. यशोदा भेटेतों लतिफा घरांत अनेकदां असमाधानवृत्तीनें वागे, तेव्हां सासूला तिचा राग येई. पण यशोदा आल्यापासून लतिफेची वागणूक वरवर तरी बरीच निवळली होती. ती आतां आपला पति व आपली सासू यांच्याशीं बरीच सलोख्यानें वागूं लागली होती. आपण धर्मभ्रष्ट झाल्यामुळें प्रारंभापासूनच लतिफेच्या मनांत असंतोषाचा इंधन पिचत होता. पण आतां त्या असंतोषाचा कांहींही उपयोग नाहीं, उलट त्यानें झाला तर अपकारच होईल; इस्माईल यशोदेच्या नादीं लागला आहे, तो ती वश झाल्यास आपणाला कायमचा विसरून वनवासी करून सोडूं शकेल; मग आपले हाल कुत्राही खाणार नाहीं ह्या भयानें ती आतांशा

सासूचे पाय धरून तिला विनवीत होती कीं, यशोदा आपली सवत होऊं नये. केवळ ह्या एका स्वार्थी विचारामुळेंच लतिफा इस्माईल व यशोदा यांचा संगम न होण्याविषयीं झटत होती असें नव्हे, याहूनही त्याला आणखी एक निराळें कारण होतें. तें असें कीं, पिराजी हा नाथाजी व पिराजी यांचा जोडीदार. ती इस्माईलनें तिला बाटविण्यापूर्वीं तिच्या मुक्ततेसाठीं नाथाजी व पिलाजी यांच्या बरोबरीनें झटणारा शतवीर होता. कमळा व कमळजा यांना पळवून इस्माईलनें नाथाजी व पिलाजी यांच्या संसाराची होळी केली होती, तशीच पिराजीच्याही संसाराची होळी पेटली जावी हा विचारही तिला सहन होण्यासारखा नव्हता. तसेंच यशोदा ही आपली भगिनी; आपण एक पतित झालों त्याला इलाज नाहीं; पण आपल्यासारखीच यशोदेची अवस्था होऊं नये, अशासाठीं मनोभावानें झटण्याइतकी आपल्या मायधर्माविषयीं—हिंदुधर्माविषयीं—आपुलकी लतिफेच्या ठायीं वसत होती. ती आपुलकी तीनत्रिकाळ तिच्याकडून परमेश्वराची प्रार्थना करावी, “ भगवान्! माझ्या वांट्याला धर्मभ्रष्टतेचे जे भोग आले, ते माझ्या कट्ट्या वैरिणीच्याही वांट्याला येऊं नयेत ! ”

तात्पर्य काय; सुलताना व लतिफा ह्या दोघींनाही यशोदा इस्माईलची व्हावयाला नको होती आणि इस्माइलाला जरी ती हवी होती तरी ह्या दोन स्त्रियांना धाब्यावर बसवून आपले मनोरथ पुरविण्याइतकें आसुरी धैर्य त्याच्या ठायीं नव्हतें. त्यामुळें तो चोरूनमारून यशोदेला वश करण्याचे प्रयत्न करीत होता. पण आपण केवळ कामांधपणें यशोदेला बाटविण्याचा प्रयत्न करीत आहों इतका शिरजोरपणा घरांत दाखविण्याची सोय उरली नाहीं, तेव्हां त्यानें निराळा डाव खेळण्याला सुरवात केली. पत्नी व माता यांची वरवर समजूत करण्यासाठीं त्यानें यशोदेचा अभिलाष सोडल्याचा बहाणा सुरू केला. सुलतानाही इस्माईलचा यशोदेचा नाद सुटावा म्हणून त्याच्या मनांत भरवूं लागली कीं, यशोदेसारखी सुरतपाक स्त्री आपण आपल्या तरुण बादशहाला नजर केल्यास बादशहा आपल्यावर खुष होऊन आपणाला मानमान्यतेला चढवील. आपल्या आईच्या डोळ्यांत धूळ फेंकण्याला हा उपाय नामी आहे असें पाहून इस्माईल तेव्हांच राजी झाला. तें पाहून सुलताना खूष झाली व बादशहाच्या जनानखान्यांत जाण्याविषयीं यशोदेचें मन वळविण्याचें काम तिनें आपल्या शिरावर घेतलें. लतिफेला हा विचार अर्थातच रुचला नाहीं. पण

सासू आणि पति यांचें ह्या बाबतींत एकमत झाल्यावर तिला त्या दोघांच्या-विरुद्ध उघड उघड वागतां येणें अशक्य होऊन बसलें. तिची मनांतून फार इच्छा होती कीं, यशोदेची अशी विटंबना होऊं नये व त्या जोडप्याच्या संसारांत बिघाड पडूं नये. पण तिच्या इच्छेला विचारतो कोण ? तिनें रोज रोज विचार करावा कीं, पिराजी व यशोदा यांची मुक्तता करून त्यांना सुखी करावें. पण इस्माईल व सुल्ताना यांच्या नजरबंदींतून ती स्वतः मुक्त होणार तेव्हां त्या दोघांच्या सुटकेची तजवीज करणार ! यामुळें तिला मनाजोगी संधी मिळेपर्यंत गप्प रहाणें प्राप्त होतें.

सुलताना मात्र आपल्या मतें यशोदेला बादशहाची नाटकशाळा होण्याला अनुकूल करण्यासाठीं रोज तिला भेटे, तिची समजूत घाली; पण फुकट ! यशोदेनें तर मनाचा पक्का निर्धार केला होता, कीं मरेन पण मुसलमान होणार नाहीं. तिनें ह्या भ्रष्ट माणसांच्या स्पर्शानें अपवित्र झालेलें अन्नपाणी-देखील सेवन करूं नये; मग त्यांना वश होणें दूरच राहिलें. ती स्वतःच्या जिवाला इतकी वैतागली होती कीं, अशा अज्ञातवासांत दिवस कंठण्यापेक्षां मरण आलें तरी बरें असें तिला वाटे. पण एकतर मरण्याची संधि तिला इतक्या सुलभतेनें मिळण्याजोगी नव्हती, व दुसरें तशी संधि मिळाली असती तरी ती तिनें तितक्या आततायीपणानें उपयोगांत आणली नसती. तिला वश करण्याचें एक साधन म्हणून तर इस्माईलनें पिराजीला अजून जिवंत ठेवला होता. त्याच्या केंसाला शक्य तों धक्का लागूं द्यावयाचा नाहीं व ज्यांनीं आपल्यावर ही अनर्थपरंपरा कोसळून पाडली त्यांचें समूळ वाटोळें केल्या-शिवाय मरावयाचें नाहीं असा यशोदेचा मनोमन निर्धार होता. त्यांतूनही तिनें वेळीं हे दोन्ही निर्धार सोडून मरण पत्करलें असतें. पण मग तिच्या नांवाला लागलेला व्यभिचाराचा कलंक कसा धुवून निघाला असता ! तेव्हां एकवार पिराजीसमोर आपली निर्दोषता सप्रमाण सिद्ध करून मग पाहिजे तर मरण्याला ती तयार होती. तेवढ्यासाठीं तिनें पिराजीला भेटण्याचे शक्य तितके प्रयत्न केले. पण त्यांत तिला यश कसें येणार ! तरीपण तिची आशा मेली नव्हती. ती आशा फलद्रूप होण्याला मुळींच अवसर नव्हता हें जरी खरें; तरी तिचा परमेश्वरावर दृढ भरंवसा होता. पार्वतीनें तिला इस्माईलच्या स्वाधीन करतांना तिच्या पातिव्रत्याविषयीं सहज थट्टेनें म्हणून जो पण लावला होता,

तो पणदेखील आपण जिंकूं व मग मरावयाचें झालें तरी पतिव्रता ह्या गौरव-दर्शक नांवानें विभूषित होऊन मरूं, ह्या आशेवर ती दिवस कंठीत होती.

पण जसजसे दिवसांमागून दिवस जाऊं लागले, तसतशी यशोदेची आशा दिवसेंदिवस क्षीण होऊं लागली. इतके शतवीर होते; पण त्यांपैकीं कोणीही पुढें येऊन तिची सुटका करीना, कोणी परिचयाचें माणूस भेटेना कीं कांहीं खबर कळेना. रोज रोज माणसें भेटावयाचीं तीं येऊन जाऊन दोन; इस्माईल आणि सुल्ताना. क्वचित् प्रसंगीं लतिफा ही तिला भेटे व सहानुभूतीचे चार शब्द बोले. तेवढ्यावरून आपल्या कारस्थानांत आपल्याला तिचा उपयोग करून घेतां येईल अशी यशोदेला आशा होती. पण तिच्या कमनशिबानें लतिफा व तिचा जहांगीर यांना आजारानें पछाडल्यापासून तिला तिचीही भेट होणें दुरापास्त झालें होतें. इस्माईल तिला एकटा भेटला कीं त्यानें तिच्याशीं लघळपणा करावा; तिला आपल्या भावी वैभवाची चुणुक दाखवून वश करण्याचा प्रयत्न करावा; सामोचारांनीं ती वळत नाहींशी पाहून तिला बलात्कारानें भ्रष्ट करण्याची भीति घालावी; पुढें पुढें तर ती तेवढ्यानेंही बधत नाहीं असें पाहून इस्माईल अत्यंत संतापला व तिच्या डोळ्यांदेखत पिराजीला हालहाल करून ठार करतां करतां तिला बलात्कारानें बाटविण्याचे आसुरी विचार त्याच्या तोंडून निश्चितपणें निघूं लागले. आपला दिवटा पोरगा एवढा अनर्थ करण्याइतका अमानुष व अविचारी आहे अशी सुल्तानाची बालंबाल खात्री असल्यानें तिनें मनांतून त्याचा संसार सुरक्षित राखण्यासाठीं पण जनांत दाखवावयाला यशोदेचें चिरकल्याण साधण्यासाठीं तिला बादशहाची नाटकशाळा होण्याचा आग्रह रोज कर कर करावा. पण त्याचा यशोदेच्या मनावर कांहींदेखील परिणाम होईना. उलट यशोदेनें सुल्तानाची परोपरीनें समजूत घालून इस्माईलला असल्या पापाचरणापासून परावृत्त करण्याविषयीं गळ घालावी, तिला हिंदु ललनांच्या अब्रूची महती समजावून सांगावी; पण सुल्ताना बोलूनचालून पतिता नारी होती, तिला यशोदेचे सुविचार कसे रुचणार! तिच्या ठायीं जर इतका स्वधर्माभिमान असता तर ती प्रारंभींच आपल्या नादान पतीबरोबर बाटण्याला कशी तयार झाली असती!

इस्माईल ह्या सर्व परिस्थितीशीं तोंड देतां देतां बाजीरावाच्या शोध करण्याचीही शिकस्त करीत होता. पण त्याला शोध कांहीं लागेना. तो स्वतः

आपल्या भवजंजाळांत गुंतून पडलेला व त्याचे लोक बाजिरावाच्या शोधाचें मिष करून आजूबाजूच्या खेड्यापाड्यांतून लुटालूट व जुलूमजबरदस्ती करण्यांत दंग झालेले. अशा स्थितींत शोध लागणार कसा ! बरें; बाजिरावाचा शोध लागला नाहीं तर सेनापति नाराज होणार व मग ज्या कारस्थानाची सांगता करण्यासाठीं इस्माईल आज इतके दिवस मराठशाहींत राहिला होता, तें कारस्थान निष्फळ झाल्यामुळें मोंगलाईत बादशहाकडे जाण्याचीही सोय नाहीं. आतां कसें करावें ह्या पेंचांत तो असतां परमेश्वरानें त्याची तेवढ्या-पुरती चिंता तरी दूर केली. कृष्णराव त्याच्यापाशीं चंद्रसेनाचा निरोप घेऊन आला. 'तुम्ही तावडतोब मोगलाईंत जाऊन वजिराला भेटून त्याला कळवावें कीं, जाधव व घाटगे ह्या दोघांनींही आपल्या सैन्यसामुग्रीनिशीं शाहूमहाराजांना सोडून कोल्हापूरला जाऊन ताराबाई आईसाहेबांच्या पक्षाला मिळण्याचें ठरविलें आहे. अशा वेळीं वजिरानें आपणाला साह्य करावें अशी ताराबाई आईसाहेबांची फार इच्छा आहे. एवढी मदत वजिराकडून झाल्यास कोल्हापूरची गादी सदैव बादशहाच्या अंकित राहील व जाधव-घाटगे हे दोघेही सरदार आपल्या इतर साथीदारांसह महाराष्ट्रांतही बादशहाची सत्ता चिरस्थायी करण्यासाठीं काया-वाचा-मनानें झटतील. इकडे बाळाजीपंतांचें पारिपत्य अनायासें होतेंच आहे. प्रत्यक्ष बाप असा कोंडला गेल्यावर बेट्या-च्या नाड्या आपोआप आंखडतील; त्याला पकडण्यासाठीं फारशी यातायात करण्याचें कारण नाहीं.'

चंद्रसेनाचा हा निरोप ऐकून इस्माईलला पराकाष्ठेचा आनंद झाला. बाजिरावाचा शोध न लागल्यामुळें त्याच्यावर येणारा ठपका अनायासें टळला व सेनापतीला वश करण्याची कामगिरीही अकल्पित रीत्या तडीला गेली. अर्थात् त्याला आतां दक्षिणेंत रहाण्याचें कांहीं कारण उरलें नाहीं. त्याला तरी यापेक्षां आणखी काय पाहिजे होतें !

"बरें तर; शिलेदार ! तुम्ही याप्रमाणें करावयाचें ठरलें. आतां मीं पुढील गोष्टींची योजना करण्यासाठीं कोल्हापुराकडे जातों." कृष्णराव म्हणाला.

"जरूर जा." इस्माईल उत्तरला. लगेच कृष्णराव तेथून निघाला.

कृष्णरावानें चंद्रसेनाचा हा निरोप इस्माईलला दाखल केला तेव्हां सुलताना, लतिफा व त्याचे इतर साथीदारही तेथें होतेच. त्या साथीदारांना

हा बेत ऐकून आनंद वाटला. अशासाठीं कीं मोहिमेच्या नांवावर त्यांनीं त्या व आजूबाजूच्या गांवांत लुटालूट करून मनमुराद संपत्ति व तेथल्या हिंदु रहिवाशांच्या स्त्रियांतील अनेक स्त्रिया हाताखालीं घालण्याचा सर्रास सपाटा चालविल्यामुळें आजूबाजूच्या पंचक्रोशींत जिकडेतिकडे हाहाःकार उडाला होता व ह्या अनर्थाची वार्ता शाहूमहाराजांच्या कानांपर्यंत पोंचून त्यांचें सैन्य आपल्यावर चालून येऊन आपणांला शासील असें सर्वांना भय होतें. शाहू-महाराजांचें सैन्य येईल, तें जुलमी मुसलमानांचें शासन करील वगैरे गोष्टी अंमळ दूरच्या असल्या तरी तेथली रयतही जुलमांच्या अतिरेकानें अत्यंत गांजून एकजुटीनें जुलमांचा प्रतिकार कसा करावा या विचारांत होती व घडोघडीं घडणाऱ्या चकमकींच्या स्वरूपांत मुसलमान गुंडांना त्या लोकक्षोभाचीं कडू फळें रोजरोज अधिक प्रमाणांत चाखावीं लागत होतीं. अर्थात् ही गुंडगिरी आतां फार दिवस चालावयाची नाहीं, येथून कसा तरी पाय काढलाच पाहिजे, अशी सर्वांची खात्री होऊन चुकली होती. तो बेत आतां इस्माईल मोगलाईत निघाल्यास आपोआप तडीला जाणार असें पाहातांच त्या सर्व मंडळीनें इस्माईलच्या बेताला तेव्हांच संमति दिली. तेवढ्या सर्व मंडळींत जर कोणाला इस्माईल मोंगलाईत जाणार म्हणून वैषम्य वाटलें असलें तर तें इस्माईलला नवीनच सामील झालेल्या तेथल्या रंभाजी व संभाजी ह्या दोघांना. ते दोघेही तेथले चांगले वतनदार पाटील होते. ह्या दोघांची गांठ इस्माईलला तेथें अचानक पडली. रंभाजी व संभाजी हे दोघेही शींव-शेजारी व दोघेही अघोर कर्मांत सारखेच निपुण होते. पण योगायोगा-सरशा त्या दोन गरीब मुली नेमक्या रंभाजीच्या आश्रयाला येऊन राहिल्या, व त्यांना गफलत करून फितवावयाच्या ह्या आशेनें रंभाजीनें त्यांना आसरा दिला. त्या मुली कोणाच्या कोण असाव्या याविषयीं प्रथम कोणालाच पत्ता नव्हता. पण थोड्या दिवसांपूर्वीं त्या अकस्मात् नाहींशा होण्यापूर्वीं त्यांच्याविषयीं गांवांत बराच बभ्रा झाला होता. ज्याला त्याला वाटे, कीं ह्या खुबसुरत मुली कोणा-च्या कोण ? आणि त्या बेवारशी आहेत असें कळतांच तर रंभाजी व संभाजी यांना त्यांच्याविषयीं जास्तच अभिलाष उत्पन्न झाला. ते हुरळून त्यांना आपल्या म्होतुराच्या बायकाही करण्याला तयार झाले. पण त्या दोघीही वश होण्याचीं कांहीं चिन्हें दिसेनात, तेव्हां ते नराधम त्यांना बळेंच पकडून मुसलमानांच्या

स्वाधीन करण्याला तयार झाले. तें पाहून त्या एके दिवशीं ज्या घराबाहेर गेल्या त्या कायमच्या गेल्या व त्यांच्या आश्रयाला राहून भीक मागून खाणाऱ्या बिचाऱ्या म्हातारीवर मात्र त्या दोघींना फुसलावून पळविल्याचा आरोप येऊन त्या घरच्या आश्रयाला मुकावें लागलें. पुढें इस्माईलचे लोक तेथें येऊन पोंचले व हा गवगवा त्यांच्या कानीं आला तेव्हां त्या दोघी कमळा व कमळजा असतील अशा समजुतीनें त्यांचा जारीनें तपास करूं लागले, तेव्हां रंभाजी व संभाजी यांना कळून चुकलें कीं, ह्या पोरी कांहीं आपल्या पचनीं पडावयाच्या नाहींत; तीं इस्माईल आदिकरून मुसलमानांचीं सावजें आहेत. इस्माईल वगैरे मंडळीला जेव्हां ह्या दोघांपाशीं त्या मुली असाव्या असा तपास लागला, तेव्हां त्यांनीं त्यांना पकडून धाकदपट करून त्या मुलींना मिळविण्याचा प्रयत्न केला. पण रंभाजी व संभाजी यांना जर पत्ताच माहीत नाहीं, तर ते तरी काय सांगणार! पण त्यांनीं एकंदर प्रकार जसा घडला तसा त्यांना सांगितला. तेव्हां त्या दोघी जवळच कोठें दडून राहिल्या असतील अशा संशयानें त्यांनीं संभाजी व रंभाजी यांना बरोबर घेऊन तपास चालविला. त्या तपासांत त्या दोघी मुली कांहीं हातीं लागल्या नाहींत; पण हे गांवचे वजनदार पाटीलच हातीं सांपडल्यामुळें इस्माईलच्या लोकांना तेथल्या व आजूबाजूच्या गोरगरिबांचीं घरेंदारें लुटावयाला मात्र सांपडलीं. कैक घरांतील स्त्रियांच्या अब्रूवरदेखील घाला पडला. इतके सारे अनर्थ पाहूनदेखील रंभाजी व संभाजी स्वस्थ होते याचें कारण एखाद्या घरांत त्या दोघी मुली जर लपून बसल्या असल्या तर त्यांचा शोध लागेल अशी त्यांना आशा होती. पण आतां इस्माईल मोगलाईंत जाणार असें पहातांच त्यांना आपले मनोरथ पूर्ण होण्याची कांहीं आशा दिसेना. आतां निर्वाणीचा उपाय योजून पहावयाचा म्हणून त्यांनीं रंभाजीच्या आश्रयाला असलेल्या गरीब बिचाऱ्या म्हातारीला नाडून तिच्यामार्फत तरी कांहीं सुगावा लागला तर पहावा असें ठरविलें व तिच्या शोधाला ते निघाले. ही गोष्ट त्यांच्या मनांत यावयाला व सुभानजी हातीं सांपडावयाला एक गांठ पडली.

रंभाजी व संभाजी यांना त्या म्हातारीचा शोध लावावयाचा होता. पण हीच म्हातारी लतिफेची आई असेल याची मात्र त्यांना मुळींच कल्पना नव्हती. आणि लतिफेनें एक दोन वेळां त्या म्हातारीला भिक्षा मागतांना

पाहून ती आपली आई असावी असें ओझरतें ओळखून 'आई ! आई !' असा ध्यास घेतला तेव्हां रंभाजी वगैरे मंडळींच्या रोषाला पात्र झालेली म्हातारी ती हीच असेल अशी कोणाला शंकाही आली नव्हती. पण आपणाला आतां मोगलाईत जावयाचें, त्यापूर्वीं शक्य तर आपल्या आईची एकवार भेट व्हावी असा लतिफा इस्माईलपाशीं हट्टच घेऊन बसली व इस्माईलच्या सांगण्यावरून त्या म्हातारीचा शोध करण्यासाठीं म्हणून कांहीं लोक बाहेर हिंडावयाला निघाले तों मध्येंच सुभानजी पांडवगडाहून तेथें येऊन गुप्त वेशानें बाजीरावाचा शोध करीत असल्याचें त्यांना आढळून आलें. त्यांतूनही त्याला कोणी ओळखूं शकलें नसतें. त्यानें वेशांतर अगदीं बेमालूम केलें होतें. पण तो फसला. त्यानें फकिराच्या वेशानें गांवभर हिंडून बाजिरावाचा तपास केला व तेथल्या एकंदर परिस्थितीचा ठाव काढला, तरी एकाही मुसलमानाला त्याची ओळख पटली नाहीं. तेवढ्यांत त्याला इस्माईलच्या लोकांनीं सर्वत्र माजविलेल्या अत्याचाराच्या एकाहून एक भयाण कहाण्या ऐकावयाला मिळाल्या, व मधूनमधून कोणी कोणी बाजिरावाचे हेर रोज भिक्षेकऱ्यांच्या वेषानें फिरत असल्याचेंही बोलूं लागले. त्यावरून सुभानजीला आशा वाटूं लागली कीं, बाजीराव इथें जवळपास कुठेंतरी आहे; त्याचा शोध जर या वेळीं लागला तर ह्या चिडलेल्या गांवकऱ्यांच्या साह्यानें इथल्याइथें इस्माईलची खोड मोडतां येऊन पिराजी व यशोदा यांचीही सुटका करतां येईल. आपल्यापाशीं सैन्य नाहीं खरें; पण आपण ह्या त्रस्त गांवकऱ्यांतूनच आपल्या देशाच्या, धर्माच्या व स्त्रियांच्या अब्रूचें अविंधांच्या अत्याचारांपासून संरक्षण करण्यासाठीं पाहिजे तेवढें सैन्य निर्माण करूं अशी सुभानजीला उमेद होती. बाळाजीपंतांच्या तालमेंत तयार झालेल्या शतवीरांपैकीं शतवीर तो होता. शाहूमहाराजांच्या नांवावर जागोजागीं विळे-कोयतेवाल्या कुणब्या-शेतकऱ्यांचें सैन्य उभारून त्या सैन्याच्या जोरावर लढाया मारण्याचे अनेक प्रसंग त्यानें यापूर्वीं अनुभवले होते. बाळाजी-पंतांनीं काय, बाजिरावानें काय अथवा मराठशाहींतील तेव्हांच्या इतर नेक-जात लढवय्यांनीं काय, राजाच्या नांवावर राजनिष्ठ मराठ्यांतून असे शेंकडों-हजारों सैनिक हांक मारून बोलावून आणावे व त्या सैन्याच्या जोरावर जिवा-वरचे प्रसंग पार पाडावे. राजासाठीं जिवावर उदार होऊन लढण्याला

स्वयंस्फूर्तीनें तयार होण्याजोगी निस्सीम राजनिष्ठा तेव्हांच्या मराठ्यांच्या नसा-नसांत मुसमुसत होती. तशांत ताराबाई शाहूमहाराजांचा पाडाव करण्याच्या आसुरी महत्त्वाकांक्षेच्या भरीं पडून त्यांच्या राज्यांत जिकडेतिकडे अशांतता माजावी व त्यांच्या राजसत्तेचा विचका व्हावा म्हणून आपल्या पदरच्या लोकांना 'असले अत्याचार करण्याला मुद्दाम फूस देते' असा बहुतेक रयतेचा खराखुरा ग्रह झाला असल्यानें ह्या बाईचें हें बंड मोडून शाहूमहाराजांची एकतंत्री सत्ता महाराष्ट्रावर सुरू होईल तो सुदिन असें रयतेला वाटूं लागल्यानें रयतेचा कल स्वाभाविकपणेंच शाहूमहाराजांकडे होता. तशांत चंद्रसेन वगैरे फितुरी मंडळींच्या कृष्णकारस्थानांचा बोभाटा सर्वत्र झालेला असल्यानें व त्याचाच शिलेदार हा इस्माईल आजकाल तेथल्या लोकांवर कमालीचे अत्याचार करीत असल्यानें त्याचें पारिपत्य करण्याची संधि सांपडल्यास तेथले मर्दमराठेच काय पण त्यांच्या बायकाही वीरवृत्तीनें शत्रूंचीं नाकें ठेंचण्यासाठीं पुढें येतील याविषयीं सुभानजीची खात्री होऊन चुकली होती. ह्या योजनेला मूर्त स्वरूप देण्यासाठीं त्यानें संभाजी व रंभाजी हे गांवचे पाटील, मोठे प्रतिष्ठित लोक म्हणून त्यांची गांठ घेतली, तेव्हां मात्र सर्पांच्या बिळांत उंदीर चालून जावा तशी बिचाऱ्याची अवस्था झाली. ही हिंदूंची अवलाद इतकी कमअस्सल असेल याची सुभानजीला तरी प्रथम कशी जाणीव व्हावी ! रंभाजी व संभाजी ह्या दोघांनीं त्याला मदत करावयाची तर बाजूलाच राहिली, त्यांनीं त्याला इस्माईलच्या इतर मुसलमान सैनिकांच्या साह्यानें घेरून त्याचा छळ आरंभिला, त्याला मारलें झोडलें, अखेर त्याला जिवंत जाळण्याचाही डाव रचला. हें एवढें त्यांनीं त्याच्या तोंडून बाळाजी-पंतांचीं कारस्थानें काढून घेण्यासाठीं केलें. पण सुभानजीची धन्य ! त्यानें आपल्या तोंडावाटे एक अवाक्षरही बाळाजीपंतांच्या कारस्थाना-विषयीं उच्चारलें नाहीं. अखेर कंठाजी वगैरे शतवीरांनीं अचानक तेथें येऊन त्याची सुटका केली. त्यानंतरही ते सैतान त्याचा व त्याच्या इतर साथीदार शतवीरांचा पाठलाग करूं शकले, त्याला ठार मारूं शकले, पण त्यांना त्या कारस्थानाचा पत्ता लागला नाहीं तर नाहींच ! उलट ते आपल्या मतें विजयाचा तोरा मिरविण्यासाठीं त्या गरीब बिचाऱ्या म्हातारीला पकडून घेऊन आले; पण ह्या म्हातारीच्या पायांनीं त्या सर्वांचा काळ त्यांचा पाठलाग करीत येत असेल याची त्यांना कल्पना कशी येणार !

## दर्शन एकविसावें

# सारेंच अघटित !

"तारा तुटला ! अगबाई ! अपशकून झाला !"

यशोदेला इस्माईलनें दूरच्या पडक्या घरांत ज्या एका अंधाऱ्या खोलींत कोंडून ठेविलें होतें, त्या खोलीच्या खिडकींत ती बिचारी आज आकाशाकडे नजर लावून भवितव्याचा विचार करीत बसली होती. इतक्यांत आकाशांतून एक मोठा तारा निखळून पडलेला तिला दिसला, त्याबरोबर अपशकुनाची अमंगळ कल्पना नेमकी तिच्या मनांत आली. जराशानें ह्या अपशकुनाचें साक्षात् स्वरूप पहाण्यासाठीं तिनें पुनः दरवाजांत जाऊन फटींतून बाहेर डोकावून पाहिलें तेव्हां तिकडे कोणी दिसेना. तरी पण तिची कल्पना झाली कीं, आतां इस्माईल येणार त्याचें सूचक हें दुश्चिन्ह असावें. इस्माईलचें अशा रात्रीच्या वेळीं तेथें चोरून येणें गेल्या चारपांच दिवसांपासून यशोदेच्या पूर्ण परिचयाचें झालें होतें. ती आपल्या शरीरभोगांतून जरा बरी झाल्या दिवसापासून तर इस्माईल रोज असाच रात्रीच्या वेळीं सर्वत्र सामसूम झालेंसें पाहून तिच्या अब्रूवर दरोडा घालण्याच्या इराद्यानें तेथें यावयाचा व तिची परोपरीनें मनधरणी करावयाचा कीं, तूं माझी हो ! हे त्या नराधमाचे पापी बोल ऐकून यशोदेच्या सर्वांगाचा तिळपापड होई. पण उपयोग काय ! ती इस्माईलचा क्रूर व अत्याचारी स्वभाव पूर्णपणें ओळखून होती. ती जर कठोर शब्दांनीं त्याचें ताडण करती तर तिच्या अब्रूवर घाला पडण्याला एका क्षणाचाही विलंब लागला नसता. प्रथम तिनें तसा त्रागा करून पाहिला; पण त्याचे परिणाम अनिष्ट होतील अशी तिची खात्री झाली. अशा स्थितींत मरण हा निर्वाणीचा उपाय; पण तोही अंमलांत येणें शक्य नव्हतें. कारण अष्टौप्रहर तिच्या निवासासभोंवार इस्माईलची फेरी होती. आणि तिलाही इतक्यांत मरावयाचें नव्हतें. दुष्टांच्या संहाराचें जें कार्य तिनें आपल्या प्रतिज्ञेनुसार शिरावर घेतलें होतें, तें पार पाडण्यासाठीं तिला जगावयाचें होतें. तेवढी सवड मिळण्यासाठीं ती अखेर आपल्या प्रत्यक्ष अब्रूला धक्का न लागेल असें काय वाटेल तें साहस करण्याला तयार झाली. प्रथम प्रथम तिनें इस्माईलचा तिरस्कार केला, त्याची निर्भर्त्सना

केली; पण तिच्या असल्या कोरड्या जळफळाटानें इस्माईलचें एका केंसा-इतकेंही वांकडें न होतां उलट त्याची सूडबुद्धि मात्र दिवसेंदिवस बळावत चालली. त्याच्या पापवासनेच्या पेटत्या खाईत त्याच्या सूडबुद्धीच्या तेलाचा असाच शिडकाव करीत राहिल्यास ती खाई जास्त भडकेल व त्यांत मग आपला पति, आपली अब्रू–आपलें सर्वस्व जळून खाक होईल; त्यापेक्षां दगडाखालीं हात सांपडला खरा, तो हळुहळू सोडवून तर घेतला पाहिजे ! अशा विचारानें यशोदेनें आतांशा तीन-चार दिवसांत होयबाच्या तोंडपुज्या व्रताची दीक्षा घेतली होती. सुलताना बादशहाची नाटकशाला होण्यासाठीं तिचें मन वळविण्याला आली तर तिचें मन मोडावयाचें नाहीं, इस्माईल प्रियानुराधन करण्यासाठीं आला तरी त्याला नाराज करावयाचें नाहीं, आली वेळा जशी साजरी करतां येईल तशी करावयाची असा तिचा सारखा क्रम चालला होता. पण आजच सायंकाळीं इस्माईलनें तिला निक्षून सांगितलें होतें कीं, “ आज रात्रौ जर तूं सामोपचारांनीं आपल्या शब्दाला रुकार दिला नाहींस तर मी पिराजीला आणून तुझ्यासमोर बांधून उभा करीन व त्याच्या डोळ्यांदेखत तुझ्या अब्रूचें मातेरें करून मग तुम्हां दोघांनाही गोमांस भरवून बाटवून ठार करीन, असा आजवरच्या अपमानाचा सूड घेईन.”

तीच ही रात्रीची वेळा ! आतां ही वेळा कशी टाळावयाची हें न समजल्या-मुळें यशोदेचें मन अगदीं भांबावून गेलें होतें. इस्माईल बोलल्याप्रमाणें करण्याला कमी करणार नाहीं याविषयीं तिला तिळमात्र शंका नव्हती. पण तिचें मन मात्र तिला सांगत होतें कीं, परमेश्वर दीनांचा पाठीराखा असतो. तो केव्हां कसा कोणत्या रूपानें पुढें येऊन आपला बचाव करील हें आपणाला कळावयाचें देखील नाहीं. आतां परमेश्वरी साह्य मिळावयाचें झालें तरी जीवाला स्वतः स्वसंरक्षणाची शिकस्त करून परमेश्वरी साह्याला आपण पात्र असल्याची पात्रता सिद्ध करावी लागतेच. ती पात्रता आपण कशी सिद्ध करावयाची हाच यशोदेपुढें महत्त्वाचा प्रश्न होता. तिच्या नशीबाचा भविष्य-काळ चित्रासारखा तिच्यासमोर उभा होता. काय वाटेल तें झालें तरी आपलें पातिव्रत्य आतां अभंग रहात नाहीं. मरून अब्रू राखावी तर मरण असें हातोहात थोडेंच ओढून आणतां येतें ? आतां पातिव्रत्यावर पाणी सोडण्याचीच जर पाळी आली तर त्या शारीरिक पापाचें परिमार्जन करण्यास्तव

परलोकीं परमेश्वराचे पाय धरण्याचा नैतिक हक्क आपणाला प्राप्त व्हावा यासाठीं आपणाला काय करतां येईल याचा विचार करतां करतां यशोदा अखेर ह्या पायरीला येऊन पोंचली कीं ज्याअर्थी स्वतःचें पातिव्रत्य, पतीचे प्राण व पापात्म्यांचा संहार ह्या तिन्ही गोष्टी एकसमयावच्छेदेंकरून साधतां येणें शक्य नाहीं, त्याअर्थी यांतून जेवढें साधतां येईल तेवढें साधावयाचें. नुसतें पातिव्रत्य राखण्याच्या निष्फळ उद्योगाच्या भरीं पडावें तर प्राणांपरी प्राण जाणार, पापात्म्यांचासंहार करण्याची आपली प्रतिज्ञा तशीच अपूर्ण राहाणार, आपला पति प्राणाला मुकणार व इतकेंही करून आपण मरून पातिव्रत्य रक्षूं शकूंच असाही भरंवसा नाहीं. त्यापेक्षां मरण व विटंबना जर आपल्या कपाळींची चुकणें शक्यच नसेल, तर ती विटंबना बलात्कारानें करून घेण्यापेक्षां सामोपचारांनीं वागून इस्माईलला टाळणें शक्य झाल्यास आपला पति जिवंत राहील व ज्या पाप्यांनीं आपली व आपल्या इतर बांधवभगिनीं-ची इतकी छळणा चालविली आहे, त्यांचा संहार करतां आला तर अंशतः तरी पुण्याई जोडतां येईल. असें करणें हें पाप आहे काय? ह्या मार्गानें जातांना वेळीं आपल्या अब्रूवर अरिष्ट आलें तर खऱ्या पतिव्रतेनें कोणत्याही सार्वत्रिक मंगलासाठीं स्वखुषीनें आपल्या अब्रूवर पाणी सोडण्याला तयार होणें पातिव्रत्याला उचित आहे काय? जगांत आजवर कोणा पतिव्रतेनें व्यक्तीच्या मंगलाहून थोर अशा समाजाच्या, देशाच्या मंगलसिद्धीप्रीत्यर्थ प्राप्त परिस्थिती-च्या यज्ञकुंडांत आपल्या दैहिक पातिव्रत्याची आहुति दिली आहे काय?

'कां नाहीं? आहे.' यशोदा विचार करतां करतां सती द्रौपदीचें उज्ज्वल चरित्र आठवून स्वतःशींच म्हणाली, 'देवी द्रौपदीला एकट्या अर्जुनानें स्वयंवरांत लक्षवेध करून वरलें असतां पुढें अघटित घटनेनुसार व गुरुजनांच्या शब्दाला मान देण्यासाठीं म्हणून तिनें पांच पांडवांचें पत्नीत्व पत्करलें, आणि तरीही ती पतिव्रता म्हणून त्रिभुवनवंदनीय होऊन बसली, ती कां? लौकिक पातिव्रत्याला विपरीत असें बहुपतित्व द्रौपदीदेवीनें कां पत्करलें व त्यानंतरही जगानें तिला पतिव्रता मानून देवतास्थानीं तिची कां स्थापना केली? तिच्या बहुपतित्वामुळें तत्कालीन देशावर–तत्कालीन समाजावर–तिचे असे कोणते उपकार झाले कीं, त्या उपकारांविषयींच्या कृतज्ञतेंत जन तिची बहुपतित्वाविषयीं अवहेलना करण्याचें सोडून तिला आदर्श–भारत–महिला

मानूं लागला?' ह्या साऱ्या प्रश्नांचें यशोदेला असें मनोमन उत्तर मिळालें कीं, 'द्रौपदीनें लौकिक पातिव्रत्याची मर्यादा उल्लंघून पांचही पांडवांचें पत्नीत्व पत्करलें तें केवळ आपल्या देशासाठीं. कौरवशत्रु मदांध बनून साऱ्या आर्यावर्ताला गांजीत होते व त्यांनीं धर्मराजादि पांचही पांडवांच्या वांट्याला वनवास आणला होता. पांडव खरे राजे होते. राज्य खरें त्यांचें होतें. पण शत्रूंच्या आसुरीबलासमोर त्यांना कांहीं काळ आपल्या दैवदुर्विलासितानुसार अज्ञातवासांत खितपत पडणें प्राप्त झालें होतें. त्यांची एकी होणें राष्ट्रहिताच्या दृष्टीनें अत्यंत अवश्य होतें. तशी एकी न होती तर कौरवांचा मोड पांडवांना कधींच करतां आला नसता. त्या एकीचें कार्य साधण्यासाठीं 'भिक्षा पांचांनीं वांटून घ्या' असें कुंतीनें चुकून सांगितलें त्यावरून पांचही पांडवांना रूपवती स्त्रीचा अभिलाष उत्पन्न होणार व एकट्या अर्जुनालाच द्रौपदी मिळाल्यास कदाचित् बाकीच्या चौघांना त्याचा हेवा वाटूं लागून तेथें दुजाभाव उत्पन्न होणार, हे सारे भावी अनर्थ ओळखून द्रौपदीनें राष्ट्राच्या कल्याणासाठीं एकपतिव्रताचा विचार बाजूला ठेवून पंचपतींचें अर्धांगीपद पत्करलें, व त्या निमित्तानें त्या पंचवीरांची स्वामिनी होऊन त्यांची एकी कायम राखली; तीच पुढें भारतीयुद्धांत एकशेंआठ कौरवांच्या प्रतिपक्षाविरुद्ध पांच पांडवांना विजयी करून देशाचें दास्य विलयाला नेऊं शकली.'

द्रौपदीच्या चरित्राचा आदर्श समोर ठेवून यशोदा आपल्या परिस्थितीचा विचार करूं लागली तेव्हां तिचें मन तिला सांगूं लागलें, 'यशोदे! तुझा मायदेश-हा महाराष्ट्र-देशही आज तुझ्यापासून अशाच उज्ज्वल स्वार्थत्यागाची अपेक्षा करीत आहे. अंतस्थ कलह व अविंधांचे अत्याचार यांनीं महाराष्ट्रांतीलच नव्हे तर साऱ्या हिंदुस्थानांतील हिंदुरयतेला त्राही भगवान् होऊन गेलें आहे. अशा वेळीं आपलें जीवनसर्वस्व स्वदेशार्पण व स्वधर्मार्पण करून मायदेशाच्या उद्धारासाठीं जे पुत्र व ज्या कन्या पुढें येतील तेच खरे हिंदपुत्र व त्याच खऱ्या हिंदकन्या होत. अब्रू ही चीज तर अमोल खरीच. तशांत स्त्रीला अब्रू तिच्या प्राणांहूनही थोर आहे. पण राष्ट्राची अब्रू एका स्त्रीच्या अब्रूहून किती तरी थोर आहे!'

'खरेंच, माझ्या राष्ट्राची अब्रू—महाराष्ट्रांतील कोटमाप हिंदु रयतेची अब्रू, माझ्या एका यःकश्चित् स्त्रीच्या अब्रूहून अनेक पटींनीं थोर आहे'. यशोदा

आपल्याशीं म्हणाली, 'आणि म्हणूनच राष्ट्राच्या अब्रूसाठीं आपल्या लौकिक अब्रूला वेळीं आग लागली तरी ती आपण सहन केलीच पाहिजे. बस्स! एवींतेवीं अब्रू जाणारच ना? तर खुशाल जावो. त्यामुळें तरी मला देशसेवेची कांहीं पुण्याई जोडतां येईल. काय, इस्माईल मला बाटविणार? बाटवो. खुशाल बाटवो. त्या अन्यायाचा सूड मी त्याचाच गळा कापून घेईन. आणखी कांहीं करतां आलें नाहीं व ह्या एकाच मुसंड्याचा मला त्याला व त्याच्या बायकोपोरांना विश्वासघातानें मारून निर्वंश करतां आला तरी त्यामुळें यापुढें तरी त्याच्या हातून माझ्यासारख्या हिंदु अबला, हिंदुधर्म व हिंदुरयत याचा छळ व्हावयाचा थांबेल. बरें; मला बादशहाची नाटकशाळा व्हावें लागलें तर वेळप्रसंग साधून बादशहालाही ठार करतां येईल, व त्यामुळें हिंदवी-स्वराज्याला लागलेलें मुसलमानी सत्तेचें ग्रहण तूर्त तरी सुटेल. शिवाय अशानें एक पिराजी जर बचावला तर तो धर्मवीर आहे, तो ह्या अत्याचारानें चिडून अशा शंभर तरी अत्याचारी लोकांना ह्या जगांतून नाहींसा करील व हिंदु जगाचे तेवढेच शत्रु कमी होतील. शिवाय चंद्रसेन जाधवादि घरभेद्यांचा निःपात करण्याचा मार्गही अशानें बराच सुलभ होईल. एकदां देशासाठीं, धर्मासाठीं सर्वस्वावर लाथ मारून धर्मशील स्वातंत्र्ययुद्धाच्या रणांगणांत उडी घ्यावयाची असें ठरल्यावर मग भीति कसली! बस्स! माझा निश्चय कायम झाला. यशोदा—ती पिराजीची पतिव्रता यशोदा आज मेली व हिंदुरयत, हिंदवी-स्वराज्य, हिंदुधर्म आणि हिंदुललना यांची विटंबना करण्यासाठीं जो जो नराधम पुढें येईल किंवा जो जो असलीं अघोर पापें करून अजून जगांत जिवंत आहे, त्याला त्याला हर उपायांनीं जगांतून नाहींसा करण्यासाठीं काया-वाचा मनानें झटणारी अमोघ आसुरीशक्ति ह्या स्त्रीरूपानें अवतरली आहे. मला इतर कांहीं करतां आलें नाहीं तरी हिंदुत्वाच्या नरडीला नख लावून त्याला ठार करण्यासाठीं जे जे अविंध पुढें येऊन पशूंसारखे वागूं लागतात, त्यांपैकीं एका तरी अविंधाचा नाश-समूळ निर्वंश करून हिंदवी-स्वराज्याला तेवढेंच निःशत्रु करतां येईल, आणि त्यामुळें पिराजीसारख्या एका हिंदूला जिवंत सोडवून मायदेशाच्या मंगलासाठीं अहर्निश झटणारा एक वाढता हिंदु वंश जिवंत राखतां येईल'.

यशोदेच्या विचारांची एथवर मजल येऊन ठेपल्यावर ती आतां पूर्वींची

यशोदा राहिली नाहीं. तिची चिंता, तिचें भय, तिचें दुःख सर्व विलयाला जाऊन एकच गोष्ट तिला आठवूं लागली—'माझी प्रतिज्ञा ! माझा देश, माझा धर्म व माझ्या बंधु-भगिनी यांना गांजणारे नराधम जेवढे म्हणून हातीं सांपडतील तेवढ्यांचा मी निःपात करीन हीच माझी इहलोकींची इतिकर्तव्यता !' अर्थात् आतां इस्माईल येईल व आपल्याला छळूं लागेल वगैरेविषयीं विषण्ण होण्याजोगी तिची मनःस्थिति दुबळी राहिली नाहीं. आतां तिच्या डोक्यांत एकच विचार घोळूं लागला; 'देश, देव व धर्म यांसाठीं आत्मयज्ञ करावयाचा हें तर ठरलेंच. आतां त्या यज्ञाला सुरुवात केव्हां व कशी होते तें पहावें'.

* * *

यशोदेनें तारा तुटलेला पाहिला व तो अपशकून असावा अशी शंका तिला आली, ती अपशकुनाचा दाखला म्हणून असो, किंवा वेळा जुळून आली म्हणून असो, अक्षरशः खरी ठरली एवढें मात्र खरें. तिच्या अटकळीप्रमाणें थोड्याच वेळांत इस्माईल तेथें दरवाजांत येऊन पोंचला. त्यानें बाहेरून 'यशोदे !' अशी कठोर हांक मारलेली ऐकतांच तिनें ओळखलें कीं, आज स्वारीच्या अमानुषतेची कमान चढती आहे. सायंकाळींच इस्माईलनें यशोदेला आपला मनोदय स्पष्ट बोलून दाखविला असल्यानें तो आतां काय विचारणार याविषयीं तिला अटकळ होतीच. पण पुढें कसें वागावयाचें याविषयीं तिचें निश्चित मत अगोदरच झालें असल्यानें आतां ह्या नव्या भूमिकेची यथायोग्य सांगता आपल्या हातून व्हावी अशी मनांतल्या मनांत अनन्यभावानें परमेश्वराची करुणा भाकून तिनें निश्चिंतपणें चटकन् पुढें जाऊन दरवाजाची कडी काढली.

आपल्या हांकेबरोबर यशोदा दरवाजाची कडी काढून समोर येऊन उभी राहिलेली पहातांच इस्माईलचा अर्धा क्रोध मावळला. आणि तिच्याशीं त्याची दृष्टादृष्ट झाली व तिनें स्मितहास्य केलें, तें पाहून तर त्याचा राग पार कुठच्या कुठें बेपत्ता झाला. वास्तविक यशोदेचें तें स्मितहास्य मायावी होतें. पण त्याला तें खरेंच वाटलें. त्याला वाटलें कीं, इतके दिवस आपण जे प्रयत्न केले, त्यांना अखेर यश आलें. म्हणून तोही हंसतमुख करून यशोदेकडे पहात उभा राहिला. यशोदेनें चाणाक्षपणानें तेव्हांच ओळखलें कीं, आपल्या नेत्रकटाक्षांच्या पहिल्या फेंकीनें ज्याअर्थीं हा मानवी राक्षस इतका उल्लू बनला, त्याअर्थीं आपल्या मायावी मोहपाशांत याचा गळा

आपण हां हां म्हणतां गुंतवूं शकूं. ती पूर्वीप्रमाणेंच स्मितहास्य करीत व नेत्र-कटाक्ष फेंकीत मंजुळ स्वरांत म्हणाली, " शिलेदारसाहेब ! मीं दरवाजाबाहेरून तुमचा आवाज ऐकला तेव्हां माझ्या छातींत भीतीनें धडकी भरली, कीं तुम्ही आतां आपल्या क्रोधाविष्ट नजरेनें मला उभी जाळतां कीं काय ? पण आतां पहातें तों तुम्ही प्रेमाच्या गहिऱ्या नजरेनें मला गुंगवून घायाळ करण्याचा विडा उचलून आलां आहांसें मला आतां वाटूं लागलें आहे ! "

" प्यारी ! आज तुझें डोकें बरेंच ठिकाणावर आलेलें दिसतें."

" हो ! डोकें ठिकाणावर न येऊन कसें चालेल ? डोकें ठिकाणावर आलें नसतें तर तें मानेवर शाबूत तरी कसें राहिलें असतें ? "

" एकूण तूं आतां माझ्या म्हणण्याप्रमाणें वागावयाला तयार आहेस म्हणावयाची ! "

" हो ! तुमच्या म्हणण्याप्रमाणें मला आतां वागलेंच पाहिजे."

" मग इतके दिवस कोणता सैतान तुझ्या अंगीं संचारला होता ? "

" इतक्या दिवसांची गोष्ट आतां कशाला ? इतके दिवस मला आशा होती कीं, आमचे धनी, आमचे शतवीर कोणी तरी येऊन माझी सुटका करतील. पण अनुभवानें मी शहाणी झाल्यें, म्हणून तुम्हांला शरण आल्यें आहें. आतां मी तुमची आहें. मला तारणें किंवा मारणें आतां सर्वस्वीं तुमच्या हातीं आहे."

इस्माईल इतके दिवस यशोदेच्या तोंडच्या ह्याच शब्दांची अपेक्षा करीत होता. ते इच्छित शब्द आज ऐकावयाला मिळतांच त्याला तरी औदार्या-चा अहंकार झाल्याशिवाय कसा राहील ? तो ऐटीनें दोन पावलें पुढें सरून कांहींशा लघळपणानें म्हणाला, " प्यारी ! तूं तर मोठी जादूगारीण आहेस. तुझ्या गोड वाणींत, तुझ्या गहिऱ्या नजरेंत, तुझ्या उभें रहाण्याच्या ढबींत अशी काय अजब किमया भरलेली आहे न कळे, तूं मला सर्वस्वीं भारून टाकलें आहेस एवढें खरें."

" तें असूं द्या. पण तुम्ही आतां आमची काय वाट लावणार ? "

" आतां काय वाट लावणार ? प्यारी ! तूं तर आपखुषीनें माझी झालीच आहेस."

" तें खरें; पण मला अजून कळलें नाहीं, मी तुमची कीं बादशहाची ? "

" म्हणजे "

"नाहीं; तुमच्या आईचा तर मला आग्रह आहे कीं मी बादशहाच्या जनानखान्यांत गेलें पाहिजे."

इस्माईलला आतां मोठा पेंच पडला. सुलताना व लतिफा यांचें तोंड-देखलें समाधान करण्यासाठीं त्यानें यशोदेला बादशहाच्या जनानखान्यांत पाठविण्याची जी खोटीच हूल उठविली, तीच आतां त्याच्या अंगाशीं येऊं लागली. पण यशोदा बश झाली, आतां त्याला खरें बोलावयाला धीर आला. तो म्हणाला, " प्यारी! तुझी इच्छा जर बादशहाच्या जनानखान्यांत जाण्याची नसेल तर मी तरी तुला मुद्दाम तिकडे कां पाठवीन? आतां, बादशाही वैभवाला भुलून आपण बादशहाची रखेली व्हावें असें कदाचित् तुला वाटेल; पण ह्या इस्माईलच्या पराक्रमाची व भावी भाग्योदयाची तुला कल्पना नाहीं. मोगलाईतून दक्षिणेंत हा इस्माईल आला तेव्हां साधा शिलेदार होता. पण आज तो इथें बसून बादशाही राजकारणाचीं सूत्रें लीलेनें खेळवितो आहे. चंद्रसेन जाधव सेनापति एवढा मातबर; पण त्यालाही बादशहाचा आश्रय मिळविण्याची आवश्यकता भासूं लागतांच त्यानें आपल्यातर्फे बादशहाच्या वजिरापाशीं शिष्टाई करण्यासाठीं मला वकील नेमलें आहे."

" म्हणजे काय? सेनापति आतां शाहूमहाराजांचा पक्ष सोडून उघड उघड बादशहाला जाऊन मिळणार कीं काय?" यशोदेनें कांहींशा विचलित चित्तानें विचारलें.

" होय."

" अस्सें. आणि मग?"

" मग काय? कोल्हापूरच्या गादीला स्थिरस्थावरता आणण्यासाठीं ताराबाई वगैरे कोल्हापूरकर मंडळीला बादशहाचा आसरा पाहिजे आहे. तो आसरा मी मिळवून देणार, व मग ह्या कामगिरीबद्दल बादशहाकडून दक्षिणची सुभेदारी मिळवून ह्याच महाराष्ट्रांत पुन्हा मोगलाई राज्य करण्यासाठीं येणार. मग पहा! माझें नशीब शिकंदर असलें तर साताऱ्याच्या ज्या गादीवर आज शाहूमहाराज शोभतो, त्याच गादीवर हा इस्माईल महाराष्ट्राचा सुलतानसा शोधूं लागेल."

" हें सारें खरें का पण?"

"हो ! खरें म्हणजे ?" असें म्हणून इस्माईलनें विषयांधतेच्या भरांत मागचा पुढचा कांहीं विचार न करतां चंद्रसेनाकडून कृष्णराव निरोप घेऊन आला वगैरे सर्व गोष्टी तिला निवेदन केल्या.

हीं कारस्थानें ऐकून यशोदेच्या आंगावर कांटा उभा राहिला. इतका वेळ इस्माईल व चंद्रसेन वगैरे शत्रु तिच्या डोळ्यांत सलत होते त्याहून आतां ते जास्त सलूं लागले. त्यांनीं आजवर जे अनर्थ व फंदाफितुऱ्या केल्या, त्या कांहींच नव्हेत अशा ह्या नव्या अनर्थांची उभारणी आतां ते करीत आहेत व त्या कारस्थानाचें पुढारीपण इस्माईलकडे आहे; हें कारस्थान जर वेळींच खोडून काढतां आलें नाहीं तर हिंदवी-स्वराज्याची धडगत नाहीं व शाहूमहाराजांचीही धडगत नाहीं; असें हें कारस्थान निष्फळ ठरविण्या-साठीं हिंदुधर्माची-आपला देश, आपला धर्म व आपले बांधव यांची अब्रू यांवरील हें गंडांतर टाळविण्यासाठीं आपण जेवढा आत्मयज्ञ करूं तेवढा थोडाच आहे असा तिचा जो पूर्वग्रह झाला होता तोच आतां जास्त दृढ झाला. ती स्वगत उद्गारली, "ह्या शत्रूंना गाडून माझा देश व माझा धर्म यांचें संरक्षण मीं माझ्या जीवनसर्वस्वाच्या मोबदल्यांत यथाशक्ति केलेंच पाहिजे."

बराच वेळ यशोदा कांहीं बोलेना, असें पाहून इस्माईल म्हणाला, "प्यारी! विचार कसला करते आहेस ?"

"विचार करत्यें आहें" प्रसंगावधान राखून यशोदा उत्तरली, "तुमचा हा बेत साधणार, व तुम्ही उद्यां दक्षिणचे सुभेदार होणार हें सारें ठीक झालें. पण मला भय वाटतें तें एवढेंच कीं, ह्या सर्व वैभवाची धनीण मी कीं लतिफा ?"

"तूं-प्यारी ! तूं! तूं मग सुभेदारीण होणार व लतिफा तुझी दासी होणार." इस्माईल उत्तरला-नव्हे, बरळला. आपण काय बोलतों आहों याचें त्या कामांधाला तेव्हां भान कोठें होतें !

"बरें; पण माझ्या पुरुषांची काय वाट झाली ?"

"कोण, पिराजी ? पुन्हा पिराजी ?" इस्माईलनें चमकून विचारलें, "मेरी प्यारी ! अजूनही पिराजीकडे तुझा ओढा आहेच ?"

"तसें नव्हे; माझा त्यांच्याकडे ओढा नाहीं. पण मी तुमच्या शब्दाला कबूल झाल्यावर तुम्हीं त्यांना जिवंत सोडण्याचें कबूल केलें आहे."

"गोष्ट खरी. पण तो मुसलमान व्हावयाला तयार असेल तर!"

"मग, ते मुसलमान व्हावयाला तयार नाहींत?"

"नाहीं. तो मरेन पण मुसलमान होणार नाहीं असें म्हणतो."

यशोदा यावर कांहीं न बोलतां तळहातावर डोकें टेंकून विचार करूं लागली. या वेळचे तिचे विचार पिराजीचें रक्षण कसें होईल व त्याच्या किंवा दुसऱ्या कोणा सच्चा मराठ्याच्या मार्फत ह्या अरिष्टाला गाडण्याची पुढची व्यवस्था कशी होईल याविषयींचेच होते. जर बाळाजीपंतांची सेनापतीच्या मगरमिठींतून सुटका झाली व शाहूमहाराजांना ही बातमी वेळच्या वेळीं कळून ताराबाई, जाधव व बादशहा यांचें संगनमत होण्यापूर्वीं कांहीं बंदोबस्त करतां आला तरच कांहीं तरणोपाय आहे, नाहींतर मराठशाहीचा व तिच्याबरोबर तिच्या सर्व कैवाऱ्यांचा सर्वनाश ठेवलेला होता. हें वार्तावाहकाचें काम विश्वासानें वेळींच पार पाडण्याला पिराजीची सुटका होण्याशिवाय यशोदेला कांहीं दुसरा उपायच सुचेना. पण पिराजीची सुटका कशी होणार! इस्माईल त्याला तो आपल्या कलाप्रमाणें वागण्याला राजी झाल्याशिवाय सुखासुखी सोडणार नाहीं, व तो तर मरेल पण आपला हेका सोडणार नाहीं. पण काय वाटेल तें झालें तरी आपणाप्रमाणेंच पिराजीनेंही या वेळीं आपल्या देशाच्या व धर्माच्या रक्षणासाठीं आपल्या चित्त-वित्त-सर्वस्वाची होळी करावयाला तयार झालें पाहिजे; तेवढी कर्तव्याची जाणीव त्याच्याठायीं उत्पन्न करण्यासाठीं आपणाला एकवार त्याची भेट झाली पाहिजे असें यशोदेला वाटलें. पण त्याची भेट कशी होणार! त्याची भेट करून देण्यासाठीं इस्माईलच्या डोळ्यांत कोणत्या नव्या योजनेची धूळ फेंकावी याचा विचार करतां करतां तिच्या डोक्यांत एक कल्पना आली. लगेच ती इस्माईलाला म्हणाली, "शिलेदार साहेब! ते जर तुमच्या शब्दाला मान देऊन तुमच्याबरोबर चंद्रसेनाप्रमाणेंच बादशहाचे सेवक व्हायला तयार झाले तर तुम्ही त्यांना ताराल का?"

"पण—"

"माझें पुरतेपणीं ऐका. माझें व त्यांचें यापुढें पटणें शक्य नाहीं. मी बाटलेली आहें—गोमातेच्या रक्तानें विटाळलेली आहें हें तर खरें ना?"

"होय. तूं एकवार बाटलीस, ती आतां शुद्ध व्हावयाची नाहींस. तूं मुसलमानीण झालीस. आतां पिराजी तुझा स्वीकार करणार नाहीं."

" तेंच. मी तरी तेंच म्हणत्यें. मी बाटल्यें हें त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें आहे. आणि वेळीं बाटल्यें नसल्यें तरी माझ्यावर दुर्वर्तनाचे आरोप आलेले तुम्हांला माहीतच आहेत. तेव्हां आतां मी परत माझ्या घरांत जाऊं शकेन हें शक्य नाहीं. आतां मला तुमच्या आश्रयानें राहिल्याशिवाय गत्यंतर नाहीं. पण ती गोष्ट देखील तुम्हांला वाटते तितकी सोपी नाहीं. आपला देश, आपला धर्म व आपल्या स्त्रियांची अब्रू यांच्या रक्षणासाठीं मराठे साक्षात् मृत्यूच्या गळ्याला देखील मिठी मारायला मागेंपुढें पहात नाहींत हें तुम्हाला माहीत आहे. मला तुम्हीं पळविली म्हणून सारे शतवीर कसे खवळले आहेत याची तुम्हांला चांगलीच जाणीव आहे. ते तुमचा व मी तुम्हांला वश झाल्यें असें कळतांच माझाही केव्हां कसा घात करतील याचा कांहीं नेम नाहीं. त्यांतच आणखी नव्यानव्या शत्रूंची भर पडूं नये म्हणून तुम्हीं जपलें पाहिजे. एवढा एक वीर जर तुमच्या बाजूला मिळाला तर तुम्हांला केवढा मोठा आधार होईल!"

" आणि इतकेंही करून तो वश झाला नाहीं तर ? "

" तें मग पुढचें पुढें पहातां येईल. त्यासाठीं तुम्हीं एक मात्र केलें पाहिजे; आपण सारीं मराठी मुलखांतून मोगलाईत जाईतों जरा त्यांच्या कलानें घेतलें पाहिजे. कारण असें कीं, आजच जर त्यांचें मन तुम्हीं दुखवलें, तर ते बिथरतील व त्यांना जरी वेळीं ठार केलें तरी मग तीं शतवीरांचीं कारस्थानें आहेत; त्यांत आपण सारीं केव्हां कशीं भरडून निघूं याचा नेम नाहीं."

यशोदा बोलली ती कोणत्याही उद्देशानें कां बोलेना ! पण इस्माईलला त्यांत बराच अर्थ आहेसें वाटलें. पिराजीसारखा वीरपुरुष आपल्या बाजूला वळला तर त्याला तो पाहिजेच होता, व हकनाहक मरण्यापेक्षां त्याला मुसलमान होऊन जगण्याची संधि मिळाली तर तो विरुद्ध जाणार नाहीं असा इस्माईलचा तर्क होता. पिराजी मुसलमान झाल्यास शाहूमहाराजांच्या पदरच्या एका पराक्रमी लढवय्याला बाटविल्याचें श्रेय आपणाला मिळेल ही आशा त्याला होती. पिराजीला त्रास न देतां आपल्याबरोबर मोगलाईत न्यावें हा यशोदेचा युक्तिवादही एका निराळ्या अर्थानें—यशोदा पूर्णपणें आपल्या पचनीं पडेपर्यंत तिच्या कलानें वागणेंच श्रेयस्कर होय या अर्थानें त्याला पटला. पण त्याला संशय इतकाच आला कीं, यशोदेच्या मनांत जर ती म्हणते त्याप्रमाणें

धिराजीशीं संसार करावयाची आशा किंवा इच्छा नाहीं, तर ती त्याच्याविषयीं इतकी काळजी कां म्हणून घेते ? त्या संशयाची निवृत्ति करून घेण्यासाठीं तो तिला म्हणाला," हें सर्व मी मान्य करीन. पण माझी एक अट तुला व धिराजीला–दोघांनाही मान्य होईल तर." इस्माईल कांहीं वेळ विचार करून म्हणाला, "उद्यां आम्ही एथले बरेचसे लोक आमच्या धर्मांत घेणार, तेव्हां तुम्ही दोघांनीं मुसलमान व्हावयाला तयार झालें पाहिजे. ही अट मान्य असेल तर पुढच्या गोष्टी."

यशोदेला आतां हा नवा पेंच येऊन पडला. पण प्राप्त प्रसंगाला तोंड दिल्याशिवाय तिला गत्यंतरच नव्हतें. उद्याचें अरिष्ट तर तिला मूर्तिमंत डोळ्यांसमोर दिसत होतें. तरीही ती डगमगली नाहीं. देशासाठीं व धर्मासाठीं काय पाहिजे तें करण्याची तिच्या मनाची तयारी झाल्या वेळेपासून तिनें हा बुद्धिबळाचा डाव खेळण्याला सुरवात केली होती व त्या डावांत ती आज ह्या वेळपर्यंत तरी चांगलीच यशस्वी झाली होती. आतां सावधपणानें अखेर ही साधलीच पाहिजे, ती कशी साधावयाची याविषयीं पुन्हा क्षणभर विचार करून ती उत्तरली, "तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें वागायला माझी ना नाहीं. पण ते ह्या गोष्टीला कबूल होतील असें मात्र मला वाटत नाहीं."

"तर मग त्यानें मरायला तयार झालें पाहिजे." इस्माईल उत्तरला.

"एकूण मीं देखील मरावें अशीच तुमची इच्छा दिसते ?"

"नाहीं. प्यारी ! तसें नाहीं."

"पण माझा एवढासा आळ पुरवायलादेखील जर तुम्ही तयार नाहीं, तर पुढें तरी तुम्ही मला काय सुख देणार ? मग तुम्ही खुशाल आम्हां दोघांनाही बाटवा, ठार मारा किंवा काय वाटेल तें करा." असें म्हणून यशोदा रुसण्याचा आविर्भाव आणून दूर कोंपऱ्यांत जाऊन बसली. इतका प्रकार झाल्यावर तिच्या डोळ्यांना पाणी येणें अगदीं अपरिहार्य होतें, व ती आपणावर इतकी अनुरक्त झाली आहे अशी इस्माईलची खातरजमा झाली असल्यानें त्या तिच्या नयनजलाच्या प्रवाहांत मिठाच्या खड्यासारखें त्याचें अंतःकरण विरघळून गेलें यांतही कांहीं अनैसर्गिक नव्हतें. तेवढीच संधि साधून तो तिच्याजवळ गेला व तिचा हात आपल्या हातीं घेऊन तिचीं आंसवें पुशीत तिच्याशीं गोड गोड बोलून तिची समजूत करूं लागला. त्याच्या

पापी हातांचा स्पर्श तिच्या पवित्र देहाला मानवला नाहीं. ती क्षणकाऱ्यानें तेथून उठून दूर जाऊन उभी राहिली. पण तेवढ्यांत भावी बेतांची आठवण होतांच संताप कांहींसा आंवरून अनुरागाचा आविर्भाव करीत म्हणाली, "दूर व्हा. शिलेदारसाहेब! दूर व्हा. तुम्ही माझें इवलालेंसें प्रिय करावयाला देखील तयार नाहीं, तर मी तरी तुम्हांला कां म्हणून वश होऊं? तुमच्या-माझ्या हिताची गोष्ट सांगितलेली देखील तुम्हांला रुचत नाहीं, त्याला माझा नाइलाज आहे. मी बादशहाची नाटक-शाळा व्हायला तयार आहे. पण तुमची संगत मला नको. तुम्ही दूर व्हा."

इस्माईललाही वाटलें, हा यशोदेचा राग नसून अनुराग आहे. आणि वर वर यशोदेकडे पहाणाराला तसेंच वाटलें असतें. ही तिची अनुरक्तता, ही आपल्या भावी शृंगारसाजाची पहिली पायरी! इस्माईल कामातुरतेच्या भरांत ती पायरी चढून गेला, व यशोदेचा हात आपल्या हातीं घेऊन निर्लज्जपणें तिला हृदयाशीं ओढीत म्हणाला, "प्यारी! बादशहा दूर तिकडे मोंगलाईंत राहिला, इथें तुझ्या जिवाचा बादशहा मी आहें. मी तुला आजच्या आज या घटकेला माझी बेगम करून सोडणार."

"दूर व्हा! शिलेदारसाहेब! दूर व्हा. माझा हट्ट पुरविण्याचें वचन न देतां तुम्ही जर असा अत्याचार करूं लागलां तर मी जीव देईन."

इस्माईलला वाटलें, बायकोची भोळी जात! नुसत्या शाब्दिक वचनावर जर हिची समजूत होत असेल, तर ती करावयाला काय हरकत आहे! आपणच वचन देणार व आपणच तें मोडणार! आज या घटकेला आपल्या आयुष्यांतील चांदरात तर साजरी करून घ्यावी! बरें; यशोदेलाही आतां त्याचा प्रतिकार करतां येण्यासारखा नव्हता. जो प्रसंग येऊं नये म्हणून तिनें शक्य तितक्या उपायांनीं चालढकल चालविली होती, तोच प्रसंग दत्त म्हणून समोर उभा रहातांच पुन्हा तिच्या मनांत जबरदस्त कालवाकालव सुरू झाली. पापपुण्याच्या विचारांनीं तिचें मस्तक पुन्हा भणभणून गेलें. देशाच्या, धर्माच्या व असंख्य बंधु-भगिनींच्या अब्रूचें रक्षण करण्यासाठीं देशाच्या व धर्माच्या वैऱ्यांचा निःपात करण्याला वैऱ्याच्या गोटांत प्रवेश मिळावा म्हणून स्वतःचा देह पापानें विटला तरी चालेल असा निश्चय करतांना तिला जितका सोपा वाटला, तितकाच तो आचरणांत आणतांना तिला अवघड

वाटूं लागला. एवढा मोठा स्वार्थत्याग करण्याची आपल्या मनाची तयारी करतांना इतक्या लौकर हें दिव्य करण्याची पाळी आपणांवर येईल अशी तिची कल्पना नव्हती; पण ती पाळी आली. पतिव्रतेच्या पातिव्रत्याचा परमेश्वर पाठीराखा असतो, ह्या विश्वाच्या विश्वासाला आज हरताळ फांसला जाणार असें तिला वाटूं लागलें. तरीही यशोदा आशावादी होती व प्रसंगावधानीही होती. ती नीतिमान् होती, व म्हणूनच ती खरी आर्यकन्या–परमेश्वराची लाडकी कन्या होती. तशा बिकट प्रसंगींही तिच्या अंतरसाक्षी परमेश्वरानें तिला जशी स्फूर्ति दिली तशी ती इस्माईलकडून वचन घेतां घेतां त्याला म्हणाली, "प्यारे! इतका अविचार बरा नाहीं."

"कां? प्यारी! मीं तुला वचन दिलें, आतां असे आढेवेढे कां?" इस्माईलनें लाचारपणानें विचारलें.

यशोदा म्हणाली, "मी धर्मांतर करून तुमची धर्मपत्नी व्हायला तयार आहें; पण तुमची रखेली व्हायला तयार नाहीं. मी तुमची आहें, सर्वस्वी तुमची आहें खरी. पण तुम्ही प्रथम तुमच्या धर्माप्रमाणें माझ्याशीं निका लावा आणि मग---काय समजलें?"

यशोदेनें धर्माचें नांव काढतांच इस्माईल क्षणभर तरी निष्प्रभ होऊन एक पाऊल मागें सरला, व त्या क्षणापुरतें तरी यशोदेच्या पातिव्रत्याचें परमेश्वरानें रक्षण केलें. अर्थात् इस्माईलची ही धर्मविषयक जाणीव क्षणभर–केवळ क्षणभरच टिकणारी होती. अंधाऱ्या रात्रीं बिजलीची चमक क्षणांत चमकावी व दुसऱ्या क्षणाला ती लुप्त होऊन पुन्हा सर्वत्र अंधारी अंधार मुसमुसूं लागावा त्याप्रमाणें दुसऱ्याच क्षणाला इस्माईल पूर्वींपेक्षांही जास्त बेभान होऊन 'प्यारी! प्यारी!' अशा लाडक्या हांका मारीत यशोदेचा हात धरण्यासाठीं पाऊल उचलतो तोंच–यशोदेला वाटलें, देव धावून आला.—एक मुसलमान धावऱ्याधावऱ्या धावत तेथें आला.

"हरामखोर! या वेळीं तुम्ही इथें कशाला आलां?" इस्माईलनें सर्पासारखे मागें वळून विषारी फूत्कार सोडीत विचारलें. यशोदेला मात्र परमानंद झाला कीं आपल्या बेअब्रूचा हा प्रसंग टळला. ती त्या माणसाला ओळखूं शकली नाहीं; त्यामुळें तो कोणी हिंदु इसम मुद्दाम आपलें रक्षण करण्यासाठीं आला असावा असाच तिचा समज झाला.

पण यशोदेचा तो समज सपशेल चुकीचा होता. तो माणूस इस्माईलला म्हणाला, "शिलेदारसाहेब! लौकर चला. तुमची सासू, तुमची आई व बायको एकमेकींना ठार करतात कीं काय असा प्रसंग आहे. तसेंच घरासभोंवार लोकांची गर्दीच गर्दी होऊन ते तुमच्या घराला आग लावूं पहात आहेत."

"ही कोण माझी सासू?" इस्माईलनें विचारलें.

"तुमची सासू रोज गांवांत एक भिकारीण भीक मागण्यासाठीं येत असे, ती." रंभजी म्हणाला.

"ती इथें कशाला आली? आणि लोक इतके कां खवळले आहेत?"

"तें मग सांगतों; पण अगोदर तुम्ही तिकडे चला. तुम्ही लौकर गेलां नाहींत तर बायको व आई जिवंत तुमच्या हातीं लागावयाच्या नाहींत."

"चल. पाहूं तर खरा काय प्रकार आहे तो!" असें म्हणून इस्माईल अस्वस्थ चित्तानें चालूं लागला.

इस्माईलवर कोसळलेला हा अकल्पित प्रसंग म्हणजे आपल्या आपत्तींना वाहून नेणारी गंगाच ईश्वरी कृपेनें वाहूं लागली आहे असें यशोदेला वाटलें. त्या वाहत्या गंगेंत हात धुवून घेण्यासाठीं तीही दरवाजाबाहेर पडली. तेवढ्यांत इस्माईलनें मागें वळून पाहिलें, तेव्हां पुन्हा बंदिवास आपल्या कपाळीं येतो कीं काय या भयानें यशोदा म्हणाली, "प्यारे! मला एकटीला इथें भय वाटतें. मीही तुमच्याबरोबर येतें."

त्या मूर्खाला तें खरेंच वाटलें. तो म्हणाला, "चल."

## दर्शन बाविसावें

# सेनापतीच्या कारस्थानांचा स्फोट

शाहूमहाराज रोजच्याप्रमाणें स्नान व पूजा आटोपून सदरेला आले, त्याबरोबर बहिरोपंत पिंगळे पेशवे अगोदरच तेथें येऊन पोंचलेल्या सर्जेरावाशीं कांहींतरी हितगुज करून या कानाची त्या कानाला दाद लागूं न देतां तेथें येऊन महाराजांचीच वाट पहात उभे राहिले होते, ते पुढें येऊन हात जोडून म्हणाले, " महाराज ! सेनापतींचा जबाब घेऊन सर्जेराव घाटगे आले आहेत."

"त्यांना इथें बोलवा." शाहूमहाराज म्हणाले.

पेशव्यांनीं ताबडतोब सर्जेरावाला हांक मारून तेथें आणलें. सर्जेराव शाहूमहाराजांना मुजरा करून एक पत्र शाहूमहाराजांसमोर ठेवीत म्हणाला, "सेनापतींनीं महाराजांना हें पत्र दिलें आहे."

"पेशवे! तें पत्र वाचा पाहूं !" शाहूमहाराज म्हणाले.

पेशव्यांनीं तें पत्र उघडून स्वतःशीं वाचून पाहिलें, त्यावेळीं त्यांचा चेहरा क्षणोक्षणीं गोरामोरा होत होता. त्यांनीं पत्र समग्र वाचून कांहीं न बोलतां शाहूमहाराजांच्या पुढ्यांत ठेवलें.

"का पेशवे! तुम्हीं पत्र वाचलें नाहीं ?" शाहूमहाराज म्हणाले.

"महाराज ! त्यांत वाचण्याजोगें कांहीं नाहीं."

"वाचण्याजोगें नाहीं कसें? तुम्ही तें वाचाच. किंवा आणा तें इकडे; मीच तें वाचून पाहातों." असें म्हणून शाहूमहाराजांनीं तें पत्र उचलून उघडून समग्र वाचलें. ते पत्र वाचीत असतां पेशवे व सर्जेराव घाटगे यांची दृष्टि सारखी त्यांच्या चर्येवर खिळून होती. त्यांची चर्या क्षणोक्षणीं लाल लाल होऊं लागलेली पाहून इकडे सर्जेरावाची घाबरगुंडी उडूं लागली व आतां सर्जेरावाची काय गत होणार ह्या चिंतेनें पेशव्यांचें मन अस्वस्थ झालें.

पत्र वाचून होतांच शाहूमहाराज पेशव्यांना म्हणाले, " पेशवे ! तुम्हीं पत्र वाचलेंच आहे. सेनापतींचें हें पत्र म्हणजे त्यांच्या उद्दामपणाची कमाल आहे. ते आपली पायरी विसरून वागूं लागले; यापुढें त्यांची गय

करण्यांत अर्थ नाहीं." शाहूमहाराज सर्जेरावाकडे वळून म्हणाले, "आणि सर्जेराव! तुम्ही सेनापतींच्या वतीनें आमच्यापाशीं ही शिष्टाई करण्यासाठीं आलां. आतां तुम्हीच सांगा, तुम्ही त्यांचे साथीदार आहां; तुम्ही पत्र वाचलेलें असेलच. ह्या अपराधाबद्दल आम्ही सेनापतींना काय शासन करावें?"

सर्जेरावाला यावर बोलण्याला तोंडच नव्हतें. कारण त्याचा विचार घेऊनच चंद्रसेनानें कृष्णराव प्रतिनिधीकडून तें पत्र लिहविलें होतें. त्यांतील प्रत्येक शब्द सेनापतीच्या उद्दामपणानें बरबटलेला व प्रत्येक विचार धमकीनें धगधगत असलेला असा होता, व त्यांत बाळाजीपंतांविषयींचा द्वेष ओतप्रोत भरलेला होता. त्याचा आशय असा कीं, महाराजांना जर चंद्रसेन जाधवां-सारख्या मातबर मराठ्यांचें पाठबळ पाहिजे असेल तर त्यांनीं बाळाजीपंतांचा पक्ष याउप्पर अजिबात सोडला पाहिजे व त्यांना तांदळांतल्या खड्याप्रमाणें प्रचलित राजकारणांतून वेंचून फेंकून देण्यांत आलें पाहिजे. अशी मागणी करतांना चंद्रसेनानें बाळाजीपंतांच्या निमित्तानें शिवाजीपासूनच्या ब्राह्मण राजकारणी पुरुषांना जेवढीं म्हणून नांवें ठेवतां येतील तेवढीं ठेवून घेतलीं होतीं, व अखेर महाराजांनीं बाळाजीपंतांचा पक्ष न सोडल्यास आपण आपल्या अनुयायांसह मोगलांना जाऊन मिळण्याची उघड उघड दहशत घातली होती.

सर्जेराव बोलत नाहीं असें पाहून शाहूमहाराज म्हणाले, "सर्जेराव! सेनापतीच्या नाकांतले बाल तुम्ही. जाधव-घाटगे ही दुक्कल आजवर आमच्या बाइटावर टपलेली आहे हें आम्ही ओळखतों. ताराबाई आईसाहेबांचे कान फुंकून तुम्हीं त्यांना कोल्हापूरचा सवता सुभा स्थापन करावयाला लावला तो तरी राज्यांत स्वतःला मन मानेल तसा धुडगूस घालावयाला सांपडावा ह्याच हेतूनें होय हें आम्हांला कळतें. तुम्हां दोघांचाही बाळाजीपंतांवर दांत कां, तर बाळाजीपंतांनीं आमच्या सिंहासनाशीं अव्याहत इमानदारी राखली म्हणून! पण आम्ही मोगलांच्या कैदेंतून सुटून सातारा राजधानीकडे यावयाला निघालों तेव्हां आमच्याविरुद्ध नाहीं नाहीं तीं कारस्थानें तुम्हींच रचिलीं, आणि आम्हांला उलथून पाडण्याचे परोपरीचे हीन डाव खेळण्याला तेव्हांपासून जी सुरुवात झाली आहे, ती दिवसेंदिवस वाढत्या प्रमाणांत आहे. जाधव मारे मराठशाहीच्या चिरकल्याणाच्या मानभावी बतावण्या करतात व बाळाजीपंत, प्रतिनिधि, अमात्य वगैरे आमच्या पदरच्या कर्त्या ब्राह्मणांना सर्रास स्वार्थी

आपमतलबी ठरवून मराठशाहीच्या राजकारणांतून ब्राह्मणांचा उठाव आम्हीं केला तरच आमच्याशीं इमानदारी पाळण्याला तयार होतात. पण आमचा प्रत्यक्ष अनुभव तर आम्हांला असें सांगतो कीं, जर बाळाजीपंतांसारखा नेकीचा राजनिष्ठ व पट्टीचा पराक्रमी पुरुष आमच्या बाजूला प्रारंभापासून नसता, तर आजला आमची व साऱ्या मराठशाहीची मोठी कठीण अवस्था होती. सेनापतींची काय कल्पना आहे, शाहूमहाराज हे आपल्या हातांतील बाहुलें बनून आपण नाचवूं तसे नाचतील? पण त्यांना म्हणावें, शाहूराजे असल्या कुटिलबुद्धीच्या नराधमांच्या कारस्थानांना बळी पडण्याइतके भोळे नाहींत. सेनापतींना काय किंवा तुम्हांला काय, एकट्याएकट्याचें कल्याण साधावयाचें आहे पण आम्हांला आमच्या अलम् मराठी दुनियेचें कल्ल्याण साधावयाचें आहे. जो कोणी आमच्याशीं इमानेंइतबारें वागेल व आम्हीं अंगीकारलेल्या हिंदवी-स्वराज्याच्या पुनर्घटनेच्या कामीं आम्हांला मनःपूर्वक मदत करील, तो आम्हांला दिल्प्यारा आहे. तो मग ब्राह्मण असो कीं मराठा असो. सेनापति मारे दिमाखानें म्हणतात, कीं थोरल्या आबासाहेबांच्या वेळेपासून मराठ्यांनीं हिंदवी-स्वराज्याची जोपासना केली, तें स्मरून आम्ही त्या कर्त्या पुरुषांच्या इभ्रतीला धक्का लागेल अशी कोणतीच गोष्ट करतां कामा नये. पण सेनापति वगैरे मराठ्यांची इभ्रत जर ढांसळली असेल तर त्यासा कारण ज्यांचे तेच आहेत. आम्ही दक्षिणेंत आलों व ताराबाई आईसाहेबांनीं आमच्या नाशासाठीं भगीरथ प्रयत्न चालविले तेव्हां हेच तुम्ही मराठे त्यांच्या कटांत सामील होऊन आमच्यावर उलटलां होतां!"

सर्जेराव म्हणाला, "महाराज! तेव्हांची वेळ निराळी होती. तेव्हां एकतर आम्हीं सर्वांनीं ताराबाई आईसाहेबांशीं राजनिष्ठ रहाण्याच्या शपथा घेतल्या होत्या, व आपल्या खरेपणाबद्दल तेव्हां जनतेंत दुमत होतें."

"बरें; त्यानंतर! आम्हीं खरेखुरे शाहूछत्रपति, भोसल्यांचे खरेखुरे वंशज, मराठी राज्याचे खरेखुरे वारस आहोंत अशी अलम् दुनियेची खातरजमा झाल्यावर तरी तुम्हीं काय केलें? आजवर तुम्हीं काय, जाधवांनीं काय, किंवा गादीच्या इतर पूर्वापार सेवकांनीं काय, अशी कोणती गोष्ट केली कीं, जी आमच्या हिंदवी-स्वराज्याच्या कल्याणाची आहे? कोल्हापूरचा सवतासुभा स्थापन होण्याला कारण तुम्ही! इतकेंच काय: पण आमचा नाश

करावयाचा म्हणून परक्या मुसलमानांशीं संगनमत करण्यालाही तुम्हीं कमी करीत नाहीं."

"हा महाराज आमच्यावर निव्वळ आळ घेत आहेत. आम्ही आजवर जें जें कांहीं केलें, तें तें हिंदवी-स्वराज्याच्या चिरस्थायित्वासाठींच केलें. आम्हीं मोगलांशीं दोस्ती आजवर कधीं केलीही नाहीं व पुढें करणार नाहीं."

"मग हें काय ?" शाहूमहाराज चंद्रसेनाचें पत्र सर्जेरावाच्या पुढें करून म्हणाले, "यांत सेनापति स्पष्ट लिहितात कीं 'आमचें म्हणणें महाराजांनीं मान्य न केल्यास आम्हांला महाराजांचे पाय अंतरतील'. याचा अर्थ काय ? सर्जेराव ! मांजर डोळे मिटून दूध पिऊं लागलें तरी घरधन्याला तें दिसतेंच. सेनापतींच्या ठायीं जर मराठशाहीविषयीं खरीखुरी कळकळ असती, तर 'महाराजांचे पाय अंतरतील' अशी अडवणुकीची बेइमानी भाषा त्यांच्या तोंडून कधींच निघाली नसती."

इतक्यांत जोत्याजीनें येऊन मुजरा करून वर्दी दिली, "महाराज ! धावडशीकर स्वामी आले आहेत."

"त्यांना ताबडतोब आंत घेऊन ये." शाहूमहाराज म्हणाले. जोत्याजी त्यांच्या आज्ञेनुसार स्वामींना आणण्यासाठीं बाहेर गेला.

"बरें; महाराज ! मीं आतां यापुढें गादीची कोणती सेवा करावी ?" सर्जेरावानें मुद्दाम दुरोखानें विचारलें.

"यापुढें तुमच्या हातून आमची सेवा नेकीनें व्हावयाची आशा नाहीं. यास्तव सेनापति व बाळाजीपंत यांचा वाद मिटेपर्यंत तुम्ही इथें आमच्या डोळ्यांसमोर राहिलें पाहिजे." शाहूमहाराज म्हणाले.

"इतका महाराजांना माझ्याविषयीं गैरविश्वास वाटूं लागला तर यापुढें ह्या गादीची सेवा करणें आम्हांला अशक्य होऊन बसेल." असें म्हणून सर्जेराव कोंडलेलें हिंस्र जनावर उलटून गुरगुरूं लागावें त्याप्रमाणें गुरगुरत बाहेर जाऊं लागला. पण तो दरवाजाबाहेर पाऊल टाकतो न टाकतो तोंच स्वामींना आणायला जोत्याजी बाहेर. गेला होता तो परत येतांना त्याला दरवाजांत भेटला. त्याच्या मागोमाग स्वामी व त्यांच्याबरोबर बाजीराव होता. त्या दोघांना विशेषतः बाजिरावाला पहातांच सर्जेराव पाण्यांत मातीचें ढेकुळ पडावें त्याप्रमाणें विरघळून गेला.

" सर्जेराव ! कुठें चाललां ?" बाजिरावानें विचारलें.

सर्जेराव त्यावर कांहीं उत्तर न देतां तडक पुढें चालूं लागला. त्याबरोबर बाजिरावानें पुढें होऊन एकदम त्याचा दंड पकडला व त्याला खेंचीत खेंचीत शाहूमहाराजांसमोर आणून उभा करून शाहूमहाराजांना विनंति केली, " महाराज ! आपल्या मानेला डसावयाला टपून बसलेल्या ह्या विषारी सर्पाला आपण मोकळा सोडणार काय ?"

तेवढ्यांत स्वामीही पुढें आले. शाहूमहाराजांनीं स्वत: उठून आपलें आसन स्वामींना दिलें. स्वामीं आसन ग्रहण करण्यापूर्वीं म्हणाले, " राजे ! ह्या गुन्हेगारास असा मोकाट सोडूं नका."

स्वामींचा शब्द म्हणजे शाहूमहाराजांचें वेदवाक्य होतें. स्वामींनीं तोंडावाटे शब्द काढला व महाराजांनीं तो मानला नाहीं असें कधींही झालें नव्हतें. महाराजांनीं लगेच जोत्याजीला आज्ञा केली, " जोत्याजी ! सर्जेरावांना कैद कर."

" मला आणि कैद ? ती कां म्हणून ?" सर्जेराव दांतओंठ खात म्हणाला, " महाराज ! माझ्या अपराधाचें माप मोजून माझ्या पदरीं घाला व मग मला काय शासन करावयाचें तें करा."

बाजीराव खदिरांगारासारखा लाल होऊन म्हणाला, " सर्जेराव ! हा साक्षात् साडेतीन हात उंचीचा देह तुमच्या समोर तुमच्या अन्यायांचें माप पुरेपूर मोजून तुमच्या पदरांत घालावयाला उभा असतांना असे बोल बोलावयाला तुम्हांला शरम वाटत नाहीं काय ?" लगेच तो शाहूमहाराजांकडे वळून म्हणाला, " महाराज ! हा आरोपी अनायासें स्वतांच्या पायांनीं चालून आपणांसमोर आला आहे; याच्या विरुद्ध माझी फिर्याद आहे. आजकाल आपण व आम्ही आपले एकनिष्ठ सेवक यांच्याविरुद्ध जीं जीं कारस्थानें रचण्यांत आलीं व सध्यां रचण्यांत येत आहेत, तीं सारीं हा सर्जेराव, सेनापति व कृष्णराव प्रतिनिधि यांचीं कारस्थानें आहेत. ह्या कारस्थानांचे धागेदोरे फार दूरवर पसरलेले आहेत. एक वर्षापूर्वीं आपला राजवाडा सुरुंग लावून उडवून देण्याचा जो कट करण्यांत आला होता, त्याच्या मुळाशीं देखील सेनापतिही होते व सर्जेरावही होता."

" महाराज ! बाजीराव केवळ सूड घेण्याच्या दुष्टबुद्धीनें माझ्यावर भलभलते आरोप लादीत आहे." सर्जेराव बाजीरावाकडे वळून म्हणाला,

"बाजी ! सेनापतींच्या आज्ञेप्रमाणें मीं तुला कैद केलें होतें; पण त्यांत माझा व्यक्तिशः कांहींच संबंध नव्हता. वरिष्ठांची आज्ञा पाळावयाची म्हणून ती मला पाळावी लागली."

"काय ? सर्जेराव ! तुम्ही हें खरें बोलतां ? इस्माईलखान रोहिल्याशीं तुम्हीं व सेनापतींनीं संगनमत करून त्याला तुम्ही आम्हां सर्वांविरुद्ध अनर्थपात करण्याची फूस दिली नाहीं काय ? " बाजिरावानें विचारलें.

"साफ खोटें ! " सर्जेराव उद्गारला.

"ठीक आहे. वेळ आली म्हणजे तुमच्या सर्व अपराधांचें माप मोजून तुमच्या पदरीं पडेल." लगेच बाजीराव शाहूमहाराजांकडे वळून म्हणाला, महाराज ! तूर्त आपल्या चरणीं माझी एवढीच विनंति आहे कीं, सर्जेराव व कृष्णराव सेनापतींच्या वतीनें कोल्हापूरकर व मोगल यांच्याशीं फितुरी करण्याच्या कामगिरीवर सध्यां निघाले आहेत; आतां त्या फितुरीपासून जर मराठशाहीचा बचाव व्हावा अशी आपली इच्छा असेल, तर यांना आपण मोकळें सोडूं नये. आम्हां बापलेकांच्या नाशावर हें त्रिकूट टपलेलें आहे म्हणूनच केवळ मी यांच्यावर ठपका ठेवतों असें नाहीं. पण हा केवळ खासगी द्वेषाचा प्रश्न नाहीं. भांडणाचें कारण तें किती क्षुल्लक, असें असतां यांनीं त्या भांडणाचा राईचा पर्वत कसा केला आहे हें आपण जाणतच आहां. आपणापाशीं सेनाकर्त्यांनीं अभय मागितलें, व आपणही त्यांना अभय देऊन सेनापतींनीं झगडा मिटवून माघारे येण्यासाठीं आज्ञापत्र पाठविलें होतें, हें खरें ना ?"

"होय."

"त्या आज्ञापत्राची व तें आज्ञापत्र घेऊन जाणाऱ्या यादवजीची काय गत झाली असें सर्जेरावांना विचारा ! तें आज्ञापत्र सेनापतीनें नुसतेंच अमान्य केलें नाहीं, तें फाडून पायाखालीं तुडविलें व यादवजीला जागच्या जागीं ठार केलें !"

"सर्जेराव ! हें खरें काय ?" शाहूमहाराजांनीं विचारलें.

सर्जेरावाला ह्या गोष्टी नाकबूल करतां येण्याजोग्या नव्हत्याच. ह्या सर्व गोष्टी बाजिरावाला कशा कळल्या याविषयीं त्याला मोठा अचंबा वाटला. पण आली वेळ कशीबशी शोभवून न्यावयाची म्हणून तो उत्तरला,

" महाराज! ह्या सर्व गोष्टी सेनापतींनीं चिडून आपल्या अधिकारांत केल्या. त्याला मी काय करणार!"

" पण केल्या खऱ्या ना?" शाहूमहाराज संतप्त होऊन म्हणाले, " सर्जेराव! तुम्ही प्रत्येक गोष्ट सेनापतींवर लोटतां; पण तुम्हीही सेनापतींच्या प्रभावळींतील एक आहां हें मी पक्कें ओळखतों. सेनापतींनीं प्रत्यक्ष माझ्या पत्राचा असा अपमान करून माझ्या सेवकाला ठार करण्याला कमी केलें नाहीं, ही राजद्रोहाची शिकस्त झाली. ह्या गुन्ह्याबद्दल सेनापतींना कडक शासन व्हावयाचें तें होईलच; पण तुम्हीही ह्या अपराधाचे अंशभागी आहां. यास्तव सेनापतींचें यथान्याय शासन होऊन तुमचा न्याय होईतों तुम्हांला राजधानी सोडून जातां येणार नाहीं. चला जा. माझ्यासमोरून चालते व्हा." शाहूमहाराजांनीं पेशव्यांना हांक मारली, " पेशवे!"

"महाराज!" पेशवे समोर येऊन हात जोडून उभे राहिले.

"सर्जेरावांना वेशीबाहेर जातां येणार नाहीं व त्यांना कोणाशीं दळणवळण ठेवतां येणार नाहीं असा बंदोबस्त राखा." शाहूमहाराज म्हणाले.

" आज्ञा महाराज!" पेशवे सर्जेरावाच्या मागोमाग बाहेर गेले.

इतका प्रकार झाला तरी स्वामी व बाजीराव तेथें उभेच! शाहूमहाराजांनीं स्वामींना आसनाचा स्वीकार करण्याची पुन्हा विनंति केली तेव्हां स्वामींनीं आसन ग्रहण केलें. बाजीरावही अदबीनें त्यांच्या बाजूला बसला. कंठाजी दूर आपल्या पायरीला शोभेसा उभा राहिला. शाहूमहाराजांनीं स्वामींना हात जोडून विचारलें, "आज स्वामींनीं अगदीं अकल्पित रीत्या दर्शन दिलें!"

" होय. गोष्ट खरी." स्वामी म्हणाल.

" सेवकाला काय आज्ञा आहे?" शाहूमहाराजांनीं विचारलें.

" तुम्ही ह्या अलम् मराठी दुनियेचे राजराजेश्वर आहां. तुमच्या पुण्यवंत पूर्वजांनीं-श्रीशिवछत्रपतींनें ह्या हिंदवी-स्वराज्याची स्थापना करून गो-ब्राह्मण-प्रतिपालक हें नांव सार्थ केलें. त्यांचे पौत्र तुम्ही; तुम्ही तुमचें कर्तव्य जाणतांच. पण आज देश-काल-परिस्थिति पाहून असें विचारणें प्राप्त झालें आहे कीं, तुम्हांस तुमचें नांव, तुमच्या पूर्वजांची कीर्ति, गो-ब्राह्मण व समस्त हिंदु रयत यांची अब्रू राखावयाची आहे कीं घालवावयाची आहे? आमच्या कठोर प्रश्नानें कष्टी होऊं नका. पण एकंदर परिस्थितीचा तुम्हीं जर सूक्ष्म

दृष्टीनें विचार केला, तर तुम्हांस कळून येईल कीं, महाराष्ट्रांतील अंतस्थ कलह, व आर्विधांचा घरभेदेपणा, यामुळें महाराष्ट्राचें नांव बुडण्याच्या पंथास लागलें आहे. तुम्ही बाळपणापासून बादशहाच्या जनानखान्यांत वाढून लहानाचे मोठे झालां, त्यामुळें तुम्हांस बादशाही अमलाचा वाटावा तितका तिटकारा वाटत नाहीं व त्या तुमच्या नरमपणाचा फायदा घेऊन मुसलमानांस हिंदूंच्या मुलखीं येऊन मनास मानेल तसा धांगडधिंगा घालतां येतो. काय पाहिजे तीं कट-कारस्थानें करतां येतात. आणि तीं खुद्द तुमच्या छत्रपतींच्या राजधानींत दिवसाढवळ्या तुमच्या नाकावर टिचवून! याचें प्रत्यंतर पाहिजे असल्यास ह्या मुलास विचारावें." स्वामी बाजिरावाकडे बोट दाखवून म्हणाले.

शाहूमहाराजांनीं बाजिरावाकडे वळून विचारलें, "बाजी! तुला आणखी कांहीं नवीं कारस्थानें कळलीं काय?"

बाजीराव हात जोडून उद्गारला, "महाराज! कारस्थानें जुनींच; पण तीं उजेडांत मात्र आज नव्यानें आलीं."

"तीं कोणतीं?" शाहूमहाराजांनीं विचारलें.

बाजीरावानें सेनापतीच्या पदरीं नोकरीला राहिलेल्या इस्माईल व इतर रोहिल्यांनीं सेनापतीसारख्या मातबर मराठ्यांना बादशहाच्या बाजूला वळवून घेण्यासाठीं कटांचें जाळें कसकसें पसरलें होतें, एका वर्षापूर्वीं साताऱ्यांत ठाणें देऊन बसलेला फकीरही ह्या कटाचाच साथीदार असून त्याच्या नेतृत्वाखालीं राजकीय दृष्ट्या महाराष्ट्राचें शरीर पोखरून महाराष्ट्राला दुबळा बनवून सोडण्याच्या कामगिरीबरोबर अत्याचारांच्या जोरावर हिंदुधर्माचा उच्छेद व मुसलमानीधर्माचा प्रसार करण्याचे उपाय सर्रास कसे अमलांत आणण्यांत येत होते, नाथाजी व पिलाजी यांच्या बायका पळविण्यांत इस्माइलादि मुसलमानांचें कसें अंग होतें, त्या पुढें नुक्त्या नारायणस्वामींच्या हातीं कशा लागल्या, त्यानंतर प्रस्तुतच्या मोहिमेंतही इस्माईल आणि त्याचे अनुचर यांनीं खंडोबाच्या देवालयांत अत्याचार करून जिथें जावें तिथें लुटालूट, बायकांची अब्रू घेणें वगैरे अनन्वित प्रकार कसे चालविले आहेत, त्यांतच आपल्या व यशोदा आणि पिराजी यांच्या जन्माचे धिंडवडे कसे निघाले व आजला एकंदर परिस्थिति कशी काय आहे, हा समग्र वृत्तांत शाहूमहाराजांना निवेदन केला.

" आणि ह्या सर्व गोष्टी आमच्या राज्यांत आमच्या सेनापतींच्या कृपा-छत्राखालीं चालल्या आहेत ? " शाहूमहाराज विषण्ण चित्तानें उद्गारले.

" होय ! ह्या सर्व गोष्टी तुमच्या राज्यांत दिवसाढवळ्या चालल्या आहेत ! तुम्ही राजे, तुम्ही गो-ब्राह्मण-प्रतिपालक, तुम्ही हिंदुधर्माचे रक्षणकर्ते, असें असतां बाहेरून शत्रु येतात, ते तुमच्या अन्नावर पोसतात आणि तुमच्याच मानेवर सुरी फिरवितात ! तुमचा धर्म अविंधांनीं पायाखालीं तुडवावा, तुमच्या देवदेवालयांचा विध्वंस करावा, तुमच्या लेंकी-सुना-बायकांची अब्रू घ्यावी, तुमच्या गोमातेच्या माना चरचरां चिराव्या, तरीही तुम्हांस त्या अधर्मीयांचें शासन करतां येऊं नये. तुम्ही राजे, रयतेचें भवितव्य तुमच्या हातीं आहे. पण तुमची राजवट ही अशी मसणवटीसारखी भयाण बनली आहे. गो-ब्राह्मणांचें प्रतिपालन हा तुमच्या पितामहांचा महामंत्र होता. तें नांव मात्र तुम्ही धारण करतां; पण गो-ब्राह्मणांचें रक्षण जर तुमच्या हातून होत नाहीं, एवढी अफाट शासनसत्ता हातीं असून जर ह्या दुरात्म्या अविंधांचें व त्यांच्या कैवाऱ्यांचें दमन तुम्हांस करतां येत नाहीं, तर आपणास राजे तरी कशास म्हणवितां ? तुमचें राज्य ही हिंदूंची राजवट, हें गो-ब्राह्मण-प्रतिपालक छत्रपतींचें धर्मराज्य, म्हणून आमच्यासारखे संन्यासी ब्राह्मण निर्घोरपणें तपश्चर्या करण्यासाठीं तुमच्या मुलखीं येऊन राहूं लागले; पण त्यांनादेखील ह्या बेबंदपुरींत आपलें ब्राह्मणत्व राखून तपश्चर्या करण्याला वाव नाहीं." स्वामी आपल्या झोळींतून बाजिरावानें नारायणस्वामींकडून आणलेली चिठ्ठी काढून शाहूमहाराजांना दाखवीत म्हणाले, " देशोदेशींच्या सद्वृत्त तपस्व्यांनीं तुमच्या हिंदुराज्यांत निश्चिंतपणें तपश्चर्या करण्यासाठीं म्हणून यावें, पण त्यांनादेखील तुमच्या राजवटीच्या आबादानीसाठीं स्नान-संध्या व तपतपस्या सोडून क्षात्रवृत्तीचे अनुयायी होणें प्राप्त व्हावें ! राजा व प्रजा या उभयतांचें रक्षण करण्याची जबाबदारी राष्ट्रांतील साधुसंतांवर पडावी यापेक्षां तुमच्या राजवटीच्या अधोगतीचा दुसरा कोणता पुरावा पाहिजे ? तुमचा अपमान करावा म्हणून आम्ही हे मर्मभेदक बोल बोलत नाहीं; पण हिंदुधर्माची व हिंदु रयतेची ही विटंबना आम्हांस सहन होत नाहीं. यास्तव तुमचा देश व तुमचा धर्म याचें रक्षण होईल अशी राज्यव्यवस्था सुधारावी तरी एक, किंवा तुमच्याकडून हें घडणें शक्य नसेल तर डोळ्यांदेखत

सारा महाराष्ट्रदेश मुसलमानमय झालेला पहाण्यास तयार व्हावें व छत्रपति हें नांव सांगण्याचें सोडावें."

स्वामींनीं शाहूमहाराजांना इतक्या कठोर शब्दांनीं उपदेशिल्याची ही शाहूमहाराजांच्या आयुष्यांतील पहिलीच वेळ होती. स्वामी किती झाले तरी एक सामान्य संन्यासी, व शाहूमहाराज हे एवढ्या मोठ्या मराठी दुनियेचे भूपति ! पण स्वामींच्या शब्दावर प्रतिशब्द बोलण्याचें धाडस महाराज कधींच करीत नसत. आजदेखील स्वामी जे इतके ज्वलज्जहाल बोलले, ते त्यांच्या अंतःकरणाला पीळ पडल्यामुळेंच बोलले हें महाराज ओळखून होते. ते स्वामींना दोन्ही हात जोडून विनीत भावानें म्हणाले, "स्वामी! ही सर्व परिस्थिति खरी आहे. पण ती कशी काबूंत आणावी हेंच आम्हांला कळेनासें झालें आहे. थोरल्या आबासाहेबांनीं सतत परिश्रमांनीं जतन करून वाढविलेला हिंदवी-स्वराज्याचा वृक्ष अधिकाधिक वाढून विस्तरावा व त्या वृक्षाच्या छायेखालीं साऱ्या हिंदु रयतेला विसांवा घेतां यावा, माझा मायदेश सर्व-समृद्ध व्हावा, ही सारी जबाबदारी त्या पुण्यपूर्वजांचे पौत्र आम्ही या नात्यानें आमच्या मस्तकावर आहे याची जाणीव ठेवूनच आम्ही आजवर वागत आलों. पण आमच्या हाताला यश नाहीं. असें कां व्हावें ?"

"असें होतें, याचें कारण राजधर्माची पाळणूक जितक्या न्यायनिष्ठुरतेनें करावयास हवी तितक्या न्यायनिष्ठुरतेनें तुम्ही करीत नाहीं. सुष्टांचें पालन व दुष्टांचें निर्दालन करणें हा राजधर्माच्या दीक्षेचा पहिला मंत्र होय. पण ह्या मंत्राची उमज तुम्हांस पडली नाहीं. नेहमीं माणसाची पारख करून ज्याचा जसा अधिकार तसें त्यास वागवायाचें; पण तुम्ही इतके दिवस जाधवासारख्या घरभेद्या माजोरी माणसाकडे सेनापतिपद कशास ठेविलें ? असले नालायक व निमकहराम लोक तुमच्या पदरीं आहेत म्हणूनच त्यांच्या छायेखालीं मुसलमान कटवाले मस्तवालपणें मन मानेल तसा हैदोस घालूं शकतात. तुम्हांस आम्हीं मागेंच उपदेशिलेलें आठवतें काय ? शिवाजीराजांनीं एवढ्या जबरदस्त मुसलमानी सत्तेशीं वैर संपादन करून जी स्वतंत्र हिंदवी-स्वराज्याची स्थापना केली ती कां ? तुम्ही आज बादशहातीवर जितके विश्वासून वागतां, तितक्या विश्वासास मुसलमान पात्र असते, तर शिवाजीराजांनीं त्यांचा प्रतिकार करून आपला देश व आपला धर्म यांच्या रक्षणासाठीं आपल्या

जन्मदात्या पित्याचाही रोष सहन करून स्वतंत्र हिंदु राज्याची उभारणी करण्याऐवजीं मुसलमानांच्या सार्वभौम सत्तेखालीं जमीनदारी पतकरण्यांत भूषण मानलें नसतें काय ? ”

स्वामींचा हा वाग्बाण मात्र शाहूमहाराजांच्या मर्मस्थानीं जाऊन झोंबला. शाहूमहाराज मोगलाईतून दक्षिणेंत आल्या वेळेपासून ते जरी स्वतःला छत्रपति म्हणवून घेत होते, तरी बादशहानें त्यांची मुक्तता केली ती आपले एक जमीनदार म्हणूनच केली होती, व त्यांनींही त्या ताबेदारीच्या नात्याचा मनःपूर्वक प्रतिकार करण्याचा आजवर कधीं प्रयत्न केला नव्हता. यापूर्वींही स्वामींनीं त्यांना वेळोवेळीं उपदेशावें कीं तुम्हीं मुसलमानांशीं सलोखा राखण्याचा कितीही प्रयत्न केला, तरी मुसलमानांच्या धर्मविषयक व राज्यविषयक महत्त्वाकांक्षा त्या सलोख्यानें कधींही शमावयाच्या नाहींत. त्याच उपदेशाची आठवण देऊन स्वामी शाहूमहाराजांना निरुत्तर झालेले पाहून पुन्हा म्हणाले, “ शाहूराजे ! महाप्रतापी शिवाजीराजांचे पौत्र तुम्ही, तुम्ही त्या महापुरुषाची 'हिंदुस्थान हिंदूंसाठीं आहे आणि तो हिंदूंसाठींच असला पाहिजे' ही महत्त्वाकांक्षा पुरी करण्यासाठीं डोळ्यांत तेल घालून झटलें पाहिजे. ह्या गोष्टीची जाणीव तुम्हांस देण्यासाठीं आम्ही आज मुद्दाम येथें आलों. त्या जाणीवेचा फायदा अजून तरी करून घ्यावासा वाटला तर करून घ्या. बादशहाच्या हस्तकांचीं जाळीं कोणी फकीर म्हणून तर कोणी शिपाईगडी म्हणून तर कोणी आणखी कांहीं म्हणून कसकशीं पसरलीं आहेत तीं दिव्यावातीनें शोधून काढून ह्या अंत-र्भेदीपणाच्या वेळींच निःपात करा, व गो-ब्राह्मण प्रतिपालक हें नांव सार्थ करा, एवढी भिक्षा मागण्यासाठीं आम्ही आज तुमच्यापाशीं आलों आहों.”

बोलतां बोलतां स्वामींची चर्या गंभीर होऊन नयनांवाटे दोन अश्रु गळाले. आपल्या गुरुदेवांचे ते दुःखाश्रु शाहूमहाराजांना पहावेनात. एखाद्या सामान्य माणसाच्या अश्रूंत व स्वामींच्या अश्रूंत फार अंतर होतें. सामान्य माणूस आपल्या स्वार्थासाठीं अश्रु गाळील; पण स्वामींचे हे अश्रु परमार्थासाठीं होते. म्हणूनच शाहूमहाराजांना ते दोन दुःखाश्रु सागरप्रमाण वाटले. त्यांनीं तेव्हांच स्वामींच्या पायांवर डोकें टेंकून त्यांची करुणा भाकली, “ स्वामी ! आपल्या उप-देशाची पाळणूक करण्याच्या कामीं आजवर आमच्या हातून ज्या चुका झाल्या असतील त्यांची आम्हांला क्षमा करा. एवढे राजे आम्ही तुमच्या पायांचे

सेवेकरी आहों. तुमच्या कृपेची भिक्षा मागण्याला तुमच्यासमोर अष्टौप्रहर पदर पसरून जिथें आम्ही उभे, तिथें आम्हांला असें लाजवणें बरें नव्हे."

"बरें; बाळाजीपंतांच्या सुटकेची काय व्यवस्था केली आहे? त्यांची आम्हांस फार काळजी आहे." स्वामींनीं अंमळ शांत होऊन विचारलें.

शाहूमहाराज म्हणाले, "त्यासाठींच आम्हीं अंबाजीपंत पुरंदऱ्यांच्या हातीं भिमथडीकडे हैबतराव निंबाळकर सरलष्कर आहेत त्यांच्यासह परस्पर सेनापतीवर चालून जाण्याबाबत आज्ञापत्र पाठविलें आहे. अंबाजीपंतांचा माणूस आतांच येईल, तेव्हां काय झालें तें कळेल."

"महाराज! तेवढ्यासाठींच मला वणवण करीत एथवर यावें लागलें. सेनापतींनीं सेनाकर्त्यांना अगदीं कात्रींत पकडलें आहे. जाधव-घाटग्यांची दुक्कल आमच्या नाशावर कशी टपून बसलेली आहे हें महाराजांना माहीतच आहे. जाधवांनीं आतां मराठशाहीचीं सर्व सूत्रें स्वतःच्या हातीं घ्यावीं म्हणून ब्राह्मण-ब्राह्मणेतर हा भेदनीतीचा नवा डाव खेळण्याला सुरुवात केली आहे. आणि दुर्दैवाची गोष्ट ही कीं, कृष्णराव प्रतिनिधीसारखे लोक त्यांना सामील आहेत." बाजीराव म्हणाला.

"काय? कृष्णरावही त्यांना सामील झाला?" शाहूमहाराजांनीं एकदम चमकून विचारलें.

"होय महाराज! ह्या मोहिमेवर निघाल्यापासून कृष्णराव जाधवांचा उजवा हात बनून त्यांच्या प्रत्येक कारस्थानांत प्रामुख्यानें वावरत आहेत. सचिवांकडे सेनाकर्त्यांना आसरा मिळाला नाहीं याचें कारण कृष्णरावांनीं तेथें जाऊन जाधवांच्या वतीनें त्यांचे कान फुंकले हें होय." बाजीराव उत्तरला.

"प्रतिनिधि व सचीव दोघेही प्रारंभापासून आमच्याशीं दुरोखानें वागतात तरी त्यांची अजवर आम्हीं गय केली, कारण ते गादीचे जुने सेवक आहेत. पण आतां ते देखील आमच्या विरुद्धपक्षाच्या कारस्थानांत सामील झाले काय? तर आतां त्यांचें शासन झालेंच पाहिजे." स्वामींनीं जोत्याजीला हांक मारून आज्ञा केली, "जोत्याजी! परशरामपंतांना आतांच्या आतां हात बांधून माझ्या समोर आण."

## दर्शन तेविसावें

# मोहिमांवर

जोत्याजी ओळखून चुकला, कीं परशरामपंतांचीं आतां शंभर वर्षे भरलीं. तो महाराजांची समजूत पाडण्यासाठीं म्हणून त्यांना हात जोडून म्हणाला, “ महाराज! प्रतिनिधींच्या एका कृतघ्न मुलानें अपराध केला, त्याच्या अपराधाबद्दल प्रतिनिधींना शासन करणें म्हणजे चोराला सोडून संन्याशाला बळी देणें होय. ”

यावर शाहूमहाराज कांहीं बोलणार तोंच परशरामपंत प्रतिनिधि स्वतःच आपला धाकटा मुलगा श्रीपतराव यासह तेथें आले. त्यांनीं जोत्याजीचें अखेरचें संभाषण येतां येतां ऐकलें होतें. ते पुढें येतांच शाहूमहाराजांसमोर माथा नम्र करून म्हणाले, “ महाराज! आपण मला शिक्षा फर्मावणार हें ओळखूनच मी आपणांसमोर आलों आहें. माझ्या पोरानें आरंभिलेल्या घर-भेदेपणाची बातमी मला कळली, तेव्हांच मीं मनोमन ताडलें कीं, आज प्रतिनिधींच्या माथीं राजकोपाची वीज कडाडणार. आणि तें एका अर्थीं बरोबरच आहे. मी आजवर ताराबाई आईसाहेबांना राजनिष्ठे-विषयीं दिलेल्या शब्दाची इमानदारी राखण्यासाठीं आपणाशीं विरोधानें वागलों व आपल्या सेवेला अंतरलों. त्याबद्दल आपण मला आजवर नुसती अटकेची शिक्षा दिली ती फारच सौम्य शिक्षा झाली. पण आपणांलाही कबूल करावें लागेल कीं, ह्या ब्राह्मणानें आपलें इमान आजवर सोडलें नाहीं. ताराबाई आईसाहेबांच्या मनांत मराठशाहीच्या कल्याणाची जाणीव जागत होती तोंवर मी आपणांला सामील झालों नाहीं. पण पुढें पाहूं लागलों तों सारी सृष्टि उरफाटी होऊं लागली. ताराबाई आईसाहेब नियत सोडून वागूं लागल्या. घरची भाऊबंदकी मिटविण्यासाठीं परक्या मोगलांना आपल्या घरांत आणून भरण्याची दुर्बुद्धि त्यांना आठवली, तेव्हांच माझें मन मला सांगूं लागलें कीं, आतां ताराबाई आईसाहेबांना दिलेल्या वचनाला जागणें म्हणजे छत्रपतींच्या गादीशीं बेइमान होणें आहे. तेव्हांच मी माझ्या दोघां मुलांना उपदेश केला, कीं माझ्या कपाळीं कैद आली ती टळावयाची नाहीं;

पण तुम्ही मात्र यापुढें सेवा शाहूमहाराजांची करा व प्रतिनिधींच्या राजनिष्ठ घराण्याचा लौकिक कायम राखा. पण कैक जन्मींचा पापी कपाळकरंटा मी, म्हणून माझा मुलगा असा कुलांगार निपजला. त्यानें माझ्या तोंडाला काळोखी फांसली. त्याच्या कर्मांचीं फळें तो भोगीलच; पण अशा कुपुत्राला जन्म दिल्यानें मी पातकाचा धनी झालों, त्या पातकाची फेड होण्यासाठीं आपण मला जें काय शासन करावयाचें तें करा."

श्रीपतराव इतका वेळ स्वस्थ होता, तो पुढें होऊन शाहूमहाराजांना हात जोडून म्हणाला, "महाराज ! तीर्थरूपांची छत्रपतींच्या गादीच्या ठायीं किती अढळ निष्ठा आहे हें आपण जाणतांच. आतां माझी आपल्या चरणापाशीं प्रार्थना एवढीच कीं, माझ्या मोठ्या बंधूंनीं शत्रूला सामील होऊन आमच्या वंशाच्या तोंडाला जें काळें फांसलें, तें मला माझ्या रक्तानें धुवून काढलें पाहिजे. महाराजांनीं मला माझ्या वडील बंधूंच्या पापाचें प्रायश्चित्त देण्यासाठीं आपल्या वतीनें एखाद्या मोहिमेवर जाण्याची आज्ञा द्यावी."

प्रतिनिधि बापलेकांचा हा खुल्या दिलाचा विनयभाव पाहून शाहूमहाराजांचा क्रोध मावळला. बाळाजीपंत जी प्रतिनिधींच्या सच्चेपणाविषयीं वारंवार प्रशंसा करीत, ती खरी होती अशी आतां त्यांची खात्री पटली. त्यांनीं पर्शरामपंतांना शासन करण्याचें दूरच राहिलें, त्यांनीं त्यांना अभय देऊन सांगितलें, "प्रतिनिधि ! तुमची बुद्धि लौकर ताळ्यावर आली हें सुचिन्ह आहे. तुमच्या पुत्राच्या अन्याय्य वर्तनाला ज्याअर्थीं तुमचा पाठिंबा नाहीं व याउप्पर तरी आमच्या गादीशीं निष्ठापूर्वक वागण्याची ज्याअर्थीं तुमच्या मनाची तयारी आहे, त्याअर्थीं तुमच्या पुत्राच्या अपराधाबद्दल तुम्हांला शासन करण्याची आमची इच्छा नाहीं." लगेच महाराज श्रीपतरावाकडे वळून म्हणाले, "श्रीपतराव ! तुमचे वडील आतां वृद्ध झाले, तरी ते आमच्या गादीचे पूर्वापार सेवक आहेत. त्यांचें प्रतिनिधिपद पुन्हा त्यांच्या घराण्याकडे चालू राहावें अशी तुमची इच्छा आहे ना ?"

"होय महाराज !" श्रीपतराव विनम्र भावानें उत्तरला.

"तर मग तुम्ही गादीच्या सेवेला सादर झालें पाहिजे. आमची आज्ञा होतांच तुम्हांला मोहिमेवर जावें लागेल."

"महाराजांच्या सेवेला हा महाराजांचा दास सदैव तत्पर आहे." श्रीपतराव उत्तरला.

" आम्हांला आमच्या राज्याभिषेकापासून न जुमानणारे असे पूर्वापार ऋणानुबंधाचे पुरुष दोन; प्रतिनिधि व सचिव. पैकीं एक वेळींच आपली मर्यादा ओळखून वागूं लागले. आतां राहतां राहिले सचिव. त्यांचें मात्र शासन झालेंच पाहिजे. त्यांनीं सेनापतींशीं संगनमत करण्याचा क्रम आरंभिला आहे." शाहूमहाराज स्वामींकडे वळून म्हणाले, " स्वामी ! आतां सचिवांना आम्हीं कोणतें शासन करावें ? ते आपले शिष्य म्हणून विचारतों."

बाजीराव ओळखून चुकला कीं, सचिवांनीं आपल्या वडिलांना आसरा दिला नाहीं अशी खबर आपण महाराजांना दिली त्याचा हा परिणाम. पण बाजिरावाच्या मतेंही सचिव निर्दोषी होते. त्यांची निर्दोषता सिद्ध करण्या-साठीं बाजीराव म्हणाला, " महाराजांना वाटतात तसे सचिव अपराधी नाहींत. त्यांच्या मनांत महाराजांविषयीं दुजाभाव असता तर त्यांनीं आपला पुत्र महाराजांच्या पायांवर घालण्यासाठीं सेनाकर्त्यांच्या स्वाधीन केलाच नसता. सचिवांची स्वामिनिष्ठा सुविख्यात आहे. त्यांना महाराजांनीं राखून घ्यावें."

परशराम पंतप्रतिनिधीदेखील म्हणाले, " महाराज! असें करूं नये. सचिवांना मी ओळखतों. सचिव कधींही गादीशीं बेइमान व्हावयाचे नाहींत. आतां सेना-पतींसारख्या मराठमोळ्यांतील विघ्नसंतोषी मराठ्यांनीं निष्कारण मराठशाहींतील दुफळीची आग चेतविण्याच्या हेतूनें हा नसता वाद वाढवून त्या वादांत मी, सचिव, बाळाजीपंत वगैरे मराठशाहींतील राजनिष्ठ ब्राह्मणांना नामोहरम करण्यासाठीं महाराजांच्या मनांत विष ओतण्याचा निंद्य प्रयत्न केला असेल, तर त्यांच्या त्या आगलावेपणावर विश्वासून महाराजांच्या हातून वेळीं निरपराधी लोकांचें निष्कारण शासन होण्याचा मात्र संभव आहे."

" प्रतिनिधि ! तुम्ही समजतां तसे शाहूराजे हलक्या कानांचे नाहींत. राजकर्तव्याची आम्हांला पूर्ण जाणीव आहे. राजकारण हें राष्ट्राचें आहे व तें यशस्वी करण्यासाठीं सर्वांनीं सर्व भेदभाव विसरून झटलें पाहिजे. तुम्ही म्हणतां तशा प्रकारची अनिष्ट चुरस सेनापति आदिकरून मराठामंडळांतील कांहीं स्वार्थी व देशद्रोही लोकांनीं चालविली आहे खरी; पण हीं राष्ट्रघाताचीं दुश्चिन्हें आहेत. असल्या दुर्विचारांना आमच्या अंतःकरणांत मुळींच थारा मिळावयाचा नाहीं. तसेंच आम्ही दक्षिणेंत आलों तेव्हांपासून हें सारें मराठा-मंडळ आमच्या विरुद्ध असतांना आमची राजवट अभंग राखण्यासाठीं ज्या

थोड्या पुरुषांनीं आजवर आपल्या हाडांचीं काडें केलीं, ते सेनाकर्ते" शाहूमहाराज ब्रह्मेंद्रस्वामींकडे अंगुलिनिर्देश करून म्हणाले, "तसेंच ज्या सत्पुरुषांच्या कृपेनें आम्हांला त्या नररत्नाचा लाभ झाला व ज्यांच्या कृपाछत्राखालीं आम्ही इतक्या कष्टप्रद स्थितींतही आमचा राज्यशकट सुरळितपणें हांकूं शकतों आणि पुढेंही हांकूं शकूं, ते दोघेही ब्राह्मणच आहेत. पण म्हणून कांहीं सचिवांनीं आमचा अपराध केला तर तो क्षम्य ठरत नाहीं."

"पण शाहूराजे! सचिव आमच्या शिष्यवृंदांपैकीं म्हणून आम्हांपाशीं तुम्हीं त्यांची कागाळी सांगितली, त्यास ते आमचे शिष्य म्हणूनच आम्ही त्यांच्याविषयीं निर्वाळा देऊन ठेवतों कीं, सचिव आपली राजनिष्ठेची बिरुदा-वळी सोडावयाचे नाहींत. राज्यांतील कर्त्या पुरुषांची कदर बाळगावयाची असते ती कठीण प्रसंगीं ते कामास यावे म्हणून. शाहूराजे! सचिव तुम्हांस परके वाटतात; पण थोड्याच दिनावधींत सचिवांची सचोटी तुमच्या प्रत्ययास येईल व तुम्हीच कबूल कराल कीं, सेवक असावे तर सचिवांसारखे असावे."

स्वामींचें हें संदिग्ध संभाषण ऐकून बाजिरावाचा तर्क चालूं लागला कीं, नारायणस्वामी स्वामींना भेटून गेले व तेथून त्यांनीं नाथाजी आणि पिलाजी यांना पांडवगड व पुरंदर या ठिकाणीं चिठ्या देऊन पाठविलें, त्याच्याशीं स्वामींचा कांहीं संबंध असावा. पण बाजीराव बोलला मात्र नाहीं. शाहू-महाराजांना जरी हा प्रकार माहीत नव्हता, तरी स्वामी वायफळ कांहीं बडबडणार नाहींत याविषयीं त्यांची खात्री होती. ते म्हणाले, "स्वामी! आपण म्हणतां त्याप्रमाणें सचिव, तसेच हे प्रतिनिधि यांची स्वामिभक्ति आमच्या प्रत्ययाला आली, तर आणखी काय पाहिजे? आपला जर सचिवां-वर इतका विश्वास आहे, तर आमचें कांहीं म्हणणें नाहीं."

"स्वामिभक्तांच्या स्वामिभक्तीचें चीज करण्याजोगी विवेकबुद्धि तुम्हीं अंतःकरणांत अशीच जागृत ठेविली पाहिजे. तसेंच सचिव व प्रतिनिधि यांनीं आजवर अज्ञातवास भोगला तेवढा पुरे झाला. असे कर्तबगार पुरुष आपल्या साह्यार्थ सदैव तत्पर राहावे यासाठीं त्यांस तुम्हीं सांभाळून घेतलें पाहिजे. तरच त्याला लोकसंग्रह म्हणावयाचें." स्वामी म्हणाले.

बाजीराव म्हणाला, "तसेंच महाराज! माझी सेवकाची विनंति मान्य

करावयाची असेल तर आज आपल्यापाशीं जी मंडळी आहेत, त्यांच्यांतच दरो-बस्त बंदोबस्ताची कामगिरी वांटून द्यावी. स्वामींचीही अशीच इच्छा आहे."

"आणि आमचीही ती कामगिरी शिरावर घेऊन पार पाडण्याची तयारी आहे." श्रीपतराव प्रतिनिधि म्हणाला.

बाजीराव पुन्हा म्हणाला, "काय वाटेल तें झालें तरी हें बंदोबस्ताचें काम दिरंगाईवर टाकतां उपयोगाचें नाहीं. माझ्या वडिलांच्या सुटकेसाठीं मी असें म्हणतों असें नव्हे, महाराज आपल्या सेवकांच्या कुशलाची काळजी घ्यावयाला समर्थ आहेत. सेनापतींचीं मोगलांकडील कारस्थानें रंगारूपाला येण्यापूर्वींच जर महाराजांनीं जागोजागच्या लहानमोठ्या पुंडांचा प्रतिकार केला नाहीं, तर जाधवांच्या कुजक्या मेंदूंतून निर्माण झालेली मुसलमानांच्या जवळिकीची सांथ हां हां म्हणतां सर्वत्र पसरेल, त्यांना कोल्हापूरच्या राज-वटींत जागा मिळेल, व मग ती सांथ थांबविणें कोणाच्याही आटोक्याबाहेरचें होऊन बसेल."

"मूर्ति लहान पण विचार महासागरासारखे खोल व व्यापक आहेत!" शाहूमहाराज बाजिरावाला उद्देशून स्वामींकडे पाहात म्हणाले.

"तो बाळाजीपंतांचा मुलगा आहे! त्याची सल्ला खरोखरच मुत्सद्दी-गिरीची आहे." स्वामी म्हणाले.

"आणि ती आम्हांला सर्वथा मान्यही आहे. आतां तसेंच केलें पाहिजे." शाहूमहाराजांनीं जोत्याजीला हांक मारून विचारलें, "जोत्याजी! पेशवे अजून कसे आले नाहींत?"

"महाराज! पेशवे ठिकठिकाणाहून आलेल्या हेरांच्या बातम्या ऐकून घेत आहेत."

"त्यांना काम होतांच तावडतोब बोलावून आण."

"आज्ञा महाराज!" असें म्हणून जोत्याजी मुजरा करून बाहेर निघून गेला.

इतक्यांत बहिरोपंत पिंगळे पेशवे स्वतःच काम आटोपून तेथें आले. शाहूमहाराजांनीं त्यांना विचारलें, "पेशवे! खबर कुठची काय आहे?"

"महाराज! कोल्हापुराकडे ताराबाई आईसाहेब व धाकटे शिवाजीराजे यांना संभाजीराजांनीं कैदेंत टाकल्यामुळें त्यांचा तात्पुरता मोड झाला खरा;

वण सेनापतींकडून मोगल व कोल्हापूरकर यांचें संगनमत घडवून आणून सातार्‍याला शह देण्याचीं कारस्थानें जारी आहेत. दमाजी थोरात हिंगण-गांवच्या गढींत ठाणें देऊन बसलाच आहे. कृष्णराव खटावकर शंभुमहा-देवाच्या डोंगरांत राहून आजूबाजूच्या मुलखांत दंगल माजवीत आहे. दक्षिण-कोंकणांत खेमसावंत वाडीकर बळी माजला आहे व उत्तर कोंकणांत कान्होजी आंग्र्यांची अरेरावी बेसुमार बोकाळली आहे. अशी परिस्थिति चारी बाजूंनीं बिकट झाली आहे."

"आणि अंबाजीपंत भीमथडीला सरलष्करांकडे गेले होते त्यांची कांहीं खबर कळली का ?"

"हो ! त्यांच्याकडील हेरानें बातमी आणली आहे कीं, अंबाजीपंत व सरलष्कर परस्पर पांडवगडाकडे सेनापतींचें पारिपत्य करण्यासाठीं चालून गेले." पेशवे म्हणाले.

"एकूण तिकडची एक काळजी मिटली." शाहूमहाराज म्हणाले.

"होय. पण इकडे आंग्र्यांच्या चढावानें मात्र फार चिंताजनक परिस्थिति निर्माण केली आहे. बहुतेक उत्तर कोंकण काबीज करून ते कल्याणपर्यंत येऊन पोंचले आहेत, व कोल्हापूरकरांचें त्यांना वश करण्याचें राजकारण गुप्तपणें सुरू असून तें यशस्वी होण्याचा संभव आहे. मग आंग्र्यांचा विचार थेट सातार्‍यावर चालून येण्याचा आहे." पेशवे म्हणाले, "तेव्हां आंग्र्यांचा पुंडावा थांबविण्याची तजवीज प्रथम झाली पाहिजे."

"मग ? आतां ही चोहों बाजूंची वावटळ मिटवावयाची कशी ?" शाहूमहाराजांनीं विचारलें.

"तें आतां महाराजांनींच सांगावें." पेशवे म्हणाले.

"महाराज सांगतील; पण मग तुम्ही पेशवे ते कशासाठीं ?" शाहूमहाराज पेशव्यांचा कानांवर हात ठेवण्याकडे कल असलेला पाहून रागाला येऊन म्हणाले, "पेशवे ! अशीं धरून कुत्रीं कुठें पारध करीत नसतात. तुमच्या-सारख्या जबाबदार पुरुषाला असली परस्पर पावणेतेरा वर्तणूक शोभत नाहीं."

"महाराजांनीं जबाबदारी माझ्या शिरावर कधीं टाकून पाहिलीच नाहीं, मग मला तरी अमकी गोष्ट अमक्या रीतीनें करावी असें निश्चितपणें कसें सांगतां येईल ?" पेशवे आंतल्या गांठीनें उत्तरले.

पेशव्यांचा महाराजांवर असा गर्भित आक्षेप होता कीं, 'आपण पेशवे असून महाराज आपणाला कधींच मसलतींत घेत नाहींत व बाळाजीपंतांच्या मताशिवाय मात्र महाराजांचें पानही हलत नाहीं. कोल्हापुराकडे ताराबाई उठावा करूं लागली, तेव्हां तिचें पारिपत्य करण्याला काय उपाय करावा असें आपणांला न विचारतां खंडोबल्लाळ व जोत्याजी यांना इतक्या दूरवर बाळाजीपंतांकडे पाठविलें, अशानें आपला अपमान होतो. हा अपमान महाराज मुद्दाम आपणावर कारणाशिवाय नाराज होऊन करतात. तसेंच महाराजांच्या राज्याभिषेकाच्या वेळेपासून महाराज बाळाजीपंतांचे पक्षपाती आहेत' अशी पेशव्यांची समजूत होती. राज्याभिषेकाच्या वेळीं अनेक हितकर्त्या लोकांना अनेक पदव्या, मानमरातब व जहागिरी मिळाल्या तेव्हां बाळाजीपंतांनीं कांहीं पारितोषिक न स्वीकारतां 'भविष्यकाळीं आपल्या हातून गादीची कांहीं उपयुक्त सेवा घडल्यास महाराजांनीं अष्टप्रधानांतील उत्तम पद आपणास द्यावें' अशी मागणी महाराजांपाशीं करून त्यांजपासून तसें वचन घेतलें होतें. शिवाय ब्रह्मेंद्रस्वामींचाही बाळाजीपंतांना पाठिंबा असून महाराज बाळाजीपंतांच्या हातून आजवर झालेल्या गादीच्या सेवेवरून बाळाजीपंतांवर प्रसन्न झाले होते. तात्पर्य, पेशवे जरी शाहूमहाराजांचे मुख्य प्रधान होते, तरी गादीचा बहुतेक कारभार अलीकडे अलीकडे तर बाळाजीपंतांच्या तंत्रानेंच चालला होता. पेशव्यांत आधींच धडाडी कमी, तशांत प्रथमपासूनच कृष्णराव प्रतिनिधि, चंद्रसेन जाधव वगैरे लोकांनीं त्यांच्या कानाशीं लागून त्यांचें मन कलुषित करण्यास सुरुवात केली कीं, बाळाजीपंत हे चित्पावन ब्राह्मण व तुम्ही देशस्थ, तेव्हां तुमचा पाडाव ते करूं इच्छितात; व पेशव्यांना तें खरें वाटलेंही. आणि तेवढ्यांतच सचिवांशीं शाहूमहाराजांचा बेबनाव आला व प्रतिनिधींना महाराजांनीं कैदेंत ठेवलें. ह्या गोष्टी पेशव्यांना सकृद्दर्शनीं बाळाजीपंतांच्या चिथावणीवरूनच झाल्यासें भासलें. प्रतिनिधि व सचिव यांच्याही मनांत हें देशस्थ-चित्पावन-भेदाचें काळें भरवून देण्याचा जाधवानें कसून प्रयत्न करून पाहिला; पण ते दोघेही पुरुष मनाचे खंबीर असल्यानें त्यांच्यापाशीं जाधवाची डाळ शिजली नाहीं. त्यानें प्रतिनिधींच्या मुलांवरही हीच मोहिनी टाकण्याचा प्रयत्न केला, व त्यांना ती मोहिनी कांहींशी गुंगवूं शकलीही. पण जितक्या मूर्ति तितक्या प्रकृति या न्यायानें

प्रतिनिधींचा धाकटा मुलगा श्रीपतराव हा पराक्रमी पुरुष असल्यानें आपण पराक्रमाच्या जोरावर शाहूमहाराजांना बाळाजीपंतांपेक्षां जास्त प्रिय होऊं व आपलें महत्त्व वाढवून घेऊं अशा आत्मविश्वासानें तो ताराबाई व शाहूमहाराज यांच्या वितुष्टांत तटस्थ राहिला. पण त्याचा मोठा भाऊ कृष्णराव निष्प्रभ व कुढ्या मनाचा असल्यानें तो तेव्हांच चंद्रसेनाच्या कारस्थानांत सामील होऊन बाळाजीपंतांशीं बांकानें वागूं लागला. पेशवे कृष्णरावाइतके नीच मनोवृत्तीचे नसल्यानें ते शाहूमहाराजांविरुद्ध कारस्थानांत जरी प्रत्यक्ष सामील झाले नाहींत, तरी ते श्रीपतरावासारखे पराक्रमी किंवा अमात्य, सचिव यांसारखे मनाचे दिलदार नसल्यानें नुसते मनांतल्या मनांत बाळाजीपंतांचा उत्कर्ष पाहून खिन्न होत. ते असावे तसे कर्तबगार नाहींत, हें ओळखूनच शाहूमहाज महत्त्वाच्या राजकाजांत त्यांच्यावर विसंबून न राहतां बाळाजीपंतांची सल्ला घेत, तेव्हां मात्र पेशव्यांच्या विवेकबुद्धीवर जातिभेदविषयक भ्रमपटल येई व त्यांना महाराजांच्या ह्या उक्त कारभारांत, तसेंच सचिव, अमात्य हे देशस्थ ब्राह्मण महाराजांच्या रोषाला पात्र होऊन बसले व बाळाजीपंतांची थोरवी मात्र एकसारखी शुक्लेंदुवत् वाढतच आहे यांत बाळाजीपंतांचा आपमतलबी चित्पावनी कावा असल्याचें दिसून येई. पुढें पुढें तर पेशव्यांनीं बाळाजीपंत हे चित्पावन म्हणून देशस्थांना मागें लोटूं पहातात अशा संशयानें, व सेनापतीला बाळाजीपंतांचा पूर्वापार कावा साधावयाचा होता म्हणून, मिळून दोघांनीं एकमत करून ब्रह्मेंद्रस्वामींनाही ते देशस्थ आहेत व बाळाजीपंतांचा चित्पावनी कावा ध्यानीं येतांच ते त्यांचा कैवार घेण्याचें सोडतील या आशेनें भोंदावयाचे प्रयत्न करून पाहिले. पण स्वामी असला क्षुद्र भेदभाव मनांत बाळगणारे नव्हते. त्यांची दृष्टि आपल्या जातीच्या हिताला झटण्याइतकी संकुचित नव्हती; जेणेंकरून हिंदवी-स्वराज्याचें व हिंदुधर्माचें मंगल होईल, अशाच गोष्टी केवळ कर्तव्य म्हणून निस्वार्थपणें करणें हें त्यांचें जीवितकार्य असल्यानें त्यांच्यासमोर पेशवे अथवा सेनापति यांचें कांहीं तेज पडेना. स्वामी बाळाजीपंतांच्या उत्कर्षासाठीं प्रारंभापासून प्रयत्न करीत होते खरे, पण त्यांत ते बाळाजीपंत ह्या व्यक्तीचें हित पाहात नसून अलम् मराठी दुनियेचें हित पाहात होते. स्वामींनीं ताराबाईचा पक्ष स्वीकारावा असें शाहूमहाराज दक्षिणेंत येण्याच्या पूर्वीपासून ताराबाईच्या वतीनें आटोकाट प्रयत्न करण्यांत आले तेव्हां देखील

स्वामींनीं शाहूमहाराजांच्याच पक्षाचा पुरस्कार केला; याचें कारण शाहूमहाराजांचा पक्ष हा सत्पक्ष आहे हेंच केवळ नसून ताराबाईसारख्या बायको-माणसाच्या हातून राज्यकारभार रेटावयाचा नाहीं व तिचा पुत्र शिवाजी हा वेडा असल्यानें तो गादीवर असून नसून सारखाच, अशा 'अबला यत्र प्रबला बालो राजा' अवस्थेचा फायदा परक्या मुसलमानांना घेतां येऊन हिंदवी-स्वराज्य नामशेष होईल; तसें होऊं नये यासाठीं शाहूमहाराजांसारखा लायक नृपति महाराष्ट्राला लाभणें यांतच महाराष्ट्राचा तरणोपाय आहे हें ओळखून स्वामींनीं शाहूमहाराजांचें पुरस्कर्तृत्व पत्करिलें होतें. आणि बाळाजीपंतांचा पुरस्कार करण्यांतही त्यांची हीच दृष्टि होती. पण जाधव काय, पेशवे काय किंवा इतर कारभारी मंडळी काय, आपल्या व्यक्तीच्या कल्याणाहून राष्ट्राचें कल्याण श्रेष्ठ आहे व म्हणूनच असले भेदभाव विसरून आपण राष्ट्र-हितास्तव जपलें पाहिजे इतकी व्यापक विवेकदृष्टि कोणालाच नसल्यानें त्यांना प्रत्येक गोष्टींत स्वार्थ व पक्षपात दिसे!

आजदेखील शाहूमहाराजांनीं ज्या अर्थीं प्राप्त परिस्थितींतून पार कसें पडावें हें निश्चित करण्यासाठीं स्वामींशींच खलबतें करतांना पेशव्यांनीं पाहिलें व शाहूमहाराज कांहींसे अप्रसन्नही दिसले, तेव्हां त्यांना साहजिक-पणेंच तें आवडलें नाहीं. आणि शाहूमहाराजांना तरी पेशव्यांविषयीं वाटावा तितका आदर अथवा विश्वास न वाटण्याचें कारण, एकतर ते असावे तितके राजकार्यकुशल नाहींत, व दुसरें, ते गादीचें हित पहाण्याच्या अगोदर आपल्या स्वतःच्या हिताची जोपासना करण्यांत चूर असतात असा शाहुमहा-राजांचा ग्रह झाला होता हें होय.

आज जेव्हां पेशवे अशी उडवाउडवीची भाषा बोलूं लागले तेव्हां शाहू-महाराजांना त्यांचा 'आंतरः कोऽपि हेतुः' कळून चुकला. स्वामींनींही तें तेव्हांच ओळखलें. ते शाहूमहाराजांना म्हणाले, "राजे! तुमचे सेवक इतक्या तत्परतेनें तुमची सेवा करण्यास तयार असतां व त्यांच्या पराक्रमास आज एवढा वाव असतां तुम्ही त्यांस वाव कां देत नाहीं?"

शाहूमहाराजांनीं स्वामींच्या बोलण्यांतील गर्भितार्थ ओळखला. त्यांना मनांतून पेशव्यांच्या नाखुषीच्या बोलण्याबद्दल राग आला होता, तरी आधींच पदरीं माणसें नाहींत, त्यांतच यांना कांहीं बोलावें तर ते निष्कारण बिथरा-

वयाचे ह्या धास्तीनें ते जरा नमत्या सुरानें म्हणाले, "पेशवे ! तुम्ही असें रागाला येणें बरें नाहीं. तुम्ही आमचे उजवे हात, तुम्ही राजवटीचे मुख्य कारभारी ! तुम्हांला वाटतें त्याप्रमाणें तुमची उपेक्षा करण्याचा आमचा मानस कधींही नव्हता व नाहीं."

"इतका जर महाराजांच्या मनांत माझ्याविषयीं खरोखर आदर व विश्वास असेल, तर मी तरी महाराजांच्या सेवेला अंतराय कसा पाडीन ! यापूर्वींच जर महाराजांनीं मला आज्ञा केली असती तर आज परिस्थिति चोहों बाजूंनीं जी इतकी चिघळली आहे ती मीं खास चिघळूं दिली नसती."

"झाल्या त्या गोष्टी होऊन गेल्या. आतां त्यांचें काय ? आतां आपण एकविचारें वागून महाराष्ट्री राखावयाला हवी." शाहूमहाराज म्हणाले, "आतां आपले प्रस्तुतचे प्रबल शत्रु कान्होजी आंग्रे, त्यांचें पारिपत्य करण्यासाठीं तुम्हीं जावें."

"महाराजांची आज्ञा मला शिरसामान्य आहे." पेशवे म्हणाले. त्यांना ही योजना या वेळीं विशेष मानवण्याचें कारण आपण आंग्र्यांचा मोड केल्यास आपलें डळमळतें पेशवेपद स्थिर होईल, अशी आशा त्यांना होती. एवढ्या एका योजनेला यश आलेलें पाहून पेशव्यांनीं महाराजांना दुसरी विनंती केली, "महाराज ! दुसरी एक व्यवहार्य सूचना माझ्या मनांतून करावयाची आहे. सेनापतींचें पारिपत्य करण्याची व्यवस्था झाली हें योग्यच झालें. पण घाटगे माझ्या मतें बरेच सुजाण आहेत. त्यांना आतां सेनापतींच्या तोंडानें आजवर पाणी प्याल्याबद्दल पश्चात्ताप होत आहे. त्यांना जर एकवार गादीची सेवा करण्याची संधि दिली तर बरें."

बाजिरावाला पेशव्यांचें हें बोलणें आंतल्या गांठीचें वाटलें. तो महाराजांना स्पष्ट म्हणाला, "घाटग्यांनीं सेनापतींच्या नादानें आजवर केलेल्या घडामोडी महाराजांना विदित आहेतच. अशा वेळीं अशा बेभरंवशाच्या माणसावर भरंवसा टाकल्यानें पुन्हा पश्चात्ताप करण्याची पाळी न येवो म्हणजे झालें."

"बाजी ! राजकारण ह्या पोरासोरांच्या गोष्टी नव्हेत." शाहूमहाराजांकडे वळून पेशवे म्हणाले, "महाराजांनीं एवढें ध्यानीं घ्यावयाला हवें कीं, घाटग्यांनीं सेनाकर्त्यांचें घोडें मारलें म्हणून तीं व्यक्तिव्यक्तींमधील भांडणें राजकारणांत समाविष्ट करणें उचित नाहीं. आज आपणांपाशीं कर्त्या माणसांचा

तुटवडा आहे, अशा वेळीं हातीं असलेल्या माणसांना निकामी बसविण्यांत अर्थ नाहीं."

"ठीक आहे. घाटग्यांना आमच्यासमोर आणा." शाहूमहाराज म्हणाले.

पेशवे बाहेर गेले. तेवढ्यांत स्वामींनीं परशरामपंत प्रतिनिधि, वगैरे मंडळींशीं पेशव्यांच्या ह्या नव्या योजनेच्या ग्राह्याग्राह्यतेविषयीं खलबत केलें. पेशवे व घाटगे यांची जी ही दिलजमाई झालेली दिसते, ती गादीच्या सुरक्षिततेला फारशी पोषक नाहीं असेंच सर्वांचें मत पडलें. पण पेशव्यांच्या शब्दाला या वेळीं मान न द्यावा तर ते बिथरतील व ही कारभारी मंडळांतील फाटाफूट पाहून शत्रु जास्त बळावेल, त्यापेक्षां पेशवे व घाटगे दोघेही परस्पर इरेला पडलेले बरे, अशी तोड स्वामींनी सुचविली व ती शाहूमहाराजांना पसंत पडली. मात्र त्याच वेळीं शाहूमहाराजांनीं मनांत खूणगांठ मारून ठेविली कीं, पेशव्यांची बुद्धि चळूं लागली; आतां त्यांना पदभ्रष्ट करून नवा पेशवा निर्माण करणें अवश्य आहे.

पेशवे घाटग्यांना घेऊन शाहूमहाराजांसमोर आले. तेव्हां व त्यापूर्वीं घाटग्यांचें पेशव्यांशीं काय हितगुज झालें होतें नकळे; पण घाटग्यांनीं स्वदेशाभिमानाचें व राजनिष्ठेचें नाटक तर खूप आवेशानें रंगवून दाखविलें. इतकेंच काय; पण आंग्र्यांचा मोड करूं तरच महाराजांना तोंड दाखवूं अशा शपथाही त्या दोघांनीं महाराजांसमोर घेतल्या. अखेर शाहूमहाराजांनीं त्या दोघांना आंग्र्यांवर पाठविण्याचें ठरविलें.

राहातां राहिले प्रबल शत्रु दोन. एक हिंगणगांवच्या गढींत ठाणें देऊन बसलेला दमाजी थोरात व माणप्रांतीं शंभुमहादेवाच्या डोंगरांत दंगल माजविणारा कृष्णराव खटावकर. यांपैकीं थोराताचा मोड करण्याचें काम शाहूमहाराजांनीं स्वामींच्या संमतीनें सचिवांवर सोंपविलें व खटावकराची खोड मोडण्यासाठीं श्रीपतराव प्रतिनिधींना जाण्याची आज्ञा केली. श्रीपतरावाला स्वतःचा पराक्रम दाखवून बाळाजीपंतांपेक्षां आपण जास्त कर्तबगार आहों असें दाखवावयाचें होतें, त्यामुळें त्याला ही संधि मिळालेली पाहून आनंद झाला. शाहूमहाराजांनीं ही व्यवस्था करतांना सर्वांना स्पष्ट इषारा दिला, "ज्यांनीं ज्यांनीं जी जी कामगिरी हातीं घेतली, ती ती मनःपूर्वक पार पाडावी व विजयश्रीचा ध्वज फडकवीत माघारे राजधानींत यावें. त्यांचा आम्ही यथोचित गौरव करूं. पण

कोणाच्या हातून अंगीकृत कार्यांत दिरंगाई झालेली आढळली तर मात्र त्याला आमच्याकडून क्षमा व्हावयाची नाहीं."

शाहूमहाराजांचे हे शब्द ऐकतांना पेशवे व घाटगे यांच्या चर्येवर उमटलेले भाव स्वामी व बाजीराव यांच्या ध्यानीं तेव्हांच आले. सर्व मंडळी शाहूमहाराजांना वंदन करून जाईतों स्वामी कांहीं बोलले नाहींत. पण त्यांनीं स्वतः जावयाला निघतांना शाहूमहाराजांना एका बाजूला घेऊन त्यांना सांगितलें, शाहूराजे ! घाटगे व पेशवे अखेरपावेतों गादीशीं इमानदारी राखतील असें आम्हांस वाटत नाहीं. यास्तव तुम्हीं जपून वागलें पाहिजे."

"ती गोष्ट माझ्या लक्षांत आली आहे. पण आम्ही त्या दोघांना आज आंग्र्यांवर पाठवितों याचें कारण आधींच आमच्यांतल्या एकीचें आकाश फाटलें आहे, त्यांत आणखी नव्या फाटाफुटीची भर पडूं नये अशी आमची इच्छा आहे. बाकी, आम्ही मनांत समजून आहों कीं, आम्हांला आमच्या राज्याची स्थिरस्थावर करण्यासाठीं प्रधानमंडळाची पुनर्घटना करण्याशिवाय गत्यंतर नाहीं. परिस्थिति अत्यंत बिकट आहे खरी; तरी पण आपल्या आशीर्वादानें आम्ही त्यांतून पार पडूं शकूं. मात्र आपणांला मला एकच गोष्ट विचारावयाची. आंग्रे जर अशानें वठणीला आले नाहींत तर काय करावें ? आपला व आंग्र्यांचा गुरुशिष्यसंबंध आहे म्हणून विचारतों."

"आमचा संबंध आहे खरा. पण आंग्रे आज मदांध झाले आहेत, त्यांस त्या संबंधाची कितपत क्षिति असेल याची वानवाच आहे. तरी पण बाळाजीपंत आल्यावर पाहूं. पण तुम्हीही बेफिकीर राहाणें बरें नाहीं. तुम्ही तुमचा सारा कटाक्ष तूर्त सेनापतींचा नीट नक्षा उतरून त्याच्या जबड्यांतून बाळाजीपंताची मुक्तता कशी होईल ह्या गोष्टीकडे ठेवा. राजकारणांत आपत्ति ह्या यावयाच्याच व त्या टाळल्या ह्या पाहिजेतच. पण त्यांतही कोणती आपत्ति किती जाचक आहे याचें धोरण राखून वर्तावयाचें असतें. आंग्र्यांसारखे स्वातंत्र्यासाठीं झगडणारे शंभर जातिवंत शत्रु पत्करले; पण सेनापतीसारखा परधर्मी मुसलमानांस सामिल होऊन स्वदेश व स्वधर्म यांच्या नाशावर टपलेला एक घरभेदा पत्करावयाचा नाहीं. यास्तव अशा घरभेद्यांचें पारिपत्य प्रथम झालें पाहिजे. त्याचें पारिपत्य झाल्यानें सध्यांच्या कुटिल कारस्थानांना बराच आळा बसेल व उरलेल्या आपत्तींशीं झगडण्यास एक विश्वासू वीर तुमच्या

हातीं लागेल." असें म्हणून स्वामींनीं शाहूमहाराजांचा निरोप घेतला. जातां जातां ते बाजिरावाकडे वळून म्हणाले, "बाजी! चल!"

"स्वामी! आमचा सर्वांचा अविंध शत्रु इस्माईल तिकडे माजोरी बनून दंगल माजवून राहिला आहे. त्याच्याशीं झगडतां झगडतां माझे जे शतवीर पतन पावले, त्यांचें तर्पण मला त्या शत्रूच्या रक्तानें केलें पाहिजे." बाजीराव आवेशानें म्हणाला, "ज्या गोष्टी महाराजांच्या कानांवर घालावयाच्या होत्या त्या घातल्या. आतां महाराज! परत आपल्या पायापाशीं येईन तर शत्रूच्या शिरकमळानें आपली चरणपूजा करण्यासाठींच येईन."

शाहूमहाराज काय किंवा स्वामी काय, त्या बालवीराचा निरुत्साह कसा करणार! त्या उभयतांनीं त्याचें अभीष्ट चिंतिलें. स्वामींनीं त्याला आशीर्वाद दिला, व बाजीराव स्वामींबरोबरच बाहेर पडला. बाहेर कंठाजी—त्याचा हनुमान त्याची वाट पहात उभा होताच.

## दर्शन चोविसावें

# मारा किंवा मरा !

एकाएकीं इस्माईलवर हें काय संकट कोसळलें, असें सर्वांना वाटलें. पण त्या संकटाचा उगम कोठून झाला हें मात्र कोणालाच माहीत नव्हतें. त्या संकटाला ती म्हातारी निमित्तमात्र झाली एवढें बरीक खरें. बोलाई-च्या देवालयाजवळून म्हातारीला इस्माईलच्या लोकांनीं व रंभाजी आणि संभाजी यांनीं बांधून आणलें, तेव्हां वाटेंत तिचे बरेच हाल करण्यांत आले आणि आश्चर्य हें कीं, तिचे हाल करण्यांत रंभाजी व संभाजी ह्या दोघां कुलांगार हिंदूंनीं पुढाकार घेतला होता. त्यांच्या डोळ्यांत म्हातारी इतकी सलत होती याचें कारण कमळा व कमळजा कोठें गेल्या तें तिला माहित असेल, तें तिच्या तोंडून वदवावें; तसेंच बाजीराव वगैरे लोकांचा पत्ता सांपडला तर तोही पहावा. म्हातारीनें जेवढा छळ सोसवला तेवढा सोसला; पण तिला जेव्हां यातना असह्य झाल्या तेव्हां तिनें बाजीराव वगैरे मंडळी त्या गुहेंतून निघून गेल्याचें सांगितलें; व कमळा आणि कमळजा यांच्याविषयीं भोगावे लागणारे क्लेश वारण्याकरितां एक निव्वळ खोटी थाप दिली कीं, कमळा व कमळजा ह्या त्यांच्याबरोबर गेल्या. रंभाजी व संभाजी यांना तें खरेंच वाटलें. आतां उजाडतांच बरोबर बरेचसे लोक घेऊन त्या गुहेंत तपास करावयाचा असा सर्वांचा बेत ठरला. पण रंभाजी यांनीं तेवढ्यांत चपळाई करून, कमळा व कमळजा आपल्या पचनीं पडाव्या ह्या हेतूनें इस्माईलच्या लोकांना नकळत परस्पर गांवांतील दहावीस लढाऊ मराठे आपल्याबरोबर घेऊन बोलाईचा डोंगर गांठण्याचें ठरविलें. त्यांचे ते गांवकरी प्रथम त्या दोघांच्या शब्दावर विसंबेनात. ते दोघेही मुसलमानांना सामील आहेत हें उभ्या गांवाला माहीत होतें. पण एक तर ते गांवचे पाटील पडले, व त्यांनीं रातोरात डोंगर चढण्याचें कारण सांगितलें तें असें कीं, 'कमळा, कमळजा व आपल्या आणखी कितीएक स्त्रिया प्राणभयानें डोंगरांत जाऊन लपून बसल्या असतील व मुसलमानांना त्यांचा तपास लागला असून उजाडतांच सारे मुसलमान तिकडे चालून जाणार आहेत. त्यांच्यापासून आपल्या लेंकी-बायका-सुनांचें रक्षण व्हावें

असें जर तुम्हांला वाटत असेल तर तुम्ही आतांच्या आतां आमच्याबरोबर येऊन त्यांच्या रक्षणाची कांहीं तजवीज केली पाहिजे.'

आधींच त्या गांवचे लोक मुसंड्यांच्या अत्याचारांनीं त्रस्त झालेले. त्या गांवांत एकही घर असें नव्हतें कीं, ज्या घरच्या लोकांना मुसलमानांच्या नांवानें हांका मारण्याला कांहीं कारण घडलें नव्हतें. मुसंड्यांनीं कोणाच्या कोंबड्या-बकऱ्या चोरून नेल्या होत्या, कोणाच्या गाई ओढून नेल्या होत्या, कोणाचा बेगमीचा दाणागोटा लुटून नेला होता, कितीएकांच्या तरुण बायकां-बहिणीं-वर दिवसाढवळ्या अत्याचार केले होते, व कितीएक स्त्रिया तर कोठें नापत्ता झाल्या होत्या याचा पत्ताच नव्हता. आणि विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, हे सारे अत्याचार मुसलमानांनीं आपल्या धर्माच्या नांवावर चालविले होते. इस्माईल अशा अत्याचारांचा पुरस्कर्ताच होता; तशांत ज्या खेडेगांवांत इस्माईलचा तळ पडला होता, तेथेंही मुसलमानांची वस्ती बरीच असल्यानें व तेथला काजी महंमदखान इस्माईलसारखाच अधर्मवृत्तीचाच असल्यानें, तसेंच 'मुसलमान हे भाई भाई' ही आपलेपणाची जाणीव सर्व मुसलमानांत स्वभावतःच असल्यानें इस्माईलनें एकवार असा धर्मप्रसार करावयाचा असें मनावर घेतांच त्याला विरोध एकाही मुसलमानानें केला नाहीं. त्यांतच त्या खेड्यांत बऱ्याच दिवसांपासून वास्तव्य करून राहिलेला शौकतखान नांवाचा हकीम व तेथल्या एक दर्ग्यावर बऱ्याच दिवसांपासून ठाणें देऊन बसलेला खोजा-हुसेन नांवाचा फकीर ह्या दोघांची भर! हा खोजाहुसेन एका वर्षापूर्वीं साताऱ्या-तून कमळा व कमळजा यांना घेऊन पळालेला फकीर व होय शौकतखानही त्याचाच साथीदार होता. शौकतखान व खोजाहुसेन यांचीं कार्यक्षेत्रें बाहेरून दिसावयाला मात्र भिन्न होतीं. शौकतखानानें अल्लाच्या नांवावर गोरगरिबांना औषधपाणी देण्याचा व जादूटोणा करण्याचा उपक्रम केला होता व खोजा हुसेन यानें 'राम-रहीम सब एकही है' असा कबीरपंथी आव आणून लोक-कल्याण साधण्याचें नाटक आरंभिल्यामुळें आधिव्याधींनीं त्रस्त झालेल्या तेथल्या खेडवळ हिंदूंना वाटूं लागलें कीं, शौकत व खोजा हे आपणाला परमेश्वरच भेटले! हां हां म्हणतां अनेक भोळेभाबडे हिंदु त्या दोघांच्या भजनीं लागले. हकीम औषधपाणी देऊन व फकीर शुभाशीर्वाद देऊन लोककल्याण साधूं लागले. असे त्या व आजूबाजूच्या खेड्यांतील शेंकडों-हजारों लोक

त्या हकीम फकिराच्या जाळ्यांत सांपडले. अनेक भावनाप्रधान पुरुष व अनेक स्त्रिया तर पूर्णपणें ह्या दुरात्म्या दुक्कलीच्या पूर्णपणें कह्यांत येऊन अल्लाची भक्ति करूं लागल्या. कांहींनीं तर उघड उघड मुसलमानी धर्माचा स्वीकारही केला. आतां, गांवांत ह्या फकिराच्या व हकिमाच्या नादीं न लागतां आपल्या हिंदुधर्माची अवास्तव घमेंड बाळगून हिंदुत्वाचें पावित्र्य कायम राखण्यासाठीं जिवाची आटापेट करणारे हिंदुत्वाभिमानी लोकही होते. पण त्यांचा अभिमान त्या फकिराचा व हकिमाचा बोज कमी करून हिंदुजनांना त्यांच्या जाळ्यांतून सोडविण्याच्या कामीं मुळींच खर्च न होतां ज्यानें हकिमाच्या हातानें औषध सेवन केलें किंवा ज्यानें फकिराचा प्रसाद ग्रहण केला, तो बाटला, तो हिंदूंतून उठला. त्याच्या हातचें पाणी प्यावयाचें नाहीं, त्याच्या स्पर्शानें विटाळलेलें अन्न सेवन करावयाचें नाहीं, फार काय, त्याला हिंदूंच्या देवालयाची पायरीही चढूं द्यावयाची नाहीं किंवा तळयां-विहिरींवर पाणी भरूं द्यावयाचें नाहीं' असा कडक बहिष्कार गांवोगांव पुकारण्यांतच त्यांचा हिंदुत्वाविषयींचा अभिमान वितळूं लागला. याचा परिणाम बरेच हिंदु स्त्रीपुरुष आपण बाटलों ह्या भावनेवर मुसलमानांच्या तंत्रानें वागूं लागण्यांत होऊं लागला. असल्या अनिष्ट धार्मिक निर्बंधांचा परिणाम निसर्गतःच स्त्रियांवर जास्त व्हावयाचा; त्यामुळें ज्या स्त्रिया हिंदु-समाजांत बहिष्कृत ठरत, त्यांना घरांत त्यांचा पति, पिता अथवा बंधु वागवून घेण्याला तयार नसे. अशांना आधार देण्याला मग मुसलमानांनीं पुढें यावें; कोणी त्यांच्या विधि-धर्म-विरहित सोबतिणी म्हणून नांदूं लागावें तर कोणीं त्यांच्याशीं लग्नें लावावींत ! असले प्रकार जोंवर इस्माईल तेथें आला नव्हता तोंवर बिनबोभाट चाललें होतें. पण इस्माईल आल्यावर त्याचे लोक 'आम्ही सरकारी शिपाई' ह्या ईश्वरदत्त अधिकाराच्या जोरावर सर्रास दंगल माजवूं लागल्यावर हिंदूंचे डोळे हळुहळू उघडूं लागले. जसा इस्माईल तसे त्याचे अनुयायी ! शिवाय मुसलमान तेवढे सारे भाई भाई ! धर्माच्या नांवावर अत्याचार करण्याची संधि मिळाली कीं, ते तरी कां वायां दवडतील! इस्माईल, खोजा हुसेन आणि शौकतखान हें त्रिकूट एकत्र जमतांच तेथला काजी महंमदखान त्यांना सामील झाला व ह्या चांडाळचौकडीच्या नेतृत्वाखालीं तेथें मुसलमानीकरणाच्या चळवळीला भयंकर ऊत आला. तेथल्या स्थायिक मुसलमानांना त्यांच्या मुसलमानी

धर्माचें ज्ञान बेताचेंच असल्यानें ते आजवर जे आपल्या रानटी अत्याचारी वृत्तीला अनुसरून काय अत्याचार करीत असत ते; पण आतां ही चांडाळ-चौकडी व इस्माईलच्या तालमेंत तयार झालेले त्याचे इतर सैनिक मुसलमान तेथल्या मुसलमानांना आपल्या धर्माची नवी शिकवण देऊं लागले, "मुसलमानानें मुसलमानाशीं भांडावयाचें नाहीं; कारण ते भाई भाई आहेत, जे कोणी मुसलमान नाहींत, ते काफीर. मूर्तिपूजा हें पाप आहे. मूर्तिपूजा करणारे हिंदुलोक हे काफीर होत. अशा काफिरांचा नाश करून त्यांना मुसलमान बनविण्यासाठीं काया-वाचा-मनेंकरून झटेल तोच खरा मुसलमान होय. धर्मासाठीं हत्या करणें हें अल्लाच्या दरबारीं पापसें गणलें जात नाहीं. जो मुसलमान अशा हरउपायांनीं मुसलमानी धर्माचा प्रसार करण्यासाठीं झटतो तो अल्लाला प्रिय असतो. एका तरी काफिराला किंवा काफिराच्या स्त्रीला जो मुसलमान बाटवितो त्याला मक्केची यात्रा केल्याचें पुण्य लागतें. तो मरणोत्तर थेट अल्लाच्या दरबारीं जातो. तेथें त्याला रुचकर शराब मनमुराद प्यावयाला मिळते व अस्मानच्या सुंदर परी उपभोगावयाला मिळतात."

एवढी शिकवण मिळाल्यावर काय, त्या अडाणी मुललमानांना अत्याचार असा जगांत दिसेनासाच झाला. कारण, अल्लाची आज्ञा त्यांना कळून चुकली कीं, जो मुसलमान नाहीं तो काफीर, आणि काफिरांना ठार करण्यांत किंवा बाटविण्यांत कोणताही अत्याचार करावा लागला तरी अल्लाच्या दरबारीं तें पुण्यच ठरतें; त्या अत्याचारांनीं अल्ला खूष होऊन आपणाला मरणोत्तर रुचकर शराब मनमुराद प्यावयाला व अस्मानच्या सुंदर सुंदर परी उपभोगावयाला देतो. अर्थात् आतां पाप असें जगांत उरलेंच नाहीं. हिंदूला धरून मारावें झोडावें, हिंदूंची मालमत्ता लुटावी, हिंदूंना बाटवावें, त्यांचीं घरेंदारें जाळावीं, हिंदूंच्या बायकांना पळवून भ्रष्ट करावें, हिंदूंच्या देव-देवालयांचा विध्वंस करावा; तात्पर्य, काफिराला मुसलमान करण्यासाठीं व मुसलमानी धर्माची वाढ करण्यासाठीं जें जें कांहीं करावें तें तें पुण्य ! एवढी धर्माची अनुज्ञा, व तिला इस्माईल मुल्ला, काजी महंमदखान, हकीम शौकतखान व फकीर खोजा हुसेन यांची जोड मिळाल्यावर धर्मनिष्ठ मुसलमानच पडले ते, ते थोडेच गप्प बसतात! ज्याला जें साधेल तें तो करून 'हाजी' होण्यासाठीं धडपडूं लागला. मुसलमान लोक दिवसाढवळ्या जागोजागचीं लहानमोठीं हिंदु देवालयें पाडूं फोडूं लागले,

हिंदूंचीं घरेंदारें जाळूं लागले व जी हिंदु स्त्री मनाला आवडेल तिला ओढून तिच्यावर बलत्कार करूं लागले. हिंदूंच्या गोठ्यांतील बकरीं-गाई, हिंदूंच्या कोठारांतील धान्य, हिंदूंच्या परसांतील भाजीपाला, घरांतील बायका, धन-दौलत, कपडालत्ता, जें जें कांहीं असेल ती सारी त्या अरेरावांच्या बापाची मत्ता! हिंदूंनीं मुसलमान तरी व्हावें, किंवा वित्त-कलत्र-सर्वस्वाला मुकून अखेर प्राणांनाही मुकावें! हे सर्व अत्याचार इस्माईलच्या कृपाछत्राखालीं सुरू झाले. इस्माईललाही बाजीराव व शतवीर यांच्या शोधाचें निमित्त सांपडलें असल्यानें व त्याला कोणी विचारता नसल्यानें त्याला आळा कोण घालणार! उलट ह्या स्वाहाकारांत आपला बळी पडूं नये म्हणून रंभाजी-संभाजी असले कमअस्सल हिंदु त्याला सामील झाले. आधींच हिंदु लोक भ्यालेले! त्यांतून गांवचे पाटील चोरांना सामील झाल्यावर मग कांहीं विचारावयालाच नको. मुसलमान गुंडांनीं दिवसाढवळ्या हिंदूंच्या घरां देवळांत शिरून मनसोक्त अत्याचार करावे!

अशा अमानुष अत्याचारांनीं त्राहि भगवान् होऊन गेलेल्या तेथल्या गांवढळ मराठ्यांतही सुभानजीनें चेतना उत्पन्न केली होती, व तेव्हां जर रंभाजी व संभाजी यांनीं दगा दिला नसता तर मराठा गड्यांना चेतवून त्यांच्या बाहुबलाच्या जोरावर सुभानजीनें इस्माईल व इतर मुसलमान यांची चांगलीच खोड मोडली असती. पण सुभानजीचा तो डाव फसला व त्याला त्याबद्दल आत्मबलि द्यावा लागला. तरी त्यानें जे मराठे गडी भेटले त्यांच्यांत स्वाभिमानाचें जें चैतन्य उत्पन्न केलें होतें, तें मात्र लोपलें नव्हतें. संभाजी व रंभाजी यांना म्हातारीनें कमळा व कमळजा यांचा खोटाच पत्ता सांगितला, तो त्या दोघींना खरा वाटून ते त्या दोघींच्या प्राप्तीच्या उद्योगाला लागले. जर सांपडल्याच तर त्या आपल्याच पचनीं पडाव्या म्हणून उजाडतांच मुसलमानांनीं त्यांचा शोध करण्याच्या अगोदर आपण त्यांचा शोध केला पाहिजे असें त्यांच्या मनानें घेतलें व इतक्या रात्रौ डोंगर चढून जावयाचा तो दोघांनाच जातां येणें शक्य नाहीं म्हणून इतर मनुष्यबळ मिळवावयाचें तें त्यांनीं सर्व मुसलमानांविरुद्ध चढाई करण्याचा आव आणून आपल्या त्रस्त गांवकऱ्यांचें मिळविलें. तेवढ्यासाठीं त्या दोघांना अंमळ लोकांच्या कलानें घ्यावें लागलें, लोकांचा उत्साह व मुसलमानांविषयींचा वाढता तिरस्कार पाहून

त्यांच्याबरोबरच मुसलमानांचा सूड घेण्याच्या शपथा घ्याव्या लागल्या, तेव्हां गांवकऱ्यांचा त्यांच्यावर कांहींसा विश्वास बसला. त्यांतले तेजस्वी तरुण मराठे जे होते, त्यांना आतां आशा वाटूं लागली कीं, आपल्या गाऱ्हाण्यांची दाद शाहूमहाराजांपर्यंत लावून घेण्यासाठीं आपणाला बाजीराव व त्याचे लोक जर भेटले तर त्यांचा फार उपयोग होईल. त्यांतही ज्यांच्या ज्यांच्या कपाळीं हे अत्याचार आले होते, ते त्या अत्याचारांबद्दल मुसलमानांवर सूड घेण्यासाठीं जास्त अधीर व जिवावर उदार झालेले असल्यानें त्यांचें साह्य रंभाजी आणि संभाजी यांना प्रथम मिळालें. ते सर्व मिळून कोणाला न कळत परस्पर बोलाईचा डोंगर चढूं लागले.

बराच डोंगर चढून गेल्यावर त्यांतल्या कांहीं लोकांचें लक्ष बोलाईच्या देवालयाकडे गेलें, तेव्हां समोर पहातां ते लोक रंभाजी-संभाजींना म्हणाले "पाटील ! तो पहा तिकडे उजेड दिसतो आहे."

## दर्शन पंचविसावें

# धर्मवीरांना आव्हान

संभाजी-रंभाजी वगैरे मंडळींना दिसलेला तो उजेड कमळा व कमळजा यांच्या हातांतील पेटत्या कांकड्यांचा होता.

"कमळजे! आतां ग कसें करायचें?" कमळा म्हणाली, "पुढें तर रस्ता बुजवलेला दिसतो."

"अग! तो रस्ता कांहीं कायमचा बुजवलेला नाहीं! तूं धाकटे धनी-साहेब स्वामींशीं बोलत होते तेव्हां ऐकलें नाहींस का? ते गुहेंत शिरले तेव्हां शत्रूला आपला तपास लागूं नये म्हणून त्यांनीं तो तात्पुरता बंद केलेला आहे. आपण एकेक दगड उचलून बाजूला सारून रस्ता मोकळा करायला हवा." कमळजा म्हणाली. लगेच कमळा आपल्या हातांतील कांकडा तेथेंच एका खोलगट दगडावर वाऱ्याच्या झुळकीनें विझणार नाहीं असा ठेवून एकेक दगड उचलूं लागली. कमळजाही आपल्या हातांतील तेलाचें गाडगें व कांकडा खालीं ठेवून तिला मदत करूं लागली.

स्वामी बाजीराव व कंठाजी यांना पोंचविण्यासाठीं गुहेबाहेर गेले, अशी संधि साधून कमळा व कमळजा एकदांचा 'मारूं किंवा मरूं' असा मनाचा निश्चय करून ज्या भुयारानें बाजीराव व कंठाजी आले होते त्या भुयारानें थेट निघाल्या. स्वामींच्या नकळत त्या दोघी निघाल्या याचें कारण, स्वामी आपणाला असें साहस करण्याला मोकळीक देतील अशी त्यांची खात्री नव्हती. वस्तुतः अशी संधि साधण्यासाठीं त्या आज कैक दिवस—किंबहुना त्यांनीं आपली मुसलमानांच्या जबड्यांतून एका वर्षापूर्वीं सुटका करून घेतली तेव्हांपासून—वाट पहात होत्या. त्या वास्तविक तेव्हांच मोकळ्या सुटावयाच्या नव्हेत. पण त्या तशाच चतुराईच्या मूर्तिमंत प्रतिमा होत्या, म्हणून ज्या दोघां मुसलमानांनीं त्यांना पकडून त्यांना आपलीं अंगवस्त्रें बनविण्याचें ठरविलें होतें, त्यांना मोठ्या युक्तीनें प्रथम आपसांत मसलत करून एके रात्रीं त्यांची इच्छा त्यांनीं पूर्ण करण्याचें ठरविलें व ते नरपशु जेव्हां हपापून अंधाऱ्या रात्रीं खोलींत आले, तेव्हां त्यांना विश्वासघातानें ठार मारून आपली तेथून सुटका

करून घेतली. योगायोग असा विचित्र होता कीं, ज्या मुससलमानांचा त्या दोघींच्या हातून असा अंत झाला ते दोघेही बोलाईच्या खेडयाजवळच्या खेडयांतीलच रहिवासी असून ज्या दिवशीं त्यांनीं त्यांना आपल्या गांवीं आणलें, त्याच दिवशीं त्यांचा असा काळ ओढवला. गांवच्या लोकांना पूर्व दिवशीं अमके-तमके मुसलमान गडी गांवांत आले एवढें कळलें व दुसऱ्या दिवशीं उजाडतांच त्यांच्या घरांत त्यांचे मुडदे पडलेले त्यांना आढळले. पण हे मुडदे कोणीं, कसे व कां पाडले याचा मात्र अखेरपावेतों कोणाला पत्ता लागला नाहीं. एवढी मर्दुमकी गाजवून त्या दोघींनीं आपली मोकळीक करून घेतली तरी त्यांना परत आपल्या घरीं जाण्याला तोंड नव्हतें. कारण, मुसलमानांच्या पाशवी मनोवासनांना बळी न पडतां आपण आपली अब्रू अशा अतुलनीय कौशल्यानें बचावली असें कोणाला सांगूं गेल्यास त्यांना पुराणांतरींच्या अघटित घटनांप्रमाणेंच तें असंभवनीय वाटेल व आपणांला पुन्हा आपला पति, आपलें घरदार, आपला समाज यांचा लाभ व्हावयाचा बाजूला राहून आपलें चोहोंकडून हंसें मात्र होईल, अशी त्यांची खात्री होती. म्हणूनच त्या दोघीही तो विचारदेखील करण्याचें सोडून तेथून रातोरात भिकारणींच्या वेषानें निघाल्या त्या बोलाई खेड्यांत आल्या. त्यांनीं भिकारणींचा वेष घेतला तरी त्यांच्या आंगचें नैसर्गिक सौंदर्य व तारुण्य हें वैभव त्यांना थोडेंच नष्ट करतां येतें ! शिवाय त्या बेवारशी मुली असल्यानें नानापरींच्या अनाचारांना सोकावलेल्या सुखवस्तु गुंडांचे डोळे त्यांना पाहून फुटावयाचेच ! व्रण दिसला कीं, तो बोंचून खावयाला कावळे टपलेले असावयाचेच ! त्यांच्या तडाक्यांतून आपला बचाव व्हावा म्हणून कमळा व कमळजा रस्त्यांत एक म्हातारी भीक मागतांना भेटली तिच्या ओळखीनें रंभाजीच्या घरीं जाऊन राहूं लागल्या. पण रंभाजी व त्याचा शेजारी संभाजी हे दोघेही पाटील म्हणजे गांवगुंडांचे राजे होते. त्यांनीं त्या दोघींशीं लघळपणा करावयाला सुरवात केली; ती त्यांना रुचली नाहीं ! तरी त्या कशाबशा अब्रू सांभाळून होत्या. रंभाजी व संभाजी यांना आपली कर्मकथा सांगून त्यांनीं त्यांच्या मनांत आपणांविषयीं अनुकंपा उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला पण त्याचा परिणाम उलटा झाला. रंभाजी व संभाजी त्यांना दहशत घालून भिववूं लागले कीं, तुम्ही जर बऱ्या बोलांनीं

आम्हांला वश झालां नाहीं तर आम्ही तुम्हांला मुसलमानांच्या स्वाधीन करूं; तेव्हां मात्र कमळा व कमळजा तेथूनही गुपचुप निसटल्या, त्या पायांखालीं वाट सांपडेल तिकडे चालूं लागल्या. त्या जेथें मराठ्यांच्या सैन्याचा तळ पडला होता त्या खेड्यांत आल्या, तेव्हां नाथाजी व पिलाजी वगैरे मंडळी त्या सैन्यांत आहेत अशी त्यांना खबर लागली. एकदां त्यांना वाटलें, आपण असेंच्या असें त्यांना जाऊन भेटावें. पण दुसऱ्याच क्षणाला त्यांना वाटलें, आतां आपले पुरुष आपणांला कसले परत घरांत घेतात ! बरें; तेथें बरेच लोक ओळखीचे असल्यानें गांवांत कोणी आपणांला ओळखील, वेळीं इस्माईलच्या लोकांनीं आपल्याला पाहिलें तर आपली अब्रू राखून राहणें आपणांला सर्वथैव अशक्य होऊन बसेल, अशा स्थितींत त्यांनीं जनसमर्दापासून दूर अशा भुलेश्वराचा पल्ला गांठला. पण पुढें काय करावयाचें, हा प्रश्न त्यांच्या समोर उभा होताच. वस्तुतः त्यांनीं अगदीं प्रथम एका वर्षापूर्वी मुसलमानांच्या तावडींतून आपली सुटका करून घेतली तेव्हांपासून त्यांच्या मनांत हा प्रश्न घोळत होता. पुन्हा संसारसुख लाभण्याची आशा नाहीं व अनीतीच्या आडवाटेनें जाण्याची मनाची तयारी नाहीं, अशा स्थितींत आपण जगावयाचें तरी कां व कोणासाठीं ? खरेंच, कमळा व कमळजा यांना आतां जगण्यांत कांहीं राम वाटत नव्हता. तरीही त्या जगल्या होत्या व जगत होत्या याचें कारण ज्यांनीं त्यांच्या जन्माची अशी माती माती केली, तो इस्माईल व त्याचे इतर साथीदार, तसेंच फकीर खोजाहुसेन यांना, आणि असल्या अनर्थांत त्यांना अप्रत्यक्षपणें प्रोत्साहन देणाऱ्या चंद्रसेन जाधवाला सप्तपाताळांतून हुडकून काढून ठार करावयाचें; त्यांनाच काय पण त्यांच्याशिवाय आणखी जे जे धर्मवैरी भल्याबुऱ्या मार्गांनीं मारावयाला सांपडतील त्यांना ठार मारावयाचें व भूभार तेवढाच हलका करावयाचा; आणि मरावयाचें झालें तर मग आपण मरावयाचें असा त्या दोघींचा निश्चय होता. मुसलमानांच्या अत्याचारांचे एकाहून एक भयाण देखावे पाहून त्या इतक्या चेतल्या होत्या कीं, काफिरांना ठार केल्यानें मरणोत्तर अल्लाच्या दरबारीं नानापरींचा सुखास्वाद घेतां येतो ही जशी मुसलमानांची धर्मकल्पना, तशीच अशा अधर्म्यांना ठार केल्यानें आपणांला मरणोत्तर स्वर्गाचा दरवाजा मोकळा होईल असा त्यांचा विश्वास बनून राहिला होता. 'दैत्य मातले

भूमंडळीं' असें दैत्यांचें वर्णन पुराणांतरीं असलेलें त्या दोघींना ऐकून माहीत होतें, तेच दैत्य मुसलमानांच्या स्वरूपानें कलियुगांत सांप्रतकाळीं भूमंडळीं पुन्हा मातले आहेत, इतका दोघींचाही मुसलमानांविषयीं प्रतिकूल ग्रह होऊन बसला होता. तेवढ्यांत त्या 'हिंदु आपले' म्हणून रंभाजी व संभाजी यांच्या आश्रयाला आल्या, व शत्रुसंहाराच्या कामीं त्यांचा उपयोग करून घ्यावयाचा त्या दोघींचा मानस होता. पण संभाजी व रंभाजी यांनींच जेव्हां त्यांच्यावर पापी दृष्टि ठेवली व स्वतःच्या पापी वासनांची पूर्तता करण्यासाठीं ते त्या दोघींनाही मुसलमानांच्या स्वाधीन करण्यालाही तयार झाले, तेव्हां त्या दोघींना असले पुरुष हिंदुजातीला लांछनें आहेत व मुसलमानांचा संहार करण्यापूर्वीं असल्या घरच्या चोरांना पकडून त्यांचा संहार केला पाहिजे असें त्यांच्या मनानें घेतलें. पण त्यांचा कोणताच बेत साधेना; अशा स्थितींत त्या भुलेश्वराजवळ जाऊन पोंचल्या व आतां एथून पुढें काय करावयाचें याचा विचार करूं लागल्या, तेव्हां त्यांच्या मनाची खिन्नता इतकी बेसुमार वाढली होती व निराशेनें त्यांचें मन इतकें होरपळून गेलें होतें कीं, आतां अशा लज्जास्पद स्थितींत जगावें कीं मरावें हें कोडें सोडविण्यांत त्या गढून गेल्या असतांना नारायणस्वामींनीं जर त्यांना पाहिलें नसतें, तर त्या दोघींनींही एकमेकींना ठार करून आपल्या अयशस्वी आयुष्याचा शेवट केला असता.

पण ईश्वरी संकेत तसा नव्हता; त्यामुळें स्वामी त्यांना भेटले, त्यांनीं त्यांचें गाऱ्हाणें ऐकून घेतलें, व जितक्या परींनीं त्यांचें शांतवन करणें शक्य होतें तितक्या परींनीं करून त्यांच्या प्रतिपालाची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली. स्वामींना त्या दोघींनीं आपली घोर प्रतिज्ञा कळविली व स्वामींनींही ह्या त्यांचा आततायीपणा आज ना उद्यां कमी होईल अशा भरंवशानें त्यांना प्रतिज्ञेपासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला नाहीं. स्वामी स्वतः अत्यंत शांत, अक्रोधानें क्रोध जिंकावा, शठाचें सत्यानें सात्त्विक परिवर्तन करावें व हिंसा करूं नये ह्या मताचे प्रथम होते. योग्य वेळीं त्या दोघींना असल्या घोर प्रतिज्ञेपासून परावृत्त करून सन्मार्गाला लावावयाचें अशा हेतूनें त्यांनीं त्यांना आपल्या शिष्या करून घेतलें व त्यांना गतायुष्याचा विसर पडावा ह्या हेतूनें त्यांचीं नांवेंही मुद्दाम नवीं ऋद्धि-सिद्धि अशीं ठेविलीं. पण दुसऱ्याच दिवशीं स्वामींना खंडोबाच्या देवालयांत मुसलमानांनीं केलेले अमानुष प्रकार

पहावयाला सांपडलें, तेव्हां त्या शांतमूर्तींची शांतता विलयाला गेली व ऋद्धि-सिद्धि मुसलमानांच्या नांवानें ज्या इतक्या जळतात त्या यथायोग्य जळतात अशी त्यांची खात्री झाली. हिंदु-मुसलमान हा भेदभाव ध्यानीं न घेतां जीव-मात्रानें सर्वांशीं समतान्यायानें वागावें व विश्वबंधुत्वाचें नातें पाळावें असे विचार, आचार व उच्चार हेंच ज्या सत्पुरुषाचें जीवितसाफल्य, त्याला त्या अत्याचारांनीं नवा धडा शिकविला तो हा कीं, "मुसलमानांच्या अंगीं माणुसकी नाहीं. ते देवदेवालयांचा विध्वंस करतात, स्त्रियांची अब्रू बेशरमपणें घेतात, पर-वित्तापहार करतात व प्रत्येक बाबतींत पशुतुल्य आचरण करतात. असें पशुतुल्य —किंबहुना पशूंहूनही हीन असे लोक हे माणूस कसले? व असे अत्याचार मोक्षदायी आहेत असें शिकविणारा हा यांचा धर्म तरी कसला? असले लोक व त्यांना असलें आचरण करावयाला प्रोत्साहन त्यांचा धर्म देत असले तर तो धर्म ही मानवी समाजाच्या अंगावर उमटलेली रक्तपिती आहे. हा रोग जगांतून जितका लौकर नाहींसा होईल तितका चांगला!"

त्याच दिवशीं स्वामींनीं श्रीगजाननाच्या चरणांना स्पर्श करून प्रतिज्ञा केली, "यापुढें आपलें सारें आयुष्य विश्वतारक अशा हिंदुधर्माचें रक्षण व प्रसार करण्यांत वेंचावयाचें. धर्मकार्य करतांना दुष्टांचें निर्दालन करण्यासाठीं जो सत्य उपाय आचरणांत आणावा लागेल तो आचरणांत आणावयाचा. ह्या पवित्रतम कार्याच्या सिद्धतेसाठीं दुष्ट जनांची हिंसा करावी लागली तरी ती हिंसा नव्हे; तो अधर्म नव्हे."

तात्पर्य, स्वामींना ऋद्धि-सिद्धींच्या प्रतिज्ञेंतील रहस्य खंडोबाच्या देवा-लयांतील 'चक्षुर्वैसत्यं' अनर्थ पाहून कळलें व गुरु शिष्यिणींची त्या बाबतींत एकवाक्यता झाली. ऋद्धि-सिद्धि ह्या सामान्य मराठा मुली खऱ्या; पण त्याच स्वामींच्या गुरुस्थानीं शोभूं लागल्या. त्यांनीं स्वतः निश्चय केला व ऋद्धि-सिद्धींनाही निश्चय करावयाला लावला, "आम्ही मारूं किंवा मरूं; पण आमचा धर्म तारूं."

अंधाराच्या पोटीं रम्य नक्षत्रांचा उगम व्हावा किंवा सुवासिक सुंदर फुलां-चा उगम मातीच्या उदरीं व्हावा, त्याप्रमाणेंच अनेकवार निराशेच्या पोटीं आशेचा उगम होत असतो. ऋद्धि-सिद्धि ऊर्फ कमळा व कमळजा यांच्या बाबतींतही असेंच झालें. पिलाजी व नाथाजी दैवदुर्विलासांच्या फेऱ्यांत

सांपडून त्या गुहेंत आले व त्या दोघींना पाहून त्या त्यांना हव्याहव्याशा वाटूं लागल्या, तेव्हां त्या दोघींच्याही निराश अंत:करणांत आशा उत्पन्न झाली कीं, आपली पुण्याई जबर आहे; आपण पुन्हा संसार हा इह-लोकींचा स्वर्ग गांठणार. स्वामींनीं त्यांना पहिल्याच दिवशीं 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' असा आशीर्वाद दिला होता, त्या आशीर्वादाची फल-श्रुति पदरीं पडण्याचा मंगल सुमुहूर्त हाच होय असें त्यांना वाटलें, व आपण तर आपल्या प्रतिज्ञा पुऱ्या करण्यासाठीं झटूंच झटूं; पण त्या प्रतिज्ञापूर्तीच्या कामीं आपणांला आपल्या पुरुषांचेंही साह्य मिळेल, अशीं भविष्यकाळीं आपल्या वांट्याला येणाऱ्या यशस्वितेचीं किती तरी रमणीय चित्रें दोघींनीं मिळून आपल्या आशात्मक कल्पनांच्या कुंचल्यांनीं रंगवून त्या आठ दिवसांत सतत आपल्या अंतश्चक्षूंसमोर टांगून ठेवावीं व त्या चित्रांत प्रत्यक्ष अनुभवाचें जीवन ओतलें जाऊन तीं कधीं एकदां बोलूंचालूं लागतील अशी चिंता वाहण्यांतच आनंद मानावा. .त्या पिलाजी व नाथाजी यांच्याशीं बोलल्या नाहींत किंवा त्यांनीं त्यांना आपली ओळख दिली नाहीं हें खरें; तरीहीं तेव्हांच काय काय मनोराज्यें त्यांच्या विचारसृष्टींत निर्माण होत होतीं तीं त्यांच्या त्या जाणोत ! पण स्वामींच्या देखत त्यांच्याविषयीं बोलतांना नाथाजी व पिलाजी यांनीं त्यांच्या पावित्र्याविषयीं नुसता संशय प्रगट केला, त्या संशयाच्या धक्क्यासरशीं त्या दोघींचींही मनोराज्यें कोसळून पार रसा-तळाला गेलीं. पिलाजी व नाथाजी यांनीं म्हणजे तेव्हांच त्यांना आपल्या संसारांत पूर्ववत् स्थान देण्याचा इन्कार केला होता अशांतली गोष्ट नाहीं. बरें; स्वामींनींही त्यांना आपल्या कन्या मानून यथाकालीं त्यांची त्यांच्या पतींशीं गांठ घालून देऊन त्यांच्या संसाराची घडी पुन्हा नीट जुळवून देण्याचें कबूल केलें होतें. पण स्त्रियाच पडल्या त्या, आधींच भावनाप्रधान व त्यांतच पोळलेल्या. त्यांना वाटलें कीं, आपल्या साऱ्या आशा जशा निराशे-च्या पोटीं उदयाला आल्या तशाच त्या पतन पावून निराशेंतच त्यांचा निरास व्हावयाचा. अंधाराच्या पोटीं जन्मलेल्या नक्षत्रांचें सूर्योदयाच्या वेळीं अंधाराबरोबरच शून्यस्वरूप व्हावयाचें; मातींतून उगवलेलें फूल कोमेजून मातींत पडून मातीमोलच व्हावयाचें. लगेच त्यांच्या साऱ्या आशा व इच्छा विलयाला गेल्या व पूर्वीची एक इच्छा–एक निश्चय–एक प्रतिज्ञा तेवढी कायम

टिकली. 'आपल्या प्रतिज्ञापूर्तीच्या जोरावर आपण आपल्या पतींना व साऱ्या जगाला, तेवढी प्रतिज्ञा पाळून जगलों वांचलों तर विचारूं शकूं कीं, बलाढ्य शत्रूंच्या हरतऱ्हांनीं माना मोडून त्यांना यमसदनाला पाठविणाऱ्या पराक्रमी पतिव्रता पापी लोकांच्या मगरमिठींतून अब्रूनिशीं मोकळ्या सुटणें शक्य नाहीं काय? तेवढें तरी आम्ही करूं व मग मरूं.' असें त्या स्वतःशीं म्हणाल्या.

असो; रात्रभर ऋद्धि-सिद्धींनीं विचार ह्याच भावी योजनेचा केला, व काय वाटेल तें करून इस्माईलच्या गोटांत शिरून त्याचा, रंभाजी व संभाजी याचा व त्याच्याबरोबरच आणखी असे कोणी पापकर्मे हातीं सांपडले तर त्यांचा-ही फडशा उडवावयाचा अशा निग्रहानें, पण स्वामी कदाचित् आपल्या संकल्पाला अडथळा करतील ह्या भयानें स्वामींना चुकवून रात्रीच निघाल्या. त्यांनीं गुहेचें वर्णन बाजिरावाच्या तोंडून ऐकलें होतें. गुहेंत एक मोठें भगदाड आहे व त्यांत दोघे शतवीर पडून मेले, तशीच आपलीही गत होऊं नये म्हणून त्या दोघींनीं तेथेंच पडलेल्या दहा हात लांबीच्या दोन वांसोळ्या बरोबर घेतल्या, व नीट सावधपणें उजेड घेऊन त्या चालूं लागल्या. भगदाड येतांच त्या वांसोळ्या त्यावर आडव्या घालून त्यांवरून त्या पुढें गेल्या. भुयार इतकें भयंकर, इतकी वाट अवघड; पण त्यांनीं ती आहारीं आणलीच! 'आपण शत्रूंचें निर्दालन करण्याच्या निश्चयानें निघालों खऱ्या; पण तें साधणार कसें?' हें कोडें सोडविण्यांत त्या दोघीही श्रमून गेलेल्या असल्यानें त्या तंद्रींत त्यांना वाटेचा अवघडपणा मुळींच जाणवला नाहीं. अखेर त्यांनीं बऱ्याच प्रयासांनीं गुहेच्या तोंडाशीं रचिलेली दगडांची रास हळुहळू मोकळी केली, व रस्ता एकदांचा मोकळा झाला, तेव्हां दोघींनाही अंमळ हायसें वाटलें. दगड उचलण्याच्या श्रमांनीं त्या इतक्या बेजार झाल्या होत्या कीं, आतां थोडा वेळ तेथेंच विश्रांति घेतल्याशिवाय पुढें पाऊल उचलण्याचें त्राणच त्यांच्या अंगीं उरलें नव्हतें. त्यामुळें त्या दोघीही थोडा वेळ तेथेंच दगडांच्या राशीवर बसल्या.

"कमळजे! एथवर तर मार्ग मोकळा झाला. आतां पुढें काय करायचें हाच प्रश्न आहे." कमळा म्हणाली.

"पुढचा मार्गही आपण ह्या मार्गासारखाच मोकळा करून घेऊं." कमळजेला तेवढ्यांत कांहीं निश्चित युक्ति आठवावयाला व कमळेनें पुढें कसें

करावयाचें अशी चिंता प्रदर्शित करावयाला एक गांठ पडली; जे विचार बोलून दाखविण्याचें कमळजेच्या अगदीं ओंठांवर आलें होतें, तेंच ती कमळेच्या प्रश्नाला उत्तरादाखल उद्गारली, "कमळे! माझ्या मनांत एक सुंदर कल्पना आली आहे. तुला ती पटेल का?"

"पण कोणती कल्पना ती अगोदर सांग तर खरी!" कमळा म्हणाली.

"एवींतेवीं आपण एवढें धाडस केलें खरें; आतां तें पुरें तरी होऊं दे. आपले मुख्य शत्रु इस्माईल, रंभाजी व संभाजी तर जवळच एकत्र आहेत. खरें ना?"

"होय."

इतक्यांत कमळजेच्या पायांना सरपटत एक जिवाणू दूर निघून गेलें, त्यामुळें कमळजेच्या तोंडचें वाक्य अर्धेंच राहिलें. त्या दोघीही भयभीत होऊन उठून उभ्या राहतात तोंच त्यांना दूरवरून प्रकाश आढळला. त्यावरून त्यांना वाटलें कीं शत्रु आले. आतां आपला बचाव करण्याला अन्य मार्गच नाहीं असें पाहून त्या दोघींनींही परमेश्वराचें नांव घेऊन हातांतील कांकडे विझविले व प्रथम गुहेच्या आंत प्रवेश करून लगेच निऱ्यांत खोंचून ठेवलेले खंजीर काढून हातीं घेऊन त्या उभ्या राहिल्या. हे लोक जर आपणांला पाहूं शकले व ते शत्रुपक्षाचे असले, तर त्यांच्या हातीं सांपडण्यापेक्षां प्रथम त्यांतले जितके ठार करतां येतील तितके ठार करावयाचे व अगदीं निरुपाय होईल तेव्हां एकमेकींनीं एकमेकींच्या छातींत खंजीर खुपसून अब्रू राखून मरावयाचें, असा त्या दोघींचा आपसांत संकेत झाला.

पण विधिसंकेत निराळा होता. ज्या लोकांना शत्रु समजून कमळा व कमळजा इतक्या जिवावर उदार झाल्या होत्या, त्यांनीं दुरून कमळेच्या हातांतील कांकड्याचा प्रकाश पाहिला होता, व तो प्रकाश मध्येंच एकाएकीं नाहींसा झाला त्याअर्थीं प्रकाशाच्या आधारानें चालणारीं माणसें तेथें जवळपास कोठें तरी लपून राहिलीं असलीं पाहिजेत अशी त्यांची अटकळ होती. ते गुहेच्या तोंडापाशीं आले तेव्हां त्यांनीं तर्क केला कीं, म्हातारीनें सांगितली ती हीच गुहा; पण आजूबाजूला कोणी माणसें दिसेनात व गुहेंत जाण्याची तर कोणाची छाती होईना. आतां कसें करावें याविषयीं गुहेच्या तोंडाशीं उभे राहून सर्वजण आपसांत खलबत करीत आहेत, तोंच त्यांचा आवाज

ओळखून कमळा व कमळजा यांनीं ओळखलें कीं, आपण ज्यांना भेटावयाचें व ज्यांच्या हस्तें आपल्या कारस्थानांची सांगता करण्याचें नियोजिलें होतें, ते रंभाजी-संभाजीच आले आहेत!

कमळजेनें कमळेला हळूच विचारलें, " कमळे आतां काय करायचें ? "

" काय करावयाचें तें ठरलेलेंच आहे." कमळा उत्तरली.

इतके त्या दोघींचें संभाषण चाललें आहे तोंच इकडे गुहेच्या तोंडाशीं उभ्या असलेल्या लोकांनीं अखेर गुहेंत शिरून म्हातारीनें पत्ता सांगितल्या-प्रमाणें कमळा व कमळजा यांचा तपास लावण्याचा बेत मुक्रर केला व 'हर हर महादेव'च्या जयघोषांत त्यांनीं पुढें पाऊल टाकलें. बरोबर त्याच वेळीं गुहेच्या आंतून कोणीतरी चालत येत असल्याची चाहूल लागली. 'ही चाहूल कोणाची असावी' असें हेरीत भयभीत चित्तानें कमळजा व कमळा मागें पळत सुटल्या. तों त्यांना प्रथम उजेड दिसला, नंतर पेटता कांकडा दिसला व लगेच तो कांकडा घेऊन येणारी व्यक्तिही दिसली. दोघींनींही ओळखलें कीं हे स्वामी येत आहेत.

स्वामींनीं त्या दोघींनाही ओळखलें. लगेच त्या स्वामींना भेटण्यासाठीं माघाऱ्या गेल्या. गुहेंतील तळ्याच्या पलीकडे दोन वळणें ओलांडून जाईतों त्या दोघींचें स्वामींशीं काय बोलणें झालें तें कळण्याला कांहीं मार्ग नव्हता. पण कांहीं वेळानें स्वामी गुहेच्या तोंडाशीं गर्जना करणाऱ्या माणसांना भेटण्यासाठीं पुढें चालूं लागले, तेव्हां त्या दोघी त्यांच्याबरोबर पुढें आल्या नाहींत एवढें खरें.

गुहेंत घुसणारे मराठे गुहेंत कोणी माणसें दडून राहिलीं असावीं अशा विचारानें संभाजी व रंभाजी यांच्याशीं वाटाघाट करीत गुहेच्या तोंडाशीं काय करावें व कसें करावें अशी चिंता करीत उभे आहेत तोंच स्वामी आपण होऊन निर्भयपणें पुढें होऊन त्यांच्यासमोर उभे राहिले व अधिकारवाणीनें उद्गारले, " उभे रहा ! तुमच्या देवाधर्मांवर, तुमच्या साधुसंतांवर, तुमच्या बायका-बहिणींची अब्रू बचावण्यासाठीं अहर्निश तळमळणाऱ्या ह्या संन्याशावर तुमचा विश्वास असेल, अस्सल हिंदु तुम्ही असाल, तर उभे रहा ! "

स्वामींच्या वाणींत असें काय अलौकिक दैवी सामर्थ्य होतें नकळे! ती वाणी ऐकून सर्व मराठे-संभाजी व रंभाजीदेखील-चित्रांसारखे तटस्थ उभे राहिले.

म्हातारीनें कमळा व कमळजा गुहेंत आहेत व बाजीराव वगैरे मंडळीही त्याच वाटेनें पळाली आहेत असें संभाजी व रंभाजी यांना आपल्या मतें जरी खोटेंच सांगितलें, तरी रंभाजी व संभाजी यांचा त्यावर विश्वास बसला; कमळा व कमळजा आपल्या हातीं लागाव्या, त्यांचा शोध लावण्यासाठीं मनुष्यबळ अनायासें मिळावें म्हणून त्या दोघांनीं आपल्या गांवकऱ्यांना कांहीं खऱ्या व कांहीं खोट्या गोष्टी सांगून त्यांना आपल्याबरोबर घेतलें, तरी गांवकऱ्यांना वाटलें कीं, रंभाजी व संभाजी खरेंच बोलतात; आणि स्वामी जेव्हां त्यांच्याशीं देवाधर्माविषयीं आणि स्त्रियांच्या अब्रूविषयीं इतक्या कळकळीनें प्रथमच बोलले, तेव्हां ज्याला त्याला खात्री वाटूं लागली कीं, आपलें हरपलेलें श्रेय इथेंच आहे आणि त्याचें रक्षण करणारी स्वामी ही परोपकारी विभूति आहे.

स्वामींनीं विचारलें, "तुम्ही कोठें चाललां ?"

रंभाजीनें पुढें होऊन कमळा व कमळजा कशा पळवल्या गेल्या वगैरे वृत्तांत स्वामींना निवेदन केला. बाकीच्या मराठ्यांनींही आपापल्या कर्मकहाण्यांचे पाढे वाचले. ते सर्व ऐकून घेऊन स्वामी संतप्त मुद्रा करून म्हणाले, "इतके अत्याचार मुसलमानांनीं तुमच्यावर केले व ते तुम्हीं निमूटपणें सहन केले ! मग तुम्ही कसले मराठे ! तुम्ही नांव मर्दाचें सांगावें व कृति बेहिमती षंढाची करावी, त्यापेक्षां सांगूनसवरून आराधे कां म्हणवीत नाहीं ?"

रंभाजी व संभाजी यांना स्वामींच्या शब्दावर बोलण्याचा धीरच होईना. कारण त्यांच्या पायाखालीं तेंच जळत होतें. पण बाकीच्या मराठ्यांपैकीं दोघे-चौघे जे खरेखुरे तेजस्वी होते, ज्यांचें अंतःकरण मुसलमानांनीं केलेल्या अत्याचारांमुळें एकसारखें पिचत होतें, त्यांना स्वामींचे शब्द फार झोंबले. ते म्हणाले, "स्वामी ! आपण म्हणतां तें खरें. पण मुसलमानांपुढें आमचा कांहीं इलाज चालेना. त्यांचा जमाव एकोप्याचा, त्यांना अत्याचारांची आवड—"

"म्हणूनच म्हणतों, बांगड्या भरून बायका तरी व्हा किंवा आराधे तरी बना !" स्वामी जास्त क्रोधाविष्ट होऊन म्हणाले, "आपणांवर अत्याचार झाले असें रडगाणें गात एथवर कशाला आलां ? पण जो तो मरणाला भितो. मुसलमान मारील, हालहाल करील ह्या भयानें भागूबाई बनलेल्या तुम्हां रडतोंड्या हिंदूंच्या हातून आपला कांहींदेखील प्रतिकार होणार नाहीं हें पक्कें ओळखूनच मुसलमान हिंदूंवर बेगुमानपणें अत्याचार करतात. अशा

अत्याचारांना थोपवून आपल्या देवाधर्माची व बायकापोरांची अब्रू तुम्हांला राखावयाची असेल, आपलें वित्तसंरक्षण करावयाचें असेल, तर मरणालाही न भितां तुम्हीं धर्मवीर म्हणून मरायला पुढें आलें पाहिजे. सांगा! तुमच्या-पैकीं कितीजणांची आपल्या देशासाठीं–आपल्या धर्मासाठीं–आपल्या देवा-साठीं मरण्याची तयारी आहे ?"

स्वामींच्या प्रश्नावर कोणीही कांहीं उत्तर देईना. थोडा वेळ कोणी कांहीं बोलतोसें पाहून स्वामी म्हणाले, "काय ? अरे! तुम्ही हिंदु अस्सल मराठे तुम्ही; तुमच्यांतूनच तानाजी मालुसरे, येसाजी कंक, बाजी पासलकर असले कर्णार्जुन निर्माण करून शिवाजीमहाराजांनीं मराठी स्वराज्याची स्थापना केली, 'मुसंड्यांकडून त्रस्त झालेल्या ह्या महाराष्ट्र-मायदेशाला तारण्यासाठीं मारूं किंवा मरूं अशा निश्चयानें पुढें या' असें शिवाजीमहाराजांचें आव्हान ऐकून तेव्हांचे तुमचे पूर्वज मराठे 'मारूं किंवा मरूं' अशा निश्चयानें पुढें आले, म्हणून आज महाराष्ट्रांत ही हिंदूंची अवलाद दिसते तरी आहे. आणि तुम्ही त्याच मराठ्यांचे वंशज देशासाठीं– देवासाठीं– धर्मासाठीं मरावयाला भितां ? शिव! शिव! असली नामर्दांची जात हिंदु म्हणून जगण्याला लायकच नाहीं. इतकेंच काय; पण माणुसकीच्या जगांत तुम्हां असल्या शेळपट हिंदूंना माणसें म्हणून मिरविण्याचाही अधिकार नाहीं. बोला! तुम्ही हिंदु आहां ? तुम्ही माणसें आहां? बोला! आतां बोलत कां नाहीं ? मी तर म्हणतों कीं, तुम्ही माणसेंही नाहीं व हिंदुही नाहीं. खरा माणूस, मग तो हिंदु असो कीं मुसलमान असो कीं दुसरा कोणी असो, विश्वधर्माचा चेला असतो. खरा माणूस कधीं देवाचा उपमर्द करीत नाहीं किंवा कोणीं उपमर्द केलेला सहन करीत नाहीं. खरा माणूस ज्या स्त्री-जातीच्या पोटीं जन्म घेतो, त्या स्त्रीजातीच्या अब्रूवर कधीं घाला घालीत नाहीं व कोणीं घाला घालण्याचा प्रयत्न केला तर तें सहन करीत नाहीं. खरा माणूस कधीं परवित्तापहार करीत नाहीं व कोणीं केलेला सहन करीत नाहीं. विश्वधर्म ज्याच्या हातून पाळला जातो, ह्या विश्वधर्माला विघ्न आणणाऱ्या सतानांचा नाश करण्यांत विश्वधर्माचें पालन व माणुसकीची सार्थकता सांठविलेली आहे हें ज्याला कळतें, तोच खरा माणूस. अधर्मी सैतानांच्या अत्याचारांची ज्याला चीड आहे व अशा सैतानांना जगांतून

नाहींसे करून जो धर्मरक्षणासाठींच जगतो आणि धर्मरक्षणासाठींच मरतो, तो खरा माणूस ! बाकीचे सारे जंतु ! बोला, तुम्ही हिंदु आहां कीं नाहीं ? तुम्ही माणूस आहां कीं नाहीं ? कोणत्याही देवस्वरूपाची अवहेलना करणें, स्त्रियांची अब्रू घेणें व परवित्तापहार करणें ह्या तिन्ही गोष्टी करणारा अधर्मी जगांत जगण्याला लायक नाहीं, एवढें देखील तुम्हांला कळत नाहीं, म्हणून विचारणें प्राप्त झालें, तुम्ही माणूस आहां किंवा नाहीं ? ''

स्वामींच्या बोलांनीं इतर सर्व मराठ्यांचें रक्त सळसळूं लागलें. ते सर्व एकदम उत्तरले, '' स्वामी ! आम्ही माणसें आहों; आम्ही आपण सांगाल त्याप्रमाणें धर्मासाठीं मरावयाला किंवा मारावयाला तयार आहों.''

रंभाजी व संभाजी मात्र कांहींच बोलेनात. स्वामींना त्यांच्याविषयीं प्रथमपासून संशय होताच. त्यांना इतर कशाशीं कांहींच करावयाचें नव्हतं. फक्त कमळा व कमळजा हातीं लागतातसें पहावयाचें होतें. म्हातारीनें सांगितल्यावरून त्या गुहेंत आहेत अशी त्यांची ठाम कल्पना झाली होती. पण हा स्वामी आतां आपल्या आड येऊं पहात आहे असें पहातांच त्याला प्रथम नाहींसा केला पाहिजे ह्या दुष्ट अंतिम हेतूनें दोघेही बरोबरच्या लोकांपाशीं संशय प्रगट करूं लागले, 'हा साधू मुसलमानांचा एखादा हेर नसेल कशावरून ? गुहेंत लपलेल्या आमच्या स्त्रिया आमच्या हातीं लागूं नयेत म्हणून तो असें मानभावीपणें बोलतो'. पण इतर गांवकऱ्यांना त्या दोघांचा चांगलाच परिचय असल्यानें ते त्यांच्या नादानें स्वामींवर हात टाकण्याला तयार होईनात.

'' मी तुम्हां दोघांनाही ओळखतों. तुम्ही इथें आपल्या बायकांची अब्रू राखण्यासाठीं आलां नाहीं; आपल्या बायकांना पकडून मुसलमानांच्या स्वाधीन करण्यासाठीं आलां आहां.'' स्वामी रंभाजी व संभाजी यांच्या मनांतील पाप ओळखून तिरस्कारानें त्यांना त्यांच्या खऱ्या स्वरूपाची चुणूक दाखवून बाकीच्या मंडळींला म्हणाले, '' तुम्ही ह्या दोघांना ओळखतां ? ''

लोक कांहीं बोलेनात. ते स्वामी व रंभाजी-संभाजी यांच्या तोंडांकडे टकमक पहात उभे राहिले.

'' आपल्या धर्माची, आपल्या स्त्रीजातीची विटंबना करण्यासाठीं तयार झालेल्या नराधमांना ठार करण्याची तुम्हां सर्वांची प्रतिज्ञा आहेना ? '' स्वामींनीं पुन्हा त्या लोकांना विचारलें.

" होय स्वामीजी ! " सर्व लोक उत्तरले.

" तर मग असे दोन नराधम तुमच्यासमोर उभे आहेत." रंभाजी व संभाजी स्वामींकडे त्यांना खाऊं कीं गिळूं अशा दृष्टीनें पाहूं लागले, तरी न डरतां स्वामी म्हणाले, " तुमच्या गांवांत भिक्षा मागून खाणाऱ्या दोघी तरुण व सुंदर मराठा मुली होत्या त्या आतां कुठें आहेत ? "

" त्यांचेंच रक्षण करण्यासाठीं तर मुख्यत: आम्ही एथवर आलों आहों." संभाजी म्हणाला.

" अस्सें ! " स्वामी लोकांकडे वळून म्हणाले, " मग त्यांचें अपहरण करूं पहाणाऱ्या नराधमांना शोधून प्रथम यमसदनाला पाठविलें पाहिजे. होय ना ? "

" होय," रंभाजी भीत भीत उत्तरला.

" त्यांचें हरण करणारे कोणी तरी मुसलमान होते. त्यांनीं त्या म्हाताऱ्या भिकारणीला सामील करून घेऊन डाव साधला." संभाजी सर्वांची दिशाभूल करण्याच्या कावेबाजपणानें म्हणाला.

" नाहीं. ते हिंदु होते." स्वामी म्हणाले.

" तर मग त्यांना प्रथम ठार केलें पाहिजे." इतर मराठ्यांतील दोन तेजस्वी तरुण पुढें होऊन म्हणाले, " असले 'कुऱ्हाडीचे दांडे गोतास काळ' असणारे कुलांगार प्रथम कापून काढले पाहिजेत."

" पण त्यांना कोण कापील ? " स्वामींनीं विचारलें.

" आम्ही कापूं. " ते दोघे तरुण उत्तरले.

" आम्ही कापूं." बाकीच्या मराठ्यांनीं उत्तर दिलें.

" आम्ही कापूं. " सर्वांच्या गंभीर शब्दाचा प्रतिध्वनि गुहेंत दुमदुमला. त्या प्रतिध्वनीचीं कंपनें वातावरणांत विरल विरल होतात न होतात तोंच गुहेंतून तोच ध्वनि निघाला, " त्यांना आम्ही कापूं."

संभाजी व रंभाजी यांना तेथल्या मंडळींत एकाएकीं इतकी क्षुब्धता उसळलेली पाहून कांपरें भरलें. स्वामींशिवाय इतर सर्व लोक गुहेंतून ध्वनि कोणाचा आला म्हणून तिकडे टकमक पाहूं लागले. तोंच कमळा व कमळजा चवताळून वाघिणी सावजाच्या वासानें गुहेंतून बाहेर पडाव्या त्याप्रमाणें धावत धावत पुढें आल्या. कमळा रंभाजीवर व कमळजा संभाजीवर अशा त्या दोघीजणी एकदम तुटून पडल्या व डोळ्याचें पातें लवतें न लवतें इतक्यांत

त्यांच्या हातांतील तीक्ष्ण जंबिये त्या दोघां नराधमांच्या छातींत घुसले; त्या सरसे ते किंचाळत खालीं पडले.

"हेच ते दोघे नराधम!" स्वामी सर्व मराठ्यांना उद्देशून म्हणाले, "आणि ह्याच त्या कमळा व कमळजा!"

"हे लोक आम्हांला ओळखतात." कमळा व कमळजा अनुक्रमें रंभाजी व संभाजी यांच्या नरड्यांवर जंबियाचा दुसरा वार करून त्यांना पुरे ठार करून मग उठून उभ्या राहून क्रोधाविष्ट स्वरांत सर्व मराठ्यांना हात जोडून उद्गारल्या, "तुम्ही आमचे पाठीराखे भाऊ; आम्ही तुमच्या बहिणी. ह्या नराधमांनीं आमच्यावर–ह्या आपल्या बहिणींवर–ह्या तुमच्या बहिणींवर पापी नजर ठेवली म्हणून आम्हांला परागंदा व्हावें लागलें. कुलस्त्रियांच्या अब्रूवर घाला घालण्यासाठीं टपून बसलेल्या–ह्या तुमच्या बहिणींना मुसलमानांच्या स्वाधीन करण्याला निर्लज्जपणें तयार झालेल्या चांडाळांना आम्हीं ठार केलें, हा अन्याय केला काय?"

"तुम्हीं केलें तें यथायोग्य केलें. शाबास तुमची!" त्या दोघां तेजस्वी तरुणांपैकीं एकजण म्हणाला.

"शाबास तुमची!" स्वामी सर्वांना उद्देशून म्हणाले, "मर्द मराठ्यांनो! सच्च्या हिंदूंनो! अधर्म्यांच्या नाशाला सुरुवात सुवासिनींच्या हातून झाली, हा आमच्या भावी धर्मयुद्धाला शुभशकून झाला." स्वामींनीं कमळा व कमळजा यांचा व आपला संबंध कसा आला, इस्माईल व इतर मुसलमान यांनीं खंडोबाच्या देवालयांत अत्याचार कसा केला, वगैरे सर्व खऱ्याखुऱ्या गोष्टी त्या लोकांना सांगून त्यांचा पूर्ण विश्वास संपादन केला, व आतां सर्व लोक पूर्णपणें आपल्या कह्यांत आले असें पाहून त्यांना सांगितलें, "एवढ्यासाठीं मी म्हणतों कीं 'मारूं किंवा मरूं' अशा निश्चयानें तुम्ही धर्मवीरांनीं मरणाचें मैदान तुडवीत अधर्म्यांचा नायनाट करण्यासाठीं पुढें सरलें पाहिजे."

"पण आमची प्रतिज्ञा अजून पूर्ण झाली नाहीं." कमळा व कमळजा म्हणाल्या.

सर्वांना स्वामींनीं आतांच वृत्तांत सांगितल्यामुळें त्यांना कमळा व कमळजा यांची प्रतिज्ञा कळून चुकली होती. त्यांच्याकडे पाहून स्वामी म्हणाले,

"तुमच्या प्रतिज्ञा हे तुमचे बंधु पूर्ण करतील. तुम्ही आतां अगोदर जशा आलां तशा माघाऱ्या जा व व्यासरावाची नीट काळजी घ्या."

स्वामींचा शब्द कमळा व कमळजा यांना मोडतां येईना व मागेंही जाववेना. त्यांनीं निमूटपणें माघारें गेल्यासारखें केलें व जातां जातां कमळजा व कमळा यांनीं आपसांत बेत करून स्वामींना हळूच सांगितलें, "स्वामी! हा रस्ता आतां निकामी आहे हें ध्यानांत धरून मात्र वागावयाचें."

"होय." असें म्हणून स्वामी त्या दोघींना परत पाठवून धर्मवीरांच्या छोट्या पथकासह बोलाई खेड्याचा रस्ता चालूं लागले. म्हातारी वगैरे सर्वांना स्वामींनीं आतांच सर्व कहाणी निवेदन केल्यामुळें कमळा व कमळजा यांची प्रतिज्ञा त्यांना कळून चुकली होती. त्यांनीं आपण होऊन त्यांच्या प्रतिज्ञेप्रमाणें वागण्याचें कबूल केलें.

"बरें; पिराजी व यशोदा?" कमळजेनें विचारलें.

"त्यांचीही मुक्तता आम्ही करतों." सर्व म्हणाले.

"पहा बरें! शत्रूंना मारूं किंवा मरूं अशी तुमची प्रतिज्ञा आहे. आमच्या पतिव्रतांचा तुम्हां सर्वांना असा आशीर्वाद आहे कीं, तुम्ही शत्रूंना मारून विजयी व्हा." कमळा व कमळजा एकदम उद्गारल्या.

"किंवा शत्रूंना मारतां मारतां मरून अमर तरी व्हा." स्वामी म्हणाले.

"हो!" कमळा व कमळजा उद्गारल्या.

"आतां तुम्ही दोघी मीं सांगितल्याप्रमाणें माघाऱ्या जा. व्यासराव तिकडे आहे." स्वामी कमळा व कमळजा यांना म्हणाले.

"पण स्वामी! मुसलमानांना गुहेची खबर मिळाली आहे. ते यांचा तपास काढीत आले तर?" एका तरुण मराठ्यानें मध्येंच विचारलें.

"त्याची तुम्ही मुळींच काळजी करूं नका. आमचें रक्षण करण्याला आम्ही समर्थ आहों. हा रस्ता तुम्हांला वाटतो तितका सोपा नाहीं. माहीतगारांना तो उपयोगी, इतरांना तो मृत्यूच्या दरबारीं पोंचविणारा रस्ता आहे." कमळा म्हणाली, "स्वामी! यापुढें आपल्या मंडळीला हा रस्ता मोकळा रहायचा नाहीं."

"म्हणजे?" एका मराठ्यानें विचारलें.

"तें मी तुम्हांला सांगतों." पण अगोदर आपण आपल्या कामगिरीवर

जाऊं. जातां जातां मी सर्व कांहीं तुम्हांला सांगतों.” असें म्हणून स्वामी पुढें चालूं लागले. त्यांच्या मागोमाग त्यांचे इतर धर्मवीर चालूं लागले. कमळा व कमळजा लगेच आपसांत खलबत करून ‘हो असेंच करायचें’ असें म्हणत माघाऱ्या गेल्या.

* * *

इस्माईलला जेव्हां आपल्यावर अरिष्ट कोसळल्याची बातमी कळली, तेव्हां त्या अरिष्टाचा उगम ह्याच धर्मवीरांच्या अंतःकरणांत झाला असेल याची त्याला कल्पना देखील नव्हती !

## दर्शन सव्विसावें

# पांडवगडावरील कारस्थान

बाळाजीपंतांना पांडवगडावर आल्याला आज दहावा दिवस. पण हे दहा दिवस त्यांना दहा युगांप्रमाणें कंटाळवाणे वाटले. जो दिवस उजाडावा तो नव्या नव्या आपत्तींचा परिवार बरोबर घेऊन उजाडावा. 'अंबाजीपंत पुरंदऱ्यांना साताऱ्याला शाहूमहाराजांकडे पाठवून आज चार दिवस झाले तरी त्यांचा पत्ता नाहीं. सुभानजी बाजिरावाचा शोध करण्यासाठीं गेला त्याचाही पत्ता नाहीं. यादवजी शाहूमहाराजांकडून चंद्रसेनाला आज्ञापत्र घेऊन आला त्याला चंद्रसेनानें जागच्या जागीं कापून काढलें, तशीच पुरंदरे व सुभानजी यांचीही गत झाली नसेलना? आतां कसें करावयाचें?' असा विचार करीत बाळाजीपंत सचिंत बसले होते. पण त्यांना कांहीं उपाय सुचेचना! चंद्रसेन तर त्यांचा पाडाव करण्यासाठीं अगदीं टपून बसला होता. त्याची कोण येईल त्याच्याशीं सामना देण्याची तयारी जारीनें सुरू होती. पण केव्हांही गडाच्या पायथ्याशीं मैदानी लढाई होणें इष्ट नसल्यानें त्यानें गडासभोंवार नाकेबंदी करून एक तुकडी बसविली होती, व इतर तुकड्या निरनिराळ्या वाटा रोंखून बसविल्या होत्या. शक्य तों त्याला गड जिंकावयाचा नव्हताच; त्याला बाळाजीपंतांचा कोंडमारा करून त्यांना शरण आणावयाचें होतें. पण शाहूमहाराजांकडून बाळाजीपंतांच्या मदतीला फौज आली तर गडकऱ्याच्या फौजेचा व त्या फौजेचा मिलाफ होऊन मग त्यांच्यावर विजय मिळविणें आपल्याला जड जाईल अशी त्याची खात्री होती. शिवाय बाळाजीपंतांचीं जीं पथकें त्यानें बळजबरीनें आपल्या हुकमतींत आणलीं होतीं तींही आपणाला पूर्ण राजी आहेत याविषयीं त्याला खात्री नव्हती. म्हणून त्यांना गडाच्या आसपास ठेवून सभोंवार आपल्या खास विश्वासांतील पथकांची योजना त्यानें केली होती. अशी योजना करण्याचें दुसरें कारण असें कीं, गडावरील कोणा माणसाला बाहेर जातां येऊं नये व बाहेरील कोणा माणसाला गडावर येतां येऊं नये. असा गडकऱ्याचा कोंडमारा केल्यावर तो किती दिवस टिकाव धरील! पण तेवढ्यांत त्याच्या बातमीदारांनीं जेव्हां हैबतराव

निंबाळकर सरलष्कर व अंबाजीपंत पुरंदरे आपणावर चालून येत असल्याची खबर आणली, तेव्हां त्यानें ताबडतोब कृष्णराव प्रतिनिधीला मागें बोलावून त्याला गडाजवळील सैन्याचा बंदोबस्त सांगितला व आपण स्वतः सरलष्करांशीं सामना देण्याला सोईस्कर पडावें म्हणून फलटण संस्थानांतील अंदरकीच्या घाटांत गेला. त्या सुरक्षित ठिकाणीं आपण सरलष्कराचा मोड करावयाचा व दरम्यान इकडे कृष्णरावानें गडावर चढ करावयाची; एवढ्या लढाईत विजय संपादन झाला तर शाहूमहाराजांना शह देण्याला सोपें जाईल; जय नच झाला तर तिकडे मोगलाईतील राजकारण रंगाला येतेंच आहे, असा त्याचा कयास होता.

पण माणसाच्या मनांतल्या साऱ्याच गोष्टी साधतील तेव्हां ! चंद्रसेन इतका सारा बंदोबस्त करूं शकला; पण बाळाजीपंतांचे तुरळक शतवीर जे दहा दिशांना पांगले होते; त्यांना पकडून त्यांचें पारिपत्य करण्याचें कांहीं त्याला साधलें नाहीं. किंबहुना त्यानें स्वतःच तिकडे दुर्लक्ष केलें होतें. कारण शतवीर कोठें शिल्लक असले तर पांच पंचवीस असणार, व तेही कोठें तरी दिवाभीतांसारखे लपून बसलेले असावयाचे. त्यांची एवढी भीति ती काय बाळगावयाची ह्या घमेंडींत तो होता. पण तो मदांधतेच्या भरांत हें विसरला होता कीं, ते शतवीर एकाहून एक बलाढ्य व हिकमती असे सिंहाचे छावे होते. बाळाजीपंतांची कल्पना कीं शतवीर सारे आटोपले; कांहीं उरले असले तर ते आपला पडता काळ पाहून शत्रूला सामील झाले असतील. पण ते आटोपलेही नव्हते व शत्रूला सामीलही झाले नव्हते. शंभरांच्या पथका-पैकीं एथवर बहुतेक कामाला आले होते हें खरें; व जे काय पांचपंचवीस शिल्लक होते, त्यांना उघड उघड कांहीं करतां येण्याजोगें नव्हतें. तरीही ते जिवंत होते, व आपण जरी संख्येनें अगदीं थोडे असलों तरी मरेतों आपल्या धन्याच्या सुटकेसाठीं धडपड करावयाची, ह्या अंतस्थ हेतूनें त्यांनीं आपसांत निश्चित विचार करून आपलीं कारस्थानें सुरू ठेविलीं होतीं. त्यांतल्या कांहींनीं आजूबाजूच्या प्रदेशांत हिंडून निरीक्षण चालविलें होतें. त्यांनीं कोणीही बातमीदार जातां येतां आढळला, कीं त्याला एकटादुकटा गांठून बेलाशक ठार करावें व अशाच आणखी दुसऱ्या गोष्टी करून जितका म्हणून सेनापतीच्या फौजेला त्रास देतां येईल तितका द्यावा. कांहीं याहीपुढचें धाडस करून सेनापतीला उघड उघड शरण गेले व त्याची करुणा भाकून त्याच्या सैन्यांत शिपाईगिरी पत्करली.

सेनापतीला त्यांनीं अशी बेमालूम भुरळ पाडली, कीं पोटांत एक व बाहेर एक अशी त्यांची वर्तणूक असेल अशी सेनापतीला शंकादेखील आली नाहीं; उलट एवढे बलिष्ठ वीर आपल्या बाजूला मिळाले हें फार बरें झालें असेंच त्याला वाटलें. पण ते शतवीर जे एवढे दांतीं तृण धरून सेनापतीला शरण गेले होते, ते स्वतःचा जीव बचावण्यासाठींही नाहीं किंवा सेनापतीची एकनिष्ठपणें सेवा करण्यासाठींही नाहीं. त्यांना त्यांतूनही स्वामिसेवा साधावयाची होती; त्यांना शत्रुसैन्याचें शरीर आंतून पोखरून जर्जर करावयाचें होतें आणि त्यांच्या कारस्थानांना परमेश्वर यशही देत होता. एकदां सैन्यांत प्रवेश मिळाल्यावर त्या शतवीरांनीं हळुहळू बाळाजीपंतांचीं जीं पथकें सेनापतीनें आपल्या अधिकाराखालीं आणलीं होतीं त्यांत शिरकाव करून तेथले बरेच शिलेदार–सुभेदार गांठून त्यांच्याशीं संगतमत करून ऐन वेळीं लढाईचा प्रसंग येईल तेव्हां त्या वेळच्या परिस्थित्यनुसार आपल्या धन्याला हितकर अशी बाजू धरावयाची, लढावयाचें तर सेनापतीच्या विरुद्ध लढून धन्याच्या बाजूला विजय मिळवून द्यावयाचा, किंवा तें साधलेंच नाहीं तर लढण्याच्या कामीं आंगचोरी करून सेनापतीच्या पदरीं अपयश तरी येईल अशाविषयीं झटावयाचें, अशी जय्यत तयारी ठेविली होती. ह्या सर्व गोष्टी आतां आजच निकराला यावयाच्या होत्या. कारण सेनापति आदल्या दिवशींच सर्जेराव घाडग्याला भावी कारस्थानांची सिद्धता करण्यासाठीं रवाना करून व सरलष्करांचें सैन्य जर आलें तर त्याच्याशीं सरळ सामना देतां यावा अशी तयारी करण्यासाठीं अंदरकीच्या घाटाकडे निघून गेला, तेव्हां जातांना त्यानें जरूर तर गडावर चढ करून बाळाजीपंतांना हस्तगत करण्याचें काम कृष्णराव प्रतिनिधीला सांगितलें होतें. शतवीरांच्या सुदैवानें त्यांना गडासभोंवार ठेवण्यांत आलेल्या सैन्यांत ठाणें देतां आल्यानें त्यांनींही कृष्णरावाला चढाई करण्याला भर देण्याला सुरवात केली; ही आपल्या सैन्याची उत्सुकता पाहून कृष्णरावही बाळाजीपंतांचें पारिपत्य करण्याला अधीर झाला. त्याच्या मनांतून स्वतः बाळाजीपंतांचा पाडाव करून त्यांच्या हातापायांत बेड्या ठोकून त्यांना ताराबाईसमोर न्यावयाचें, व ताराबाईला खूष करून तिचें प्रतिनिधिपद आपण मिळवावयाचें; ह्या अंतिम इच्छेला सैन्याचें पाठबळ मिळतांच माकडाच्या हातांत कोलीत मिळावें तशी

कृष्णरावाची अवस्था झाली. त्यानें ताबडतोब गडकऱ्याला निर्वाणीचा निरोप पाठविला, " उदईक सूर्योदयापूर्वी जर तुम्हीं बाळाजीपंतांना आमच्या स्वाधीन केलें नाहीं तर आम्हांला सेनापतींच्या हुकुमाप्रमाणें तुमच्याशीं लढाई करावी लागेल. मग आम्ही तुमची गय करणार नाहीं."

कृष्णरावानें हा निरोप ज्या माणसाच्या हातीं गडावर पाठविला तो त्याच्या मतें त्याच्या अगदीं विश्वासांतील होता. पण—!

* * *

वस्तुतः चंद्रसेनाचा दूत गडकऱ्यापाशीं आला त्यानें कृष्णरावाचा निरोप गडकऱ्याला सादर करावयाचा; पण गडकऱ्याची भेट झाली तेव्हां त्या निरोपा-विषयीं एक अक्षरदेखील न बोलतां त्यानें निराळ्याच भाषेंत बोलण्याला सुरुवात केली, " गडकरीसाहेब! आपण आपल्या गुरूंना ओळखतां?"

" होय. पण कोण ते? नारायणस्वामी?"

" होय."

" मग त्यांचें काय?"

" त्यांचें आपणाला हें पत्र आहे." असें म्हणून त्या दूतानें एक पत्र कडोसरीचें काढून गडकऱ्याच्या पुढें ठेवलें व सांगितलें, " ह्या पत्राप्रमाणें आपण काय करणार याचा उलट जबाब स्वामींना पाहिजे आहे."

दूत गडावर चढून आला तेव्हां बाळाजीपंतांनीं त्याला दुरून पाहिलें व ओळखलें कीं, आपल्या शतवीरांपैकीं शतवीर हा; असें असतां हा गडकऱ्या-पाशीं कशाला आला? काय, आपलेच लोक आपल्यावर उलटून आपल्या विरुद्ध कांहीं कारस्थानें तर रचीत नाहींतना?

पण बाळाजीपंतांचा हा संशय फार वेळ टिकला नाहीं. गडकऱ्यानें पत्र वाचून लगेच बाळाजीपंतांना हांक मारून तें पत्र जसेंच्या तसें त्यांच्या स्वाधीन केलें. बाळाजीपंतांनीं तें वाचलें. त्या पत्रांत स्वामींनीं गडकऱ्याला व त्याच्या मार्फत बाळाजीपंतांना कळण्यासाठीं म्हणून पत्र लिहिण्याच्या घटकेपर्यंत घडलेला सर्व वृत्तान्त निवेदन केला होता व अखेर बाळाजीपंतांचा काय वाटेल त्या उपायांनीं बचाव करून त्यांना गडापार करून देण्याला लिहिलें होतें. गडापार झाल्यावर बाळाजीपंतांनीं पुरंदरकडे जावें, तेथें सचिव त्यांना आधार देतील; त्यांच्या मदतीनें त्यांनीं पुढें साताऱ्याची वाट धरावी.

असेंही लिहिलें होतें. बाजीराव सुखरूपपणें सातार्‍याला गेला असून इतक्यांतच महाराजांच्या आज्ञेवरून चंद्रसेनाची खोड मोडण्यासाठीं फौज येईल असा त्या पत्रांत स्पष्ट उल्लेख करून ही कामगिरी पार पाडणें हें गडकर्‍याचें कर्तव्य आहे व ह्या कामगिरीबद्दल शाहूमहाराजांपाशीं त्याची चहा होईल असेंही पत्रांत स्पष्ट दर्शित करण्यांत आलें होतें.

स्वामींचें पत्र पाहण्यापूर्वीं गडकरी बाळाजीपंतांच्या हितासाठीं जपतां जपतां अखेरपावेतों जपला असता किंवा नाहीं नकळे; पण स्वामींचें पत्र पाहतांच त्यानें त्यांची आज्ञा अक्षरशः पाळण्याचा निश्चय केला खरा. स्वामींचें त्या गडकर्‍यावर इतकें वजन होतें; याचें कारण, स्वामींनीं महाराष्ट्रांत संचार सुरू केल्यापासून ज्या अनेकांवर आपल्या दैवी शक्तीनें अनंत उपकार केले होते, त्यांपैकीं हा गडकरी एक होता. स्वामींवर त्याची इतकी अलोट भक्ति होती कीं, स्वामींच्या पादुका तयार करून त्यानें नित्यपूजेला लावल्या होत्या, व त्यांच्यापासून गुरुमंत्रही घेतला होता. स्वामींचें शिष्यत्व पत्करल्यावरच त्याला शाहूमहाराजांनीं गडकरी केलें होतें. हा त्याच्या पराक्रमांचा प्रभाव होता हें तर खरेंच; पण त्याचा तर असा अढळ विश्वास होता कीं हें स्वामींच्या कृपेचें फळ. आणि तसें नाहीं किंवा नव्हतें असें तरी कोणीं म्हणावें! त्यानें ताबडतोब त्या दूताला सांगितलें, "स्वामींना सांग, आपली आज्ञा मला शिरसामान्य आहे. माझ्या जिवांत जीव असेतों मी सेनाकर्त्यांच्या केंसालाही धक्का न लागतां त्यांना शत्रूच्या गोटापार करून देण्याचा प्रयत्न करीन. त्यांतूनही आमचें व त्यांचें नशीब!"

गडकर्‍याचा एवढा निश्चय असलेला पाहून त्या दूतालाही पुढें बोलण्याला हुरूप आला. आतां आपण शतवीरांपैकीं एक आहों अशी ओळख देण्यांत धोका नाहीं असें पाहून तो प्रथम बाळाजीपंतांना मुजरा करून म्हणाला. "धनीसाहेब! आतां मी आपल्या पायांचा सेवक आपला शतवीर मानाजी आहें. इतका वेळ मीं ओळख दिली नाहीं याचें कारण मला गडकर्‍यांच्या मनाची खोली पहावयाची होती. जर यदाकदाचित् त्यांनीं सेनापतीची बाजू धरली असती, तर मी शतवीर आहें व मी माझ्या धन्याच्या मुक्ततेसाठीं धडपड करतों आहें या गोष्टीचा बोभाटा होऊन आम्हीं जीं कारस्थानें आजवर शत्रूचे साथीदार बनून त्याच्या गोटांत बसून केलीं, तीं सर्व चव्हाट्यावर येऊन

आम्हां सर्वांचा व त्याबरोबर आपलाही काळ ओढवला असता. पण आतां तसलें कोणत्याही प्रकारचें भय उरलें नाहीं. तेव्हां आतां—" मानाजी गडकऱ्याकडे वळून म्हणाला, "गडकरी ! आतां तुम्ही दैव म्हणालां; पण इतकें हताश होण्याचें कांहीं कारण नाहीं. पाया सद्धेतूंचा असला कीं त्या पायावर उभारलेली प्रयत्नांची इमारत दैवाच्या हेलकाव्यांनीं कधींच हलत डुलत नाहीं किंवा कोसळूनही पडत नाहीं. आपला निश्चय खरा आहे ना ?"

"होय. एकवार नव्हे, त्रिवार–सहस्रवार खरा आहे. स्वामींची आज्ञा पाळण्यासाठीं मी मरेन. इतकेंच काय; पण मेल्यावरदेखील तें अपुरें कर्तव्य हातून पुरें व्हावें म्हणून पुनःपुन्हा जन्म घेईन." गडकरी म्हणाला.

"तर मग आतां सांगतों, मी आलों ती माझी खरी कामगिरी दुसरीच आहे."

"पण मग हें पत्र तूं कोठून आणलेंस ?" बाळाजीपंतांनीं मध्येंच विचारलें.

"तें मीं आणलें नाहीं; नाथाजीनें आणलें." मानाजी म्हणाला.

"म्हणजे ? नाथाजी इतके दिवस कुठें होता ? आणि पिलाजी कुठें आहे ?" बाळाजीपंतांनीं एकदम औत्सुक्यातिरेकानें प्रश्नांची गर्दी करून सोडली, "आणि पिराजी व यशोदा यांची काय वाट ? तसेंच बाकीच्या शतवीरांची काय दशा आहे ? कमळा व कमळजा—"

"धनीसाहेब त्या प्रश्नांची चर्चा करण्यांत आपण वेळ दवडतां कामा नये. सर्वांची मोजदाद आपण यशस्वी होऊन साताऱ्याला गेल्यावर करावयाची. परमेश्वराच्या कृपेनें शेवटीं सर्व कांहीं नीट होईल. ती कथा सांगूं लागलों तर तें एक महाभारत होईल. तेव्हां तूर्त तें राहूं द्या, अशी माझी विनंति आहे." मानाजी गडकऱ्याकडे वळून म्हणाला, "गडकरी ! मी तुमच्यापाशीं आलों तो कृष्णरावाचा दूत म्हणून आलों आहें. सेनाकर्त्यांना उद्यां उजाडेपर्यंत स्वाधीन करा नाहींतर युद्धप्रसंग ओढवेल असा त्याचा तुम्हांला निकडीचा निरोप आहे. या निरोपाला तुमचें काय उत्तर आहे ?"

गडकरी व बाळाजीपंतदेखील हा निरोप ऐकून घोंटाळ्यांत पडल्यासारखे झाले. गडकरी मानाजीला म्हणाला, "तूं स्वामींचें पत्र घेऊन येतोस, सेनाकर्त्यांचा शतवीर म्हणवितोस, व सेनाकर्त्यांच्या शत्रूची कामगिरीही तूंच पार पाडतोस, हा घोंटाळा काय आहे ?"

"तो घोंटाळा तसाच आहे." मानाजी हंसत म्हणाला, "याचा अर्थ आम्ही शतवीर आहों व शतवीरांचीं पाताळयंत्रें हीं अशींच असतात. कृष्णरावाला लढाईला चेतवणारेही शतवीरच, कृष्णरावाच्या विश्वासांतील वीर म्हणून ह्या उठाठेवी करणारेही शतवीरच व ऐन लढाईला तोंड लागल्या-वर शत्रूचे दांत शत्रूच्या घशांत घालून आपल्या धन्यासह विजयश्रीला वरून राजधानींत गर्जत जाणारेहीं शतवीरच! तें कसें तें विचारूं नका; पुढें कसें करावयाचें व काय करावयाचें तें आम्हीं ठरविलें आहे. तुम्ही फक्त एवढेंच करा," मानाजी बाळाजीपंताकडे वळून म्हणाला, "धनीसाहेब! रात्रौ मध्य-रात्रीच्या सुमाराला छोटे धनीसाहेब व सचिवांचे पुत्र यांसह बिन्धोक गडा-खालीं उतरून या. सेनाकर्ते पळूं लागले म्हणून सैन्य कदाचित् आपल्या विरुद्ध उठेल, मोठा गोंधळ करील, धांवपळ होईल; तें कांहीं झालें तरी डगमगण्याचें कारण नाहीं. आपण थेट पुरंदरचा रस्ता धरा व सैन्य आपला पाठलाग करीत आपल्या मागोमाग येईल.—गडकरी! तुम्हीं मात्र एवढेंच करावयाचें, तळावर जें सैन्य राहील, बहुधा रहावयाचेंच नाहीं; पण राहिलें तर त्याचा समाचार मात्र तुम्हीं घ्यावयाचा."

"पण दरम्यान सेनापतीचें इतर सैन्य चालून आलें तर?" बाळाजी-पंतांनीं विचारलें.

"सेनापतीचें सैन्य चालून येणें शक्य नाहीं. आमच्या बातमीदारांनीं नक्की बातमी आणली आहे त्यावरून आम्ही खात्रीनें सांगूं शकतों कीं, सर-लष्कर व पुरंदरे यांचें अफाट सैन्य शाहूमहाराजांच्या आज्ञेवरून सेनापतीवर चालून येत आहे. त्यांची तेथें अंदरकीच्या घाटांत रातोरात लढाई जुंपेल. मग सेनापति इकडे कोठून येणार? शिवाय आमचे बेत पुरंदरे व सर-लष्कर यांना वेळींच कळतील अशी व्यवस्था मी करतों. म्हणजे सेनापति तिकडे परस्पर गुंतून पडेल व इकडे आपला मार्ग मोकळा होईल."

"पण मानाजी! हा तुमचा बेत फार धोक्याचा दिसतो." गडकरी म्हणाला.

"धोक्याचा नाहीं." बाळाजीपंत म्हणाले, "माझ्या शतवीरांचा पराक्रम मी पूर्णपणें जाणतों. ते मनांत आणतील तर शेषाच्या मस्तकापर्यंत सृष्टि पालथी घालतील; पण हातीं घेतलेलें कार्य तडीला नेतील."

" हेंच. हेंच मोल आम्हां शतवीरांना आमच्या स्वामिनिष्ठेचें पाहिजे. हा आमचा लौकिक आम्हांला राखला पाहिजे." मानाजी गडकऱ्याकडे वळून म्हणाला, " गडकरी ! आमच्या स्वामींना शतवीरांच्या पराक्रमाची पारख आहे. आम्हीं आमच्याच तोंडानें आमची स्तुति काय करावी ! तें असो. तेव्हां आतां मी कृष्णरावांना काय जबाब देऊं ?"

" ज्याअर्थीं सर्वच कारस्थानें तुम्हां शतवीरांच्या हातून पार पडावयाचीं आहेत, त्याअर्थीं तुमच्या सोईला पडेल असा जबाब द्या." गडकरी म्हणाला.

बाळाजीपंत म्हणाले, " डाव खेळून खेळावयाचा तर तो नीट चतुराईनें खेळावा. कृष्णरावाला सांग कीं, गडकरी युद्धाला तयार नाहीं. फक्त तो बाळाजीपंत सेनापतीला शरण जाण्याला तयार होतात कीं काय एवढा प्रयत्न करून पहाणार आहे. म्हणजे निष्कारण रक्तपात व्हावयाचा थांबेल. म्हणावें, ते शरण जाण्याला तयारच नसले तर गडकरी सूर्योदयाच्या वेळीं त्यांना तुमच्या स्वाधीन करील. पण होतां होईतों तसा प्रसंग यावयाचा नाहीं; बाळाजीपंत फार जेरीला आले आहेत व त्यांना नीट रीतीनें वागविण्याची कृष्णराव जर हमी घेत असतील तर ते शरणही येतील असेंही सांगावयाला हरकत नाहीं."

" ठीक आहे. ही युक्ति फार उत्तम आहे. याप्रमाणें मी करतों. आपण मात्र मीं सांगितल्याप्रमाणें करावें." मानाजी म्हणाला.

इतक्यांत चिमाजी व नारायण तेथें आले. त्यांना पाहून बाळाजीपंत म्हणाले, " पण ह्या मुलांचें काय करणार ? हा एक माझा मुलगा आहे; त्याची मला तेवढी काळजी नाहीं. पण हा लोकांचा—"

नारायण बाळाजीपंतांना बोलूं न देतां म्हणाला, " नानासाहेब ! बाबांनीं मला आपल्या हातीं देतांना काय सांगितलें ?"

" आणि बाबा ! माझी तरी एवढी काळजी कशाला ? मोठ्या माणसांना तेवढें लढतां येतें व आम्हां मुलांना येत नाहीं काय ? तुम्ही आमच्याविषयीं मुळींच काळजी करूं नका. मी तर म्हणतों, शत्रूशीं होऊंद्यात ना दोन हात ! असे भिऊन भिऊन किती दिवस काढणार ? आम्ही लढूं व मारूं किंवा मरूं ! पण बाजीची काय वाट झाली ?"

" बाजी सुखरूप आहे." बाळाजीपंत म्हणाले.

" होय ना ? मग काय तर ! आमची निम्मे काळजी कमी झाली. देवा श्रीगजाननानें जसें आमचें आजवर रक्षण केलें तसेंच तो पुढेंही करील." चिमाजी मानाजीकडे वळून म्हणाला, " मानाजी ! तूं जा व पुढच्या उद्योगाला लाग. आम्ही दोघेही थोरल्या धनीसाहेबांच्या बरोबरीनें सेनापतीशीं लढणार, कृष्णरावाशीं दोन हात करणार व 'आमच्या वयाचीं मुठीएवढीं मुलें स्वामिकार्यासाठीं भर रणांगणावर प्राणांची पर्वा न करतां लढतात आणि तुम्ही एवढे मोठे घोडे वाढलां तरी स्वामिद्रोह करण्याची तुम्हांला लाज वाटत नाहीं काय ?' असें धडधडीत त्यांच्या तोंडावर त्यांना विचारून त्यांना लाजेनें खालीं मान घालावयाला लावणार." चिमाजी नारायणाकडे वळून म्हणाला, " नारायण ! खरें कीं खोटें ? "

" अलबत् ! " नारायण स्वयंस्फूर्तिसंपन्न स्वरांत म्हणाला, " आम्हांला लढण्याची संधि मात्र मिळाली पाहिजे. मी तर म्हणतों, परमेश्वर पावावा व मला शत्रूविरुद्ध लढण्याची संधि मिळावी. मी लढतां लढतां मेलों तर राजांच्या कार्यासाठीं माझा जन्म सार्थकीं लागला; विजयी होऊन शाबूतपणें राजांच्या पायाशीं गेलों तर अनायासें सचिवांच्या स्वामिभक्तीविषयीं राजांची खात्री पटेल."

" तर ! मी तरी तेंच म्हणतों." चिमाजी म्हणाला.

" धाकटे धनीसाहेब ! लढण्याच्या गोष्टी बोला; मरण्याच्या गोष्टी बोलूं नका. आपले आम्ही हे इतके सेवक शत्रूच्या शस्त्रास्त्रांचे वार छातीवर सहन करायला छातीचा कोट उभारून तुमच्या सभोंवार उभे असतांना तुमच्या एका केंसाला तरी धक्का लावण्याची शत्रूची काय माय व्याली आहे !" मानाजी बाळाजीपंतांकडे वळून म्हणाला, " धनीसाहेब ! आपण कसलीही चिंता न करतां ठरल्याप्रमाणें करावयाचें. मी आतां येऊं ? "

" या. परमेश्वर तुमच्या बेतांना यश देवो." असें म्हणून बाळाजीपंतांनीं मानाजीला निरोप दिला.

मानाजी गेल्यावर गडकरी अवश्य ती पुढील तरतूद करण्यासाठीं गेला. बाळाजीपंतांनीं मात्र चिमाजी व नारायण यांनीं नाना परींचे प्रश्न विचारून पुरे वाट केली. बाळाजीपंत त्यांच्याशीं बोलत होते, तरी मनांत मात्र एकसारखा एकच विचार घोळत होता कीं, हा बेत सिद्धीला कसा जाईल ?

## दर्शन सत्ताविसावें

# पापांचा घडा भरला !

इस्माईल आपल्या घरांत अनर्थ गुदरला आहे ही अनिष्ट वार्ता ऐकून लगबगीनें तेथें येऊन पहातो तों घराबाहेर कांहीं हिंदु व कांहीं मुसलमान यांची आपसांत मारामारी सुरू आहे व घरांतही नुक्तीच आलेली म्हातारी, लतिफेची आई, लतिफा व सुलताना यांची आरडाओरड, रडारड चालली आहे; जिकडे तिकडे गोंधळ माजून राहिला आहे असें त्याला दिसून आलें. हा अनर्थ पाहून विस्मित होऊन तो घरासमोर दंगा करणाऱ्या लोकांना विचारूं लागला, "तुम्ही कां भांडतां ?"

एक हिंदु पुढें होऊन उत्तरला, "शिलेदारसाहेब ! हे तुमचे लोक त्या गरीब म्हातारीला निष्कारण ठार करूं पहात आहेत. तिला सोडा म्हणजे आमचें कांहीं म्हणणें नाहीं."

एक मुसलमान पुढें होऊन म्हणाला, "शिलेदारसाहेब ! त्या म्हातारीनें तुमच्या आईला ठार मारलें व ती तुमच्या बायकोलाही ठार मारूं पहात आहे; तिला मोकळी सोडावयाची काय ?"

तीच ती म्हातारी, जिला मुसलमानांनीं बोलाईच्या देवालयांतून पकडून आणलें तीच ती ! बाहेर हें बोलणें चाललेलें पाहून ती वाघिणीसारखी गर्जत इस्माईलच्या घराबाहेर आली व बेभानपणें बोलूं लागली, "हो ! मीं माझ्या सवतीला ठार मारली ! आणि मी माझ्या पोरटीलाही ठार मारणार."

"कां ?" इस्माईलनें संतापानें आपल्या हातांतील सोटा त्या म्हातारीवर उगारीत विचारलें. त्या प्रश्नाबरोबर त्याच्या हातांतील सोटा त्या म्हातारीच्या टाळक्यांत पडावयाचा; पण तेवढ्यांत लतिफा पुढें होऊन इस्माईलचा हात धरून रडत रडत म्हणाली, "प्यारे ! ती माझी आई आहे. तिला मारूं नका."

इतक्यांत घरांतून सुलताना कण्हत कण्हत ओरडली, "इस्माईल ! त्या म्हातारीनें मला ठार मारली, आणि तुझ्या बायकोनें तिला भर दिली. मी आतां मरतें. पण तुला तुझ्या आईचा कांहीं अभिमान असेल तर माझी शेवटची इच्छा पुरी कर. त्यांना ठार मार—" पुढें सुलतानाच्या तोंडून शब्दच उमटेना. इस्माईल लगेच आंत गेला व पहातो तों सुलताना गतप्राण झालेली !

" लतिफे ! हें काय ?" इस्माईलनें दरवाजांत जहांगिराला हृदयाशीं घेऊन उभी असलेल्या लतिफेकडे पाहून विचारलें, " तूं माझ्या आईला ठार मारलीस ?"

" नाहीं. मीं मारली नाहीं." लतिफा रडत रडत उत्तरली.

म्हातारी दरवाजाबाहेर उभी राहून आवेशानें रडत रडत टाहो फोडीत होती. " मीं त्या कुलटेला ठार मारली !"

लतिफा पुन्हा बाहेर येऊन म्हातारीला आंवरण्याचा प्रयत्न करीत म्हणाली, " आई ! आई ! माझ्याकडे पहा व शांत हो !"

" तुझ्याकडे पाहूं ! निलाजऱ्या पोरी ! तुझ्याकडे काय पाहूं ?" म्हातारी बाहेर जमलेल्या हिंदूंना उद्देशून उद्गारली, तोंडें पहात उभे काय रे राहिलां ? षंढांनो ! हा अधम चांडाळ–हा इस्माईल " मी त्याची सावत्र आई असतां माझ्या द्रौपदीला–आपल्या सावत्र बहिणीला बाटवून आपली बायको करूं शकला. याला आईबहीण यांचीही ओळख नाहीं. असल्या नरपशूला ठार करावयाचें सोडून तोंडें पहात उभे काय राहिलां ?"

म्हातारीच्या तोंडून हें विलक्षण विधान निघालेलें ऐकून सर्वांनीं तोंडांत बोटें घातलीं. हें प्रकरण एथवर पेटावयाला कारण असें झालें कीं, मुसलमानांनीं म्हातारीला धरून आणून लतिफेच्या आईला भेटण्याविषयींचा आळ पुरवण्यासाठीं त्या दोघी मायलेकींची भेट करून दिली व सुलतानाही लतिफेची आई कोण, तें पाहण्यासाठीं पुढें आली, तेव्हां त्या दोघींनींही एकमेकींना ओळखलें, कीं आम्ही सवती सवती ! म्हातारी व लतिफा यांच्यांतला सवतीमत्सर पूर्वींपासून फार तीव्र होता. दिनाजी जावळीकर पाटील याची म्हातारी ही लग्नाची बायको व सुभद्रा ही त्याची रखेली ! पण दिनाजी सुभद्रेच्या नादानें म्हातारीचा फार छळ करी. पुढें दिनाजी बाटून मुसलमान झाला तेव्हां त्या म्हातारीनें–तेव्हां चांगली ती तरुण होती.–आपल्या नादान नवऱ्याबरोबर बाटून मुसलमान होण्याचें नाकारून व आपला नवरा स्वाभिमान, स्वदेशाभिमान, स्वधर्माभिमान यांवर पाणी सोडून मायदेशाशीं निमकहराम होऊन मोगलाईत मानमरातब मिळविण्याच्या आशेनें बाटला तेव्हांच तो मेला अशी समजूत करून घेतली. सुभद्रा आपल्या लहानग्या शंभुरावासह आपल्या बिनलग्नाच्या पतीबरोबर आनंदानें बाटली. तिला

आपल्या सवतीचा मत्सर साधावयाचा होता, म्हणून तिलाही बळजबरीनें बाटण्याला भाग पाडण्यासाठीं सुलतानानें दिनाजी पाटलाचे कान फुंकले व दिनाजीनें आपल्या त्या दीड दमडीच्या रखेलीच्या सांगण्यावरून कावेरीचा बेसुमार छळ केला; पण कावेरी वळली नाहीं. ती आपल्या कपाळींचें कुंकू पुसून आपल्या सहा महिन्यांच्या तान्ह्या कन्येसह तेथून रातोरात पळाली व माहेरीं येऊन राहिली. दिनाजी पाटील बाटून अल्लाउद्दीन झाला. त्याचा शंभुराव इस्माईल झाला व सुभद्रा सुलतानी बनली. ती सर्व मंडळी मोगलाईंत जाऊन राहूं लागल्यावर इस्माईल मोठा होऊन कर्ता झाला व मोगलांच्या वतीनें सातार्‍याला भेदनीतीचे सुरुंग पेरण्यासाठीं येऊन राहिला, तेव्हां त्यानें बलात्कारानें ज्या एका अनाथ म्हातारीच्या मुलीला पळवून तिच्याशीं लग्न केलें, ती म्हातारी ही कावेरी ती तिची मुलगी अर्थात् इस्माईलची बहीण द्रौपदी-तीच त्याची आजची बायको लतिफा, व ती दिनाजी पाटलाची रखेली-इस्माईलची आई सुभद्रा म्हणजेच आजची सुलताना होय. हा सारा रहस्यभेद म्हातारी व सुलताना समोरासमोर येतांच झाला. 'इस्माईल हा आपल्या नवर्‍याच्या रखेलीचा पोर अर्थात् द्रौपदीचा भाऊ! पण त्यानेंच द्रौपदीस बाटवून तिच्याशीं–आपल्या बहिणीशीं लग्न केलें, असें पाहतांच म्हातारी-च्या दुःखाला व संतापाला पारावार उरला नाहीं. ह्याच सुलतानानें–ह्याच कुलटेनें –ती आपल्या पतीची एक दीड दमडीची रखेली व आपण त्याची लग्नाची बायको असतांना आपला बेसुमार छळ करावयाला लावलाच; पण पुढेंही आपला असा सूड घेतला! आपली कुलीनाची मुलगी, शिवाय ती त्याची बहीण असतांना, आपल्या अकर्माशी पोराकडून भ्रष्टविली! द्रौपदी बाटून मुसलमानाची बायको होऊन जन्मांतून उठली म्हणून म्हातारीच्या मनाला असह्य वेदना होत होत्याच; तरी बोलून चालून तो मुसलमान पडला, इतके मुसलमान अशीं पशुतुल्य आचरणें करतात त्यांतला इस्माईल हा एक पशु! त्याच्यासमोर आपला काय इलाज!' अशी ती आपल्या मनाची आजवर समजूत घाली. पण आज जेव्हां तिला कळलें कीं, इस्माईल अस्सल मुसलमान नाहीं व कोणी परकाही नाहीं, तो आपला सावत्र मुलगा आपल्या द्रौपदीचा व त्यांचा जन्मदाता एक, तेव्हां तिला वाटलें कीं, ह्या चांडाळणीनें–सुलतानानें अखेरपावेतों आपला पुरेपूर सूड घेण्यासाठींच स्वतःच्या बाटग्या पोराला प्रत्यक्ष

बहिणीची अब्रू घेण्याला भाग पाडलें तेव्हां तिला त्यांत अत्यंत नामुष्की वाटली. मुसंड्यानें आपली पोर बाटविली म्हणून तिला जी खंत व जें दुःख वाटत होतें, त्याची आतां परमावधि झाली. त्यांतच पूर्वी सुलतानानें केलेल्या छळाच्या आठवणींची भर पडली. अशी ही हाडवैरीण समोर पहातांच म्हातारीचा क्रोध अनावर झाला. त्या क्रोधाच्या भरांत तिनें सुलतानाला बेफामपणें शिव्या देण्याला सुरवात केली. लतिफेलाही आपली आई भेटल्यानें जो आनंद व्हावयाचा तो बाजूलाच राहून आपणाला बलात्कारानें बाटवून आपला नवरा शोभणारा इस्माईल आपला भाऊ आहे, त्यानें कामांधतेच्या भरांत हें भावाबहिणींचें नातें विसरून पशूलाही लाजविणारें निंद्यकर्म केलें व ह्या कर्मांत त्याची आई सामील होती, असें कळतांच तिला मरण-प्राय दुःख झालें. सुलताना व इस्माईल यांच्याविषयीं तिच्या मनांत आदर कधींच नव्हता; असें असतांही नाइलाज म्हणून अलीकडे ती प्राप्त परिस्थितींत कसेबसे दिवस कंठीत होती; पण ह्या रहस्यभेदानें तिला सुलताना व इस्माईल हीं दोन्ही माणसें शत्रुवत् दिसूं लागलीं. त्यांतच सुलताना जेव्हां झाल्या गोष्टीबद्दल जरादेखील दिलगिरी न दर्शवितां बेसुमार शिव्या देऊं लागली व म्हातारीनें पूर्वीपासून आपला सुलतानानें कसकसा छळ केला याचा पाढा वाचला, तेव्हां तर लतिफेच्या संतापाला व दुःखाला सीमा राहिली नाहीं. सुलताना व म्हातारी ह्या दोघींचें भांडण हां हां म्हणतां विकोपाला गेलें व दोघीही एकमेकींची करूं नये तसल्या शब्दांनीं विटंबना करूं लागल्या. त्यांतच म्हातारीनें सुलतानाला तूं 'लुटारू'** ! तुझा पोर अकर्माशी असा सकारण दोष देतांच सुलताना केवळ खोडसाळपणानें म्हातारीलाही तशींच नांवें ठेवूं लागली व 'जास्त बोलशील तर माझा मुलगा आल्यावर तुला देखील गोमांस भरवून बाटवून मुसलमान करावयाला लावीन व तुला माझ्या घरीं माझी बटीक म्हणून राबवीन' असें म्हणाली, तेव्हां म्हातारी अस्सल मराठा कुळांतील खऱ्या हिंदु रक्ताची स्त्री पडली, तिला तो अपमान अगदीं असह्य होऊन तिनें कोंपऱ्यांतला सोटा घेऊन त्यानें सुलतानाचें टाळकें खासें सडकलें! सुलतानाही घरांतली सुरी घेऊन म्हातारीचा खून करावयाला धावली तेव्हां मात्र लतिफा मध्यें पडली व तिनें संतापाच्या भरांत आपल्या आईबरोबरच सुलतानाला मरेमरेतों मारलें. म्हातारीनें मागचा पुढचा कांहीं

विचार न करतां तेथल्या तेथें इस्माईललाही ह्या अघोर कर्माबद्दल ठार मारण्याचा निश्चय केला व लतिफेच्याही मनानें घेतलें कीं हा नवरा कसला! सैतान हा ! हा मेला तरी पत्करला !

इतका प्रकार घरांत चालला आहे तों आरडाओरड ऐकून आजूबाजूचे बरेच हिंदु व कांहीं मुसलमान तेथें जमा झाले. म्हातारी तेथलीच रहिवाशीण असल्यानें तिच्याविषयीं तेथल्या हिंदूंना साहजिकच आपलेपणा वाटत होता व सुलताना ही दुष्कर्मी इस्माईलची आई म्हणून तिच्याविषयीं तिरस्कारही वाटत होता. पण तेथें जमलेल्या मुसलमानांना म्हातारीविषयीं कांहींच आपलेपणा वाटत नव्हता. सुलताना मात्र त्यांना जवळची होती. आतां, म्हातारी ही इस्माईलची सासू आहे तेवढें त्या मुसलमानांना माहीत होतें. पण ती हिंदु होती व ती सुलतानावर अचानक उलटली असें पाहतांच ते तिचा प्रतिकार करून सुलतानाला वांचविण्यासाठीं पुढें जाऊं लागले. पण हिंदूंना सुलतानाचा-त्यांच्या वैऱ्याच्या आईचा-तसा शेवट झालेला पहातांना उलट आनंद वाटला व म्हातारीचा हिंदुत्वाविषयींचा अभिमान इतका जाज्वल्य आहे हें पाहून तर तिच्या केंसालाही धक्का लागूं द्यावयाचा नाहीं ह्या उद्देशानें ते तिला मारण्यासाठीं पुढें सरसावलेल्या मुसलमानांवर चिडून तुटून पडले. असा हा दंगा माजला होता.

म्हातारी तेथल्या लोकांपाशीं इस्माईलला ठार करण्याविषयीं विनवूं लागली तेव्हां इस्माईलला तें कसें सहन व्हावें! त्यानें तिला तेथल्या तेथें ठार करण्यासाठीं हात उगारला, लतिफेनें त्याचा हात धरला. तेवढ्यांत हिंदूही चिडून जाऊन इस्माईलवर हात टाकण्यासाठीं पुढें सरले तेव्हां मुसलमान त्याचें रक्षण करण्यासाठीं आडवे आले. पुन्हा दंगा जुंपला. मारामार सुरू झाली. म्हातारीला सोडून द्या असा हिंदूंनीं हट्ट धरला; पण इस्माईल सोडीना. हां हां म्हणतां दंगा इतका माजला कीं बोलावयाची सोय नाहीं. त्यांतच म्हातारीच्या आकांडतांडवाची भर! आतां काय करावें हेंच इस्माईलला सुचेना. हिंदूंचा आग्रह कीं म्हातारीला सोडा, व मुसलमानांचा आग्रह —आणि इस्माईलच्या मनांतून देखील तिला ठार मारावयाचें. त्या दंगलींत इस्माईलनें म्हातारीला तर ठार मारलेंच; पण अखेर हिंदूंचा जमाव मोठा असल्यानें त्यांची सरशी झाली. तेही बऱ्याच दंगेखोर मुसलमानांना ठार

मारून त्यांचा मोड करून चालूं लागले. त्यांच्यासमोर मुसमानांचा कांहीं इलाज चालेना. तरीही ते हिंदूंविषयीं मनांत दावा धरून त्यांचें पारिपत्य करण्याच्या तयारीला लागले. इस्माईलनेंही त्यांना काय पाहिजे ते अत्याचार करून हिंदूंची रग जिरविण्याला प्रोत्साहन दिलें. तात्पुरता दंगा मिटला; पण दंग्याची आग विझाली मात्र नाहीं; धुमसत राहिली.

इस्माईलचें चित्त मातेचें मरण व आतां झालेली हिंदूंची सरशी यांनीं अत्यंत व्यग्र झालें होतें. त्यांतच लतिफाही मातृशोकानें विव्हल होऊन धाय मोकलून रडत बसली. तिची समजूत करायला त्याला तोंडच नव्हतें. यशोदा त्याच्याबरोबर बाहेर पडली ती कुठें गेली याचा थांग-पत्ता नव्हता. अशी चारी बाजूंनीं परिस्थिति त्याला खायला उठली असतांना काजी महंमदच्या पदरच्या म्हणून एका मुसलमान तरुणानें घाबऱ्या घाबऱ्या धावत येऊन वर्दी दिली, " शिलेदारसाहेब ! प्रसंग मोठा कठीण आला आहे. कोणतासा एक हिंदु साधु बऱ्याच हिंदूंना बरोबर घेऊन गांवांतील मुसलमानांशीं लढण्यासाठीं चालून आला आहे. गांवांतले हिंदु किती खवळले आहेत हें आपण जाणतांच आहां. आतां जर त्यांच्याशीं लढण्याची आपण तयारी केली नाहीं, तर आपली धडगत नाहीं. यास्तव सर्व मुसलमानांनीं मशिदींत जमून लढण्याला तयार व्हावें अशी कांहीं योजना करण्यासाठीं तुम्ही आपल्या सर्व मुसलमानांना बरोबर घेऊन मशिदींत यावें अशी काजी महमदाची तुम्हांला सांगी आहे."

ही अकल्पित वार्ता ऐकून तर इस्माईलचे पाय खचल्यासारखे झाले; पण अशा वेळीं हातपाय गाळून स्वस्थ बसून भागावयाचें नाहीं हेंही तो जाणून होता. ह्या अरिष्टांतून मोकळीक होण्यासाठीं धडपड करणें त्याला अपरिहार्य होतें. त्यासाठीं त्याला आईचें प्रेत घरांत तसेंच टाकून, लतिफेला तेथेंच रडत एकटी सोडून व यशोदेची आशा सोडून घराबाहेर पडावें लागलें.

* * *

यशोदा इतका वेळ कोठें दूर नव्हती; सर्व लोक इकडे दंग्यांत गुंतले आहेत असें पाहून ती तेथून जवळच एका वृक्षाआड उभी राहून आपल्याला हितकारक अशी संधि केव्हां येते याची वाट पहात होती. इकडे हिंदु-मुसलमान भांडूं लागले म्हणून घरोघरच्या इतर स्त्रिया घाबरून गेल्या. स्त्रियाच काय, अनेक पुरुष देखील घाबरून दरवाजे लावून स्वस्थ बसले. तरी

यशोदा आपली निर्भयपणें तेथेंच काळोखांत एकटीच उभी ! याचें कारण तिचा निश्चय ! कळिकाळालाही मागें हटविणारा निश्चय करून ती बाहेर पडली होती, ती असल्या दंग्याधोप्यांना थोडीच भिते !

इस्माईल बाहेर निघून जातांच यशोदा नीट तेथें गेली व लतिफेला भेटली. लतिफा तेव्हां मातृशोकांत चूर झाली होती, तरी यशोदेला मुक्त झालेली पाहून तिला तेवढेंच दुःखांत सुख वाटलें. तिनें यशोदेला विचारलें, " तुझी मोकळीक कोणीं केली बाई ? "

" परमेश्वरानें ! " यशोदा उत्तरली, " सुष्टांचें प्रतिपालन व दुष्टांचें निर्दालन करणाऱ्या परमेश्वरानें माझी मोकळीक केली आणि त्यानेंच मला आतां तुझ्याकडे पाठविलें आहे. तूं सध्यां कोणत्या मनःस्थितींत आहेस हें मी जाणतें. पण यांत एवढें दुःख करण्यासारखें तरी काय आहे ? तुझी सासू मेली, तिला तिच्या कर्माचें यथायोग्य प्रायश्चित्त मिळालें. तुझी आई मेली; पण ती रडून थोडीच येणार आहे ! हा अनर्थ कां झाला याचा विचार कर व चल ऊठ ! नुसतें रडून दुःख करून काय होणार ? "

" मला दुःख एवढ्यासाठींच वाटतें कीं, इस्माईल हा माझा भाऊ ! माझ्या बापाच्या रखेलीचा मुलगा ! त्यानें माझ्याशीं—प्रत्यक्ष बहिणीशीं असा संबंध आणण्याचें महत्पाप करावें ! "

" जे पाप करतात, त्यांना त्या पापाचें प्रायश्चित्त मिळालें पाहिजे हें तर खरें ना ? "

" प्रायश्चित्त तर मिळालेंच पाहिजे. पण—"

" मला तसें वाटलेंच होतें, तूं पण म्हणशीलसें. पण काय ? तो तुझा पति म्हणून ! " लतिफा यावर कांहीं बोलेना असें पाहून यशोदा म्हणाली, " होय. तो तुझा पति म्हणून तूं त्याचें रक्षण व्हावें असें इच्छीत असशील. " यशोदा लतिफेच्या हातीं असलेल्या जहांगिराकडे बोट दाखवून म्हणाली, " हा आपला पति, हें आपलें अपत्य,—हे मोह तुला टाळतां येत नाहींत. पण बहिणीच्या अब्रूवर घाला घालणारा नराधम तो, त्याला तूं पति मानतेस ? आणि त्याच्या पापाचारांत जन्म पावलेल्या त्याच्या प्रतिबिंबाविषयीं 'अमक्या तमक्या भाऊबहिणींनीं पशुतुल्य आचरण करून आपणाला जन्म दिला' अशी जगाला ग्वाही देणाऱ्या ह्या अर्भकाविषयीं तुला इतकी ममता वाटते ? "

"यशोदे! काय करूं! हा पोटजाळ पडला ग! माझ्या जागीं तूं असतीस तर काय केलें असतेंस ?"

"ऐक. तूं आज ज्या स्थितींत आहेस त्या स्थितींत मी असतें तर इस्माईल बळजबरीनें माझा पति झाला असता तरी त्याला माझा—माझ्या देशाचा—माझ्या धर्माचा—साऱ्या मानवजातीचा शत्रु म्हणून ओळखलें असतें व असल्या शत्रूचा समूळ निर्वंश करून भूभार हलका करण्यासाठीं झटलें असतें! जो उठला तो मुसलमान मला बलात्कारानें माझ्या घरांतून ओढून काढून माझी अब्रू घेऊन मोकळा झाला, तर ह्या त्याच्या महत्पापाबद्दल मीं त्याच्याठायीं पतिश्रद्धा ठेवणें म्हणजे त्याच्या पापाचरणाचा गौरव करून त्याच्या महत्पापाची वांटेकरीण होणें होय. असला पतिव्रताधर्म जर आम्ही आर्यकन्या पाळूं लागलों तर जगांतील एका तरी स्त्रीची अब्रू सुरक्षित राहील काय? लतिफे! आमच्या हिंदुधर्माचें—आमच्या माणुसकीचें मरण ह्या आमच्या भोळसटपणांत आहे. असे नराधम स्त्रियांची अब्रू घेतात, त्यांना बलात्कारानें बाटवितात, ते कां? तर अशा स्त्रिया आज ना उद्यां आपल्याशीं सलोख्यानें वागणारच अशी त्या नराधमांची खात्री असते. तुझ्यासारख्या कालांतरानें वश होणाऱ्या दुबळ्या स्त्रियांचीं उदाहरणें त्यांना पहावयाला सांपडतात, म्हणून नव्या नव्या लोकांना नव्या नव्या स्त्रियांवर अत्याचार करण्याला प्रोत्साहन मिळतें. धर्माच्या नांवावर मुसलमानांकडून स्त्री जातीच्या जन्माची अशी दैना होण्याची थांबविण्यासाठीं अशा लोकांना शासन करण्याचें कार्य आम्हीं स्त्रियांनींच शिरावर घेतलें पाहिजे. तूं मला विचारतेस, तुझ्या स्थितींत मीं काय केलें असतें! तुझ्या स्थितींत मी असतें तर मला बलात्कारानें बाटविणाऱ्या राक्षसाला व त्याच्यापासून झालेल्या मुलाला देखील आजच्या स्थितींत ठार करून त्याचा निर्वंश केला असता, व माझ्या प्रत्यक्ष आचरणानें समाजांतील साऱ्या स्त्रीलंपट दुरात्म्यांना सर्व स्त्री-जातीच्या वतीनें सांगितलें असतें कीं खबरदार! तुम्ही जर बलात्कारानें आम्हां अबलांना बाटवूं लागाल तर आमच्या कोपाच्या होमकुंडांत तुमच्या सर्वस्वाची अशी होळी होईल! माझें बोलणें तुला पटतें ?"

"होय. पटतें."

"तर मग चल माझ्याबरोबर. परमेश्वराचें नांव घे व बाहेर पड."

"पण हा माझा बाळ!"

"पुन्हा बाळ? कसला बाळ घेऊन बसलीस?" यशोदा लतिफेच्या हातांतील जहांगिराला आपल्याकडे घेत म्हणाली, "लतिफे! तुला मीं आतां सांगितलें ना? विषवृक्षाच्या नुसत्या फांद्या तोडून त्याचा नाश होत नाहीं; त्याचीं पाळेंमुळें खणून काढून नष्ट केलीं पाहिजेत तेव्हांच त्याचा नाश होतो. सर्पाचें पिल्लूं मोठेपणीं सर्पच व्हायचें, म्हणून त्याची गय न करतां त्याला ठेंचायचें!" यशोदा क्षणभर थांबली. तेव्हां तिच्या डोक्यांत कोणतासा भयंकर विचार आला असावा. कारण तेवढ्यांत ती गुंजेसारखी लाल झाली. तिचे ओंठ व हात थरथर कांपूं लागले. ती दोन पावलें मागें सरून साभिनय बोलूं लागली, "तूं मला विचारलेंस, तुझ्या जागीं मी असतें तर काय केलें असतें! जें आपण करायला तयार असावें तेंच इतरांना करायला सांगावें. मी तुझ्या जागीं असतें तर माझाही जीव अशा गोजिरवाण्या अर्भकासमोर घोंटाळत राहिला असता. पण केवळ कर्तव्य म्हणून–परस्त्रियांना बळजबरीनें पळवून त्यांना आपल्या रखेल्या किंवा बायका बनवून सोडणाऱ्या सैतानांच्या सैतानी वृत्तीला आळा बसावा म्हणून–डोळ्यांवर कातडें ओढून माझ्या ह्या पोटच्या गोळ्याला–असा ठार केला असता!"

लतिफेला वाटलें कीं यशोदा नुसती आवेशाच्या भरांत बोलते आहे. पण बोलतां बोलतां तिनें जहांगिराचा जोरानें गळा दाबून त्याचे चिमुकले पाय धरून त्याला धाड्कन् जमिनीवर आदळलें. तें पाहून लतिफेनें एकदम 'चांडाळणी! माझ्या बाळाचा घात केलास कीं ग!' अशी किंकाळी फोडली. ती जास्त ओरडली तर निष्कारण बभ्रा होईल व आपले पुढील बेत फसतील, म्हणून यशोदा आपलें अंतःकरण दगडासारखें घट्ट करून लतिफेला म्हणाली, "हं! लतिफे! ओरड करण्यांत अर्थ नाहीं. मीं तुझा मुलगा मारला नाहीं; इस्माईलच्या वंशाचा विषारी वेल मीं वेळींच खुडला, व तुझा मोहपाश तोडून तुला मोकळी केली. देशाची, देवाची किंवा धर्माची सेवा करायला जे माणूस निघालें, त्याच्या वाटेंत कोणी मऊ मऊ रुजामे आंथरलेले नसतात किंवा जाई-जुई-बकुळीचीं फुलें पसरलेलीं नसतात! ती वाट अशीच परोपरींच्या आपत्तींच्या कांट्याकुंट्यांनीं आच्छादिलेली असते! मुसल-मानांच्या संसर्गानें तुझ्या हातून घडलेलें कायिक पातक हें असें फिटलें. या-

घातकाचा अंश इस्माईलच्या रूपानें अजून शिल्लक असेल तोही आज ना उद्यां असाच नाहींसा होईल ! आतां तूं जर रडत ओरडत बसशील तर तूं त्या दुष्टाची साथीदारीण म्हणून माझी प्रतिज्ञा पार पाडण्यासाठीं तुझ्या मुलाचा मीं शेवट केला तसाच तुझाही शेवट मला करावा लागेल."

" यशोदे ! मी मरणाला भितें अशी का तुझी कल्पना आहे ? मार मला; खुशाल ठार मार. खरेंच मार. आतां मला जगण्यापेक्षां मरणांतच गोडी आहे. जगून तरी मी काय करणार ?"

" सांपडेल त्या संधीचा फायदा घेऊन शत्रूंचा संहार आपण करूं."

" तें माझ्या हातून व्हायचें नाहीं. माझ्या अंगीं आतां तेवढें त्राणही नाहीं व तेवढा हुरूपही नाहीं. मी मनाची दुबळी झालें आहें. आतां, एका दुरात्म्याचा तरी निर्वंश करून देशकार्य व धर्मकार्य साधावें असें तूं म्हणतेस, त्या तुझ्या धर्मकार्याला फूल ना फुलाची पाकळी मदत म्हणून—"

तोंडचें वाक्य अर्धवट सोडून लतिफा एकदम आंत गेली, ती क्षणार्धांत एक तीक्ष्ण खंजीर घेऊन बाहेर आली, व 'यशोदे ! तुझ्या धर्माच्या झोळींत मी ही एवढीच भिक्षा घालतें' असें म्हणून तिनें कच्‌कन् तो खंजीर आपल्या छातींत खुपसून घेतला.

" लतिफे !" यशोदेनें तिच्याजवळ जाऊन केविलवाण्या स्वरांत हांक मारली. लतिफेनें एकवार डोळे उघडून तिच्याकडे पाहिलें व शेवटचे शब्द तोंडावाटे उच्चारले, " तूं जा ! जा अगोदर, नाहीं तर हकनाहक मुसंड्यांच्या हातीं पडशील. साधेल तेवढा शत्रूंचा विध्वंस साध, व नाइलाज झाला कीं अशी माझ्यासारखी मरून जा; पण शत्रूच्या हातीं सांपडूं नकोस. एक हिंदु पुरुष बाटला तर एकटाच मुसलमान होतो; पण एक हिंदु स्त्री बाटली कीं ती अनेक शत्रूंची जननी होते. यासाठीं शत्रूंच्या हातीं सांपडलेल्या प्रत्येक स्त्रीनें शत्रूंच्या निपजेला आळा घालण्यासाठीं असेंच माझ्यासारखें—राम !"

लतिफेचा शेवट हा असा झाला. झाल्या गोष्टीला यशोदेचाही कांहीं इलाज नव्हता. तिला तो भयानक प्रकार पाहून खिन्नता वाटली; पण एका दृष्टीनें समाधानही वाटलें. आतां पुढें काय करावयाचें याचा तिनें तेथल्या

तेथें स्वतःशीं विचार केला व 'हो ! असेंच' एवढे शब्द तिच्या मुखावाटे निघाले. ते अर्थात् तिचे तिला तेवढेच ऐकूं गेले.

* * *

यशोदा पुढें कोठें गेली नकळे ! कांहीं वेळानें बोलाईच्या डोंगरांत कमळा-कमळजा यांचा कैवार घणारांपैकीं एक पिळदार मराठा तरुण आणखी दहापांच गांवकरी साथीदारांना घेऊन तेथें आला. तेथें येतांच तो आपल्या साथीदारांना म्हणाला, " हेंच त्या दुस्मानाचें घर ना ? "

" होय." एक साथीदार उत्तरला.

" मग पाहतां काय ? बत्ती ठोका ! पण हें पहा, घराचे मागचे पुढचे दरवाजे अगोदर बंद करून घ्या, म्हणजे त्याच्या बायकापोरांनाही बाहेर पडतां यावयाचें नाहीं. त्याचें घरदारच काय, पण त्याच्या वंशाचा एखादा अंकुर किंवा एखादी फांदीदेखील शिल्लक राहतां उपयोगी नाहीं."

यांचें इकडे असें संभाषण चाललें होतें तेव्हांच त्या घराच्या पिछाडीला एका वृक्षाखालीं—ज्या वृक्षाखालीं यशोदा उभी राहून कांहीं वेळापूर्वीं त्या घरासमोर हिंदु-मुसलमानांची भांडाभांडी चाललेली ऐकत होती, त्याच वृक्षाखालीं कोणीएक व्यक्ति उभी राहून तें सारें ऐकत होती. ह्या व्यक्तीचा पुरुषी पेहराव थेट मुसलमानी होता, व उमरही अठरा-विशीच्या वर नसावी. कारण, उजेडांत कोणीं पाहिलें असतें तर त्या व्यक्तीला अजून मिसरूडही फुटलेली नाहीं असेंच कोणाच्याही प्रत्ययाला आलें असतें. प्रथम हा गांवकऱ्यांचा घोळका तेथें आलेला त्या व्यक्तीनें पाहिला तेव्हां तिला वाटलें कीं, ही मुसंड्यांचीच धाड आली. पण त्यांचें संभाषण जेव्हां त्या व्यक्तीला ऐकूं आलें तेव्हां तिला समाधान वाटलें. ती व्यक्ति लगेच धीरानें पुढें झाली व त्या मंडळीला म्हणाली, " तुमचें निम्मे काम मीं पूर्ण केलें आहे. तुमच्या दुस्मानाची आई, बायको व मुलगा आतां जिवंत नाहींत. तसेंच—" इतक्यांत इस्माईलच्या घरानें आंतून पेट घेतला, तिकडे बोट दाखवून ती व्यक्ति म्हणाली, " तें पहा ! घराला आग लावण्याचे श्रम घेण्याचेंही तुम्हांला कारण नाहीं."

" हें काय ? घराला आग कोणीं लावली ? " तो पुढारी मराठा तरुण

क्षणांत त्या आगीकडे पहात व क्षणांत त्या नव्या तरुणाकडे न्याहाळीत म्हणाला, " पिराजी तर आपल्यापुढें इकडे येऊन गेला नाहीं ना ? "

" आग मीं लावली!" हें उत्तर देतां देतां तो नवा तरुण त्या मराठा तरुणाच्या चेहऱ्याकडे न्याहाळून पाहूं लागला. पिराजीचें नांव ऐकतांच कां नकळे, त्याच्या मनोवृत्तींत व चेहऱ्यांत एकाएकीं बदल पडला. पण तेथें पुरेसा उजेड नसल्यानें तो बदल तेथल्या मंडळींच्या ध्यानीं मात्र येऊं शकला नाहीं.

" तूं कोण ?" त्या मराठा तरुणानें व त्याच्या इतर साथीदारांनीं त्या तरुणाला विचारलें.

" मी तुमच्यांपैकींच एक आहें." तो तरुण उत्तरला, " मीं तुमचें मनोगत प्रगट होण्यापूर्वींच तडीला नेलें आहे, यावरून मीही ह्या दुस्माना-च्या दावेदारांपैकींच एक आहें, हें तुमच्या ध्यानीं येत नाहीं काय ? "

इतक्यांत इस्माईलच्या घरानें चांगलाच पेट घेतला.

" तूं मुसलमान कीं हिंदु ? " एकानें त्या तरुणाला विचारलें.

" पेहरावावरून तर हा मुसलमान दिसतो." दुसरा म्हणाला.

" पण मुसलमान आहे तर त्यानें इस्माईलच्या घराला आग कां लावावी ?" तिसरा म्हणाला.

" गड्यांनो ! मला वाटतें, मरणाला भिऊन हा मुसंडा इस्माईलच्या द्वेषाची धूळ आमच्या डोळ्यांत फेंकून निसटून जाऊं पहात असावा. अशा दगलबाजाला ठार मारलाच पाहिजे."

" हो ! अशा दगलबाजाला ठार मारलाच पाहिजे ! " असें म्हणून बाकीचे मराठे त्या तरुणावर हत्यारें उपसून चालून गेले, पण ती व्यक्ति भीतीनें मागें न सरतां निधड्या छातीनें जागच्या जागीं उभी राहून निर्भय-पणें उद्गारली, " हां ! मला ठार माराल तर तुम्हांला पश्चात्ताप करावा लागेल. मी मुसलमान नाहीं; मी हिंदु आहें. तुम्ही मला ओळखीत नसाल; पण तुमचा साथीदार पिराजी मला ओळखतो."

" काय, पिराजी तुला ओळखतो ? " मराठा तरुणानें आश्चर्यचकित होऊन विचारलें.

" होय. ते मला ओळखतात."

" पण तुझें नांव काय ? "

" माझ्या नांवाशीं तुम्हांला काय करायचें आहे ? ते मला ओळखतात; माझें नांव त्यांना माहीत आहे. माझ्याविषयीं तुम्हीं इतका अविश्वास बाळगण्याचें कारण नाहीं. मी तुमच्यांतीलच एक आहें, तुमचें व माझें कार्यही एकच आहे. मी तुम्हांला सोडून पळून जात नाहीं; तुमच्याबरोबर यायला तयार आहें. तुम्ही आतां कुठें जाणार व काय करणार ? "

" आम्हांला आतां प्रथम यशोदेचा शोध करून तिची मोकळीक करावयाची. तिला सुरक्षितपणें स्वामी व पिराजी यांच्या स्वाधीन करावयाचें, व मग जो जो आमचा शत्रु हातीं लागेल, त्याच्याशीं झगडावयाचें."

" म्हणजे ? आतां तुम्ही मुसलमानांशीं लढणार ? "

" हो ! लढणार ! आम्ही धर्मवीर आहों; आमच्या देशासाठीं—आमच्या धर्मासाठीं—आमच्या देवांसाठीं—आमच्या आया-बहिणींच्या अब्रूसाठीं एथल्या साऱ्या अत्याचारी मुसलमानांशीं धर्मयुद्ध करण्याचें आम्हीं ठरविलें आहे."

" कुणीं तुम्हांला शिकविलें हें ? "

" आमच्या गुरूनें—आमच्या स्वामींनीं व आमच्या पुढाऱ्यानें—पिराजीनें शिकविलें."

" पण तुमचा पिराजी इस्माईलच्या कैदेंत होता ना ? "

" हो. पण त्याला आम्हीं सोडविला."

" तो कसा काय ? "

" तें सांगत इथेंच वेळ किती काढावयाचा ? आम्हांला पुढचीं कामें आहेत. प्रथम आम्हांला यशोदेचा शोध करावयाचा आहे."

" यशोदेचा पत्ता मला माहीत आहे. ती तुम्हांला पूर्वीच्या जागीं सांपडायची नाहीं." तो तरुण थोडा वेळ थांबून विचार करून म्हणाला, " तिला मुसलमानांनीं पळवून नेली आहे."

" मग ती कुठें आहे तें सांग ! "

" नाहीं. तें मी तुम्हांला सांगणार नाहीं."

" सांगणार नाहीं ? " मराठा तरुणानें आपली तरवार उगारून रागाच्या भरांत विचारलें, " सांगणार नाहींस तर तूं इथून जिवंत सुटणार नाहींस."

" मारा ! छाती असेल तर मारा ! " तो तरुण निर्भयपणें त्या सर्व

मंडळींच्या समोर येऊन छाती वर काढून उभा राहिला व म्हणाला, "मला ठार मारलेंत कीं यशोदा गेली–ती तिकडे नाहींशी झाली असें समजा. कारण यशोदा कुठें आहे याचा पत्ता एकट्या मला माहीत आहे, व मला तुम्ही मारलेंत कीं यशोदेचा पत्ता तुम्हांला लागणें अशक्य आहे. अशा स्थितींत छाती असेल, यशोदा हातची गमावण्याची तुमची तयारी असेल, तर मला ठार मारा."

"मग ती कुठें आहे तें तूं आम्हांला सांग ना? आपण तिचा शोध करून तिला पिराजीपाशीं घेऊन जाऊं." मराठा तरुण जरा नरमाईच्या भाषेंत म्हणाला. त्याचें मुख्य काम यशोदेचा शोध करणें हेंच होतें व तें तडीला जाण्यासाठीं त्याला नमतें घेणें प्राप्त होतें.

पिराजीचें नांव काढतांच तो तरुण म्हणाला, "मी पिराजीला मात्र यशोदेचा पत्ता पाहिजे तर सांगेन; तुमच्यावर माझा विश्वास नाहीं. पण पिराजीला यशोदेशीं आतां काय करायचें आहे? ती त्याची कोण?"

त्या तरुणाचा हा चमत्कारिक प्रश्न ऐकून सारे लोक विस्मयानें एकमेकांकडे पहात कुजबुजूं लागले, "हा मनुष्य अगदीं नवखा दिसतो!"

दुसरा एक मराठा म्हणाला, "हा बावळट दिसतो."

तिसरा एक आपल्या चतुरपणाच्या घमेंडींत म्हणाला, "हा त्या हराम-खोर इस्माईलचा एखादा हेर तर नसेल?"

अखेर सर्वांनुमतें ठरलें कीं, हा माणूस जरी कोणीही असला तरी आपण त्याला नीट सावधपणें पिराजी व स्वामी यांच्यापाशीं घेऊन जावें. तिथें यानें यशोदेचा पत्ता बरोबर सांगितला तर ठीक, नाहींतर—"

त्या मराठा गड्याचें संभाषण तो तरुण जवळच उभा राहून ऐकत होता; तो म्हणाला, "नाहींतर मग तुम्ही खुशाल मला ठार मारा. मग तर झालें?"

आतां ह्या मनुष्याला अगोदर पिराजी व स्वामी यांजकडे घेऊन जाणेंच योग्य, असें पाहून सर्व मराठे आपले पुढील सारे बेत तात्पुरते रहित करून त्या तरुणाला नीट सर्वांच्या मध्यें घालून सावधपणें चालवूं लागले.

## दर्शन अठ्ठाविसावें

# पिता-पुत्रांची भेट

आतां उदईक सेनाकर्ते आपल्या हातीं लागणार असें कृष्णराव प्रतिनिधीला त्याच्या विश्वासांतील शतवीराकडून जेव्हां निश्चितपणें कळलें, तेव्हां त्याच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. त्यानें तावडतोब ही आनंदाची वार्ता एका जासुदाहातीं सेनापतीला कळविण्याची तजवीज केली, व आपल्या साऱ्या सैन्यालाही इषारत दिली, कीं आतां एथल्या लढाईचा प्रसंग टळला. आपल्या अथवा आपल्या शत्रूच्या रक्ताचा एकही थेंब रणांगणावर न सांडतां हा मर्दवीर एवढा मोठा विजय मिळवूं शकला, याबद्दल त्याची पाठ थोपटण्याला तेथें कोणी नसल्यानें व जें त्याचें सैन्य म्हणून त्याच्या सभोंवार होतें, तें योग्य वेळीं त्याला नकळत त्याची पाठ थोपटण्याला टपून बसलें असल्यानें, त्यानें स्वतःच स्वतःची पाठ थोपटून घेतली कीं, धन्य ! धन्य मी कृष्णराव प्रतिनिधि ! इतक्या चतुराईनें मी प्रत्यक्ष युद्धप्रसंग न आणतां सेनाकर्त्यासारख्या जहरी सापाला नुसत्या दराऱ्यानें दबवून दोरीसारखा सरळ आणला, तसाच त्याला दोरीनें बांधून एकदां कोल्हापूरला ताराबाई आईसाहेबांसमोर नेऊन गुदरला, कीं ताराबाई आईसाहेब परमसंतुष्ट होऊन मला तेव्हांच आपला प्रतिनिधि नेमतील !

कृष्णराव भावी विजयानें इतका बेहोष झाला आहे असें त्याच्या भोंवतालच्या कावेबाज शतवीरांनीं पाहिलें, तेव्हां आपली इष्ट कार्यसिद्धि होईतों कृष्णरावाला गुंगविण्याला त्यांना हा खासा मंत्र सांपडला. तेव्हांपासून ते भाटांसारखे त्याच्या सभोंवार त्याचीं स्तुतिस्तोत्रें गात होते. ह्या विजयाचे आपणही वांटेकरी आहों त्याअर्थीं आपणांला सैन्यांत बढती मिळाली पाहिजे असें रडगाणें–नव्हे, हंसगाणें गाऊन कृष्णरावाला त्यांनीं सारा दिवस अगदीं सतावून सोडलें होतें.

पुढें रात्र झाली, बहुतेक मंडळी आपापल्या जागीं झोंपी गेली, तेव्हां शतवीरांना चांगलें फावलें. त्यांनीं आपल्या काबूंत असलेल्या साऱ्या सैन्याला आगाऊ इषारा देऊन ठेवल्याप्रमाणें तें सैन्य झोंपेचें सोंग घेऊन इष्ट वेळेची

वाट पहात जागत होतें. त्या दिवशींचे पहारेकरीही कृष्णरावाच्या मर्जींतील शतवीरांनीं 'कदाचित् सेनाकर्ते कांहीं फितूर करून पळतील' ह्या सबबीवर जे नेहमींचे ते बदलून नवे ठेवले होते. त्यांतले बरेचसे त्या कटवाल्यांपैकीं होते हें सांगावयाला नकोच.

अशी इकडे गडाच्या पायथ्याशीं शतवीरांच्या कारस्थानाची कल्पनेबाहेर सांगता झाली. तेवढ्यांत मध्यरात्र झाली. एक शतवीर सावधपणें बाळाजी-पंतांना ही खबर देण्यासाठीं गेला. लगेच बाळाजीपंत नारायण व चिमाजी ह्या दोघां मुलांना घेऊन गड उतरून खालीं आले. कृष्णरावाच्या सैन्याचा तळ मुख्यतः गडाच्या पायथ्यापासून एक अष्टमांश कोसाच्या अंतरावर होता, व तेथवर जागोजागीं त्याचे खडे पहारे होते. त्या पहाऱ्यांपैकीं बहुधा सर्व पहाऱ्यांवरील सारे किंवा एक दोन तरी पहारेकरी बाळाजीपंतांच्या खाल्ल्या मिठाला जागणारे होते. जेथें सर्वच पहारेकरी त्यांचे होते, तो पहारा त्यांना बिनबोभाट ओलांडून जातां आला, व जेथें कांहीं कृष्णरावाचे लोक होते, तेथें बाळाजीपंतांच्या वतीच्या इतर पहारेकऱ्यांनीं त्यांना जेथल्या तेथें ठार करून धन्याला मोकळा रस्ता करून दिला. अशी सर्व परिस्थिति अनुकूल असल्यानें प्रत्यक्ष शत्रुसैन्याच्या फळीपर्यंत बाळाजीपंत दोन्ही मुलांसह बिनबोभाट जाऊं शकले; पण तेथवर पोंचतात तोंच सैन्यांत कृष्णरावाच्या पक्षाचे जे लोक होते त्यांनीं ओरड सुरू केली. प्रसंग तर बिकट आला खरा. पण यांतूनही पार कसें पडावें हें या कारस्थानाच्या सूत्रचालक शतवीरांना चांगलें माहीत होतें. आतां ओरड व्हावयाची थांबत नाहीं असें पाहून त्यांतलेच दोनचार म्होरके सर्वांच्या अगोदर कृष्णरावाच्या डेऱ्यापाशीं ओरडत गेले, "प्रतिनिधि ! सेनाकर्ते दगा देऊन पळत आहेत. आतां कसें करावयाचें ?"

अशा वेळीं कृष्णराव काय किंवा त्याच्या जागीं दुसरा कोणी जबाबदार सेनाधिकारी असता तरी तो काय, 'शत्रूचा पाठलाग करून त्याला कैद करा' यापेक्षां निराळें काय सांगणार ? कृष्णरावानेंही तेंच सांगितलें. लगेच तो स्वतःही शस्त्रास्त्रांनीं सज्ज होऊन लढाईला निघाला. पण सैन्यांत जाऊन पहातो तों काय ? सारेंच तिरपागडें झालेलें ! त्याच्या तोंडून हुकूम निघण्या-पूर्वींच त्याचें बहुतेक सैन्य बाळाजीपंतांचा पाठलाग करण्यासाठीं म्हणून चालूं लागलें होतें. बाळाजीपंत व नारायण आणि चिमाजी यांच्यासाठीं आमच्या

वीरांनीं घोडे सरंजामून तयार ठेविले होतेच. बाळाजीपंतांच्या मनांतून नारायण व चिमाजी यांनीं अशा धोक्याच्या वेळीं आपणाबरोबर येऊं नये असें होतें. पण ते पाणीदार पोरगे मुळींच ऐकेनात. अखेर त्या दोघांना बरोबर घेऊन त्या घोड्यांवर स्वार होऊन बाळाजीपंत निघाले. त्यांच्या-सभोंवतीं त्यांच्या रक्षणासाठीं शंभर निवडक घोडेस्वारांच्या तुकडीनें कडें तयार केलें, व सर्वजण पुरंदरच्या अनुरोधानें चालूं लागले. ते जणुं काय पुढें पळत होते व इतर बहुतेक सैन्य त्यांचा पाठलाग करीत होतें! इतक्या सावधपणें आपलें सैन्य ज्याअर्थीं बाळाजीपंतांचा पाठपुरावा करीत आहे, त्याअर्थीं ते आपल्या सैन्याच्या हातून निसटणार नाहींत खास, असे इकडे कृष्णराव मनांत मांडे खात उभा होता. पण अंदरकी बात निराळीच होती!

जोंवर कृष्णराव कांहीं चाळवाचाळव करीत नव्हता, तोंवर त्याच्या विश्वासांतील शतवीर त्याच्यासभोंवार अगदीं आज्ञाधारक नोकरसे आपल्या धन्याच्या जिवाला जीव देण्यासाठीं उभे होते. पण तेथें खुद्द त्याच्या विश्वासांतील सैन्याच्या दोन तुकड्या शिल्लक होत्या, त्यांच्यासह सेनाकर्त्यांच्या मागावर चालून जाण्याची चळवळ तो करूं लागला, तेव्हां मात्र पूर्वसंकेतानुसार गडाच्या पायथ्याशीं गडकऱ्याचें सैन्य गडाच्या रक्षणासाठीं उभें होतें, तें चालून आलें. त्या सैन्याची व कृष्णरावाच्या सैन्याची कांहीं वेळ चांगलीच लढत जुंपली. त्या लढतींत मात्र कृष्णरावाच्या विश्वासांतील शतवीरांनीं आपलें खरें स्वरूप प्रगट केलें. त्यांनीं हां हां म्हणतां कोणाला नकळत त्याला कैद करून गड-कऱ्याच्या स्वाधीन केलें. तेव्हां कोठें कृष्णरावाचे डोळे उघडले! पण डोळे फार उशिरां उघडले. त्यामुळें त्याच्या डोळ्यांना दिसलें काय? आपला शत्रु पळाला, आपल्या सैन्यानें आपणाला ऐन वेळीं दगा दिला, व ज्यांना आपण आपल्या जिवाचे कलिजे मानले, त्यांनींच आपला शेवटीं घात केला.

गडकऱ्याच्या सैन्याला कृष्णरावाच्या सैन्याच्या एका तुकडीचा मोड करावयाला मुळींच प्रयास पडले नाहींत. त्यांतूनही प्रत्यक्ष सेनाधिकारी गड-कऱ्याच्या हातीं सांपडला तेव्हां तर त्याच्या सैन्याचा सारा धीर खचला व त्याची दाणादाण उडून गेली.

बाळाजीपंतांचें भाग्य थोर, म्हणून त्यांना त्यांच्या सैन्यासह पुरंदरला येऊन पोंचेपावेतों वाटेंत कांहींसुद्धां विघ्न अडथळा करूं शकलें नाहीं. ते

पुरंदर गडाच्या पायथ्याशीं जाऊन पोंचले, तों सचिवांचा कारभारी राजेकर आपले कांहीं निवडक लोक बरोबर घेऊन बाळाजीपंत व सचिवांचा पुत्र नारायण ऊर्फ नारो शंकर यांच्या स्वागतार्थ सामोरा आला.

पुरंदरावर आपला इतका आदर होईल अशी बाळाजीपंतांची कल्पना नव्हती. कारण, थोड्या दिवसांपूर्वीं एथूनच त्यांना विन्मुख जावें लागलें होतें. ते राजेकरांना पाहतांच म्हणाले, " दिवाणजी ! आपणाला आमच्या आगमनाची वार्ता कशी कळली ? "

बाळाजीपंतांच्या प्रश्नाला राजेकर कांहीं उत्तर देणार, तोंच नाथाजी व पिलाजी इतका वेळ बाजूला उभे होते, त्यांनीं पुढें होऊन बाळाजीपंतांच्या पायांवर डोकीं ठेवलीं.

" कोण ? नाथा ! पिलाजी ! " बाळाजीपंतांनीं त्या आपल्या आवडत्या शतवीरांकडे पाहून आश्चर्य व आनंद यांनीं युक्त अशा प्रसन्न मुद्रेनें पहात विचारलें, " ही सारी तुमची कामगिरी वाटतें ? "

राजेकर म्हणाले, " होय ! सेनाकर्ते ! आपले हे दोघे शतवीर परम-प्रतापशाली आहेत. आपण असले धन्याच्या जिवाला जीव देणारे शतवीर जवळ केले आहेत, म्हणून मी म्हणतों, यांचा कडेकोट आपणांसभावार असेतों आपणांला काळिकाळाचेंही भय नाहीं."

" एकूण आमची पांडवगडावरून सुटका ज्या कारस्थानामुळें झाली, त्या कारस्थानाचे सूत्रचालक तुम्हीच वाटतें ? " बाळाजीपंत नाथाजी व पिलाजी यांच्या पाठीवरून प्रेमानें हात फिरवीत म्हणाले.

" होय सरकार ! " पिलाजी नम्रपणें उत्तरला.

" आतां तरी सांगा, हीं कारस्थानें तुम्हीं कसकशीं पार पाडलीं ? " बाळाजीपंतांनीं विचारलें.

" कारस्थानें आम्हीं कसलीं पार पाडलीं सरकार ! ही आपल्या व आपल्या मस्तकावर ज्या दोघां गुरुमाउलींचें कृपाछत्र सदैव रुळत आहे, त्यांच्या कृपेची सारी करामत आहे." पिलाजी म्हणाला, " खंडोबाच्या देवालयांत जो अनर्थ झाला, त्यांतून आम्ही दोघे वांचलों ते तेथेंच भुलेश्वराच्या देवालया-खालील गुप्त गुहेंत वास करणाऱ्या स्वामींच्या कृपेनें वांचलों, हें आपणांला कळलेंच असेल."

"होय." बाळाजीपंत उद्गारले, "बरें; पुढें ?"

"पुढें स्वामींनीं आम्हां दोघांपाशीं दोन चिठ्या देऊन मला पांडवगडावर व नाथाजीला इथें सचिवांकडे पाठविलें. वाटेनें येतांना आम्हीं आमच्या अल्पमतीप्रमाणें आपल्या सुटकेचा कांहीं बेत केला; तोच पुढें तेथें येऊन अंमलांत आणला. तो पुढें कसा यशस्वी झाला हें आपण सर्व आतां पहातच आहों. पण हें यश आमचें दोघांचें नाहीं. मानाजी व इतर शतवीर मला पांडवगडाच्या आसपास भेटले, म्हणून सारा बेत जुळला."

इतक्यांत दुरून एकाएकीं शंखनाद ऐकूं आला, व मशालींचा उजेडही दिसला; त्यावरून सर्वांना वाटलें, शत्रु आपला पाठलाग करीत आला. बाळाजीपंतांनीं आपल्या व राजेकरांनीं आपल्या सैन्याला सज्ज होण्याची इषारत दिली. शंखनाद प्रथम नीटसा ऐकूं आला नव्हता, तो पुन्हा ऐकूं आला, तेव्हां बाळाजीपंत नाथाजी व पिलाजी यांना तो ओळखीचासा वाटला, म्हणून ते कान देऊन ऐकूं लागले. खासे व आघाडीचे लोक ऐकूं लागले म्हणून पिछाडीचे लोकही ऐकूं लागले.

"स्वामी आल्याची ही खूण असावी. स्वामींच्या भार्गवदत्त शंखाचा ध्वनि आमच्या पूर्ण परिचयाचा आहे." असें बाळाजीपंत म्हणतात व नाथाजी-पिलाजीही ध्वनि ओळखल्यासारखें करून मान डोलवितात, तोंच दुरून दौडत येणारे स्वार जवळ आल्याचें त्यांच्या हातांतील मशालींवरून दिसलें. आणखी जराशानें ते आणखी पुढें आले तेव्हां नाथाजी व पिलाजी यांनीं प्रथम त्यांतल्या एकाला ओळखलें. तो कंठाजी होता.

"सरकार ! हे आपलेच लोक दिसतात." मानाजी म्हणाला.

इतक्यांत ते पांचही स्वार तेथें येऊन हजर झाले. कंठाजीला सर्वांनीं ओळखलेंच होतें; बाकीच्यांचा भगवा पेहराव पाहून बाळाजीपंतांनीं ओळखलें कीं हे सैनिक स्वामींच्या शिष्य-परिवारांतील असावे. अर्थात् स्वामी येत असल्याचें तें सूचक असावें.

"सरकार ! धाकटे धनीसाहेब व धावडशीकर स्वामी येत आहेत." कंठाजी म्हणाला.

"मग ते कुठें आहेत ?" बाळाजीपंतांनीं विचारलें.

"ते दूर उभे आहेत. आपण स्वामींच्या शंखाचा ध्वनि ऐकला नाहीं;

का ? आपली पांडवगडावरून सुटका झाली किंवा नाहीं हें आम्हांला कळण्याला कांहीं मार्ग नव्हता. पण सुटका झाली असेल तर आपण नारायणस्वामींच्या चिठीप्रमाणें इथें–पुरंदरला आलां असाल, अशी आमची कल्पना होती. दुरून आम्हांला हें सैन्य दिसलें पण हें आपलेंच असेल अशी आमची खात्री होईना. म्हणून स्वामींनीं शंख वाजविला. आपण त्याला प्रत्युत्तर म्हणून शिंग कां फुंकलें नाहीं ?"

" खरेंच !" बाळाजीपंत पिलाजीकडे वळून म्हणाले, " मानाजी ! शिंग फुंक, म्हणजे आपण इथें आल्याची खबर बाजी व स्वामी यांना मिळून ते इकडे येतील."

मानाजीनें शिंग फुंकलें. थोड्याच वेळांत बाजीराव, स्वामी व दहावीस इतर भगव्या पेहरावांतील सैनिक तेथें दौडत आले. स्वामींचे शिष्य लढवय्ये आहेत हें अनेकांना माहीत होतें. पण स्वामींना अश्वारूढ लढवय्याच्या वेशांत पाहण्याचा बाळाजीपंतांच्या व इतर मंडळींच्या आयुष्यांतील हा पहिलाच प्रसंग होता. त्यांना पाहतांच सर्वांना पराकाष्ठेचा विस्मय वाटला. ती मंडळी जवळ येतांच घोड्यांवरून खालीं उतरली. प्रथम बाळाजीपंतांनीं स्वामींच्या चरणांवर मस्तक ठेवलें. इतर झाडून साऱ्या सैनिकांनीं स्वामींना लवून मुजरा केला.

स्वामी सर्वांना आशीर्वाद देऊन म्हणाले, " श्रीभार्गवरामाचे कृपेनें एथवर तर आपल्या बेतांस सुयश लाभलें म्हणावयाचें."

" होय. पण गुरुदेव ! आमच्या रक्षणासाठीं आपणांला आपलीं ब्रह्मकर्में सोडून क्षात्रकर्माची दीक्षा घ्यावी लागली ! " बाळाजीपंत म्हणाले.

" हो ! क्षात्रकर्माची दीक्षा आम्हांस घ्यावी लागली खरी ! पण आम्ही हें सारें करतों तें तुमच्या भरंवशावर करतों. तुमचा व शाहूराजांचा विजय व्हावा, तुम्हां उभयतांच्या हातून हिंदवी-स्वराज्याची यथान्याय पुन्हा संस्थापना व्हावी, गो-ब्राह्मणांचा प्रतिपाळ व्हावा, देवाधर्माचें रक्षण व्हावें, एवढी राजा व प्रधान यांची घडी आम्हीं नीट बसवून दिली कीं आम्ही फिरून स्नान-संध्या व तपाराधना करण्यास मुक्त होऊं. स्वजनांचा, स्वधर्माचा व स्वराज्याचा घात अविंधांच्या हातून अहर्निश होत असलेला आमच्यानें पहावत नाहीं, म्हणून—

अग्रतश्चतुरो वेदान्पृष्ठतः सशरं धनुः
इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि'

अशी ब्रह्म-क्षात्राची संयुक्त दीक्षा घेणें आम्हांस भाग पडलें. ही दीक्षा घेण्यास आम्हांस तुमच्या ह्या पराक्रमशाली चिरंजीवांनीं भाग पाडलें. तिकडे इस्माइलादि अविंधांनीं मोठ्या जमावानें अत्याचारांचा कडेलोट चालविला आहे; त्यांच्या पारिपत्यासाठीं हा तुमचा चिमणा वीर खरा धर्मवीर बनून सडाच निघाला, तेव्हां ह्या प्रतीवीर अभिमन्यूला पाठीशीं घालण्यासाठीं आम्हांस क्षात्रकर्माचें अवलंबन करणें प्राप्त झालें. पण आतां बोलत बसून वेळ दवडण्यांत अर्थ नाहीं. तुम्हीं आतां पुढें काय करण्याचें योजिलें आहे ?"

"स्वामी ! मी माझ्या मनांतून प्रथम साताऱ्याला जाऊन महाराजांची भेट घेऊन मग त्यांच्या आज्ञेनुसार काय तें करण्याचें ठरविलें आहे. तिकडे राजकारणाच्या काय काय नवीन भानगडी उत्पन्न झाल्या असतील त्याचा नेम नाहीं." बाळाजीपंत बाजिरावाकडे वळून म्हणाले, "बाजी ! यावर तुझें मत काय ?"

"माझें मत मी काय देऊं ? जशी स्वामींची आज्ञा व आपली इच्छा ! मला मात्र माझ्या स्वीकृत कार्याच्या सिद्धीसाठीं जाण्याची आज्ञा व्हावी."

"पण सेनापतीच्या हालचालीविषयीं कांहीं खबर ?" स्वामींनीं विचारलें.

इतक्यांत एक घोडेस्वार दौडत दौडत तेथें जो आला, तो थेट बाळाजीपंतांसमोर येऊन त्यांना मुजरा करून म्हणाला, "सरकार ! सरलष्कर व पुरंदरे यांच्या सैन्याशीं सेनापतीच्या सैन्याची चांगलीच लढाई झाली. सूर्यास्ताला लढाईला प्रारंभ झाला, ती तीन प्रहरपर्यंत सारखी झुंज चालली होती. आपली मुक्तता होणार हें अगोदरच सरलष्कर व पुरंदरे यांना आपल्या माणसांकडून कळल्यानें सेनापतीशीं सामना देण्याला त्यांना जास्त जोर आला."

"पण शेवट काय झाला ?" बाळाजीपंतांनीं विचारलें.

"शेवट व्हायचा तो झाला. सेनापति पराजित होऊन पळाले. त्यांच्या सैन्याची दाणादाण उडूं लागली. पुरंदरे व सरलष्कर आणि ते यांचे घोडें समोरासमोर आले, तेव्हां पुरंदऱ्यांनीं त्यांची घाल घाल समजूत घालून पाहिली; असा स्वामिद्रोह करूं नये असें कानींकपाळीं ओरडून सांगून पाहिलें; पण त्यांची समजूत पडेना आणि सलोख्याची भाषा त्यांना रुचेना.

'सेनाकर्त्यासारख्या भटाला पाठीशीं घालून महाराजांनीं माझा व साऱ्या मराठमंडळाचा अक्षम्य अपराध केला आहे, त्याअर्थी याउप्पर महाराज माझे उघड उघड शत्रु झाले. याउप्पर सातारा राजधानींत येईन तो भटांचा बीमोड करून महाराजांना त्यांच्या सिंहासनावरून फरफरां ओढून कैद करण्यासाठीं मोगलांचा पाठिंबा घेऊन येईन. मराठी राज्याची सातारा राजधानी नामशेष करून कोल्हापूरची गादी व राजधानी यशस्वी करून दाखवीन, तरच जाधवांच्या वंशाचें नांव सांगेन' अशी घनघोर प्रतिज्ञा करून सेनापति आपल्या पराजित फौजेनिशीं कोल्हापुराकडे निघून गेले. आतां पुरंदरे व सरलष्कर उजाडतांच राजधानीकडे जावयाला निघणार आहेत."

" ठीक आहे. त्यांना म्हणावें, आमची सुखरूपपणें मुक्तता झाली असून आम्हीही लौकरच राजधानींत येतों. कृष्णरावाचा पुरा मोड होऊन तो कैद झाला आहे असेंही त्यांना सांग." असा उलट जबाब देऊन बाळाजीपंतांनीं त्या घोडेस्वाराला परत सरलष्करांकडे रवाना केलें. नंतर ते स्वामींकडे वळून म्हणाले, "अखेर सेनापतींनीं ह्या थराला गोष्टी आणल्या !"

स्वामी म्हणाले, " विधिघटनाच तशी होती, त्यास कोण काय करणार ? पण आतां तुम्ही काय करणार ?"

असेंच्या असेंच साताऱ्याला जावें असा ह्या वेळपर्यंतचा बाळाजीपंताचा मानस होता; पण सेनापति मोगलांना उघड उघड सामील होण्याच्या इराद्यानें निघून गेला असें कळतांच त्याच्या भावी मसलतींना जातां जातां शक्य तितका पायबंद लावणें अवश्य आहे असें त्यांच्या मनानें घेतलें. हा पायबंद लावावयाचा म्हणजे ज्या इस्माईलच्या पाताळयंत्रांनीं जाधवांचें मोगलांशीं सूत जमूं पहात होतें, त्या इस्माईलला पकडून जगांतून नाहींसा करणें हा होय. शिवाय महाराजांकडे जावयाचें तें अशा निष्क्रिय स्थितींत महाराजांना तोंड दाखवावयाचेंही बाळाजीपंतांच्या जिवावर आलें होतें. ते स्वामींना म्हणाले, "स्वामी ! सेनापति मोगलांकडे गेले तरी त्यांच्या फितुरीचा अर्धा प्राण इस्माईल अजून आपल्या कह्यांत आहे. तो जर हातचा मोकळा सुटला, तर त्याच्या मदतीनें सेनापति काय करतील व काय नाहीं याचा नेम नाहीं. यास्तव सेनापतींच्या ह्या कारस्थानाचे पुरे पाय मोडण्यासाठीं प्रथम इस्माईलचा नाश करावा व मग साताऱ्याला जावें असें मला वाटतें."

"ह्या योजनेस आमची संमति आहे." स्वामी म्हणाले, "त्या अधर्म्याचें पारिपत्य झाल्याशिवाय अन्नग्रहण करावयाचें नाहीं व श्रीभार्गवरामही निर्माल्यांतच रहावयाचा असा आमचाही पण आहे. पण सचिवांस सांगितलेली कामगिरी? सचिवांस भेटून त्यांना आम्ही पुन्हा एकवार त्यांच्या कर्तव्याची जाणीव देऊं इच्छितों."

राजेकर इतका वेळ सचिवांविषयीं कांहींच बोलले नव्हते, ते आतां म्हणाले, "स्वामी! सचिव कालच नारायणस्वामींची चिठी पावतांच थोरातावरील मोहिमेचें काम मी व धाकटे धनीसाहेब यांच्यावर सोंपवून यापुढें सर्वसंगपरित्याग करावयाचा असा निश्चय करून आम्हां सर्वांना नकळत कोठें गेले त्याचा पत्ता नाहीं!"

"काय? सचिवांनीं सर्वसंगपरित्याग केला?"

"काय? बाबा सर्वसंगपरित्याग करून निघून गेले?" नारायण ऊर्फ नारोशंकर यानें एकदम खचल्यासारखें होऊन विचारलें.

"होय!" एवढेंच तुटक उत्तर यावर राजेकरांच्या मुखावाटे बाहेर पडलें.

"आणि वहिनी वगैरे मंडळी कुठें आहेत?" बाळाजीपंतांनीं विचारलें,

"सारी मंडळी दोन दिवसांपूर्वींच सासवडला रवाना झाली आहे." राजेकर नारोशंकराकडे वळून म्हणाले. "आणि धाकटे धनीसाहेब! स्वामींनीं चिठ्ठींत 'तुम्ही शाहूमहाराजांच्या हितासाठीं यापुढें तरी जपण्याचें शहाणपण करून सेनाकर्त्यांची मुक्तता होईल असें करून लगेच थोराताचा मोड करण्यासाठीं मोहिमेवर जाणें उचित' असें लिहिलें होतें. ती कामगिरी थोरल्या धनीसाहेबांनीं तुम्ही आणि मी अशा उभयतांवर सोंपविली आहे व तुम्हांला असा आशीर्वादपूर्वक निरोप दिला आहे कीं, आपण ताराबाई आईसाहेबांशीं सदैव राजनिष्ठ राहाण्याची शपथ घेतली होती ती अखेरपावेतों पाळली; पण त्या शपथेची पाळणूक आपणाबरोबरच संपली. आतां तुम्हीं—धाकटे धनीसाहेब! तुम्हीं शाहूमहाराजांशीं आजच स्वामिनिष्ठ राहून महाराजांच्या पायांची सेवा करावी; थोरातांचा मोड करण्याची कामगिरी तुम्ही पार पाडून त्या यशाच्या जोरावर महाराजांपाशीं जाऊन सत्तेनें सचिवपद मागून घ्यावें; त्यांत तुम्ही यशस्वी व्हाल; असा थोरल्या धनीसाहेबांचा तुम्हांला अखेरचा आशीर्वाद आहे."

" बाबांची आज्ञा, इच्छा व आशीर्वाद मला शिरसामान्य आहे." नारोशंकर स्वामी व बाळाजीपंत यांजकडे वळून म्हणाला, " स्वामी ! नानासाहेब ! मी आतां राजेकरांसह थोरातांवर चालून जातों. त्याचा मोड करून विजयी होईन तेंव्हांच शाहूमहाराजांच्या पायांपाशीं सचिव-वंशाच्या स्वामिनिष्ठेच्या खंडणीची भरपाई करण्यासाठीं येईन. तोंपर्यंत महाराजांना तोंड दाखविणार नाहीं व माझ्या मातेलाही तोंड दाखविणार नाहीं." नारोशंकर लगेच राजेकरांकडे वळून म्हणाला, " दिवाणजी ! मोहिमेची तयारी करा."

स्वामी व बाळाजीपंत या दोघांनाही सचिव बापलेकांपैकीं कोणाचें कौतुक करावें हेंच कळेना. त्यांनीं दोघांविषयींही धन्योद्गार काढले व नारोशंकर याला अनेक उत्तम आशीर्वाद देऊन थोरातावरील मोहिमेवर जाण्याला मोकळीक दिली. लगेच बाकीच्या सर्वांनीं इस्माईलचें पारिपत्य करावयाला जावयाचें ठरलें. त्याप्रमाणें वाटेला लागतांना नाथाजी व पिलाजी यांनीं पुढें होऊन हात जोडून बाळाजीपंतांना विनंति केली, " सरकार ! एक दावेदार सर्प अर्धवट ठेंचला जाऊन तसाच पांडवगडावर जिवंत राहिला आहे. तो मोकळा सुटला तर दावा धरून पुन्हा अनर्थ करावयाचा. त्याला बांधून आणावयाला नको काय ? "

" खरेंच ! " बाळाजीपंत म्हणाले, " त्या सापाला बांधून आणावयाला पाहिजे खरेंच."

" मग तें काम त्या दोघांवर सोंपवावें." बाजीराव म्हणाला. नाथाजी व पिलाजी यांच्या मनांतीलच गोष्ट बाजीराव बोलला.

बाजीरावाची योजना बाळाजीपंत व स्वामी या दोघांनाही मानवली. बाजीराव त्या दोघांना निरोप देतांना म्हणाला, " नाथा ! पिलाजी ! त्या सापाला पकडून घेऊन तुम्ही लौकर भुलेश्वरीं या. तेथें आपण पुढील बेत ठरवूं. मग मीं स्वामींपाशीं बोलणें करून व महाराजांना सांगून तुमचा योग्य गौरव करावयाला लावीन."

बाजिरावाच्या ह्या संदिग्ध बोलण्याचा खरा अर्थ नाथाजी व पिलाजी यांना कायतो कळला. बाजीराव बोलला तें स्मित हास्य करीत बोलला, व त्या दोघांनीं तें ऐकलें तेंव्हां त्यांच्याही चेहऱ्यावर स्मित हास्य झळकलें.

## दर्शन एकुणतिसावें

# आणीबाणीची वेळ

नारायणस्वामी बोलाईच्या डोंगरावर लाभलेल्या धर्मवीरांना समागमें घेऊन पहांटेच्या प्रहरीं गांवांत आले व त्या लोकांनीं प्रथम हर उपायांनीं पिराजीची सुटका केली. इस्माईल इकडे आपल्या घरच्या गोंधळांत गुंतलेला असल्यानें त्याला पिराजी व यशोदा यांवर नजर ठेवतां आली नाहीं, त्यामुळें स्वामींच्या प्रोत्साहनानें धर्मयुद्ध करावयाला सज्ज झालेल्या मराठ्यांना पिराजी-ची मोकळीक करणें सुलभ गेलें. एवढा एक लढवय्या हातीं लागल्यावर त्याच्या नेतृत्वाखालीं इस्माईल व इतर मुसलमान यांच्याशीं झगडण्याला तेथल्या गांवकऱ्यांना स्फुरण आलें. त्यांनीं मग घरोघरचे सर्व तरुण मराठे गांवा-बाहेर बोलाईच्या डोंगराच्या पायथ्याशीं एकत्र जमविले. ते आधींच चिडलेले होते, व 'मारूं किंवा मरूं' अशा निर्धारानें इस्माईल व इतर अत्याचारी मुसलमान यांच्याशीं झगडून त्यांचा नायनाट करण्याइतकी त्यांच्या मनाची तयारी आधींच झालेली होती. तशांत त्यांना पिराजीसारखा कसलेला शतवीर नेता व नारायणस्वामींसारखे गुरु मिळाले, मग काय विचारतां ! ज्यांच्या-पाशीं युद्धोपयोगी हत्यारें होतीं ते तर लढवय्ये सजलेच; पण ज्यांच्यापाशीं तीं नव्हतीं, तेदेखील लाठी, कुदळ, खोरें, विळा, कोयता, पिकाव, सुरी जें काय हातीं सांपडलें, तें घरांतून उचलून घेऊन मुसलमानांविरुद्ध लढावयाला, 'मारूं किंवा मरूं' अशा ईर्षेनें तयार झाले. त्यांच्या अंगीं नवचैतन्य उत्पन्न करण्याचें स्वामींना कांहींच कारण उरलें नाहीं. उलट ह्या खवळलेल्या जन-समूहाच्या हातून शत्रूंचा निःपात होतांना अधर्म होऊं नये एवढयासाठीं मात्र त्यांना उपदेश करणें भाग पडलें: "बाबांनो ! शत्रूचा मोड करतांना एक गोष्ट ध्यानीं ठेवा कीं, अधर्म आपल्या हातून होऊं द्यावयाचा नाहीं, अत्याचार करावयाचा नाहीं. खरा हिंदु कधीं देवाचा अपमान करावयाचा नाहीं, स्त्रियांच्या अब्रूवर घाला घालावयाचा नाहीं, व अधर्माचरण करावयाचा नाहीं. तुम्ही खरे हिंदु आहां. तुम्ही शत्रूविरुद्ध जिवावर उदार होऊन उठलां ते शत्रु तुमच्या देवदेवालयांचा विध्वंस करतात, तुमच्या आया-बायका-बहिणींची

अब्रू घेतात, तुम्हांला बलात्कारानें बाटवितात, तुमच्या गोमातांच्या मानांवर सुरी फिरवतात, असा सर्वतोपरी अधर्म करतात; त्या अधर्माचा व तो करणाऱ्या अधर्म्यांचा नाश करून तुम्हांला तुमचा धर्म, तुमच्या आया-बहिणी-बायका, तुमचीं मुलें यांची अब्रू राखावयाची आहे. तुमच्या गोमातां-च्या मानेवर चालणारी मुसलमानांची सुरी बोथट करावयाची आहे. हें धर्मकार्य आहे, हें धर्मयुद्ध आहे. भूपृष्ठावर जेथें जेथें अधर्म दिसेल, तेथें तेथें त्याचा प्रतिकार करून धर्मरक्षण व देशरक्षण करणें हें प्रत्येक धर्म-वीराचें कर्तव्य आहे. तें कर्तव्य तुम्हीं पार पाडलेंच पाहिजे. पण तें पार पाडतांना एवढी जागरूकता ठेवावयाची कीं, अधर्माचें शासन अधर्मानें करावयाचें नाहीं; धर्मानें करावयाचें. मुसलमान तुमचीं देवदेवालयें विध्वं-सितात म्हणून तुम्हीं हिंदूंनीं त्यांच्या मशिदी व त्यांचे दर्गे विध्वंसावयाचे नाहींत; जसें तुम्हां हिंदूंचें देवालय हें देवाचें अधिष्ठान, तसेंच मुसलमानांची मशीद किंवा दर्गा हेंही देवाचेंच अधिष्ठान होय, व त्या अधिष्ठानाचा अपमान केल्यानें देवाचा अपमान केल्याचें महत्पाप लागतें. मुसलमान तुमच्या आया-बहिणी-बायकांवर अत्याचार करतात म्हणून तुम्हीं त्यांच्या आया-बहिणी-बायकांवर अत्याचार करावयाचे नाहींत. कारण परस्त्री कोणत्याही धर्माची अथवा जातीची असो; ती आपली माता-भगिनी-समान होय. ज्या स्त्रीजातीच्या उदरीं आपण जन्म घेतों त्या स्त्रीजातीची अब्रू घेण्यानें आपण आपल्या माता-भगिनींची अब्रू घेतल्याच्या महत्पापाचे धनी होतों. निरपराधी लोक, अनाथ अबला व अनाथ मुलें यांचा संहार करावया-चा नाहीं; कारण निरपराधी जीवांची हत्या केल्यानें तुम्ही पापाचे धनी व्हाल. ह्या तीन धर्मतत्त्वांना स्मरून तुम्ही धर्मयुद्ध करा; तरच तुम्ही विजयी व्हाल. याप्रमाणें वर्तन ठेवण्याची शपथ अगोदर घ्या, व मग परमेश्वराचें नांव घेऊन धर्मयुद्धाला सज्ज व्हा."

याप्रमाणें सर्व हिंदूंना शपथा घ्यावयाला लावून मग स्वामींनीं त्यांना इस्माईल आदिकरून मुसलमानांशीं लढण्याची संमति दिली. लगेच सर्व लोक 'हरहर महादेव' अशी गर्जना करून समराला सज्ज झाले. आतां समर करावयाचा तर तो समोरासमोर थोडाच करतां येतो! अर्थात् सारा धरपकडीचा व हमरातुमरीचा कारभार! प्रथमतः हिंदूंचा विचार इस्माईल,

काजी महंमदखान, फकीर खोजाहुसेन व हकीम शौकतखान यांना पकडून नाहींसे करावयाचा होता. कारण मुसलमानांकडून होणाऱ्या सर्व अनन्वित अत्याचारांचें बीज मुळांत ह्या चांडाळचौकडीच्या ठायीं आहे हें सर्वांना माहीत होतें. त्यामुळें पिराजीनें आपल्याबरोबर आणखी दहापंधरा तह्लख डोक्याचे व कणखर हाडापेरांचे मराठे गडी घेऊन वेषांतर करून त्या चौकडीला पकडून आणण्याचें काम आपल्या शिरावर घेतलें. त्याप्रमाणें पिराजीनें मोठ्या चतुराईनें इस्माईलला मशिदींत सर्व मुसलमान जमल्याची थाप मारून तेथून तर लांबविलेंच. अशाच आणखी कांहींना कांहीं युक्त्या करून पिराजीच्या इतर साथीदारांनीं बाकीच्या तिघांनाही रात्रभर घरोघर हिंडून हुडकलें; पण पत्ता लागेना. इतकें हुडकावें लागलें याचें कारण स्वामींच्या नेतृत्वाखालीं हिंदूंनीं मुसलमानांशीं सामना देण्याची तयारी केली आहे हीं बातमी हां हां म्हणतां वाऱ्यासारखी सर्वत्र पसरली तेव्हां मुसलमान वाघ सिंहां-सारखे क्रुद्ध होऊन उठले, व जमावानें 'दीन! दीन!' करीत गांवभर हिंडून इस्माईलचा शोध करूं लागले. त्या संतापाच्या भरांत त्यांनीं आपल्या अंग-वळणीं पडलेल्या पद्धतीप्रमाणें काय पाहिजे ते अनन्वित प्रकार करण्याला सुरवात केली. वाटेंत जो हिंदु सांपडेल त्याला ठार कर, हिंदूचें घर सांपडलें कीं त्याला आग लाव, घरांत शिरून बायका-पोरांना कापीत सूट, देवीचें देऊळ एकच त्यांच्या तावडींतून सुटलें होतें तेंही त्यांनीं आंत घुसून देवीच्या मूर्तीचा भंग करून भ्रष्टविलें व पेटविलें; इतर कुठें मारुती तर कुठें शिव-लिंग तर कुठें खळनाथ अशीं बारीकसारीक हिंदु देवस्थानें जागोजाग होतीं तीं विध्वंसिलीं, व हिंदूंच्या गोठ्यांत शिरून गाईंच्या माना चिरल्या! असा धडा प्रथम जेव्हां मुसलमानांनीं घालून दिला तेव्हां हिंदूंनींही जिवावर उदार होऊन तोच धडा गिरवण्याला सुरुवात केली. तरीही स्वामींच्या शब्दाची पुण्याई एवढी जबर कीं, हिंदूंनीं मुसलमानांच्या बायका-मुलांवर मात्र कधीं अत्याचार केले नाहींत, शस्त्र उगारलें नाहीं कीं त्यांच्या मशिदी आणि दर्गे फोडले नाहींत. पण मुसलमान मात्र सांपडला कीं काप, मुसलमानाचें घर सांपडलें कीं बत्ती ठोक, असले अत्याचार हिंदूंच्याही हातून अनेक झाले. एवढा अनर्थ ज्यांच्या कारस्थानांमुळें व शिकवणुकीमुळें झाला त्या चौकडी-पैकीं इस्माईल तर पिराजीच्या हातीं अगोदरच कैद झाला होता व त्याला

पिराजीनें स्वामींच्या सांगण्यावरून तेव्हांच्या तेव्हां ठारही केलें होतें. बाकीचे तिघे मात्र प्राणभयानें आपल्या घरांतून पळून मशिदींत लपून बसले होते. पण त्यांना हुडकून काढण्याच्या कामावर पिराजीनें ज्या लोकांची नेमणूक केली होती, ते तर त्यांचा शोध करतां करतां हरले. अखेर एकदांचे ते मशिदींत लपून बसले आहेत असा त्यांना शोध लागला. पण तेथें जाऊन पहातात तों दुसरे दहावीस मुसलमान मशिदीच्या दरवाजाशीं उभे राहून आपल्या त्या तिघां मर्द (!) पुढाऱ्यांचें रक्षण करीत होते. अर्थात् तेथें तेवढ्या हिंदूंचें कांहींच चालण्यासारखें नव्हतें.

पण तेथें त्या हिंदूंना इस्माईलच्या घरापाशीं जो एक बिन्‌मिशीचा कोंवळा मुसलमान तरुण भेटला होता, त्यानें आपल्या चातुर्याची कमाल केली. आपल्या बरोबरचे हिंदु हताश होऊन मागें सरले तेव्हां तो तरुणही कांहीं अंतर त्यांच्यासमवेत चालत गेला व कोणी ऐकत नाहीं असें पाहून हळूच त्यांना म्हणाला, "मी युक्ति करून ह्या तिघांही हरामखोरांना मशिदीबाहेर काढतों, व तुमच्यापुढें घेऊन येतों. पण तुम्ही इथें जवळपास राहतां कामा नये. कारण, तुम्ही हिंदु आहां, तुम्हांला पाहून ते बिचकतील."

प्रथम ते लोक त्या तरुणावर विश्वासेनात. पण त्यानें जेव्हां 'आतां मी सांगतों तसें तुम्ही वागणार नाहीं तर हकनाहक हे चोरही हातचे गमावून बसाल व यशोदेलाही गमावून बसाल. माझ्या शब्दावर तुमचा इतकाही विश्वास नाहीं ? पहा ! पिराजी भेटल्यावर जर तुमच्या गैरवर्तनाची कागाळी मीं त्याच्यापाशीं केली तर—तेव्हां मुकाट्यानें माझें ऐका व दूर जा' असें सांगितलें तेव्हां त्या लोकांना दूर जाणें भाग पडलें. इतकेंही करून ते दूर गेले नसते; पण ह्या तरुणाची व त्यांची भेट झाल्यापासून ह्याच्या नसानसांत मुसलमानांविषयींचा द्वेष कसा सळसळत आहे हें त्यांनीं प्रत्यक्ष पाहिलें होतें, त्यावरून हा पिराजीचा जिवलग स्नेही आहे याविषयीं त्यांना शंका उरली नव्हती. त्यामुळें लगेच ते लोक निमूटपणें दूर निघून गेले. ते त्या तरुणाशीं बोलत होते, तों त्यांच्या मागें काळोखांत दुसरे दोघे तरुण तें आडवशाला उभे राहून ऐकत होते याची त्यांना दादच नव्हती.

"मीं सांगितलें तेंच खरें. चल आपण पुढें जाऊंच." आडवशाला उभे

राहिलेल्या दोघां तरुणांपैकीं एक दुसऱ्याला म्हणाला व आपल्या सोबत्याचा हात हातीं धरून तो तरुण उभा होता तेथवर चालत गेला.

" कोण आहे ? " त्या उभा असलेल्या तरुणानें दचकून विचारलें.

लपत येणाऱ्या तरुणांपैकीं एक त्या तरुणाच्या दरडावण्यानें न भितां तसाच पुढें गेला व त्याच्या कानाशीं लागून म्हणाला, " भिऊं नको, आम्ही कोणी शत्रु नाहीं..."

आणखी कांहींतरी त्या तिघांचें बोलणें झालें. तें काय झालें तें ऐकूं येण्याला कांहीं मार्ग नव्हता. पण 'मग घ्या तर परमेश्वराचें नांव व चला धावत धावत. इतक्या वेगानें जायचें कीं, त्या चांडाळांना वाटलें पाहिजे हे खरोखरच इस्माईलनें पाठविलेले लोक आहेत'. असें तो पूर्वीचा मुसलमान तरुण म्हणाला, व लगेच जीव घेऊन धावत सुटला. त्याच्या मागोमाग त्याचे नवे साथीदारही धावत सुटले.

" हकीमसाहेब ! फकीरसाहेब ! काजीसाहेब ! " मशिदीपर्यंत पोंचतांच त्या मुसलमान तरुणानें घाबऱ्या घुबऱ्या मशिदींत घुसत गडबडून काजी-साहेब समोर उभे होते त्यांना विचारलें, " फकीरसाहेब व हकीमसाहेब कुठें आहेत ? इस्माईलखानांनीं आम्हांला त्यांच्या रक्षणासाठीं पाठविलें आहे."

इस्माईलचें नांव ऐकतांच व त्या मुसलमान तरुणाची इतकी तारांबळ उडालेली पाहून हे इस्माईलनेंच पाठविलेले लोक असावे, याविषयीं मशिदीं-तील एकाही मुसलमानाला शंका राहिली नाहीं. ते तरी इतका वेळ इस्माईलची काय गत झाली असेल ह्या फिकिरींतच होते.

हकीमसाहेबांनीं पुढें येऊन विचारलें, " इस्माईलखान कुठें आहेत ? "

" ते कांहीं मुसलमानांना बरोबर घेऊन गांवाबाहेर एक देऊळ आहे त्या देवळाच्या आश्रयाला गेले आहेत व त्यांनीं हकीमसाहेब, काजीसाहेब व फकीरसाहेब ह्या तिघांना सुरक्षितपणें तेथवर घेऊन यावयाला सांगितलें आहे. एथले हिंदु फार खवळले आहेत. शिवाय तिकडून शाहूमहाराजांचें अफाट सैन्यही आमच्यावर चालून येत आहे. अशा स्थितींत—इस्माईल-खानांचें असें सांगणें आहे कीं, पहिली गोष्ट, आपला चौघांचा जीव वांचवा-वयाचा व मग बाकीच्या मुसलमानांचें रक्षण कसें करावयाचें किंवा शत्रूशीं

सामना कसा द्यावयाचा याचा विचार करावयाचा. पण हकीमसाहेब व फकीरसाहेब कुठें आहेत? त्यांना म्हणावें, लौकर चला."

"पण आम्हांला जावयाला रस्ता कोणता?" खोजाहुसेननें हळूच पुढें होऊन विचारलें.

"रस्ता आम्हांला माहीत आहे. आतां बोलण्यांत वेळ दवडूं नका. लौकर चला." दुसऱ्या दोघां तरुणांपैकीं एकजण म्हणाला.

काजीसाहेब त्या तिघांही तरुणांना ओळखूं शकले नाहींत पण त्यांच्या कळकळीवरून ते आपल्या कैवाऱ्यांपैकीं असावे अशी त्यांची खात्री झाली. इतक्यांत त्या मराठा तरुणांनीं भाकित केल्याप्रमाणें खरोखरच हिंदूंची एक मोठी टोळी 'हरहर महादेव!' अशी गर्जना करीत मशिदीच्या अनुरोधानें येऊं लागली.

"चला, लौकर चला. ही पहा हिंदूंची टोळधाड आली!" तो मुसलमान तरुण अधिकच घाबरा होऊन म्हणाला.

"चला." असें म्हणून फकीर खोजाहुसेन, हकीम शौकतखान व काजीमहंमद लगबगीनें त्या तिघा तरुणांच्या मागोमाग निघाले.

इकडे त्या मुसलमान तरुणाबरोबरचे लोक पिराजीपाशीं गेले व त्याला त्यांनीं घडलेला प्रकार सांगितला, तेव्हां इस्माईलचा कायमचा शेवट आपण लावलाच, आतां तो फकीर, तो हकीम व काजी असे तिघे सांपडले कीं पूर्ण चांडाळचौकडी हातीं सांपडल्यासारखी झाली; शिवाय तो मुसलमान तरुण आपणांला यशोदेचाही पत्ता सांगणार आहेच; असें पाहून पिराजीला व नारायणस्वामींनाही अत्यानंद झाला.

पण सर्वांचा तो आनंद अखेर फोल ठरला! हकीम, फकीर वगैरे मंडळींला फसवून आणण्याचें ज्या मुसलमान तरुणानें कबूल केलें होतें, तो ती रात्र संपली, दुसरा दिवस उजाडला, दिवस संपला, पुन्हा रात्र उजाडली व तीही संपली, तरी माघारा आलाच नाहीं. तिकडे मुसलमान आपल्या पुढाऱ्यांचा शोध करीत होते, इकडे हिंदु ते कोठें लपले असतील म्हणून फिकिरींत होते, पण कुणालाच कांहीं पत्ता नाहीं. मुसलमानांना वाटलें, त्यांना हिंदूंनीं पळविलें असेल, म्हणून ते चिडले; हिंदूंना वाटलें, त्यांना मुसलमानांनीं लपवून ठेवलें असेल, म्हणून ते चिडले; शिवाय यशोदा शोध शोध शोधूनही कोठें हातीं

लागेना म्हणून पिराजी चिडला. पिराजीला यशोदा सांपडली पाहिजे होती ती पुन्हा तो तिला आपल्या संसारांत नांदविणार होता म्हणून मुळींच नाहीं; ती पतिता नारी आहे, नाथाजी-पिलाजीच्या नादानें ती बाटलेली आहे, याविषयीं त्याचा संशय अजून कायम होता. पण ती किंवा अन्य कोणतीही हिंदु स्त्री मुसलमानाच्या हातून भ्रष्टविली जाऊं नये असा एक प्रकारचा अभिमान त्याला होता, व यशोदा अजून तशी बाटली गेली नाहीं असें त्याला कळलें होतें. त्यामुळें तिला मुसलमानांच्या तावडींतून सोडवून मग ठार करावयाची असा त्याचा मानस होता. पण फुकट !

इतकें सारें होऊन अखेर सर्वच तिरपागडें होण्याचा समय येऊन ठेपला. दीड दिवसांत मुसलमानांनीं जिकडे तिकडे आकांत करून सोडला. त्यांच्यासमोर हिंदूंचा टिकाव लागला नाहीं. गांवांतील दरोबस्त हिंदूंचीं घरेंदारें जाळून बेचिराख करण्यांत आलीं. स्वामींच्या उपदेशाप्रमाणें हिंदु मुसलमानांना मारतां मारतां मेले, व त्यांची ही दशा पाहून आजूबाजूच्या गांवांतील लोक मुसलमानांच्या अत्याचाराला भिऊन आपापल्या घरांत कड्या लावून बसले. मुसलमानांचें मात्र उलट झालें. त्यांनीं ह्या दंग्याला जिहादीचें—धर्मयुद्धाचें—स्वरूप आणतांच आजूबाजूच्या पंचक्रोशींतील मुसलमान त्या जागीं धावून आले. इतका मुसलमानांचा जमाव झाल्यावर त्यांच्यासमोर हिंदूंचा टिकाव लागणें शक्यच नव्हतें. बहुतेक हिंदु मरून पडले व त्यांचीं म्हातारींकोतारीं माणसें, बायका-मुलें व अजून त्यांच्या संरक्षणासाठीं धडपडणारे मूठभर मराठे ही सारी मंडळी स्वामींच्या सभोंवार दूर जंगलांत जमा झाली. पिराजी आपल्या मतें लढाईची शिकस्त करीत होता; पण त्याला पुरेसें मनुष्यबळच नव्हतें. स्वामी तरी काय करणार ! ते आतां सर्वस्वीं हतबल झाले होते. जे लोक त्यांना कालपर्यंत दुवा देत होते तेच आतां 'आपल्यामुळें हा सारा अनर्थ झाला; आमच्या नाशाला कारण आपण' असा त्यांना दोष देऊं लागले होते. हळुहळू मुसलमानांनीं तें जंगलही घेरलें. आतां मात्र हिंदूंना कांहींच तरणोपाय नाहींसा झाला. हिंदूंना कोंडून मुसलमानांनीं प्रथम इस्माईलला शोधलें; पण त्याचा मुडदा मात्र त्यांच्या हातीं लागला. त्यामुळें तर मुसलमानांना स्वामी व इस्माईलची हत्या करणारा पिराजी यांच्याविषयीं अत्यंत चेव आला. अखेर ह्या दोघां काफिरांना पकडून आमच्या स्वाधीन

कराल तर आम्ही तुमच्या माणसांना जिवंत सोडूं, नाहींपेक्षां एकजात सर्वांना कापून काढूं असें मुसलमानांनीं स्वामी व पिराजी यांच्या सभोंवार घोळका करून बसलेल्या हिंदूंपाशीं बोलणें लावलें व ते नामर्द हिंदु त्या तडजोडीला तयारही झाले. आतां मरण तर टळत नाहीं, मग निष्कारण हत्या तरी कां होऊं द्यावी असा विचार करून स्वामी व पिराजी आपण होऊनच शत्रूच्या स्वाधीन होण्याला तयार झाले. तोंच—!

* * *

'यतो धर्मस्ततो जयः' ही भगवदुक्ति अन्यथा कशी होईल! अगदीं ऐन वेळीं बाळाजीपंत, बाजीराव, स्वामी ही मंडळी आपल्या अफाट सैन्यासह तेथें येऊन धडकली. त्यामुळें सर्व पारडें एकदम फिरलें. ती सागरप्राय विशालसेना पाहतांच मुसलमानांचीं धाबीं दणाणून गेलीं, मग प्रत्यक्ष सामर्थ्यांत ते काय टिकणार! थोडा वेळ चकमक झाली न झाली, व इतका वेळ स्वामी व पिराजी यांचा जीव घेण्यासाठीं टपलेल्या त्या मुसलमानांना जीव घेऊन डोंगरांत पळून जावें लागलें.

अशा अकल्पित रीतीनें शत्रूचा मोड झाला, तेव्हां कुठें नारायणस्वामी, ब्रह्मेंद्रस्वामी, बाळाजीपंत, पिराजी वगैरे मंडळीला एकमेकांचा परामर्श घेण्याला फावलें.

इतकें सारें झालें, तरी हकीम, फकीर व काजी यांचा त्यांना घेऊन पळणाऱ्या त्या मुसलमान तरुणाचा मात्र शोध लागला नव्हता. त्यामुळें अर्थातच यशोदेचाही पत्ता नव्हता. त्या तरुणाचा शोध लावण्यासाठीं पिराजीचे लोक सारखे हिंडत होते; पण शोध कांहीं लागेना.

आतां त्या मुसलमान तरुणाचा शोध कुठें कसा करावा या फिकिरींत सर्व असतां व्यासराव अकस्मात् काठी टेंकीत टेंकीत धापा टाकीत बोलाई-च्या डोंगराकडून तेथें आला व उभयतां स्वामी आणि बाळाजीपंत यांना भेटून म्हणाला, "यशोदा व ते तिघे मुसंडे आमच्या हातीं लागले आहेत; आपण त्यांच्याविषयीं चिंता करण्याचें कारण नाहीं."

"याचा अर्थ काय?" नारायणस्वामींनीं विचारलें.

इतर सर्वांनाही ही वार्ता ऐकून विस्मय वाटला. त्यांनीं व्यासरावावर

नानापरींनीं प्रश्नांचा भडिमार केला. पण व्यासरावाचें एकच उत्तर, "माझ्या-च्यानें जास्त बोलवत नाहीं. आपण या व पहा म्हणजे कळेल."

व्यासराव ज्याअर्थीं इतकें सांगतो, त्याअर्थीं तें खरेंच असेल असें सर्वांना वाटलें. लगेच शाहूमहाराजांना ह्या विजयाची वार्ता कळविण्याची व्यवस्था करून सर्व मंडळी कंठाजी व मानाजी यांना तेथल्या बंदोबस्तासाठीं ठेवून नारायणस्वामींबरोबर त्यांच्या निवासस्थानाकडे जावयाला निघाली. व्यासराव पुढें चालूं लागला व ती मंडळी त्याच्या मागोमाग सडी चालूं लागली.

## दर्शन तिसावें

## 'पेशवाईचें ध्रुवदर्शन'

व्यासरावानें वाट चालतां चालतां यशोदा, कमळा व कमळजा यांच्या पराक्रमाची हकीकत त्यांच्या तोंडून ऐकली होती तशी सर्व मंडळीला सांगितली, तिचा सारांश असाः—" यशोदा मोकळी सुटली ती इस्माईलच्या घरांत जाऊन त्याच्या बायकोला व मुलाला वाटेला लावून आपणाला कोणीं ओळखूं नये म्हणून इस्माईलच्या घरांतील पुरुषी पेहराव चढवून बाहेर पडली. इकडे कमळा व कमळजाही इस्माईल वगैरे मंडळीला ठार करण्यासाठीं अधीर झाल्या होत्या, त्याही आपली प्रकृति बरी आहे असें पाहून वेषांतर करून आपणाला सांगून गुहेबाहेर पडल्या. त्यांची व यशोदेची अवचित गांठ पडली. त्यांनीं एकमेकींना ओळखलें व त्या आपसांत संगनमत करून त्या तिघां बेरडांना मशिदीबाहेर घेऊन आल्या त्या इस्माईलकडे जावयाचें म्हणून थेट स्वामींच्या निवासस्थानांत आल्या. इस्माईलला पिराजीनें पकडून नेलें हें यशोदेला त्याच्या साथीदारांकडून अगोदरच कळलें होतें. यशोदेच्या मुसलमानी वेषानें सारे लोक फसले तसे ते तीन बेरडही फसले. पुढें स्वामींनीं फिकिरींत पडूं नये म्हणून आपण ही बातमी देण्यासाठीं येथवर आलों."

हें वर्णन करणारा व्यासराव व तें त्याला प्राणाहूनही प्रिय अशा यशोदेच्या पराक्रमांचें वर्णन! शिवाय तें खरें! मग तें ऐकून सर्वांनीं त्या तिघी मुलींचें—विशेषतः यशोदेचें—कौतुक केलें तर त्यांत नवल तें काय! अशा गोष्टी बोलत बोलत व्यासराव व बाकीची मंडळी नारायणस्वामींच्या निवासस्थानाकडे जाण्यासाठीं निघाली. ती बोलाईच्या डोंगरांतील गुहेंतून न जातां बाहेरच्या रस्त्यानें नारायणस्वामींबरोबर भुलेश्वराच्या डोंगरांतून दीड प्रहर दिवसाला भुलेश्वराच्या देवालयांत जाऊन पोंचली. लगेच नारायणस्वामी व व्यासराव हे दोघे प्रथम बाकी मंडळी बाहेर उभी करून देवालयाच्या गाभाऱ्यांत गेले, व गाभाऱ्याचा दरवाजा लावून घेतला. तोंच नाथाजी व पिलाजी पूर्वसंकेतानुसार कृष्णरावाला कैद करून मोठ्या बंदोबस्तानें तेथें घेऊन आले.

त्यांनीं येतांना सेनापतीचा पुरा मोड झाल्याची विश्वसनीय बातमी आणल्या-मुळें व कृष्णरावही हातीं लागल्यामुळें सेनापतीच्या कुटिलकारस्थानाचा शेवट झाला याविषयीं आतां कोणाला शंका उरली नाहीं. ह्या कारस्थानाच्या मुळाशीं असलेला षड्रिपूंपैकीं एक रिपु इस्माईल अगोदरच जगांतून नाहींसा झाला होता. दुसरा रिपु सेनापति, तो पळून गेल्यामुळें त्याचाही शेवट झाल्यासारखाच होता. घाटगे हा दुय्यम रिपु अगोदरच दूर गेला असल्यानें त्याचा विचार करण्याचें कांहीं कारण नव्हतें. राहतां राहिला कृष्णराव व काजी-फकीर-हकीम हें त्रिकूट. पैकीं कृष्णरावानें बाळाजीपंत व ब्रह्मेंद्रस्वामी यांना भेटतांच आपला सारा ताठा विसरून त्यांच्या पायांवर लोटांगण घातलें व यापुढें शाहूमहाराजांची एकनिष्ठपणें सेवा करण्याचें शपथेवर कबूल करून क्षमेची याचना केली, तेव्हां बाळाजीपंत व स्वामी या उभयतांनाही त्याची दया आली. बाळाजीपंतांनीं ब्रह्मेंद्रस्वामींचें मत विचारलें तेव्हां ब्रह्मेंद्रस्वामी म्हणाले, "हा गुन्हेगार असला तरी जातीनें ब्राह्मण आहे. यास एकवार क्षमा करावी."

बाळाजीपंतांनाही परशरामपंत प्रतिनिधि व श्रीपतराव यांची राजनिष्ठा पाहून कृष्णरावाला एकवार अपराधाची गय करावीशी वाटली. त्यांनीं त्याला शाहूमहाराजांकडून अभय मिळवून देण्याचें वचन देऊन नाथाजी व पिलाजी यांना आज्ञा केली, "कृष्णरावाला मोकळा करा."

नाथाजी व पिलाजी यांनीं आपल्या धन्याचा हुकूम पाळला; पण त्यांना त्यांत नाराजी वाटली. नाथाजीनें तर बोलूनही दाखविलें, "धनीसाहेब! ह्या अपराध्यावर आपण अशी दया केली तर आम्हीं त्याला एथवर आणण्याचे श्रम घेतले त्यांचें चीज काय?"

"तुमच्या श्रमांचें चीज धनीसाहेब अन्य उपायांनीं करतील, मग तर झालें?" बाजीराव हंसत हंसत म्हणाला. नाथाजी व पिराजी यांनीं त्या हास्याचा अर्थ ओळखला; पण ते बोलले मात्र नाहींत.

थोड्या वेळानें नारायणस्वामी देवालयाबाहेर आले. बाळाजीपंतांनीं त्यांना विचारलें, "स्वामी! व्यासरावानें दिलेली बातमी खरी काय?"

"होय. खरी आहे. पण त्या मंडळीची भेट एका अटीवर होईल." नारायणस्वामी म्हणाले.

"ती अट कोणती?" बाळाजीपंतांनीं विचारलें.

नारायणस्वामी नाथाजी व पिलाजी यांना पाहून प्रसन्न मनानें म्हणाले, "तुम्ही दोघेही आलां, बरें झालें." लगेच ते बाळाजीपंताकडे वळून म्हणाले, "हा विजय माझ्या धर्मकन्यांनीं मिळविलेला आहे. त्यांची तुमच्या ह्या तिघां शतवीरांविरुद्ध तुमच्यापाशीं अशी फिर्याद आहे कीं, हे तिघेही आपल्या बायकां-विषयीं उगाच भलभलते संशय घेतात. त्यांचा बंदोबस्त अगोदर व्हावा."

बाळाजीपंत नाथाजी, पिलाजी व पिराजी यांच्याकडे वळून म्हणाले, "ही तुमच्याविरुद्ध फिर्याद आहे. यावर तुमचें म्हणणें काय?"

नाथाजी व पिलाजी यावर कांहींच बोलले नाहींत. कमळा व कमळजा यांच्याविषयीं म्हणण्यासारखा अविश्वास त्यांच्या मनांत नव्हता. पण यशोदे-च्या अब्रूशीं आपला—विशेषतः नाथाजीविषयीं—गैरसंबंध पिराजीनें लावून दिल्याचें त्यांना माहीत असल्यानें पिराजी यशोदेविषयीं जें बोलेल, त्याचेंच अनुकरण करून करण्याचें त्यांनीं तेथल्या तेथें उभयतांत संगनमत करून मुक्रर केलें. कारण, कमळा व कमळजा यांनीं त्या दोघांविषयीं पिराजी-प्रमाणेंच गैरसमज करून घेतला होता, हें त्यांना माहीत होतें. तो गैरसमज पिराजीनें यशोदेचा स्वीकार केल्यास आपोआप दूर होईल असें त्यांना वाटत होतें.

पण पिराजीचा संशय असा साधा नव्हता. तो त्याच्या मनांत इतका दृढमूल होऊन बसला होता कीं, यशोदा जर एकटीच त्याच्या हातीं सांपडती, तर त्यानें वेळीं तिचा खूनही केला असता. पण एवढी खासे-मंडळी समोर असल्यानें तसें कांहीं बोलण्याला त्याला धीर होईना. पण यशोदेचा त्याग तर करावयाचाच व नाथाजी व पिलाजी—विशेषतः नाथाजी तिला कुमार्गाला लावणारा हरामखोर आहे हेंही सिद्ध करावयाचें अशा इराद्यानें त्यानें सर्वांनाच अवघड पेंच घातला, "फिर्यादींना जर आपली निर्दोषता सिद्ध करावयाची असेल,—कमळा व कमळजा यांविषयीं मला कांहींच बोलावयाचें नाहीं. त्या इतके दिवस मुसलमानांच्या हातीं होत्या. पण त्यांचे नवरे त्यांना चालत असेल तर खुशाल त्या दोघींनाही पुण्य पतिव्रता मानून पदरीं घेवोत. पण माझ्यापुरतें मी बोलतों, यशोदेनें तप्त-लोह-दिव्य करून आपली निर्दोषता सिद्ध केल्यास मग माझी कांहीं हरकत नाहीं."

पिराजीच्या भाषणांतील टोमणा नाथाजी व पिलाजी यांना खासा झोंबला. त्यांना जनलज्जेसाठीं तरी त्याचीच रीऽऽ ओढावी लागली. कमळा व कमळजा यांच्याविषयीं त्यांनींही तप्त-लोह-दिव्याचीच अट घातली. मनुष्य एकवार इरेला पेटल्यावर काय करणार नाहीं !

ही दिव्याची अट सर्वांनाच भयंकर वाटली तरीही हा नवरा-बायकोंचा संबंध, यांत बोलणार कोण ! पण इतरांना बोलण्याला अवसर मिळण्यापूर्वींचा देवाच्या गाभाऱ्यांतून 'आम्ही तिघीही दिव्य करायला तयार आहों' असें सडेतोड उत्तर मिळालें, तेव्हां प्रश्नच मिटला !

" मग करा तर ! " पिराजी म्हणाला. नाथाजी व पिलाजी तेंच म्हणाले.

सर्वानुमतें तेथल्या तेथें दिव्य करावयाचें ठरलें. यशोदा, कमळा व कमळजा यांना घेऊन व्यासराव बाहेर आला. लगेच देवालयाबाहेर अग्नि पेटवून त्यांत तीन लोहगोल तापत ठेवण्यांत आले. पिराजीनें जवळच्या पिंपळाचीं बरींच पानें तोडून आणलीं. व्यासरावानें आपल्या हातानें देवालयाच्या सभामंडपांत देवाच्या अंगाऱ्याच्या कुंडांतील अंगारा घेऊन सात मंडलें काढलीं. सातव्या मंडलाच्या शेवटीं तीन ठिकाणीं तिघींच्या नांवानें गवत ठेवण्यांत आलें. यशोदा, कमळा व कमळजा देवासमोर हात जोडून उभ्या होत्या. लोहगोल निखाऱ्याप्रमाणें तप्त होतांच व्यासरावानें त्या तिघींनाही दोन्ही हात पसरावयाला सांगून त्यांवर पिंपळाचीं पानें ठेवलीं, व 'आतां मी तुमच्या हातावर हे तप्त लोहगोल ठेवीन. ते घेऊन तुम्हीं हीं सात मंडलें ओलांडून जावयाचें व पलीकडच्या निरनिराळ्या गवतावर एकेकीनें आपल्या हातांतील लोहगोल टाकावयाचा. जिचें गवत पेटेल ती निर्दोषी; नाहीं ती दोषी' अशी त्यांची नीट समज पाडून तिघींच्याही हातांवर एकेक लोहगोल ठेवला. तिघीही निर्भयपणें एकेक मंडल ओलांडीत चालल्या. आतां परिणाम काय होतो इकडे सर्वांचें लक्ष वेधून राहिलें होतें; इतक्यांत तिघींनींही सप्तमंडलें ओलांडून जाऊन सांगितल्याप्रमाणें केलें. त्यांच्या हातांतील लोहगोल गवतावर पडतांच तिघींच्याही गवतानें पेट घेतला. त्याबरोबर सर्वांच्या तोंडून उद्गार निघाले, " धन्य ! धन्य ह्या पतिव्रता ! "

" आतां तरी आम्ही तिघीही पवित्र आहों अशी सर्वांची खात्री झाली ना ? " यशोदेनें विचारलें.

" हो ! झाली." सर्वजण एकमुखानें उत्तरले. आनंद तर सर्वांनाच झाला. पण त्यांत व्यासरावाचा आनंद विशेष होता. आपली यशोदा पातिव्रता ठरली असें पाहतांच त्यानें तिला हृदयाशीं धरून 'माझा कृष्णा गेला तो गेला; ती झाली गोष्ट कांहीं नव्हेशी होत नाहीं; पण आतां तूं पूर्ण दिवसांनीं बाळंत होशील तेव्हां तोच माझा बाळ पुन्हा तुझ्या उदरीं जन्माला येईल. त्याला पाहून व तुम्हां दोघांचा संसार सुखानें चाललेला पाहून मग सुखानें मरेन' असे उद्गार काढले. नाथाजी व पिलाजी यांच्याविषयींचा त्याच्या मनांतील संशयही आपोआप दूर झाला. पिराजी-यशोदा, नाथाजी-कमळा व पिलाजी—कमळजा ह्या तीन जोडप्यांनीं प्रथम देवाला व नंतर सर्वांना नमस्कार करून त्यांचे आशीर्वाद मिळविले. पिराजी मनांतल्या मनांत यशोदेला आजवर दोष दिल्याबद्दल कमालीचा खजील झाला. कमळा व कमळजाही— पण आतां ती प्रेमळ जोडपीं त्यांचें तीं पाहून घेतील. आपण कशाला त्यांत बोला !

" आतां तीन रेडे आम्ही तिघींनीं पकडून आणले आहेत, ते आपणां सर्वांसमक्ष श्रीखंडोबाला बळी देणार." असें म्हणून तिघीही आंत गेल्या, व काजी महंमद, फकीर खोजाहुसेन आणि हकीम शौकतखान यांना हात पाय बांधलेले असे फरफरां बाहेर ओढून घेऊन तरवारींनीं सज्ज होऊन आल्या. त्या वेळीं तो देखावा अस्वलांना धरून आणणाऱ्या दरवेशांसारखा सर्वांना अत्यंत कुतूहलजनक वाटला.

त्या तिघांनाही बाहेर आणण्यांत येतांच ते उभयतां स्वामी व बाळाजीपंत यांचे पाय धर धरून प्राणदानाविषयीं परोपरीनें विनवूं लागले. पण अशा मूर्तिमंत कलहपुरुषांना प्राणदान कोण करील !

यशोदा त्या तिघांनाही उद्देशून म्हणाली, " ह्या तिघांना आम्हीं जें आणलें जें इस्माईलकडे पाठविण्यासाठीं आणलें; तें त्यांना बरोबर पत्त्यावर पोंचते केले पाहिजेत." कमळजा फकिराकडे वळून म्हणाली, " फकीरसाहेब ! तुमच्यासारखे धर्मवीर क्वचित् पहावयाला सांपडतात. तुम्ही लोकांना काय शिकवितां, एक काफीर मारला किंवा एका काफिराची स्त्री भ्रष्ट केली कीं

त्या मुसलमानाला हज केल्याचें पुण्य लागतें, व मरणोत्तर स्वर्गांत त्याला रुचकर शराब प्यावयाला आणि सुंदर सुंदर परी चैनीला मिळतात. अशा किती तरी काफिरांना व व त्यांच्या स्त्रियांना तुम्हीं चौघांनीं आजवर बाटवून कितीतरी हजच्या यात्रा केल्याचें पुण्य संपादन केलें आहे. त्यासाठीं तुमचा अल्ला तुमच्यावर खूष होऊन शराबेचीं पिंपें व परींचे तांडे तुमच्या तैनातीसाठीं तयार ठेवून तुमची वाट पहात स्वर्गाच्या देवडीवर उभा आहे."

"हो! तिकडे यांना लौकर पाठवायला हवें!" कमळा म्हणाली.

"आम्ही वचनाला जागणाऱ्या स्त्रिया आहों. इस्माईलकडे तुम्हांला पाठवायचें हा आमचा-तुमचा करार." यशोदा पिराजीकडे वळून म्हणाली, "यांचा साथीदार कुठें गेला तेवढें सांगा ना? तेवढी वाट दाखवा ना?"

"वाट दाखवूं? दाखवतों. जरूर वाट दाखवतों." पिराजीनें नाथाजी व पिलाजी यांच्याकडे पाहून कांहीं खूण केली; त्याबरोबर तिघांच्याही तरवारी म्यानांतून सर्कन् बाहेर आल्या व त्यांनीं 'हीच ती वाट' असें म्हणून त्या तिघाही मुसलमानांचीं शिरें धडावेगळीं केलीं. लगेच त्यांच्या रक्तानें तेथली भूमि राड होऊन गेली.

ते तिघे नीच मनुष्य मेले म्हणून कोणालाही वाईट वाटलें नाहीं; उलट आनंदच वाटला. पण यशोदा कमळा व कमळजा मात्र कांहींशा गगावल्या. त्या आपसांत कांहींशा कुरकुरत होत्या. पिराजीनें पुढें होऊन यशोदेला विचारलें, "यशोदे! तुम्हांला कुरकुरावयाला काय झालें?"

यशोदा लटक्या रुसव्यानें उत्तरली, "इस्माईलला तुम्हीं मारलें ती शिकार परती तुम्हीं साधली. पण आम्ही यःकश्चित् बायकांनीं कोंडलेल्या सावजांची तुमच्यासारख्या मर्दांनीं असली जनानी शिकार करावी हें कांहीं मर्दांच्या मर्दांनी बाण्याला शोभत नाहीं!"

कमळा नाथाजीकडे वळून म्हणाली, "शिवाय आम्हांला नवस फेडायचा होता, तो तसाच राहिला!"

"अस्सें! अस्सें!" पिराजी हंसत म्हणाला, "तो नवस काय, आणखी असे किती तरी रेडे बळी देऊन किती तरी वेळां फेडतां येईल."

"आतां आपण सर्व मंडळीनें शाहूमहाराजांच्या दर्शनाला जावयाचें. त्यांना माझ्या शतवीरांच्या एकीहून एक मर्दुमकीच्या गोष्टी ऐकून किती आनंद

होईल!" बाळाजीपंत म्हणाले, "आपली मोगलांवरील मोहीम यशस्वी झाली नाहीं तरी आपण आपल्या शत्रूंचा बीमोड करूं शकलों हीही कांहीं लहान, सान गोष्ट नाहीं."

"आणि सरकार! मोहिमांचें एवढें कसलें महत्त्व? आपण आमच्या मस्तकावर असेंच कृपाछत्र धरून उभे आहां तोंवर आमच्यासारखे शतवीरच काय पण सहस्र वीर–लक्ष वीर आपल्या वतीनें प्रत्यक्ष काळाशींदेखील झगडण्याला समर्थ आहेत."

"तें तर खरेंच! तसें नसतें तर आज इतक्या संकटांतून आमचा बचाव झालाच नसता." बाळाजीपंत म्हणाले, "आतां राजधानींत गेल्यावर आम्ही पहिली गोष्ट कोणती करूं तर ती ही,–आमच्या शतवीरांच्या पराक्रमांचे पोवाडे शाहूमहाराजांना ऐकवूं."

बाळाजीपंतांच्या कृतज्ञताबुद्धीचें सर्वांना कौतुक वाटलें. श्रीभुलेश्वराचें दर्शन करून सर्व मंडळी साताऱ्याच्या मार्गाला लागली.

* * *

बाळाजीपंत वगैरे मंडळी साताऱ्याला जाऊन पोंचण्यापूर्वींच सर्व खबर शाहूमहाराजांच्या कानांवर गेली होती. तिकडून सरलष्कर व पुरंदरे यांचें सैन्य व इकडून बाळाजीपंतांचें सैन्य अशीं दोन्ही सैन्यें जेव्हां विजयोत्साहानें प्रफुल्लवदन होऊन राजधानींत प्रविष्ट झालीं, तेव्हां शाहूमहाराजांच्या ढांसळ-ल्या मनाला पुष्कळ धीर आला. त्यांचें मन ढांसळूं लागलें होतें तें अशा-साठीं कीं, मराठशाहीच्या शरीरावरील अंतस्थकलहाची जखम दिवसें-दिवस इतकी चिघळत होती कीं, या जिवावरच्या संकटांतून मराठशाहीचा बचाव कसा करावा हेंच त्यांना कळेनासें झालें होतें. गेल्या चार दिवसांत-च तिकडे जाधव उघड उघड मोगलांना मिळाला, घाटगे व पेशवे आंग्र्यां-वर चालून गेले तोंच त्यांतले पेशवे आंग्र्यांसमोर पराभूत होऊन पळाले व घाटगे आपल्या स्वभावजन्य बद्नेकीला अनुसरून आंग्र्यांना ताराबाईच्या पक्षाला वश करून घेण्याच्या वाटाघाटींत गढून गेले आहेत, अशा बातम्या येऊन थडकल्या, व आंग्र्यांचें पारिपत्य करण्यासाठीं कांहीं फेरयोजना करणें अवश्य होऊन बसलें. श्रीपतराव खटावकरावर चालून गेला, ती त्यांची झुंज

तिकडे सुरूच होती व श्रीपतरावालाही कुमक पाहिजे होतीच. कोल्हापूरचे कावळे तर काव काव करून महाराजांविरुद्ध काहूर उठवीत होतेच. त्यांतच थोराताकडील ताज्या बातमीची अशी भर पडली कीं, राजेकर व नारो शंकर थोरातावर चालून गेले, त्यांना थोरातानें 'शाहूमहाराजांशीं सख्य करतों' असें सांगून व तसें करण्याविषयीं बेलभंडार उचलून त्या दोघांना सख्याची वाटाघाट करण्यासाठीं म्हणून हिंगणगांवच्या गढींत बोलावून नेलें, व विश्वासघातानें कैद करून, सख्य बाजूलाच राहिलें, उलट त्यांच्यापाशीं जबर खंडणीची मागणी केली व खंडणी न दिल्यास त्यांना राखेचे तोबरे देण्याची धमकी घातली. अर्थात् थोराताचें पारिपत्य करण्याची आवश्यकता उलट दुणावली. अशी प्रतिकूल परिस्थिति चारी बजूंनीं आ वांसून मराठशाहीला गिळंकृत करण्याला टपली असतां ह्या संकटांतून मराठशाहीला तारण्याला सर्वसमर्थ असा एकच पुरुष शाहूमहाराजांच्या नजरेसमोर होता; तो अर्थात् बाळाजीपंत हाच होय.

शिवाय बाळाजीपंत वगैरे सर्व मंडळी साताऱ्याला आली तेव्हां ब्रह्मेंद्रस्वामी, पर्शरामपंत प्रतिनिधि, सरलष्कर, पुरंदरे वगैरे सर्व मंडळींची बैठक भरवून शाहूमहाराजांनीं त्यांचें मत घेतलें तेव्हां त्या मंडळींचा विचारही शाहूमहाराजांच्या विचाराशीं तंतोतंत जुळला. कृष्णराव प्रतिनिधि बाळाजीपंतांचा एवढा द्वेष्टा; पण तोही तेवढ्यापुरता तरी बाळाजीपंतांच्याच वतीनें बोलला. शाहूमहाराज कृष्णरावावर चिडले होते, तरी बाळाजीपंतांनीं वचन दिल्याप्रमाणें महाराजांकडून त्यांना क्षमा करविली. इतक्या मंडळींचें अनुकूल मत मिळाल्यावर व बहिरोपंत पिंगळे पेशवे आपल्या बद्करणीनें पेशवेपदाला नालायक ठरल्यामुळें शाहूमहाराजांनीं बाळाजीपंतांना सन्मानपूर्वक पेशवेपद देण्याचें ठरविलें. बाळाजीपंतांना लोकसंग्रह कसा करावा हें पूर्णपणें कळत असल्यानें त्यांनीं महाराजांपाशीं वजन खर्च करून जाधवांच्या बदनेकमुळें रिकामें झालेलें सेनापतिपद सरलष्करांना देवविलें व सेनापतीची उणीव भरून काढली. तसेंच सचिवांची थोरवी महाराजांच्या मनाला पटवून देऊन सचिवांचा पुत्र नारोशंकर याला सचिवपद देवविलें व प्रतिनिधीचें प्रतिनिधिपदही त्यांना देवविलें. पुरंदरे बाळाजीपंतांच्या विश्वासांतले, तेव्हां त्यांना महाराजांनीं पेशव्यांची फडणिशी सांगितली. अशी कारभारीमंडळाची

पुनर्घटना होऊन बाळाजी विश्वनाथ 'पेशवे' यांच्या प्रभुत्वाखालीं मराठशाही-च्या चिरस्थायित्वासाठीं नवी योजना मुक्रर करण्यांत आली.

* * *

दुसऱ्या दिवशीं शाहूमहाराजाचा मोठा दरबार भरला व त्या दरबारांत पूर्वनिश्चित अधिकारदानें करण्यांत आलीं. त्या समयीं शतवीरादि निःसीम सेवकांचा महाराजांकडून बाळाजीपंतांनीं यथोचित गौरव करविला; त्या गौरवाचें वर्णन करावें तेवढें थोडेंच होणार आहे.

वस्तुतः पेशवाईचें ध्रुवपद शाहूमहाराजांनीं आपल्या राज्याभिषेकाच्या वेळींच बाळाजीपंतांना मनानें दिलें होतें, तें आज जनांत दिलें. पांच वर्षां-पूर्वीं या ध्रुवताऱ्यावर जीं परिस्थितीचीं दाट अभ्रें आलीं होतीं, तीं आज दूर होऊन आज 'ध्रुवदर्शन' झालें. महाराष्ट्रां लि पेशवाईचा गुढीपाडवा आज साजरा झाला. आतां शाहूमहाराजांनीं बाळाजीपंतांना पेशवेपद अर्पण करण्यांत योग्य पुरुषाची योग्य स्थानीं निवड केली हें ऐतिहासिक सत्य वाचकांना 'पेशवाईचा ध्रुव ढळला !' या कादंबरीमय पेशवाईमधील चौथ्या कादंबरीवरून कळून येणारच आहे. तोंपर्यंत या नव्या भाग्यशाली पेशव्याला व त्याच्या सहाकाऱ्यांना मराठशाहींतील बखेडे मोडण्यासाठीं इथेंच सोडून देऊन ब्रह्मेंद्रस्वामी, नारायणस्वामी व राजकार्यधुरंधर शाहूमहाराज यांच्या पुण्यचरणांना वंदन करून त्यांची पुढील यशस्विता अवलोकन करण्यासाठीं अल्पकाल विश्रांति घ्यावी हेंच उचित होय.

